# श्री ज्ञानेश्वरी

(सुबोधिनी)

अध्याय अकरावा

"विश्वरूपदर्शन योग"



फलटण

१९५६

डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर

# प्र स्ता व ना

## अध्यायसंगति किंवा विषयप्रवेशासहित लघुसा सारांश

**"देवभक्ताचा संगम । तेथें नाम ओघ त्रिवेणीचा ॥"**

पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥ १ ॥
तयाचे चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥ २ ॥
देव इच्छी रजचरणाची माती । धांवत चालती मागेंमागें ॥ ३ ॥
काय तया उरलें वेगळें आणीक । वैकुंठ नायक जया कंठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें नाम ओघ त्रिवेणीचा ॥ ५ ॥

अकरावा 'विश्वरूपदर्शनयोग' अध्याय अकराव्या अध्यायासारखाच ! त्याच्या जोडीला दुसरी जोड नाहीं. दुसरे कोठेंही असें दर्शन नाहीं. रूपें, आकृति, आकार, अवर्णनीय रस, अद्‌भुत दर्शनें, रसांचा तोल इत्यादींनीं हा अध्याय अप्रतीमतेच्या कोटीचा ! बुद्धीस नच आकळणारा असा ! तेथें मन, बुद्धि, ज्ञान, इंद्रियें ह्यांची तारांबळच होणारी ! श्रृंगार, करुण, रौद्र, भयानकादि रसांचा केलेला नयनोत्सवच एक, रस प्रसंगानेंच सरता होतो. एरव्हींचें तेंहीपण प्रसंगावरच सरसतेचें होणारें ! जगांचींही जगें ह्या एकाच विश्वानें, विश्वरूपानें आपल्या ओळखीचीं म्हटलीं, परमात्म्याचें तें पूर्वजपण, पुरातनपण ते 'भोक्तारं यज्ञ तपसाम् । सर्व लोक महेश्वरम्, सर्व भूत सहृदम्' असा ज्या मला जाणून शांति, विश्रांति पावतील असा देवाधिदेव तो अलौकिक लोकोत्तर सर्व भूतमात्रांनीं एकमतानें अनुरक्ततेनें मानलेला जगाचेंही जग का देवांचाहि देव असा हा !

जयजयाजी अहो स्वामिन् ! हे देवाधिदेवा ! हे विश्वजगतांच्या ब्रह्मांडाच्या ईश्वरा ! अनंतरूपा ! देवेशा ! जगन्निवासा ! सर्वव्यापी विश्वेश्वरा ! देववृक्षसृष्टिनिर्मात्या ! हे विश्वरूपा, आपला जयजयकार असो ! मी आपल्याला नमस्कार करतों.

जेथून महान अशा सिद्धींचीं मूळपीठेंच निर्माण होतात, शिणलेली लक्ष्मी जेथें विश्रांति पावते, जें स्थान महात्म्याचें सिंहासन होतें, जो सुरतरुची सृष्टीच, उल्हासिलेला कण्ठच ज्याचा लोकोत्तर दिव्यमालांनीं विलसत आहे, जेथें अनेक पूजोपचार सन्मानाचे होऊन आहेत, आकाश वस्त्रसंरक्षणार्थ धारण केलें आहे. आकाश व पृथ्वी यांमधील अंतर आणि दाही दिशा तुम्हीं एकट्यानेंच व्यापलेल्या आहेत, ज्यानें अति उत्तम अशी स्वर्गीय कुसुमेंच धारण केलीं आहेत, स्वर्गानें सूर्याचें सर्वच्या सर्व तेज पांघरण्याचें केलें आहे. पीतांबरधारी रूप–सुवर्णासारखें पिवळें तेज–देदिप्यमान होऊन आहे. जणुं पंधरा नंबरच्या उत्तम सुवर्णानें मेरू पर्वतास मढिलें आहे, जसें का चंद्रम्याची घडीच एक उकलली तशी चंदन पंजरी, चंदनाची उटी, ज्या स्वरूपाच्या सर्वांगीं आहे, ज्याच्या सुगंधानें वेदवती जी त्या पृथ्वीला जीवित जोडलें आहे. जणुं क्षीरसमुद्र शुभ्र उदकानें पांघरला, कैलास पर्वत पाऱ्यानेंच जणुं डंवरिला. अशा विश्वरूपाच्या शृंगाराची शोभाच प्रकाशणारी जेथें अशा तुम्हांला नमन असो ! असा तुमचा जयजयकार असो. सर्व जगत् विभक्त तें एकस्थ झालेलें तुमच्या देहांत पाहून मूक भावानें मी पुन्हां पुन्हां नमस्कार करतों. जय हो, अहो श्रीदेवा ! मी तुमच्या देवदेहामध्येंच कीं सत्यलोक पहात आहें. आतां जगदाश्चर्याचें स्थान असलेल्या विश्वरूपाला मी सविनय नमन करतों.

" हे देवाधिदेवा ! अविद्यारूपी समुद्रांत पडलों ! विषयरूपी जाळयांत सांपडलों ! स्वर्गसंसाराच्या दोन्हीं तऱ्हांनीं पेंचांत पडलों ! आतां आमची सोडवण ती तुम्हांवांचून कोण बरें करील ? तुम्हांस आम्हीं जीवेभावेंकरून शरण आलों आहों. असें भ्यायलेले सुरसंघ तुम्हांला प्रार्थित आहेत. महर्षि, सिद्ध, विविध

विद्याधर समूह "जगताचे कल्याण असावें!" असा आशीर्वाद मागत आहेत. वायुदेव जे तुम्हीं त्या तुम्हां वायुदेवांस नमस्कार असो. यमदेव जे तुम्हीं त्या तुम्हां यमदेवांस नमस्कार असो. वरुणदेव जे तुम्हीं त्या तुम्हां वरुणदेवांस नमस्कार असो. अग्निदेव जे तुम्हीं त्या तुम्हां अग्निदेवांस नमस्कार असो. पितामह जे तुम्हीं त्या तुम्हां पितामहांस नमस्कार असो. शशांक जे तुम्हीं त्या तुम्हां शशांकांस नमस्कार असो. प्रपितामह जे तुम्हीं त्या तुम्हां प्रपितामहांस नमस्कार असो. आदिदेव जे तुम्हीं त्या तुम्हां आदिदेवांस नमस्कार असो. विश्वान्तर्गत रुद्र जे ते तुम्हीं त्या तुम्हां रुद्रांस नमस्कार असो. रुद्र ते तर विस्मित होऊन देवाची ती महामूर्ति अवलोकन करीत आहेत, विश्वान्तर्गत आदित्य जे ते तुम्हीं त्या तुम्हांस नमस्कार असो. विश्वान्तर्गत वरुण जे ते तुम्हीं त्या तुम्हांस वरुणास नमस्कार असो. विश्वान्तर्गत साध्य जे ते तुम्हीं त्या तुम्हां साध्यास नमस्कार असो. विश्वान्तर्गत विश्वदेव जे ते तुम्हीं त्या तुम्हां विश्वदेवास नमस्कार असो. विश्वान्तर्गत अश्विनौदेव जे ते तुम्हीं त्या तुम्हां अश्विनौदेवास नमस्कार असो. विश्वान्तर्गत उष्मप जे ते तुम्हीं त्या तुम्हां उष्मपांस नमस्कार असो. विश्वान्तर्गत गंधर्व जे ते तुम्हीं त्या तुम्हां गंधर्वांस नमस्कार असो. विश्वान्तर्गत सुरसिद्धसंघ जे ते तुम्हीं त्या तुम्हां सुरसिद्धसंघांस नमस्कार असो.

बहिऱ्यास ऐकूं येत नाहीं म्हणून काय कधीं गाणें बंद होईल? खडकावर पाऊस पडल्यास काय उपयोग, म्हणून मेघानें वर्षण्याचें कांहीं सोडलें नाहीं. चाताकाला एक थेंब पोहोंचता करण्यासाठीं संबंध जगच मुळी पावसानें भिजवलें जातें. मला दिसत नाहीं म्हणून आपण दर्शन देण्याचें नच कराल असें नाहीं. तुम्हीं मला दर्शन द्यालच द्याल. कामधेनु जी सर्व जगास अर्थ पुरविते तिची वांसरें पाहावें तों उपाशीं असें कधीं असेल काय?

रस हा प्रसंगानेंच सरता होतो. एरव्हीं आपलें असणें हें प्रसंगावरच कीं सरसतेचें होतें. शृंगाररसांतील स्थायीभावी स्त्रीपुरुषांमधील परस्पर प्रेमभाव 'रति' हा असतो. त्याप्रमाणें रुसवा रागावणें, भांडण–तंडण, इत्यादि सुपरीत विपरीत, व्यभिचारी भाव परस्पर असले तरी 'रति' ती कायमची असते. त्याप्रमाणें कर्म, ज्ञान, उपासना, कांडांचे संबंध विपरीत जरी असले, तरी मुख्यत्वेंकरून उपासनेवरच जोर दिलेला असतो. तो उपासनेनें व्यक्त होतो व तसा तो उपासनेनें व्यक्त व्हावयास पाहिजेच हें केव्हांही! म्हणून उपासना ही सर्वश्रेष्ठ होय.

उपासनेचा हेतु म्हणजेच यज्ञपुरुष जाणणें होय. जेथें प्रगटतेनें साक्षात् (यज्ञपुरुष प्रगट झालेला) तेथें पुरुष तोच प्रतीतीस, प्रीतीस आणलेला झाल्यानें, जन्माचें साफल्य, कृतकृत्यता पदरांत पडलेली व ऐक्य बोधतेवर तोच देवकोटीमध्यें बसलेला होतो. मनुष्यप्राणी हा देहानें मर्यादित असला तरी मनानें अमर्यादित असतो. मन हें विकाराचें बनलेलें व त्यावर अनेक बरे वाईट संस्कार (का संसर्ग) झाल्यामुळें विकाराचीं, कामुकतेचीं पुटांवर पुटें बसल्यानें तें शुद्धि पाहात नाहीं. बुद्धि ही मलीन असते. जेव्हां बुद्धि शुद्धि पाहील, तेव्हांचमुळीं मनावरचीं विकारमय पुटें निवळतात व अमर्याद अशा विश्वरूपाचें नित्याचें, नित्यानंदाचें विश्वदर्शन केवळ उपासनेच्या जोरावर (देहीं असे देव हाचि भाव खरा। वांया तूं सैरा धांवो नको ॥) या अमर्यादित देहांत दिसूं लागतें. तेथें यज्ञपुरुष निमित्तमात्रहि न विसंबलेला झाल्यामुळें उपासना ही खऱ्या अर्थानें 'उपासना' ह्या शब्दास सार्थ होते, शोभूं लागते. हें विश्वरूप या देवतुल्य देहांत का देवदेहांत पाहावयास मिळतें; म्हणून संतदर्शन हेंच जीवितसाफल्य होय.

नीळ कमळांना रांबवून आकाशाला रंग लाविला, तेजाची झांक दाखवून इंद्रनील मणी (काळा मोठा भ्रमर मन भ्रमर) पुढें केला. (कंठीं धरिला कृष्णमणि अवघा जनी प्रकाश) अंगाचा परिमळ झुलुकल्यामुळें पाचुचे असे जाहाले. आनंदासच भुजा निघाल्या; ज्याचे गुडघ्यानीं मदनास शोभा आली, मस्तकास मस्तक मुगुट झाले. अंगामुळें श्रृंगारास शृंगार झाला, आंगचि शृंगार झालें. मेघाच्या बैठकीवर इंद्रधनुष्य

झळकतें त्याप्रमाणें वैजयंतीनें शारंगपाणी कृष्णास वेष्टिलें आहे. गदेचें उदारपण असुरांनांही मोक्ष देतें. चक्र सौम्य तेजानें मिरवत आहे, असें तें पाहाण्यास मी उत्कंठित झालों आहें. तसे चतुर्भुज तुम्हीं व्हा !!

तुम्हांवांचून ह्या जगीं दुसरें कांहींही नाहीं. तरीसुद्धां मी आणि तुम्हीं अशी आमच्या तोंडची निराळेपणाची भाषा निघते.

अभ्र संपल्यावर सूर्यमंडळामध्यें दृष्टीचा प्रवेश होतो. प्रकृति आड होती ती देवांनीं बाजूस केली—परती सारिली व मगच परतत्व तें बुद्धीच्या शेजारचें केलें. बुद्धीला ब्रह्मच भेटलें, म्हणून देवाविषयीं जीव भरंवशाचा झाला आहे. विश्वरूप तें कांनीं ऐकावें, डोळ्यांत भरून घ्यावें, म्हणून चित्त उतावीळ होऊन आहे. जीव तळमळत आहे. विश्वरूप पाहिल्याशिवाय सुख होईना, विश्रांति भेटेना. मजवर कृपा अनुग्रह करण्यासाठीं ब्रह्म जें अनिर्वाच्य तें वाच्य केलें. स्वभाव-ज्ञान सांगितलें त्यायोगें माझा मोह (बाजूस झाला) गेला.

जाणतेपणानें स्वप्नावस्थेंत ब्रह्मकटाह अनंत ब्रह्मांडें आपणच झाला आहे. तेथें बाह्य मुद्रा सोडिली, स्थूल दृष्टीचा पडदा फेडून टाकिला. योग ऋद्धीच उघडिली. हा पाहील किंवा नाहीं अशी आठवणच नाहीं. स्नेहातुरतेनें पाहा पाहा म्हणत आहे. दिव्य दृष्टीशिवाय तेथें अर्जुन नच पण देवच ते जागते असें—अर्जुनास दिव्य दृष्टि दिल्यावरच, श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा देह ज्ञानमय केल्यानंतरच अर्जुन पाहूं देखूं लागला व त्यास दिव्य दर्शनें दिसूं लागलीं.

अमोल वस्तु घेऊन ती स्वतःच टाकून देणें, विश्वरूपाएवढी दशा तेथें प्रीति कशी बरें वाढती होणारी होते ! ते उमज जाणून ऐस, उत्तमत्व तेथें सर्व घेतलें तर उपदेशच महत्वानें आपलासा केला, सर्वस्वच ह्या विश्वरूपास दिलें होतें—विश्वरूपच सर्वस्वाचें केलें होतें.

अंग सोडून सांवली—छायाच एक आलिंगित आहेस—तें कांहीं मी नव्हे. चतुर्भुजाचे नामरूपास आलेल्याचे अवगणियेचें जें त्याचें प्रेम धरीत आहेस. अजून तरी, नामरूपात्मकाची आकृतीस आलेल्याची आस्था सोड. विश्वरूपाची अनास्था करूं नको. हे रूप घोर विकृत जरी तरी हेंच कृतनिश्चयाचें कर. विश्वरूपापासून आपला सद्भाव निघूं न द्यावा.

अहो, माझ्या जीवींचे जाणणारे तुम्हीं अहो ! देवाच्या देवा, हा जो मी तुमचें पूजन करून आहें, त्या मजवर प्रसन्न व्हा !

"तूं विटेवरी सखये बाई हो करीं कृपा । माझे मन लागो तुझिया पायीं हो करीं कृपा ।। तूं सांवळे सुंदरी हो करीं कृपा । लावण्य मनोहरी हो करीं कृपा । निजभक्ता करुणा करीं हो करीं कृपा ।। १ ।। पंढरपुरी राहिली । डोळां पाहिली । संते देखिली वरूनि विठाई वरूनि विठाई सच्चिदानंद अंबाबाई हो करीं कृपा । उजळकुळदीपा । बोध करी सोपा येऊनि लवलाहि येऊनि लवलाहि ।। ध्रु० ।। तुझा देव्हारा मांडिला । हो करीं कृपा । चौक आसनी कळस ठेविला हो करीं कृपा । प्रेम चांदवा वर दिधला हो करीं कृपा । ज्ञान गादी दिली बैसाया हो करीं कृपा । वरी बैसविली आदि माया हो करीं कृपा । काम क्रोध मद मत्सर दंभ अहंकार त्याचे बळ फार । सर्व सुख देई । सर्व सुख देई ।। २ ।। शुकसनकादिक गोंधळी हो करीं कृपा । नाचताति प्रेम कल्लोळीं हो करीं कृपा । उदे उदे शब्द आरोळी हो करीं कृपा । पुढें पुंडलीक दिवटा हो करीं कृपा । त्यानें मार्ग दाविला निटा हो करीं कृपा । आई दाविली हो मूळपीठा हो करीं कृपा । बाप रखुमादेवीवर सुखसागरू त्याला नमस्कार सर्व सुख देई सर्व सुख देई ।। ३ ।।

आपण दाखविलेल्या विश्वरूपाचे सोहळे पाहून माझे डोळे निवाले, पण आतां ती श्रीमूर्ति पाहाण्यासाठीं माझे डोळे भुकेले आहेत, त्यांना साकार कृष्णरूपाशिवाय दुसरे कांहीही पाहाणे आवडत नाहीं. व ते जर नच पाहिले तर ह्या सर्व दृश्यास मानीतच मुळीं नाहीं. अम्हांस भोगमोक्षाच्या ठिकाणीं श्रीमूर्तीच

एक महत्व घेऊन असते. म्हणून तसें तुम्हीं साकार व्हा व हें दर्शन पुरे करा. ह्या अर्जुनाच्या बोलण्याचें विश्वरूपास आश्चर्य वाटलें.

दान, पुण्य करावें, त्याचें फळ हेंच चतुर्भुज! तेथीलची आवड आम्हांस फार आहे. ते पाहाण्यासाठीं आम्हीं जे कष्टानें असतों, संकटानें असतों, ते कष्ट का संकट दूर करून आम्हांस चतुर्भुज रूप पुन्हः दाखवा, देखणें करा.

"गोडपणे जैसा गूळ। तैसा देव झाला सकळ ॥ १ ॥
आतां भजूं कोणे परी। देव सबाह्य अंतरीं ॥ २ ॥
उदका वेगळा। नव्हे तरंग निराळा ॥ ३ ॥
हेम अलंकार नामी। तुका म्हणे तैसे आम्हीं ॥ ४ ॥

ज्याप्रमाणें गुळाची गोडी आंत बाहेर सारखीच असते, तसा आतां देव सर्वत्र गोड शांततेनें व्यापून आहे. तेथें भाज्य भजक भाव हा रहात नाहीं. देव आंतबाहेर सर्व ठिकाणीं व्यापून आहे. तरंग म्हणजेच समुद्र—उदक त्याप्रमाणें जीव हा नामधारकरूपी शिवच होऊन आहे. जीवितरूपी सुवर्ण हे अलंकारामुळें अनेक नांवांचे होते. त्याप्रमाणें संत जे आम्ही ते जाणावेत, असें तुकोबाचें वचन आहे."

सगुण स्वरूपाची शोभा ही चतुर्भुज रूपानें वर्णिली आहे. हें चतुर्भुज रूप परमेश्वरांनीं त्यांच्या भक्तांचा छळ करणाऱ्या नास्तिकांना आस्तिक्य बुद्धीचे करण्याकरितां—सरळ मार्ग दाखविण्याकरितां—धारण केलें. ह्या चतुर्भुज सच्चिदानंदानंदमूर्तिरूपासंबंधीचें वर्णन :—

"सुकुमार मुखकमळ निजसार निर्मळ। सांवली सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ। झळकती दिव्य तेजें दंत माज पातळ। मिरविली मयूर पत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥ जय देवा जगदीश्वरा। धन्य रखुमाईवरा। आरती करीन काया ओवाळीन सुंदरा ॥ जय० ॥ ॥ धृ० ॥ गोजिरें ठाणमान भुजा मंडित च्यारी। शोभती शंख चक्र गदा पद्म मोहरी। हृदयीं ब्रह्मपद बाणलें श्रृंगारी। गर्जती चरणीं वांकी, कंठी कोकिळास्वरी ॥ २ ॥ घवघवित उटी अंगी बावन चंदनाची। लल्लाटी कस्तुरीचा मळवट कास पितांबराची। कटिसूत्र वरि साजिरे प्रभा। वर मोतियाची संगीत सकळ मुद्रा पाऊलें कुंकुमाची ॥ ३ ॥ सौभाग्य सुख सागर गुण लावण्य खाणी लाघवी दीनवत्सला विश्व लाविलें ध्यानीं। आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनी। धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नि॥ ४ ॥ वर्णिता ध्यान महिमा श्रुति राहिल्यां नेति। रविकोटिचंद्र तारा प्रकाशा न तुळती। उदार सुर गंभिर पूर्ण आनंदमूर्ति। तुकया बंधु म्हणे स्तवूं मी काय किती ॥ ५ ॥

वरील 'सुकुमार मुख कमळ' ह्या तुकया बंधूच्या अभंगामध्यें आल्यामुळें तेंच ध्यान होण्याचे दृष्टीनें उपयुक्त वाटलें म्हणून येथें दिलें आहे.

विश्वरूपांतलें तें 'चतुर्भुज रूप' म्हणजे आकाराचा शेवट, मोक्षाचा एकांत, जेथें आदि अंत लय पावले. विश्वाचें मूळ, योगरूप वृक्षाचें फळ, आनंदच केवळ असें चैतन्य जीवन·महाभूताचें बीज, तेजाचें तेज माझें निजस्वरूप होय. ते अनिर्वाच्य सुख बोलण्यास आलें, असें महासुख जे पुरुष आपण स्वतः झाले त्याचे प्राप्तीपर्यंत मतितार्थ तो जाणावा.

भगवंतांनीं सर्व कांहीं विश्वरूपमय करून टाकिलें. अर्जुनास तेथें अपार अशा नानाविध आकृति दिसल्या. त्या एकेकाच्या अंगप्रांतामध्यें त्यास सर्व जग दिसत होतें. डोळ्यांच्या उघडझांपीवर सूर्याच्या पंक्तीच्या पंक्ती दिसत होत्या. विश्वरूपाच्या वदनाच्या वाफेबरोबर सर्व कांहीं ज्वालामय दिसत होतें. तेथें पावकादि अष्टवसू उगवले—जन्मले—पाहिले होत आहेत. भुवयांच्या टोंकाच्या कडा मिटतांना तेथें रुद्रगणांचे संघाट अवतरत होते. साम्यतेच्या ओलाव्यावर तर अपार असें अश्विनौदेव जन्मत होते. कानामध्यें

अनेक वायु होत होते. याप्रमाणें एक एका आकृतीच्या सिद्धांतावर लीलेमुळें तर देव व सिद्ध यांची कुळें जन्मत होतीं. ज्याचें वर्णन करतांना वेद बोबडे झाले, तें रूप जाणण्यास काळाचेंहि आयुष्य थोडेंच म्हटलें. ब्रह्मदेवालाही तिथला ठाव सांपडला नाहीं—नव्हता. असें श्रीविश्वमूर्तीनीं बोलणें केलें. याप्रमाणें अर्जुनास देवांनीं विश्वरूप दाखविलें, असें संजय म्हणत आहे. पण अर्जुनाला तें दिसलें नाहीं, म्हणून देवांनीं त्यास दिव्य दृष्टि दिली, अर्जुनाला ज्ञान दृष्टि लाभली. याप्रमाणें देवांनीं आपलें ऐश्वर्य अर्जुनास दाखविलें

हे सकळ अवतार ते ज्या तेज समुद्राच्या लाटा. तेथें विश्व हें त्या तेजाच्या रश्मिमुळें मृगजळासारखें दिसलें. अनादि जी चित्तरूपी नीट भूमिका, तीवर चराचर हे चित्राप्रमाणें उमटलें आहे. असें श्रीवैकुंठांनीं—आपणास—अर्जुनास दाखविलें.

त्या त्या प्रसंगानुरूप ते ते रस—मात्रा—तेथें न्याय—समर्थन योग्य ठरत होता. त्यामुळें त्याबद्दल कांहींहीं बोलतां येत नाहीं.

रस ज्या शृंगारादिक गुणावर, रागावर, द्रवावर, वीर्यावर, विषयावर म्हटला होतो.

भाव हा मनोविकाराची चेष्टा; विलास, उत्पत्ति, अभिप्राय असून तो स्पष्ट दिसतो, अनुभविला होतो.

"रवि रश्मिकळा। नये काढिता निराळा ॥ १ ॥
तैसा आम्हा झाला भाव। अंगी जडोनि ठेला देव ॥ २ ॥
गोडी साखरेपासुनी। कैसी निवडते दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे नाद उठी। विरोनि जाय नभा पोटीं ॥ ४ ॥"

किरणापासून सूर्य कांहीं निराळा करतां येत नाहीं. तसा आम्हांस भाव झाल्यानें आतां देवचमुळीं अंगीं जडून गेला आहे, अंगीं जडून राहिला आहे. गोडी साखरेपासून भिन्न नाहीं. तसा भाव व देव हे निराळें निवडिता येत नाहींत. जो नाद उत्पन्न होतो तो नभाच्या पोटींच विरून असतो असें तुकोबाचें वचन आहे.

रस हा 'रज्जूसर्प न्याय' 'शाखाचंद्र न्याय' इत्यादींनीं तो तो न्याय प्रसंगच प्रत्यक्ष येऊन तेथीलची शिस्त ही शासनतेची का न्यायाची केली होते. जसें रज्जूसर्प न्यायामध्यें रज्जूचें सर्प भासणें व तो भास खऱ्या सर्पाप्रमाणेंच कीं, देहावर, मनःस्थितीवर—मनावर परिणाम करणारा झाल्यानें तेथें बोबडीच कीं वळते, अंगच मुळीं नाहींसें होतें, सर्वांगीं घाम येणें, विकल होणें हे परिणाम दिसूं लागतात! हे कांहीं भावाबरोबर उपमिले व्हावेत हे केव्हांहीं नच! म्हणून जे का रौद्र भयानकादिनि रसच हे आपल्या रसपणांच्या कोटीचे होणारे ते! येथें लिहूच मुळीं कांहीं येत नाहीं. कारण जे कां ते ते प्रसंग कल्पनेचे म्हणावेत का उपयोगी असें म्हणावेत नच म्हणून!

श्रृंगारः शुचि उज्वलः। वीरः उत्सह वर्णनः। करुण, कारुण्य, करुणा, घृणा, दयानुकम्पाच। हास्य—हासोहास्यंच। बीभत्स विकृत। शान्त—दान्त अनुदमिते शान्तः। शमिते प्रार्थिते उदिते। अद्भुतः विस्मयोऽद्भुतमाश्चर्यंचित्रमप्यथभैरवम्। रौद्र भयंकरं प्रतिभयं रौद्रम् उग्रम्।

भयानकम् दारुणं भीषणं भीष्मं घोरं भीमं भयानकम् इत्यादींचें केलेलें. तेथें घोर अशी रात्रच एक भयंकर अशी, विष का जादुटोणाचे एक परिणाम करणारा जसा! केशरसुद्धां घोर म्हटलें. भीम म्हणजे महत्भय अशी भयंकर दुर्गा का चाबूक का वेतस्!!!

[भीषणम्—भयंकर (सा०): पारवा, व्होला, कुत्रा; आघाडीचे, महत्भय, काटेताड, (प०), भीष्म, पिशाच्च, राक्षसासारखे भयंकर, शंकर (सा०), दारुण, कठिण, दुःसह, कठोर, निंद्य, तीव्र, क्रौर्य (मृग,

पुष्य, ज्येष्ठा, व मूळ ही दारुण नक्षत्रें; रुद्र, वन्हि, शंकर उग्र, तामसी, रागीट, भयानकपणा, रागीट, उष्णता, यम, गौरी शैव (सा०), भयानकरस, हिंवाळा, धोक्याचे, भीतीप्रद, उग्रदर्शन क्रूर, शक्तिमान, जोराचा, उष्ण श्रेष्ठ, उदास, राजसेवक, जवादि मांजर क्षत्रिय व शूद्र स्त्री याचा पुत्र राऊत, अण्डिल बैल.]

अशा तऱ्हेनें ते ते प्रसंगास आलेले, प्रसंगाचे झालेले ते शासन किंवा शिस्त होय, असेंच केव्हांहि !! ह्या सर्वांवरही प्रेमरस=प्रीति, स्नेह, दया, क्रीडा, थट्टा, आनंद, इंद्र, वायु, प्रेमवती, कांता, प्रिया = का प्रीति रस तोच उत्साहाचा असून सर्वतोपरी तोच एक पुढें घेऊन चाललों तरी तेथें ईश्वरत्वच एक आपल्या राजसत्तेस का शोभेस आलेलें असे !!

अर्जुनानें मागितलें तसें सौम्य मनुष्यरूप देव झाले. तें पाहून अर्जुन म्हणूं लागला कीं, हें आपलें सौम्य मनुष्यरूप पाहून मी अर्जुनपणास आलें. मी जगलों वांचलों, असें मला वाटत आहे. मी जियालों, वांचलों; बुद्धीनें आपलें ज्ञान सांडून देऊन तिनें रानच घेतलें होतें. मन हें देहबुद्धिसहित देशधडी झालें होतें. इंद्रियें प्रवृत्तीस भुललीं होतीं. वाचा वाचकपणास बोलण्यास चुकली होती, अशी सर्व दुर्दशा या शरीरांमध्यें झाली होती. आतां पुन्हां ती प्रकृति ह्या जीवास भेटली असें झालें. श्रीमूर्तीमुळें मी जीवन होऊन आहे तुमचें मनुष्यरूप पाहाणें, हे देवराया !! म्हणजे चुकलेल्या मुलाला मायेनें समजावून स्तनपान दिल्यासारखेंच होय. विश्वरूपसागरांत मी पैसच नुसती मोजीत होतों; तों इतक्यांत निजमूर्तीस येऊन पोहोचलों. हे द्वारकेच्या मित्रा ! सुकत चाललेल्या मज झाडावर ही नुसती भेटीच नव्हे तर मेघाची वृष्टीच झाली. तहानेनें फुटलेलों मी, त्यास अमृतसिंधु भेटला; आतां जीवित भरंवशाचें असें होऊन आहे.

मनुष्य प्राण्याची दृष्टि ही विश्वेश्वरानें निर्माण केलेली सृष्टि पाहाण्याकरितां असते; ही स्थूल दृष्टि होय. त्याच्या देहांत असलेलें मन अनेक सृष्टया क्षणोक्षणीं निर्माण करीत असतें, त्याचें आकलन हे कसें होईन, हीच उत्कंठा प्रत्येक मानवाची असणार केव्हांहि ! हें अंर्तबाह्य सृष्टयांचें दर्शन व्हावें हीच मनीषा पुरातन कालापासून चालत आलेली ! बुद्धि पलीकडील तत्व तें अनुमानानें न्यायधर्माचें (जसें शाखाचंद्र न्याय रज्जुसर्पन्यायानें) आकलन करण्याचें पण ते केवळ स्वदेहानें जाणणें तें जे कोणी संत तेच फक्त करूं शकतात. मनाच्या चतुर कलांचें, तर्काच्या परमसीमेचे, शास्त्रांच्या मर्यादा ओलांडून डोळ्याच्या स्थिर कनिनिकेने पाहिलेलें वाक् विलासाचे श्रींशारदासरस्वतीचें दर्शन हें केव्हांहि भावगम्य असणारच ! देह जो "विकाराचा," तेथें त्या देहाचे विकारातीत स्वरूप सन्त देहामध्यें विलसत असतें. सर्व रस हे प्रसंगानेंच भावावर अधिष्ठित होत असतात. हा भाव शब्दातीत असल्यामुळें हा अकरावा अध्याय जो "विश्वरूपदर्शन-योग" अति कठिणतर असा, केवळ श्रीसन्त शिरोमणी श्रीज्ञानेश्वर माऊली यांच्या कृपादृष्टीर्च्या सामर्थ्यानेंच शेवटास नेला गेलेला असणारच होय !

या अध्यायांत अनेक रसांचें दर्शन एक भावावर स्थिर झालेलें असल्यामुळें शब्द तोकडे पडलेले हे असणारच !

श्रीमाऊलीच्या कृपेची याचना करणें एवढीच माझी अल्पमति जाणते. या कृपाकिरणाचा नेहमीं ध्यास लागला असल्यामुळें बापरखुमादेवीवरचें चरणीं ही कृति सविनय अर्पण करतों. ती तुम्हां संत जनांचें हृदयनिधान ठरो हीच श्रीचे चरणीं सविनय विनवणी !

॥ "श्रीपुंडलीक वरदा हरिविठ्ठल" ॥

'श्रीगुरुकृपा भवन'
ज्ञानेश्वर कॉलनी,
फलटण.
१७ मे १९५६

संतांचा दासानुदास
**डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर**

# अध्याय ११ वा—'विश्वरूपदर्शनयोग'

## – उपोद्घात –

### वेद, उपनिषद्, महाभारत यांमधील विश्वरूपवर्णन :—

विश्वरूपाचें वर्णन महाभारत, पुरुष सूक्त, श्वेताश्वतरोपनिषद्, छांदोग्य उपनिषद्, इत्यादि ठिकाणीं आलें आहे. तें कसें आहे हें सहज पाहिलेलें असावें म्हणून देत आहें. त्या सर्वांमध्यें गीतेंतील युद्धाच्या प्रसंगास अनुरूप असें विश्वरूपाचें वर्णन तें अप्रतीम असें हुबेहूब केव्हांही होय.

[१ श्वेताश्वतरोपनिषद्—]अध्याय ३ रा (१४–१७)

सहस्रशीर्षापुरुषःसहस्राक्षःसहस्रपात् ।
स भूमीं विश्वतोवृत्त्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ॥ १४ ॥
पुरुषः सर्वं एवेदं यद्भूतं यच्च भव्यम् ।
उतामृतस्यानो यदन्नेनातिरोहति ॥ १५ ॥
सर्वतः पाणि पादंयत् सर्वतोक्षि शिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १६ ॥
सर्वेंद्रिय गुणाभासं सर्वेंद्रिय विवर्जितम् ।
सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं बृहत् ॥ १७ ॥

### अतिशय जें सुख तें भूमा म्हटलें :—

आत्मा जो तेथें उत्कंठा, उत्सुकता अतिशय अशी, अतिशयतेमुळें सर्व व्यापकत्व आपलेंसें केलें, आपलेंसें झालें, तेथें मग आत्मरूपच एक चराचराच्या ठायींचें दर्शन इच्छेची पूर्तता–तृप्ति.

(२) [छांदोग्य]—आयत, मंदिर, स्थळ. (अध्याय ७वा खंड १ ते २६ सारांश)

देवर्षि नारद सनत्कुमाराकडे गेला व म्हणाला कीं मला '**ज्ञान**' सांगा. यावर **सनत्कुमारांनीं** नारदास विचारलें कीं तुला किती ज्ञान प्राप्त झालें आहे तें सांग; म्हणजे त्याच्या पुढचें '**ज्ञान**' मी तुला सांगेन. **नारद म्हणाला**—मी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व चवथा अथर्ववेद, पांचवा भारतादि इतिहास पुराण, व्याकरण (वेदांचा वेद) श्राद्धकल्प, गणीत (राशी) उत्पादकाचें ज्ञान, दैव महाकालादि शास्त्र (निधि) तर्कशास्त्र (वाक्योवाक्ये) नीतिशास्त्र (एकायनं) निरुक्त (देवविद्या) ऋग्वेदादि वेदविद्या, भूतमंत्र चतुर्वेद ज्योतिष, सर्पविद्या आणि नृत्य गीत वाद्य शिल्पादि विद्या याचें मीं अध्ययन केलें आहे; तथापि मी केवळ **शब्दार्थमात्र** जाणणारा आहे मला आत्मज्ञान झालें नाहीं. आपणासारख्या थोर पुरुषाकडून मी असें ऐकिलें आहे कीं, **आत्मज्ञानी मनस्तापाच्या म्हणजे शोकाच्या पलीकडे जातो.** पण हे भगवन् ! माझें मन ताप पावत आहे; करितां आपण मला शोकाच्या पैलतीरीं न्या. **सनत्कुमार म्हणाले**—तुला जें ज्ञान झालें आहे तें केवळ नाममात्र आहे. ऋग्वेद...ते नृत्य, गीत, वाद्य, शिल्पादि विद्या (ललितविद्या इत्यादि) हें सर्व ज्ञान नाममात्र आहे. या सर्व नामाची ब्रह्मबुद्धीनें उपासना कर. जो या नाम ब्रह्माची उपासना करितो. त्याला जेथपर्यंत नामाची गति आहे तेथपर्यंत संचार करितां येतो. नारद म्हणाला :—नामाहून अधिक कांहीं आहे काय ? यावर सनत्कुमार म्हणाले, "होय". तेव्हां नारद म्हणाला, "नामाहून अधिक जें आहे तें मला सांगा".

सनत्कुमार म्हणाले, (नारदा ऐक.) **नामाहून वाणी अधिक.** [कारण वाणी ऋग्वेद, यजुर्वेद ते नृत्य, गीत, वाद्य, शिल्पादि ललित विद्या. तसेंच स्वर्ग, पृथ्वी, वायु, आकाश, उदक, तेज, देव व मनुष्य, पशुपक्षी, गवत, वनस्पति, किडे, पतंग, पिपीलिकादि सर्व श्वापदें, धर्म–अधर्म, सत्य–असत्य, साधु–असाधु, हृदयप्रिय–हृदयअप्रिय, यांचें ज्ञान वाणीच करून देते. वाणी नसती तर धर्म–अधर्म, सत्य–असत्य, साधु–असाधु, हृदयप्रिय–हृदयअप्रिय, यांचें ज्ञान झालें नसतें. या सर्वांचें ज्ञान वाणीच करून देते; म्हणून वाणीची उपासना कर–वाणीरूपी ब्रह्माची जो उपासना करतो त्याला जेथपर्यंत वाणीची गति आहे, तेथपर्यंत संचार करतां येतो. यावर **नारद म्हणाला** :— वाणीहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमारांनीं उत्तर केलें, होय.] **वाणीहून मन अधिक आहे.** [ज्याप्रमाणें दोन आंवळे, दोन बोरें, दोन मणी मुठीमध्यें बसतात, त्याप्रमाणें वाणी आणि नाम हीं दोन्हीं मनामध्यें राहातात. मी मंत्राचा उच्चार करतों असें जेव्हां मनुष्याच्या मनांत येतें तेव्हां तो मंत्राचा उच्चार करूं लागतो; कर्म करतों असें मनांत येतें तेव्हां तो कर्में करूं लागतो. मला पुत्र पशु इत्यादि प्राप्त व्हावे असें मनानें इच्छितो तेव्हां तो त्यांच्या प्राप्तीचा उद्योग करूं लागतो व त्याला त्यांची प्राप्ति होते. हा लोक व परलोक प्राप्त व्हावे असें मनानें इच्छा करतो तेव्हां त्याला ते प्राप्त होतात. सारांश, मन हाच आत्मा आहे, मन हे लोक आहे, मन ब्रह्म आहे, म्हणून मनाची उपासना कर. जो मनरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला मनाची गति जेथपर्यंत आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारदानें विचारलें, मनाहून अधिक कांहीं आहे काय? यावर सनत्कुमार म्हणाले, होय.] **मनाहून संकल्प अधिक आहे.** [जेव्हां मनुष्य संकल्प करतो, तेव्हां त्याच्या मनांत जे विचार येतात ते विचार तो वाणीनें प्रकट करतो, व त्याला नांव देतो. त्या नांवामध्यें मंत्र (शब्द) एकत्र होतात; मंत्रामध्यें–शब्दांमध्यें कर्मांचा अंतर्भाव होतो; म्हणजे मंत्राच्या योगानें कर्में होतात. या मन आदि सर्वांचा संकल्पामध्यें अंतर्भाव होतो. हीं सर्व संकल्परूप आहेत, संकल्पामध्यें स्थित आहेत. स्वर्ग, पृथ्वी यांनीं जणूं काय संकल्पच केला आहे. वायु आकाश यांनींही संकल्पच केला आहे. उदक, तेज यांनीं संकल्प केला आहे. त्यांच्या संकल्पामुळेंच **वृष्टि** उत्पन्न होते, वृष्टीमुळें **अन्न** होतें. अन्नामुळें **प्राण** होतात. प्राणामुळें **मंत्र** होतात. मंत्रामुळें **कर्में** होतात. कर्मांमुळें कर्मफल (लोक) होतें; कर्मफलामुळें **सर्व** होतें. अशा प्रकारचा संकल्प आहे, म्हणून संकल्पाची उपासना कर. जो या संकल्पाची उपासना करतो तो स्वतः ध्रुव (शाश्वत), प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित लोक पावतो. जेथपर्यंत संकल्पाची गति आहे, तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं संकल्पाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **संकल्पाहून चित्त अधिक आहे.** [जेव्हां मनुष्याला चैतन्य उत्पन्न होतें, तेव्हां तो संकल्प करतो. त्याच्या मनांत विचार येतात. ते विचार तो वाणीनें प्रगट करतो. त्याला नांव देतो. त्या नांवामध्यें मंत्र एकत्र होतात–मंत्रांमध्यें कर्मांचा अंतर्भाव होतो. या (मन आदि) सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव होतो; हीं सर्व चित्तरूप आहेत. चित्तामध्यें स्थित आहेत, म्हणून **कोणी मनुष्य पुष्कळ ज्ञानी असला तरी तो जर चित्तरहित असेल तर त्याचें तें सर्व ज्ञान हें ज्ञान नाहीं असें म्हणतात;** कारण जर याला ज्ञान असतें तर हा चित्तरहित कसा असता? **पण अल्पज्ञ असा असून जर तो चित्तयुक्त असेल तर त्याजपासून त्याचें ज्ञान श्रवण करण्याची लोक इच्छा करतात.** म्हणून या मन आदि सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव आहे. चित्त हा आत्मा आहे, चित्त स्थान आहे. म्हणून तूं चित्ताची उपासना कर. जो चित्तरूपी ब्रह्माची उपासना करतो तो स्वतः ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता, ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित असे लोक पावतो. जेथपर्यंत चित्ताची गति आहे, तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, चित्ताहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **चित्ताहून ध्यान अधिक आहे.** [पृथ्वी जणूं काय ध्यान करते; अंतरिक्ष जणूं काय ध्यान

करतें, स्वर्ग जणूं काय ध्यान करतो. उदक जणूं काय ध्यान करतें, पर्वत जणूं काय ध्यान करतात, देव व मनुष्य जणूं काय ध्यान करतात, म्हणून या लोकीं जे मनुष्यामध्यें महत्व पावतात, ते आपल्या ध्यानाच्या फलाचाच अंश उपभोगीत आहेत, असें समजावें. **ज्यांना ध्यान नाहीं ते कलहप्रिय, परदोष, परोक्ष, आणि प्रत्यक्ष सांगणारे असे क्षुद्र होतात.** जे ऐश्वर्ययुक्त असतात ते आपल्या ध्यानाच्या फलाचा अंश उपभोगतात; म्हणून ध्यानाची उपासना कर. जो ध्यानाची उपासना करतो त्याला जेथपर्यंत ध्यानाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, ध्यानाहून अधिक असें कांहीं आहे काय? तेव्हां सनत्कुमार म्हणाले, होय.] **ध्यानाहून विज्ञान अधिक आहे.** [विज्ञान म्हणजे शास्त्रार्थ विषयज्ञान–विज्ञानाचे योगानें मनुष्याला ऋग्वेद, यजुर्वेदापासून तों नृत्यवाद्यशिल्पादि ललित विद्या तसेंच स्वर्ग, पृथ्वी, वायु, आकाश, उदक, तेज, इत्यादींचें आणि अन्न, रस, इहलोक, परलोक या सर्वांचें ज्ञान विज्ञानाचे योगानें होतें. म्हणून विज्ञानाची उपासना कर. जो या विज्ञानाची उपासना करतो त्याला विज्ञानयुक्त व ज्ञानयुक्त लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत विज्ञानाची गति आहे, तेथपर्यंत विज्ञानाची उपासना करणाराला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं विज्ञानाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **विज्ञानाहून बल अधिक आहे.** [शंभर विज्ञानयुक्त मनुष्यांना देखिल एक बलवान मनुष्य कंप पावण्यास लावतो. मनुष्य जेव्हां बलवान असतो तेव्हां तो उठून उभा राहातो, उभा राहून (गुरूच्या समीप जाऊन गुरूची) सेवा करतो. सेवा केल्यावर गुरूला प्रिय होतो. प्रिय झाला म्हणजे तो द्रष्टा होतो. श्रोता होतो–मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. बलाचे योगानें पृथ्वी स्थित आहे. अंतरिक्ष, स्वर्ग, पर्वत, पशुपक्षी, गवत, वनस्पति, किडे, पतंग, पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व स्थित आहेत. बलानें लोक स्थित आहे, म्हणून तूं बलाची उपासना कर. बलाची उपासना जो करतो त्याला जेथपर्यंत बलाची गति आहे, तेथपर्यंत संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, बलाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **बलाहून अन्न अधिक आहे.** [सतत दहा दिवसपर्यंत अन्न खाल्लें नाहीं व तरीसुद्धां मनुष्य जिवंत राहिला तर तो अद्रष्टा, अश्रोता, मननरहित, ज्ञानरहित, कर्तृत्वरहित, विज्ञानरहित होतो. ज्याला अन्नाची प्राप्ति होते तोच द्रष्टा होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. म्हणून अन्नाची उपासना कर. जो या अन्नाची उपासना करतो त्याला अन्नानें व उदकानें युक्त अशा लोकांची प्राप्ति होते. अन्नाची जेथपर्यंत गति आहे, तेथपर्यंत अन्नाची उपासना करणाऱ्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, अन्नाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **अन्नाहून उदक अधिक आहे.** [वृष्टि झाली नाहीं तर अन्न कमी होईल, म्हणून प्राणी दुःखी होतात. जेव्हां सुवृष्टि होते तेव्हां अन्न पुष्कळ होईल, म्हणून प्राणी आनंदयुक्त होतात. ही पृथिवी, अंतरिक्ष, पर्वत, देव, मनुष्य, पशुपक्षी, गवत, वनस्पति, किडे, पतंग, पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व मूर्तिमंत उदकें होत. म्हणून उदकाची उपासना कर, जो या उदकरूपी ब्रह्माची उपासना करतो, त्याला सर्व मनोरथ प्राप्त होतात, त्याची तृप्ति होते. जेथपर्यंत उदकाची गति आहे, तेथपर्यंत उदकाची उपासना करणाराला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं उदकाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **उदकाहून तेज अधिक आहे.** [तेज वायूला घेऊन आकाश व्यापतें व तृप्त करतें, तेव्हां "ऊष्मा होत आहे, घाम येत आहे, आतां वृष्टि होईल" असें लोक म्हणतात. अगोदर तेज वृष्टीची सूचना करतें; नंतर उदक वर्षाव करतें. ऊर्ध्वमुख वांकड्या व आवाज करणाऱ्या अशा विजांनीं उदक आकाशांत संचार करतें, म्हणून वीज दिसत आहे, गडगडत आहे, वर्षाव होत आहे असें म्हणतात. याप्रमाणें तेजानेंच वृष्टीची सूचना दर्शविल्यावर उदक वृष्टि करतें. म्हणून तेजाची उपासना कर, जो तेजरूपी ब्रह्माची उपासना करतो तो तेजस्वी होतो. त्याला तेजस्वी प्रभासंपन्न, अंधकाररहित असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत तेजाची

गति आहे, तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें, तेजाहून अधिक असें कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **तेजाहून आकाश अधिक आहे.** [सूर्य, चंद्र, वीज, नक्षत्रें, अग्नि ही सर्व आकाशामध्येंच आहेत. आकाशामुळें मनुष्य हांक मारतो, आकाशामुळें ऐकतो, आकाशामुळें (दुसरा त्याला) उत्तर देतो. आकाशामध्यें मनुष्य रममाण होतो, आकाशामध्यें दुःखी होतो, आकाशामध्यें व आकाशामुळें सर्व उत्पन्न होतें. म्हणून आकाशाची उपासना कर. जो या आकाशरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला विस्तृत, प्रकाशयुक्त, पीडारहित व विस्तीर्ण गति असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत आकाशाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, आकाशाहून (श्रेष्ठ) अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **आकाशाहून स्मरण अधिक आहे.** [पुष्कळ माणसें जरी एकत्र बसलीं आहेत, पण जर त्यांना स्मरण नसेल तर त्यापैकीं कोणाचे कोणाला ऐकूं येणार नाहीं, कोणी मनन करणार नाहीं, कोणी विचार करणार नाहीं. जेव्हां त्यांना स्मरण करतां येईल, तेव्हांच त्यांना ऐकूं येईल, मनन करतां येईल, विचार करतां येईल. स्मरणानेंच मनुष्य आपल्या पुत्राला ओळखतो, पशूंना ओळखतो. म्हणून स्मरणाची उपासना कर. स्मरणाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, स्मरणाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **स्मरणाहून आशा अधिक आहे.** [आशेनें प्रेरित होऊन मनुष्य मंत्राचें अध्ययन करतो, कर्में करतो, पुत्र, पशु इत्यादिकांची इच्छा करतो, इहलोक परलोकाची इच्छा करतो. त्याचे सर्व मनोरथ आशेनें पूर्ण होतात. त्याच्या प्रार्थना फलदायी होतात. जेथपर्यंत आशेची गति आहे, तेथपर्यंत (आशेची उपासना करतो) त्याला संचार करतां येतो. यावर नारदानें विचारलें कीं, आशेहून अधिक तें कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय.] **आशेहून प्राण अधिक आहे.** ज्याप्रमाणें चक्राचे मध्यभागीं आरा येऊन मिळालेल्या असतात त्याप्रमाणें हे सर्व कांहीं प्राणामध्यें येऊन मिळालें आहे. प्राण प्राणाचे योगानें (दुसऱ्यावर अवलंबून न रहातां) गमन करतो; प्राण प्राणच प्राणाला देतो; प्राणच पिता, माता, भ्राता, भगिनी, आचार्य, ब्राह्मण, इत्यादि सर्व कांहीं आहे. जर कोणी पिता, माता, बंधु, भगिनी, आचार्य, अथवा ब्राह्मण यांपैकीं कोणाला अयोग्य भाषण बोलला तर त्याला लोक 'तुझा धिक्कार असो' असें म्हणतात; तसेंच पिता, माताइत्यादि मरण पावले असतां, त्यांना एकत्र किंवा भागशः दहन करणाराला, तूं पितृघ्न, मातृघ्न, भ्रातृघ्न, स्वसृघ्न, आचार्यघ्न, ब्राह्मणघ्न, असें म्हणूं नये. प्राणच हे पित्रादि सर्व होतो. याप्रमाणें सर्व पाहून मनन करून आणि उपपत्तिसहित जाणल्यानें **मनुष्य अतिवादी होतो. नामापासून आशेपर्यंत सर्वांच्या पलीकडील प्राणासंबंधीं बोलणारा, अथवा जाणणारा होतो.** भगवान् मी सत्यानें अतिवदन करीत आहें. असें **ज्ञान** मला द्या—**सनत्कुमार म्हणाले**—तूं सत्य जाणलें पाहिजेस :(हे सत्य आहे असें) जेव्हां ज्ञान होतें तेव्हां मनुष्य सत्यच बोलतो. ज्याला **ज्ञान** झालेलें नाहीं, तो सत्य बोलत नाहीं. म्हणून तूं ज्ञान जाणलें पाहिजे.

**सत्य जाणावयाचें असेल तर** ज्ञान जाणलें पाहिजे. ज्ञान प्राप्त होण्यासाठीं **'मनन'** केलें पाहिजे. श्रद्धा ठेवल्यानें मनुष्य मनन करितो. **निष्ठा असेल तरच** मनुष्य श्रद्धा ठेवतो. इंद्रियसंयमादि कृति करतो, तेव्हांचमुळीं निष्ठा येते. **कृति नसेल तर निष्ठा** असत नाहीं. कृति असेल तरच निष्ठा येते म्हणून कृतीचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. निरतिशय सुख प्राप्त होण्याची आशा असते, तेव्हां मनुष्य (इंद्रियसंयमादि) कृति करतो. **सुख नसेल तर** कृति करीत नाहीं. म्हणून सुखाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे; जे अत्यंत असतें तेंच खरें सुख. अल्पामध्यें सुख नाहीं. निरतिशयत्व (भूमन्) हेंच सुख. म्हणून निरतिशयाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे.

जेव्हां दुसरें कांहीं दिसत नाहीं, दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं, दुसरें कांहीं जाणतां येत नाहीं, तेव्हां

त्याचें नांव निरतिशयत्व (भूमन्); जेव्हां दुसरें पाहातां येतें, ऐकतां येतें, जाणतां येतें त्याचें नांव अल्प; जें भूमन्, तें मृत्युरहित; जें अल्प तें मर्त्य. **नारद म्हणाला**—भगवन्, तो भूमन् कशामध्यें स्थित आहे? यावर **सनत्कुमार म्हणाले,** तो स्वतःच्याच विभूतीमध्यें-(महात्म्यामध्यें) स्थित आहे आणि तो विभूतीमध्यें स्थित नाहींही. गाई, अश्व, हत्ती, सुवर्ण, दास, भार्या, शेतवाडी घरें इत्यादिकांना महिमा समजतात. हा महिमा ज्यांच्याजवळ असतो तो मनुष्य ज्याप्रमाणें (त्या महिम्याहून अन्य असून) अन्याचे ठिकाणीं स्थित असतो तसा हा भूमन् नाहीं असें मी सांगतो. **(खंड २४ वा)**

तो खालीं आहे, वर आहे, पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे तोच आहे, तोच हें सर्व आहे—(तो भूमन् जीवाहून इतर कोणी नाहीं असें दर्शविण्यासाठीं)-**अहंकारादेश सांगतात**. मीच खालीं आहें, मीच वर आहें; पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे मीच आहें. हें सर्व मीच आहें. आतां **आत्मादेश सांगतात**—आत्माच खालीं आहे, आत्माच वर आहे, पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे आत्माच आहे, हें सर्व आत्माच आहे, याप्रमाणें सर्वत्र हा आत्माच (आहे असें) पहाणारा, मनन करणारा व जाणणारा मनुष्य आत्म्याचे (स्वतःचे) ठिकाणीं रममाण होतो. आत्म्याचे बरोबर क्रीडा करतो (अद्वैत), आत्म्याबरोबरच (द्वंद्वजनित) सुख भोगतो, आत्म्याबरोबर आनंद पावतो, तोच स्वतंत्र होतो. तो सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होतो. जे याहून इतर (म्हणजे द्वैतभाव) मानतात ते (अन्य राजानः) परतंत्र होतात, क्षय पावणाऱ्या लोकाप्रत जातात. ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास असमर्थ असतात. **(खंड २५ वा)**

याप्रमाणें (सर्व आत्मरूप आहे असें) पाहाणाऱ्या, मनन करणाऱ्या व जाणणाऱ्या मनुष्याची आत्म्यांपासूनच प्राण, आत्म्यापासून आशा, स्मरण, आकाश, तेज, उदक. आविर्भवन, तिरोभवन, अन्नबल, विज्ञान, ध्यान चित्त, संकल्प, मन, वाणीनामोमंत्र कर्म आणि सर्व कांहीं (आत्म्यापासूनच) होतात. याविषयीं पुढील मंत्र आहे. हें जाणणाऱ्या मनुष्याला **मरण** येत नाहीं. **रोग** नाहीं, दुःख होत नाहीं. तो सर्व कांहीं पाहातो, त्याला सर्व कांहीं सर्व प्रकारें प्राप्त होतें. **तो सृष्टिपूर्वकालीं एक असतो. तो तीन प्रकारांनीं होतो**—५, ७, ९, ११, १११, २०,००० इत्यादि प्रकारांनीं तोच (सृष्टि कालीं) होतो, आणि पुन्हः प्रळय काळीं एकच होतो.

शुद्ध आहार असला म्हणजे अंतःकरण (सत्व) शुद्ध होतें. अंतःकरण शुद्ध असलें म्हणजे निश्चित स्मृति होते. स्मृति असली म्हणजे (अविद्यादि) सर्व ग्रंथींचा नाश होतो. ज्याचा (रागद्वेषादि) कषाय, (ज्ञान वैराग्यरूपी सारानें, क्षारानें) नष्ट होत होता का झाला होता, अशा त्या नारदाला भगवान् सनत्कुमारांनीं तमाचें अथवा अविद्येचें पैलतीर दाखविलें. त्या सनत्कुमारांना **'स्कंद'** असें म्हणतात. **(खंड २६ वा)**

## ३ [पुरुष सूक्त]:—(ऋग्वेद मंडल १० वें)

सर्वाभूतीं परमात्मा भरलेला आहे हे सांगण्यासाठीं **वेदोनारायणांनीं** विश्वरूपाचें पुरुष-सूक्तानें चांगलें वर्णन केलें आहे.

तो पुरुष हजारों डोक्यांचा, हजारों डोळयांचा, हजारों पायांचा आहे. तो पृथ्वीला चोहोंकडून व्यापून दहा अंगुळें उरला आहे. [त्या पुरुषाच्या व्यापकत्वाला सीमा नाहीं. हजारों ह्या संख्यांनीं त्याला परिमित केलें असें होईल; तसेंच दशांगुळें म्हणजे फक्त दहा बोटें एवढाच तो उरला आहे, असें म्हणण्यानेंही त्याला बंधन येतें, म्हणून येथें हा भावार्थ कीं **विश्वरूप** पुरुष सर्व पृथ्वीला व्यापूनही शिल्लकीनें आहे. (असा भावार्थ)]

तो पुरुष, हें मागील सर्व झालेलें व पुढें होणारें जें सर्व जगत् तें तोच आहे. एवढेंच नव्हे तर जें देवत्व, देवपणाचा स्वामी तोही तोच आहे. कारण प्राण्यांना भोग्य जें कर्म तें निमित्त करून कारणावस्था टाकून, कार्यावस्थेंत तो आला आहे. मागें झालेलें व पुढें होणारें, तसेंच सद्यः असलेलें जें जग, तेंही पण हाच आहे. एवढा सर्व या पुरुषाचा महिमा (म्हणजे विशेष सामर्थ्य) आहे. हा महिमा सर्वांपेक्षां जास्त आहे. हीं सर्वभूतें या पुरुषाचा चौथा अंश आहेत. राहिलेले तीन अंश (विनाशरहित असलेले ते) आपल्या प्रकाशरूप स्वरूपाचे ठायीं तीन भागांत राहिलेले आहेत. अशा तऱ्हेचा तीन अंशांचा पुरुष, ज्याला संसाराचा स्पर्श नाहीं असा – (संसाराच्या बाहेर आहे त्याचा) हा एक भाग तोच पुन्हः पुन्हः जगाची सृष्टि व संहार करीत असतो. देव, पशु इत्यादि रूपानें हा नानाप्रकारचा होऊन चेतन, अचेतन यांना व्यापून आहे. ह्या आदि पुरुषापासून ब्रह्मांडदेह उत्पन्न झाला आहे. याच्याहीवर जो परमात्मा आहे, तो जीवरूपानें देवात्म–जीव झाला. तोच विराट पुरुष मनुष्य, पशुपक्षी रूपानें झाला. नंतर यानें सृष्टि उत्पन्न केली. त्यानंतर जीवांचीं शरीरें उत्पन्न केलीं. देव शरीरामध्यें उत्पन्न झालेले **देव**, बाह्य वस्तु उत्पन्न न झाल्यामुळें सृष्टि उत्पन्न करण्याकरितां मन हाच आविर्भाव कल्पून मानसयज्ञ करिते झाले. त्या यज्ञामध्यें वसंतऋतु हें **आज्य** (तूप) होतें, ग्रीष्मऋतु ह्या **समिधा** व शरद्ऋतु हा **पुरोडाश** होता; देवांनीं यज्ञ-बर्हि म्हणजे यज्ञ करणारें जें मन त्याच्याठिकाणीं यज्ञसाधनभूत पुरुष (आणि जो अगोदर) जन्माला आलेला त्याचें **प्रोक्षण** केलें. देवांनीं त्या योगानें यज्ञ केला.

त्याचप्रमाणें साध्य व ऋषि यांनींही यज्ञ केला. (यज्ञामध्यें ज्याबद्दल हवन करतात) त्या मानस-यज्ञापासून–दहीं ज्यांत मिसळलेलें आहे असें तूप संपादन केलें. तेव्हां तेथें ज्यांची देवता वायु आहे, असे लोकप्रसिद्ध पशु (आकाशांतून संचार करणारा वायु पशुयुक्त आहे असें सांगतात.) अरण्यांतील गाई, घोडा, हरिण इत्यादि गांवठी पशु जन्माला आले. त्या यज्ञापासून (पुरुषापासून) ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे उत्पन्न झाले. तसेंच वर खालीं संचार करणारे घोडे व गाईही उत्पन्न झाल्या. तसेंच बोकड, मेंढेही जन्माला आले.

ब्रह्मदेवाचे प्राणरूप देव ज्यावेळेला विराटपुरुषाला संकल्पानें उत्पन्न करते झाले, त्यावेळेला विविध रूपांनीं त्यांनीं कल्पना केली. प्रश्न :—या पुरुषाचें मुख कोणते ? दोन हात कोणते ? दोन मांड्या कोणत्या ? दोन पाय कोणते ?

**उत्तर** :—त्याचें मुख ब्राह्मण; (हात) बाहु हे क्षत्रिय, मांड्या हे वैश्य, त्याच्या पायांपासून शूद्र जन्माला आले. मनापासून चंद्र निर्माण झाला. डोळ्यापासून सूर्य, मुखापासून **इंद्र** आणि **अग्नि**, प्राणापासून **वायु**, नाभिपासून **आकाश**, डोक्यापासून "**द्यु**" लोक, पायांपासून भूमि व श्रोत्रापासून दिशा झाल्या. अशाप्रकारें यानें लोकांना निर्माण केलें. याच्या सात परिधी आहेत. (परिधी वस्त्र, तेजोमंडल, कुंपण, क्षितिज, परिघ.) [ सात यज्ञाग्नींच्या भोवतालचा वर्तुळाकार जो भाग, तो '**परिधी**' खालच्या (अधर) बाजूला तीन अग्निकुंड वरच्या (उत्तर) बाजूला तीन अग्निकुंड व सातवा आदित्यकुंड] (समिधा–इंध्=प्रकाशणें, पेटणें, पेटविणें. इंद=ऐश्वर्य.) समिधा २१ आहेत. (१२ महिने, ५ ऋतु, ३ लोक, १ आदित्य) या विराटाचा–पुरुषाचा मानस–यज्ञ करणारांनीं विराटालाच पशु कल्पून बांधलेलें आहे, हें प्राणींद्रिय–रूप–देव, मानससंकल्पानें–प्रजापतीचा यज्ञ करिते झाले. नंतर हेच जगद्रूप विकारी पहिल्या प्रथमचे असे धर्म असते झाले. स्वर्गामध्यें **साध्यदेव** समुदायत्वेंकरून यज्ञ करिते झाले.

**४ [महाभारत उद्योगपर्व]—(३/१३१)**

भगवान श्रीकृष्ण पांडवांची बाजू मांडण्यासाठीं, शिष्टाई करण्यासाठीं दुर्योधनादि कौरवांकडे गेले असतांना, त्यांनीं दुर्योधनाला पांडवांची वांटणी देण्याबद्दल सांगितलें. तेव्हां दुर्योधन आपल्या सेनापतीला

म्हणाला कीं, 'हा कृष्ण फार ज्ञान सांगतो आहे; पकडून ठेवा याला,' तेव्हां यावर श्रीकृष्णानें दुर्योधनाला उत्तर दिलें कीं तूं, मला एकटा समजून पकडण्याची इच्छा करितोस, पण तें व्यर्थ होय; कारण या माझ्या ठिकाणीं सर्व अंधक, वृष्णी, पांडव आहेत. आदित्य, तसेंच ऋषींसह वर्तमान रुद्र आहेत. याप्रमाणें बोलून भगवान श्रीकृष्ण परमात्मा हंसले व त्यांनीं आपलें विश्वरूप दाखविलें, तें कसें होतें तर—

"ललाटाचे ठिकाणीं ब्रह्मदेव, वक्षःस्थळीं रुद्र, भुजांचे ठायीं लोकपाळ, तोंडामध्यें अग्नि, आदित्य, साध्य वसु, अश्विनीकुमार, मरुद्गण, विश्वेदेव, त्याचप्रमाणें गंधर्व, यक्ष, राक्षस यांचीही एक रूपें तेथें दिसूं लागली. उजव्या बाजूला संकर्षण आणि धनंजय अर्जुन, व डाव्या बाजूला बलराम दिसूं लागले. तसेंच, भीम, युधिष्ठिर, माद्रीपुत्र हे पृष्ठभागीं; तेथेंच अंध, वृष्णी प्रद्युम्न इत्यादिही दिसते झाले. पुढच्या भागीं श्रीकृष्णाचीं शंख, चक्र, गदा, शक्ति, शार्ङ्ग, लाङ्गल, नंदक इत्यादि आयुधें दिसूं लागली. त्यावेळीं त्या विश्वरूपाच्या नेत्र, नाक, श्रोत्र यांपासून धूमासह अग्नीच्या ज्वाला प्रगट झाल्या. रोम कूपाच्याहीं ठिकाणीं ज्वाला दिसूं लागल्या. तें भयंकर रूप पाहून तेथें सर्व राजांनीं आपले डोळे झांकलेले आहेत. त्यावेळीं द्रोण, भीष्म, विदुर आणि धृतराष्ट्र यांना वगळून, संजय आणि तपोधन ऋषि यांना श्रीकृष्णांनीं दिव्य दृष्टि दिल्या-मुळें त्यांनीं तें विश्वरूप पाहिलें. नंतर श्रीकृष्णांनीं (महाविष्णूनीं) सर्व राजांना दिव्य दृष्टि दिली; तेव्हां आकाशांतील सर्व देवांनीं दुंदुभी वाजविल्या. नंतर आंधळ्या धृतराष्ट्रनेंही मलाही विश्वरूप पाहाण्याची दृष्टि द्या, अशी श्रीकृष्णाची विनंति केल्यामुळें श्रीकृष्णानें त्यालाही दिव्य दृष्टि दिली. तेव्हां सर्वांना आश्चर्य वाटलें. नंतर श्रीकृष्णानीं आपलें रूप आवरून घेतलें.

## ५ [यशोदेला दिसलेलें विश्वरूप] :—

(१) एकदां श्रीकृष्णाला मांडीवर घेऊन यशोदा स्तनपान करवीत होती. त्यावेळीं सहज तिनें त्याच्या मुखाकडे पाहिलें; तों तिला आकाश, पृथ्वीलोक, तेज, सैन्य, दिशा, सूर्य, चंद्र, वन्हि, वायु, समुद्र, द्वीप, पर्वत, नद्या, आणि स्थावर जंगम सर्व जगत् दिसलें. हें पाहून तिला एकदम कांपरें भरलें.

(२) श्रीकृष्णाच्या बालपणीं एकदा त्यानें माती खाल्ली होती; म्हणून त्याचे गोपालमित्र यशोदेकडे आले व सांगूं लागले कीं कृष्णानीं माती खाल्ली. तेव्हां यशोदा कृष्णाला विचारूं लागली, "काय रे कान्हा, तूं माती खाल्लीस होय?" कृष्ण म्हणाला, "नाहीं ग आई, मी मुळींच माती खाल्ली नाहीं. हे सर्वजण खोटा आळ माझ्यावर घेत आहेत. तुला खोटें वाटत असल्यास पाहा!" असें म्हणून त्यानें तोंड उघडून यशोदेला दाखविलें, तोंच तिला त्या मुखामध्यें स्थावर जंगम सर्व जगत् आकाश दिशा, पर्वत, द्वीप, समुद्र, भूगोल, वायु, अग्नि, चंद्र, तारका, ज्योतिश्चक्र, पाणी, तेज, वायु, आकाश, वैकारिक इंद्रिय–(मन तामस शब्दादि मात्रा, तीन गुण.) दिसले. हें विश्वरूप पाहून ती भ्यायली व हें स्वप्न का भ्रम, का ईश्वरी लीला आहे, तें कळेना; ती स्तंभित झाली.

## ६ [अक्रुरानें पाहिलेलें 'विश्वरूप']

गोकुळांत रहाणाऱ्या कृष्ण व बलराम यांना मथुरेला नेण्यासाठीं 'अक्रूर' गेला होता. तो परत कृष्ण बलराम यांसह मथुरेस येत असतांना दुपारीं यमुनेच्या कांठीं (माध्यान्ह) संध्या करण्यासाठीं अक्रुरानें रथ थांबविला व तो (माध्यान्ह संध्या करण्यासाठीं) यमुनेंत उतरला. तेव्हां संध्या करीत असतांना त्यानें बुडी दिली तो आंतमध्यें कृष्ण दिसूं लागला. म्हणून त्यानें वर तोंड काढून पाहिलें, तो कृष्ण व बलराम दोघे रथांतच बसलेले दिसले. म्हणून त्यानें पुन्हां बुडी दिली, तेव्हां त्याला श्रीकृष्णांनीं विश्वरूप दाखविलें त्यांत सर्व देवदेवतांनीं स्तुति केलेलें हजार डोकीं ज्याला आहेत, अशा शेषाच्या अंकावर (मांडीवर) बसलेले आहेत अशा **'परमेश्वराचें'** दर्शन झालें. तो परमेश्वर कसा होता तर :—

किरीट कुंडलें धारण करणारा, सनकादिक, ब्रह्मारुद्र यांनीं, तसेंच प्रल्हाद, नारद, वसु इत्यादि श्रेष्ठ भागवतांनीं स्तवन केलेला, श्री, पुष्टि, वाणि, कांति, कीर्ति, विद्या–अविद्या, शक्ति माया यांनीं सेवन केलेला असा **'परमात्मा'** अक्रुरानें पाहिला.

## ७ [त्याचप्रमाणें बलिराजाला झालेलें विश्वरूप दर्शन असें होतें :–]

(१) जेव्हां बलिराजानें नर्मदा तीरीं 'ऋतुत्तम' यज्ञ केला होता, तेव्हां अनेक याचकांना दान देऊन संतुष्ट केलें होतें. तें पाहून देवांनीं बलिराजाचा दानशूरपणाचा 'पण' मोडावा म्हणून वामनाला (श्रीविष्णूला) पाठविलें होतें. वामनानें बलीला तीन पावलें जमीन मागितली. बलीनें जमीन देण्याचें कबुल केलें तेव्हां वामनानें आपलें खरें रूप प्रगट केलें. तें असें होतें :—

त्या परमेश्वराच्या शरीरामध्यें आकाश, दिशा, द्यु लोक, विवर (पर्वताच्या मोठमोठ्या गुहा), समुद्र, पशुपक्षी, देवऋषि बलीनें पाहिले.

पायाच्या तळव्याचे ठिकाणीं पृथ्वी, पोटऱ्यांमध्यें पर्वत, गुढघ्यामध्यें पक्षी, मांड्यांमध्यें वायूचा संघ, वस्त्राचे ठिकाणीं संध्या, गुह्य इंद्रियाच्या ठिकाणीं प्रजापति, जघनाचे (*मांड्या व कमर यांचे मधला भाग*) ठिकाणीं ज्यामध्यें बलि हा मुख्य आहे असे दैत्य पाहिले. नाभीचे ठिकाणीं आकाश, उरस्थळाचे ठिकाणीं नक्षत्रमाळा, हृदयाचे ठिकाणीं धर्म, स्तनाचे ठिकाणीं ऋत आणि सत्य, कंठाचे ठिकाणीं साम, हाताचे ठिकाणीं इंद्रादिक देव, कानाचे ठिकाणीं दाही दिशा, नाकाचे ठिकाणीं वायु, डोळ्यांचे ठिकाणीं सूर्य, वदनाच्या ठिकाणीं अग्नि, वाणीचे ठिकाणीं छंद, रसाचे ठिकाणीं जलेश (वरूण), भ्रुकुटीचे ठिकाणीं विधिनिषेध, पापण्याचे ठिकाणीं दिवस आणि रात्र, ललाटाचे ठिकाणीं क्रोध, अधरोष्टाच्या ठिकाणीं लोभ, स्पर्शाचे ठिकाणीं काम, रेताचे ठिकाणीं पाणी, पृष्ठभागाचे ठिकाणीं अधर्म, पाय टाकण्याचे (क्रमण्याचे) ठिकाणीं यज्ञ, छायेच्या ठिकाणीं मृत्यु, हंसण्याच्या ठिकाणीं माया, अंगावरच्या केंसाच्या ठिकाणीं सर्व औषधी, नाडीचे ठिकाणीं नद्या, नखांचे ठिकाणीं शिला, बुद्धीच्या ठिकाणीं ब्रह्मदेव, देवगणऋषि, इंद्रियांच्या व अवयवांच्या ठिकाणीं सर्व स्थावर जंगम भूतें हीं पाहिलीं.

एके ठिकाणीं हें सर्व पाहिल्यामुळें सर्व दैत्य मूर्च्छा येऊन पडले.

(२)　किं छत्रं किं नु रत्नं तिलकमथ तथा कुण्डलं कौस्तुभं वा
चक्रं वा वारिजं वेत्यमरयुवतिभिर्यद् बलिद्वेषि देहे ।
उर्ध्वं मौलौ ललाटे श्रवसि हृदि करे नाभिदेशे च दृष्टं
पायात्तद्वोऽर्कबिम्बं स च दनुजरिपुर्वर्धमानः क्रमेण ।

वामनावतारीं (भिक्षुक) विष्णूनें आपलें प्रचंड रूप एकदम प्रकट केलें असतां देवांगनांस सूर्य हा प्रथम त्याच्या डोक्यावरील छत्र, नंतर शिरोभागींचें रत्न, नंतर कपाळावरचा टिळा, नंतर कानांतील कुंडल, नंतर हृदयावरील कौस्तुभ, नंतर हातांतील चक्र, आणि शेवटीं नाभिस्थानाचे कमल असें क्रमाक्रमानें वाटलें तो दनुजरिपू व ते सूर्यबिंब तुमचें रक्षण करो !

## ८ [अर्जुनाला दिसलेलें विश्वरूप] :—

**प्रसंग :**—(दहाव्या अध्यायांत) श्रीकृष्णांनीं अर्जुनास विभूति सांगितल्या, त्या समजल्या किंवा नाहीं ? त्या नीट लक्षांत ठेव असें सांगितलें. तेव्हां अर्जुन म्हणाला कीं, विभूति कळल्या का नाहीं हें लक्षांत येत नाहीं; पण एवढें मात्र कळलें कीं, तुम्हीं सर्वत्र (भरलेले आहांत) व्यापून आहांत, तरी आतां तें तुमचें व्यापक असें विश्वरूप दाखवा.

## अर्जुनानें विश्वरूप दाखविण्याबद्दलचा प्रश्न कसा केला ?

ज्ञानदेव म्हणतात, अर्जुन मनांत म्हणाला असेल कीं :—हे श्रीकृष्णा, मी जरी तुझा लहानपणचा सवंगडी–खेळगडी असलों तरीसुद्धां आईसी इतका कांहीं आवडता नाहीं. तीही विश्वरूप विचारण्यास भ्यायली. तसेंच गरुड, सनकादिक यांनाही विश्वरूप विचारण्याचें धाडस झालें नाहीं. इतकेंच काय पण गोकुळांतल्या गोप-गोपिका बरोबर लहान होऊन खेळलांत, बागडलांत पण विश्वरूप कांहीं दाखविलें नाहीं. तें न दाखवून तुम्हीं ते जन लपविलेत, फसविलेत, चकविलेत. तें विश्वरूप पाहिल्याशिवाय मला कांहीं चैन पडणार नाहीं. वर जगणेंही मुश्किल होईल. बरें ! उभ्या उभ्या म्हणजे एकदमच कीं देवांना तुमचें ते गूढ–गुह्य रूप दाखवा असें म्हणूं तरी कसें ? पण आतां देवाला जसें आवडेल तसें बेताबेतानेंच विचारावें हें बरें !

**ज्ञानदेव म्हणतात**—असें विचारास घेऊन त्यानें पुसण्याविचारण्याचें केलें कीं येथें. अहो ! वांसरूं पाहिलें कीं लगेच गाय ही खडबडून उठते व मग वासरानें स्तनाला तोंड लाविल्यावर पान्ह्याला काय उशीर ? अहो ! रानावनांतही पांडवांचा सांभाळ करण्यासाठीं धांवणारे जे भगवान श्रीकृष्ण जेव्हां का अर्जुनानें त्यांना विश्वरूप दाखवा असें म्हटलें तर ते कांहीं गप्प बसणारे नव्हत. म्हणून अर्जुनाच्या विचारण्यापुसण्याबरोबर देव आपोआपच कीं विश्वरूप धारण करणारे होतील !!!

**अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला**–देवा आपण माझ्यावर अनुग्रह करून परम गुह्य असें अध्यात्म ज्ञान मजला सांगितलेंत. तें ऐकून माझा मोह (विगतः) बाजूस झाला आहे. हे कमलपत्राप्रमाणें डोळे–नेत्र असलेल्या श्रीकृष्णा, तुम्हांपासून भूतमात्रांच्या उत्पत्ति व लयासंबंधींची सविस्तर माहिती मी ऐकिली.

वाचेचा विषय नव्हे असें जें ब्रह्म तें आपण बोललांत व त्या आपल्या बोलण्यामुळें माझें समाधान झालें; पण माझ्या मनांत ह्या माझ्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष तुमचें **विश्वरूप** पहावें अशी फार उत्कंठा–उत्सुकता मजमध्यें येऊन आहे. पण तें विश्वरूप पाहाण्याची योग्यता माझेठायीं आहे किंवा नाहीं तें कांहीं मला समजत नाहीं; वर तुम्हीं म्हणाल कीं तुझी योग्यता तुजला कळलीच पाहिजे. ती तुला कां कळूं नये ! तर असें पाहा कीं रोगी कांहीं रोगाचें निदान जाणूं शकत नाहीं. अतिशय तहानेला मनुष्य तेथें तहान भागविण्यास त्यास समुद्रही पुरणार नाहीं असें म्हणतो ! बाळकाची योग्यता बालक कांहीं जाणत नाहीं, ती माऊलीच जाणते ! त्याप्रमाणें माझी योग्यता जाणून तुम्हींच मग विश्वरूप दर्शनाचा आरंभ करावा. अमृत कण वेंचण्याचे हलुवारपण तेथें चकोराच्या पिलांना–चकोरालाच काय ते तेवढें चंद्रामृत, तेथें ते इतरांना चंद्रामृत नसतें काय ? बहिरा जो त्यापुढें पंचम आलापाचें गाणें गाऊन काय उपयोग ? मेघ हा चकोरासाठींच किंवा फक्त जगावरच वृष्टि करीत नाहीं, तर व्यर्थ अशी खडकावरही वृष्टि करतोच ना ! तसें औदार्यवंत असे तुम्हीं पात्रापात्राचा विचार न करितां कोणालाहि कैवल्य-मोक्ष देतांच ना ! तुम्हांला आठवण आहे का ? पूतना जी विषाचा स्तन घेऊन मारण्यासाठीं आली होती, तिला सायुज्य मुक्ति तुम्हीं दिलीत. राजसूय यज्ञाचे प्रसंगीं अपशब्द (वाईट शब्दानें) बोलून शिशुपाळानें आपला अपराध केला; तरीसुद्धां त्याला आपणाठायीं ठाव दिलात. ध्रुव हा कांहीं अढळपद मिळावें म्हणून वनांत गेला नव्हता; पण त्यालाही अढळपद देऊन टाकलेंत. त्याला ती कसची तेथची आवड ? पोपटाला विठ्ठल, कृष्ण असें जी वेश्या शिकवीत होती तिचा उद्धार केलात. दान मागून बळीचे द्वारपाल झालांत. अहो, जी कामधेनु जगाचे सर्व मनोरथ पुरविते, तिचें वांसरूं कधीं उपाशीं राहील काय ?

अशा तऱ्हेनें अर्जुनानें विनंत्यांचा श्रीकृष्णावर भडिमार चालविला होता. श्रीकृष्ण म्हणजे कृपारूपी अमृताचा ढग व अर्जुन म्हणजे जवळ आलेला वसंतऋतु. वाटोळें चंद्रबिंब पाहून ज्याप्रमाणें समुद्राला

भरती येते, त्याप्रमाणें अत्यंत उल्लसित झाले आहेत अशा श्रीकृष्ण देवांनीं जें शेषाला, लक्ष्मीलाही दाखविलें नाहीं, तसेंच अर्जुन विश्वरूप पाहूं शकेल किंवा नाहीं याची त्याना आठवण न राहिल्यामुळें एकदम श्रीकृष्ण म्हणाले, पार्था, पाहा पाहा! माझीं अनंत विश्वरूपें! तूं एकच विश्वरूप दाखवा म्हणत होतास; पण तेवढ्यानें तुझें समाधान होणार नाहीं, म्हणून माझीं अनंतरूपें पाहा.

(१) रूपें तीं नाना प्रकारचीं, नाना रंगांचीं, नाना अलंकारांचीं, शेंकडों, हजारों व अलौकिक अशीं रूपें. बारा आदित्य, अकरा रुद्र, तीन अश्विनीकुमार, एकुणपन्नास मरुद्गण, पूर्वीं कधींहीं कोणीही न पाहिलेलीं रूपें तींही तेथें होतीं. एकत्र झालेलें चराचर याशिवाय त्या पार्थानें जें जें पाहाण्याची इच्छा केली होती तेही तेथें होतें.

(२) पण हें सर्व अर्जुनास चर्मचक्षूनीं दिसलें नाहीं म्हणून त्याला देवांनीं अलौकिक अशी दिव्य दृष्टि दिली. तेव्हां जें रूप त्यास दिसूं लागलें तें कसें होतें तर—

### अनेक अद्भुत दर्शनें—

अनेक तोंडें, अनेक डोळे, दिव्यालंकार, हातांत दिव्य आयुधें, अंगावर दिव्य माला व वस्त्रें, तसेंच अंगाला दिव्य गंधाची उटी लाविलेली होती. अनंत प्रकाशमय अशा त्या विश्वरूपाचा प्रकाश कसा होता? तर हजारों सूर्यांच्या प्रभा एकाच वेळीं एकत्र प्रकाशित झाल्या, तर कदाचित् तें विश्वरूपाच्या प्रगट प्रभेसारखें दिसेल. नाना प्रकारांनीं विभागलेल्या देहांमध्यें देव-देवता एकत्र झालेल्या दिसत होत्या.

अर्जुन तें रूप पाहून आश्चर्यचकित झाला. त्याच्या आंगावर रोमांच उभे राहिले. दोन्ही हात जोडून शिरसाष्टांग नमस्कार करून अर्जुनानें विश्वरूपाची स्तुति आरंभिली. तो देवांना म्हणूं लागला कीं,—

तुमच्या देहांत सर्व जग, निरनिराळ्या प्राण्यांचे समुदाय, कमलासनस्थ ब्रह्मदेव, पार्वतीसहित कैलासवासी महादेव, सर्व ऋषि, दिव्य सर्परूपी यज्ञसूत्रें, सर्व बाजूनीं अनंत बाहू, अनंत उदरें, अनंत मुखें, अनंत नेत्र, मी पाहात आहें.

आदिमध्यांतरहित असें तें विश्वेश्वराचें विश्वरूप मुकुट, गदा, चक्र, धारण केलेलें, सर्व बाजूनीं प्रकाशमान, तेजाचा निधि का प्रज्वलित अग्नीप्रमाणें दैदिप्यमान, जें पाहातांना डोळे दिपून जात आहेत, त्या रूपाचा अंदाज करतां येत नाहीं. सर्व ठिकाणीं जाण्यास योग्य असें परब्रह्म, विश्वाचें परम आश्रयस्थान, शाश्वत धर्माचे रक्षक, अविनाशी सनातन पुरुष, अनंत वीर्य, अनंत भुजा, चंद्र सूर्य हे डोळे, प्रज्वलित अग्नि हें मुख, विश्वाला प्रकाशवीत असणारें तें आकाश व पृथ्वी यांमधील अंतर–अंतरीक्ष व दहाही दिशा ह्या विश्वरूपानें व्यापलेल्या आहेत. अद्भुत व उग्र तेजानें त्रैलोक्यही व्यथित झालेले सुरदेव संघ विश्वरूपाचा आश्रय घेत आहेत; तर कित्येक भीतीमुळें हात जोडून नामाची–गुणाची उच्चारणा करीत आहेत. महर्षि व सिद्ध यांचे समुदाय जगाचें स्वस्ति क्षेम असो असें विश्वरूपास प्रार्थित आहेत. उत्तमोत्तम उत्कृष्ट स्तोत्रांनीं तुमचें स्तवन करीत आहेत. अकरा रुद्र, बारा आदित्य, अष्टवसु, साध्य देव, विश्वदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण उष्मप, पितृगण, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, साध्य इत्यादि विस्मित होऊन चित्तक्षुब्ध डोळ्यांनीं पाहात आहेत.

तें रूप बहु बाहु, बहु नेत्र, बहु वक्त्रें, बहु ऊरू, बहु पाय, बहु उदर, व कराल दंष्ट्रा असलेलें तें रूप पाहून सर्व लोक भयभीत झाले आहेत. तुम्हीं म्हणाल कीं, तुला लोकांच्या भीतीशीं काय कर्तव्य? तूं आपला धन्य असे विश्वरूपाचें ध्यानसुख भोग. पण अहो देवा, तसें नाहीं, तर स्वतः मीच तें उग्र, भयंकर रूप पाहून बावरून गेलों आहें. लोकांचें एक निमित्तच मीं पुढें केलें आहे. तदंगभूततेमुळें वस्तुतः माझेच प्राण भयानें व्याकुळ झाले आहेत.

तो श्रीकृष्णास म्हणाला, तुमची अग्नीसारखीं मुखें पाहून दिशा समजेनात, धैर्य येईना, शांतिही मिळेना; तेव्हां हे देवेशा! जगन्निवासा! प्रसन्न व्हा! मजवर प्रसादतेनें कृपानुग्रह करा. हे विष्णो! तुमच्या उग्र प्रभा आपल्या प्रखर तेजानें जगाला व्यापून तापवीत आहेत. असें उग्ररूप धारण करणारे आपण कोण आहांत? तें मला सांगा. हे देववर, देवश्रेष्ठा! मी तुम्हांस नमस्कार करतों. नमोऽस्तुते भगवन्! हे देववर प्रसीद, प्रसीद, प्रसन्न व्हा. आपणांस अनेक वेळां नमन असो, नमन असो. 'इच्छामि अहं भवन्तं अद्यं विज्ञातुम्.' आपण जे आदि पुरुष आहांत त्यांना तत्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे. तुमची लीला मला समजेना. तेव्हां आतां प्रसन्न होऊन असें उग्र रूप धारण करणारे आपण कोण आहांत तें जाणण्याची मी इच्छा करतों.

**श्रीभगवान म्हणाले :—**

माझा आत्मा प्रवृद्ध झाला आहे. इंद्रियें कर्माच्या ठायीं वाढ घेऊन आहेत; त्यामुळें मी वाढलेला महाकाळ आहें, असें समज. तूं युद्ध केलें नाहींस तरी येथें सैन्यामध्यें उभे असलेले योद्धे उरणार नाहींत. यासाठीं जागा हो, (युद्ध करून) यश मिळव, शत्रूंना जिंकून धनधान्यांनीं समृद्ध अशा राज्याचा उपभोग घे. सैन्यांतील सर्व शूरवीर मी पूर्वींच जिंकले आहेत. अगा हे सव्यसाची, तूं निमित्तमात्र कारण हो, शत्रूंना न भितां जिंक, युद्ध कर, रणांत तूंच विजयी होशील!

**विश्वरूपाची प्रार्थना, महति, प्रशस्ति—**

योग्यच हें कीं सर्व जग तुमच्या नामगुणप्रभाव कीर्तनानें तुमच्यावर अनुरक्त–आसक्त व्हावें. राक्षसगण प्रवाही होऊन आहेत. सिद्धसंघ तुम्हांस नमस्कार करीत आहेत.

आदिकर्त्रे, आदिमहान् आत्म्य ब्रह्मदेवाचेही आदिकर्त्रे व त्याहूनही श्रेष्ठ अशा तुम्हांस पाहून ते जे दशदिशांस प्रवाही होऊन आहेत, ते तुम्हांस कां बरें नमन करणारे होत नाहींत ते! हे अनंता! देवेशा! जगन्निवासा! सत् असत्च्याहि पलीकडील अविनाशी अशा रूपाचे, सच्चिदानंद ब्रह्म तुम्हीं.

(३) अनंतरूपा! आदिदेव तुम्हीं, पुराणपुरुष तुम्हीं, ह्या विश्वाचा आश्रय तुम्हीं, विश्व जाणणारे तेच कीं, जाणण्यास योग्य असें परमधाम, श्रेष्ठ स्थान तुम्हींच आहांत.

(४) अनंतरूप, विश्वरूप तेच वायु, यम, अग्नि, वरुण, शशांक, प्रजापति, प्रपितामह, प्रजापतीचे पिता ब्रह्मदेव, अशा तुम्हांस नमो! नमस्ते! मी वारंवार नमस्कार करतों. पुन्हः पुन्हः अनेकशः नमस्कार करतों.

(५) मी तुम्हांस समोरून, पाठीमागून, सर्व बाजूंनीं नमस्कार करतों. अगणित, अमित पराक्रम, अनंतवीर्य असे तुम्हीं सर्वत्र व्यापून आहांत, त्यामुळें सर्वरूप आहांत.

(६) तुमचा महिमा न जाणतां हे अच्युता! तुम्हांस बरोबरीचा मित्र समजून, प्रेमानें प्रमादानें अमर्यादतेचें बोललों असेन; हे कृष्ण! हे यादवा! हे सखया! असें, त्याबाबत मी तुमची क्षमा याचतों, मागतों.

(७) एकांती चारचौघांत बसतां उठतां, आहारविहारांत सहज विनोदानें तुमचा अवमान केला, त्याचा अचिंत्यप्रभाव असे जे तुम्हीं त्या तुमची क्षमा मागतों.

(८) चराचराचे जे पूज्य अत्यंत श्रेष्ठ असे गुरू आहांत, अप्रतीम प्रभावा! तुमच्या बरोबरीचा त्रैलोक्यांत कोणी नाहीं. मग तुमच्याहून अधिक तो कुठून आणावा?

(९) मी आपला देह तुम्हांस अर्पण करून, तुमच्या चरणांवर ठेवून तुम्हांस मी नमस्कार करून स्तुति करण्यास, आळविण्यास योग्य अशा तुम्हां परमेश्वराची मजवर प्रसन्न होण्यासाठीं मी प्रार्थना करतों.

पिता हा पुत्राचे, सखा सख्याचे, पति हा पत्नीचे, बाप मुलाचे अपराध क्षमा करतो; त्याप्रमाणें अहो, हे देव देवा! तुम्हीं माझे अपराध सहन करणें हे केव्हांहि योग्यच आहे, होय.

(१०) हे देवेशा! जगन्निवासा! पूर्वी कधींही न पाहिलेलें हें आपलें रूप पाहून मी तर हर्षभरित झालों आहें; पण भयानें माझें मन फार व्याकूळ होऊन आहे. म्हणून हे देवदेवा, मजवर प्रसन्न व्हा व तेंच आपलें चतुर्भुज रूप मला दाखवा, कृपा करा.

(११) हे सहस्रबाहो, हे विश्वमूर्ती, मस्तकीं मुकुट धारण केलेले, हातीं गदाचक्र घेतलेले अशा तुम्हांस मी पाहूं इच्छितों. आपण त्या चतुर्भुजरूपानेंच मजपुढें प्रगट व्हा!

अर्जुनाच्या विनंतीबरोबर देवांनीं विश्वरूप पुन्हां दाखवून मनुष्यरूप चतुर्भुजरूप घेतलें, तेव्हां अर्जुनास आनंद झाला. तो देवांना म्हणाला कीं, मला तुमचें चतुर्भुज रूप आवडतें. यावर देव श्रीकृष्ण म्हणाले, एकदेशीय कृष्ण रूपापेक्षां विश्वरूप श्रेष्ठ आहे. त्यावरच तुझी प्रीति असूं दे: कारण तेंच शाश्वत असें आहे.

अशाप्रकारें श्रीकृष्णांनीं अर्जुनास विश्वरूप दाखवून त्याला मी मारता व कौरव मरते **असा जो मोह-संभ्रम** झाला होता तो (बाजूस सरला विगतः) मागें पडला आहे.

---

## — अष्टाध्यायी देवताकांडासंबंधीं संदर्भ —

**विश्वरूपदर्शनाचा अकरावा अध्याय संपेपर्यंत कर्माचरणानें ईश्वराला भजावें, हें तत्व सारखें सांगितलें आहे.** अकरावा अध्याय हा देवताकांड किंवा उपासनाकांडामधील आहे. हें देवताकांड चौथ्यापासून तों अकराव्या अध्यायाअखेर आठ अध्यायांत सांगितलें आहे. हिला अष्टाध्यायी म्हणतात. कर्माचरणानें ईश्वराला भजावें. या विषयींचा सर्व प्रतिबंध दूर करून गीताशास्त्रानें उहापोह केला आहे. अशा ह्या ईश्वरभक्तीमुळें ईश्वरीप्रसाद होऊन श्रीगुरुसंप्रदायानुरूप सत्य व प्रेमळ ज्ञान लाभतें.

**ज्या वस्तूचा नाश न होतां तिचा विस्तार ज्यांत लयरूपानें सांठविला होतो, तेंच त्या वस्तूंचें बीज म्हणावें.** ह्या गीतेंत सांठविलेला कांड त्रयात्मक (श्रुतिवेद मोक्षरूप फळच एक गर्जून सांगतें कीं हें अवश्य साधावेंच.) महाविष्णूच्या श्वासाबरोबर जन्मलेला वेदराशी, बीज व वृक्ष असा आहे; म्हणून ही गीता वेदांचें बीज होय, असें मला वाटतें. वेदांचे त्रिकांडात्मक भाग आहेत. सद्यःप्रसंगीं अकराव्याचा विचार करणें जरूर आहे.

**मनुष्य कर्म करूं लागला असतां माणसाच्या मनांत विचार येऊं लागतात कीं शास्त्रांचें (कर्म व अकर्माबाबत) याबाबत म्हणणें काय आहे** ते ? तीच ह्या मोक्ष उपाय आरंभासंबंधींची प्रस्तावना होय. मोक्षप्राप्तीसाठीं दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं. फक्त एका ज्ञानानेंच तो प्राप्त होतो असा "एकं सांख्य च योगं च" सांख्य शास्त्राचा सिद्धांत (प्रकृति पुरुषाचे विवेचन ज्यानें केलें जातें असा सांख्य समुद्ररूपी श्रीमत्‌भगवद्गीता ग्रंथ आहे.)

**मोक्षप्राप्तीच्या साधनांचा आरंभ** म्हणजे अज्ञानानें जखडलेल्या जीवांकरितां मोक्ष प्राप्त व्हावा, हें **तिसऱ्या अध्यायाच्या सुरवातीस** सांगितलें. आतां काम्य व निषिद्ध कर्में जीं देहाभिमानाचा बंध दृढ करतात, तीं टाकावींत व **नित्यनैमित्तिक योग्य कर्में बिनचुकपणें व निर्मळ वृत्तीनें आचरावींत;** असा निर्णय भगवंतांनीं तिसऱ्या अध्यायांत दिला आहे. ह्या नित्यनैमित्तिक कर्माचें आचरण होण्यावर तें आचरण अज्ञानाचे बंध कसें तोडणारें होतें हा प्रश्न जेव्हां मनांत येतो, तेव्हां तेथें बद्ध पुरुष तो मुमुक्षूच्या पायरीवर येऊन ठेपतो, व असा तेथें आला म्हणजे (त्यानें सर्व **कर्में ब्रह्मार्पण करून आचरावींत.**) तेथें देवांचें म्हणणें असें कीं विहित कर्म तें जसें देहानें, वाचेनें, मनानें आचरिलें जाईल तें जसेंच्या तसेंच ईश्वरार्पण करावें. अशी ही कर्मयोगाच्या द्वारें होणारी ईश्वरभक्तीच होय असें चवथ्या अध्यायाच्या शेवटीं भक्तिसंबंधीं गोड बोलणें केलें आहे.

पृथ्वीच्या पोटांत धनराशी–संपत्ति, काष्टाच्या गर्भात अग्नि व गाईच्या कासेंत दूध हीं सिद्ध असतातच; पण तीं मिळविणेचा उपाय केला तरच तीं लाभतात. त्याप्रमाणें मी **स्वतःसिद्ध जो तो उपायानेंच साध्य होय.** ह्या गीतारहस्याचा मुख्य अधिकार म्हणजे प्रकाश व मोक्ष यांसंबंधीं सर्व बाजूनीं विवेचन करावें तेथें उपायांसंबंधीं विचार सुचविलेला असावा. शास्त्रामध्यें सांगितलेला उपाय प्रमाणसिद्ध असावा असें नाहीं. फार झालें तर वारा अभ्र नाहींसें करील, म्हणून कांहीं त्याला सूर्य निर्माण करतां येणार नाहीं. हातानें शेवाळ बाजूस करतां येतें, पण त्या हाताला पाणी उत्पन्न करतां येत नाहीं तसें फार झालें तर शास्त्र हें आत्मदर्शनाच्या आड आलेल्या अज्ञानाचा पडदा (मालिन्य) नाहींसें करील; पण त्याला कांहीं स्वयंप्रकाश, निर्मळ असा परमेश्वर तो प्रकाशवितां येईल काय ? मी नेहमीं स्वतःसिद्ध जो त्याला प्रकाशीत करील काय ? एकंदरीत **शास्त्रें हीं अज्ञानरूपी मळ धुवून काढणारीं साधनें होत,** यापलीकडे त्यांचा आत्म-

बोध करण्याचा स्वतंत्र अधिकार नाहीं. जेव्हां कां ह्या अध्यात्म शास्त्राचा खरेपणा सिद्ध करण्याचा प्रसंग येतो तेव्हां ती शास्त्रें ह्या गीतेच्याठायीं लय पावतात. पूर्व दिशेस सूर्य चमकला, तेव्हां आपोआपच सर्व दिशा उजळ होतात त्याप्रमाणें शास्त्रांना योग्य मार्गानें चालविणाऱ्या ह्या गीतेमुळेंच सर्व शास्त्रें समर्थ होतात.

**सूर्याच्या कक्षेत प्रवेश केला म्हणजे रात्र व दिवस हीं उरतच नाहींत;** तसें माझी (परमेश्वराची) भेट होतांक्षणींच भक्त तो सायुज्य मोक्ष सिंहासनावर विराजतो—

**स्थिर भक्तीनें कर्मयोगी हा 'मी' होऊन माझ्याठायीं अक्षय्य राहातो.** स्वकर्माचरणरूपी निर्मळ फुलें, फुलांनीं अर्चा, अर्चेमुळें प्रसाद, प्रसादानें ज्ञाननिष्ठा, ज्ञाननिष्ठेनें भक्तीचा उत्कर्ष व भक्तीमुळें साम्यावस्था, व साम्यावस्थेमुळें शांति व शांतीमुळें सुख–आनंद.

**विश्वाला प्रकाशित करणारा आत्मा तो मी सर्व ठिकाणीं ओतप्रोत भरलेला** त्यासच जो अनुसरतो व जो बुद्धीनें, वाचेनें, शरीरानें माझा आश्रय घेतो, त्याच्या हातून जर एकादे वेळीं भलतेंच कर्म घडलें तरी ज्याप्रमाणें रस्त्यावरील पाणी गंगेशीं मिळालें का संबंधाचें झालें असतां त्याचा व महानदीचा प्रवाह एकच ठरतो त्याप्रमाणें त्याचा माझे ठायीं प्रवेश होतो व कर्माचा संबंध राहात नाहीं. शुभ म्हणा का अशुभ म्हणा दोन्हीं तीं एकरूपच होतात.

**ज्ञानसंपत्तीनें वेद भरलेला आहे. पण तें ज्ञान त्याचें आपल्याच ठिकाणीं आहे.** त्याच्यासारखा दुसरा कंजुष कोणीही नाहीं कारण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या वर्णांशींच फक्त तो कानगोष्ट करतो. इतर जे स्त्री, वैश्य, शुद्र, जे मानवी जीवजंतु त्यांना आपल्या मनो-मंदिरांत ठाव देत नाहीं व स्वस्थ असतो. म्हणूनच जसा का तो आपल्या दोषांचें परिमार्जन करण्यासाठीं आपला वेष बदलून गीता शास्त्ररूपानें सर्वांना साध्य झाला आहे. जो अर्थरूपानें मनांत शिरतो, श्रवणानें कानीं लागतो, जपाच्या मिषानें वदनांत राहातो जो तो गीतारूपानें वाटेल त्याला प्राप्त होतो.

**आठव्या म्हणजे अक्षर ब्रह्मयोग अध्यायांतील अनन्यचेताः सततं ये मां स्मरति नित्यशः।** ......

**माझ्या प्रसादानें संसारांतील दुष्ट दुर्गतीपासून तरशील.** माझ्या कृपेनें ज्याचा जीवभावकण उपमर्दें म्हणजे भरडला होतो तो संसाराच्या बुजगावण्यानें पीडित होत नाहीं–पीडिला जात नाहीं. सूर्याच्या मदतीनें ज्याचा डोळा सांवरला होतो, त्याला अंधःकार हा कःपदार्थ! माझा प्रसाद लाभल्याची खूण म्हणजे जेव्हां का भेदभावरहित भक्तीनें मीच चित्तांत ओतप्रोत सांठविला होतों तेव्हां तर जन्ममृत्युमुळें दुःखाचीं स्थळें जीं भोगिलीं जातात, तीं तर सुखकारक वाटतील. ती माझ्या प्रसादाची खूण जाण. अभिन्न भक्तीनें अनन्यत्व कीं जेव्हां तेव्हां चित्त हे मियांचि भरले होते, तेव्हां पूर्णपणें माझा प्रसाद झाला असें समज.

**नवव्या अध्यायांतील राजगुह्ययोगः—मांनमस्कुरु—भूतद्वेष जाऊन सर्वत्र जो मी त्यास नमन होतें.** माझे निर्दोष शब्द पुन्हां एकवार ऐक; चांगलें लक्ष असूं दे. हें माझें भाषण म्हणजे तुझें भाग्यच उदयास आलेलें जाण. चातकाच्या घरीं आकाशच प्रत्यक्ष पाणी भरण्याचें काम करतें. कासवीच्या पिलांना कासवीच्या नजरेमधूनच दूध मिळतें. हें कसें म्हणावें तर प्रत्यक्ष एक फळच व्यवहाराचें तें भोगण्यास मिळतें. जेथें कांहीहीं व्यवहार होऊं शकला नाहीं तरी दैव अनुकुल तेथें सर्व लाभ घडतात. फेरी ती द्वैताची चुकविली तर एकतत्वाच्या घरीं फळ भोगावयास मिळतें—जेथें कांहीं **दिखाऊपणा नाहीं त्या प्रेमाचें फळ हें विषय होतें तेथें स्वतः आपल्याशिवाय दुसरें**

**कोणी नसतें,** हें जाणतां येत नाहीं का ? हें समजत नाहीं का ? ज्या आरशांत पहावयाचें तो आपणच स्वच्छ करतों, पण हें कांहीं त्या आरशाकरितां नसून तें स्वतःकरितां आहे. येथें मी हें स्वतःशींच केवळ बोलत आहें, तूं केवळ निमित्तच जाण. कारण माझ्यातुझ्यामध्यें कसल्याहि तऱ्हेनें मीतूंपणा नाहीं. म्हणून माझ्या जिवलगालाच–स्वतःच्या जीवाला कीं मी हें सांगत आहें. कारण एकनिष्ठ भक्ताचें मला फार वेड आहे. पाण्याला सर्वस्व अर्पण करतांना मिठाला भूल पडते. सर्वांशीं जलरूप होतांना तें मुळींच लाजत का संकोच करीत नाहीं. मजसीं तूं कोणत्याही प्रकारचा अंगचोरपणा करण्याचें जाणत नाहींस. म्हणून तुझ्या-पासून कांहीं चोरून ते का ठेवावें बरें ? ज्या रहस्यापुढें जगांतील सर्व गूढें उघडीं ठरतात, तें आपलें परम गुह्य–गुप्त रहस्य–वचन सांगतों, 'मला सर्व व्यापकाला तूं आपल्या सर्व अंतर्बाह्य व्यवहाराचा विषय कर.'

**वायु आकाशाच्या सर्वांगीं मिळून असतो,** तसा तूं मज ठायीं रहा–ऐस. तूं आपलें **मन** माझ्या एकट्याचें मंदीर कर. तसेंच माझ्या कीर्ति श्रवण करण्यामध्येंच आपले **कान** कोंडून ठेव. **संतजन** हे आत्मज्ञानानें निर्मळ झालेल्या माझ्या प्रमाणाच्या लहान प्रतिमा होत. (कामुक स्त्री जशी आपल्या पतीकडे आवडीनें पाहाते तशी) तुझी दृष्टि संतांनां आवडीनें पाहो. **वस्तुमात्राच्या वसतिस्थानीं माझ्या निर्मळ नामाचा छंद जिव्हेला लावून तिला जिवंत ठेव. हाताचें करणें, पायाचें वावरणें, तें सर्व माझ्याठायींच होईल असें कर. उपकार करणें हा यज्ञच एक** आपल्या किंवा परक्या जना लोकांसाठीं तेथें ह्या यज्ञानें तूं खरा माझा याजक; पण ही एकएक गोष्ट तुला **कोठवर शिकवूं ? इतर सर्वांना तूंम द्रूप मानून सेवायोग्य समज. तेथें स्वतःच्या अंगीं सेवकभाव घेऊन असण्यावरच हें घडेल. म्हणजेच स्वतःच्या अंगीं सेवक भाव घेणें, इतर सर्वांना सेवा योग्य समजणें ह्यानेंच भूतमात्राविषयींचा द्वेष नाहींसा होईल. सर्वत्र मीच आहें, अशा ज्ञानभावनेनें तुला नम्रता अंगीं धारण करितां येईल व माझा तुला पूर्ण आधार लाभेल. ह्या जगांत तिसऱ्याची गोष्ट न राहिल्यामुळें तुझामाझा खरा एकांत घडून येईल;** व **मी तुझा** व **तूं** माझा असे **दोघेजणच परस्पर** सहवासाचा **उपभोग घेण्यास उरल्या-मुळें** आपलें **सुख आपसुखच वाढीस लागेल. तिजेपणाचा अडथळा ज्या स्थितींत नाहींसा होतो,** त्याच स्थितींत शेवटीं **मद्रूप होऊन तूं माझ्यांत मिळशील.** जळाचा नाश झाल्यावर जळां-तील प्रतिबिंबाशीं जळ एक होतेंच. (तेथें कसलीही आडकाठी नसतेच.) **आकाशीं वायु समुद्राशीं तरंग एक होऊं लागला, तर त्याला कोण अडविणार ? ह्या देहधर्मामुळेंच नां तूं आणि आम्हीं वेगळे दिसतों ते ?** हा **देहच जेव्हां नाहींसा होतो तेव्हां तूं मीच होणार** ह्याविषयीं **कांहीं शंका घेऊ नको.** कांहीं **अनमान करशील तर तुला माझी शपथ आहे. तुला तुझी शपथ घालणें म्हणजे आत्मरूपाची शपथ घालणें होय.**

यांत आश्चर्य तें कसलेंहि नाहीं. कारण लाजेची आठवण कधींही न होऊं देणें जें तेंच कीं प्रीतीचें मुख्य लक्षण ना! नाहींतर जो ज्ञानाचा विषय आहे, जो या प्रपंचापासून अलिप्त आहे, ज्याच्यामुळें विश्व हें खरें भासतें, त्याच्या आज्ञेचा प्रताप काळासही जेर करतो, हारीस आणतो, असा तो मी देव जो जगाच्याकरितां सत्यसंकल्पानें नेहमी जागा आहें. मग शपथ घालणें तें कशास म्हणावें ? तर प्रेमानें मी इतका वेडा झालों आहें कीं, त्या वेडांत देवपणाचीं भूषणें तीं टाकून दिलीं व त्यामुळें मी अर्धवट झालों व तूं मात्र सगळा संपूर्ण बनलास तें मद्रुप होण्यामुळें, होण्यासाठी होय.

राजानें स्वतःस स्वतःची शपथ घालावी, तें त्याचें आपलें कार्य साधण्याकरितांच कीं, (एकादें काम करून दाखवीनच. नाहींतर मी नांवाचा नव्हेच असें जें पैजेचें बोलणें. तसाच हाहीपण प्रकार जाण. हे

भगवन्, आपलें बोलणें तर मला भलतेंसें वाटतें; कारण अहो, तुमच्या नामस्मरणावरच कीं आमचीं सर्व कार्यें चाललीं आहेत; व अशांतही, तुम्हीं प्रतिज्ञेवर बोलणें करून उपदेश करीत बसतां ही तुमची विनोदी लीला ह्यास मर्यादा नाहीं! अहो! सूर्य हा तर सर्व प्रकाशानें उगवतो. तेथें त्याच्या प्रकाशाच्या अल्पशा अंशानेंही कमळें फुलतात, फुलविलीं होतात. मेघ जो वर्षतो त्यानें समुद्रही भरेल, पृथ्वीचा दाह शांत होईल, इतकें पाणी तो वर्षतो. असें कमळाचें सूर्यामुळें फुलणें हें निमित्त, तसें चातकाची तृषाशमन हें केवळ निमित्तमात्र तसे दात्यांमध्यें आपण सर्वश्रेष्ठ आहांत; त्या तुमच्या औदार्याला मी केवळ निमित्तमात्र असें म्हणणें होत नाहीं का! देवकृष्ण म्हणाले, असें हें असो. ह्या विषयाचा हा प्रसंग नव्हे. तुला जें आतां साधन सांगितलें त्यानें तूं माझ्या स्वरूपाला निःसंशय पावशील; कारण मिठाचा खडा समुद्रांत पडतो त्याचक्षणीं तो विरतो. (न विरतांच रहाण्याचें त्याला कांहीं कारण नाहीं.) त्याप्रमाणें माझें सर्व वस्तुमात्राच्या ठिकाणीं असणारें जें स्वरूप, त्या स्वरूपाच्या ठायीं भक्ति जडली, तर सर्वाविषयीं आत्मबुद्धि होईल! देहाभिमान निःशेष लोपून जाईल! तूं मीच होशील! साधनाची मजल माझ्या प्राप्तीपर्यंत कशी आहे, तें सांगतो. सर्व कर्में मला ईश्वराला अर्पण करावींत किंवा केली म्हणजे माझ्या ईश्वरी भावनेनें चित्त शांत होतें, चित्त प्रसन्न होतें. त्या प्रसन्नतेवरच ईश्वरी ज्ञान प्राप्त होतें. व त्या ज्ञानानें ईश्वरी स्वरूपाशीं एकरूप होतां येतें. तेथें साध्यसाधन उरत नाहीं, कांहींही करण्याचें रहात नाहीं. तुजला जी कांहीं आज मज ईश्वराची प्रसन्नता लाभली आहे, ती तुवां आपलीं सर्व कर्में मला ईश्वराला अर्पण केलीस म्हणून होय. वर झुंजण्यासंबंधीं जो प्रतिबंध होत आहे, तो ह्या प्रसन्नतेच्या सामर्थ्यावर नाहींसा होईल. तुला मी आकळलों, तुला केव्हांही कष्टी करणार नाहीं; समाधानाचें करीन. जिच्यामुळें प्रपंचासह सर्व अज्ञान नाहींसें होतें व मी एकटाच परमात्मा सर्वत्र दिसूं लागतों, त्या ज्ञानाचें स्पष्ट केलेलें रूप म्हणजे ही गीता जाण. अनेक तज्ज्ञांनीं तुला ह्या आत्मज्ञानासंबंधीं उपदेश केला. त्या ज्ञानानें धर्माधर्मासंबंधी भ्रांति उत्पन्न करणारें अज्ञान तें घेऊं नको, टाकून दे, अज्ञानाचा अंगिकार करू नको, तिकडे लक्ष देऊं नको. एकंदरीत ज्ञानरहस्य हें असें आहे.

**मी अर्जुन, कौरव हे माझे आप्त, यांना मारणें घोर पातक, ही माया–भावना तेथें तथ्य कितपत तें अर्जुनाच्या विषादयोगाचें उत्तर :—**

अभिमानामुळें कानामनांच्या पाळीला हें बोलणें शिवूं देणार नाहींस, तर तुझें नित्यमुक्त का अव्यय असणें तें व्यर्थ होईल व देहाभिमानाचा तडाखा तुजवर बसेल, देहासंबंधीचा जो प्रांत का प्रदेश जेथें पावलोपावलीं आत्मघात सोसतांना क्षणाचीही फुरसत उसंत–विश्रांति लाभत नाहीं. माझें सांगणें मनावर घेत नाहींस तर तूं संकटांमुळें न मरतांही मेल्यासारखा होशील.

**पथ्य न पाळणारा तापाला जोर पोहोंचवितो. दिव्याचा द्वेष करणारा अंधाराला महत्त्व देतो.** अहंकार पोसलास, विवेक झिडकारलास, हा देह अर्जुन, दुसरा देह स्वजन, युद्ध म्हणजे पापाचरण अशीं नांवें दिलीस, वर मी युद्ध करणार नाहीं, अशा दिमाखानें मिरविलास तरी तुझा क्षात्रस्वभाव तो निर्धार (निश्चय) निष्फळ करील. आधीं झुंजण्यास सिद्ध व्हावें, झुंजण्यासाठीं हातीं शस्त्र घ्यावें. इतकें केल्यावर मग मी झुंजणार नाहीं अशी प्रतिज्ञा करावी, हें सर्व विचित्रच. व्यवहार लौकिकानेंही तुझ्या बोलण्यांत तथ्य नाहीं. मी झुंजणार नाहीं असें तें तुझें बोलणें फोल होय. न झुंजण्याचा विचार मनांत करीत आहेस, तो विचार तुझा क्षात्र स्वभावच मोडून टाकील. पाणी पूर्वेस वाहात आहे, तेथें पश्चिमेकडे पोहून जाण्याची तारांबळ केली तर त्याला तें पाणी आपल्याच कक्षांत आणील. भाताच्या बीजकणानें–साळीनें म्हणावें, मी भाताप्रमाणें रुजणार–वाढणार नाहीं तर त्याला आपल्या स्वभावाचें उल्लंघन करतां येईल काय? तशी तुझी स्वभावधर्मप्रकृति, क्षात्रधर्म संस्कारानें बनलेली आहे, घडलेली आहे. म्हणून तूं जरी

मनानें न झुंजण्याचा आग्रह धरून आहेस, तरी ती तुझी प्रकृति तुला उठण्यास लावील. तुझ्या क्षात्र स्वभाव प्रकृतीनें तुला शौर्य, तडफ, तत्परता हे गुण दिलेले आहेत, त्या गुणांस साजेल असें काम केल्या-बांचून तुझी प्रकृति तुला स्वस्थ बसूं देणार नाहीं. जन्मरहस्य लक्षांत घे. अविचारानें झुंजणार नाहीं असा छंद घेऊन बसूं नकोस. हातपाय बांधून ज्यास रथांत घातलें आहे, तो तर मनानें लांबच्या अंतरावर भ्रमण करतो. तूं आपल्याकडून मी कांहीं करणार नाहीं अशी गांठ बांधलीस, तरी तूं कांहींना कांहीं करणारच, ही खात्री आहे. राजपुत्र उत्तर रणांतून पळून जात असतां त्यांस परत वळवून, फिरवून तुझ्या क्षत्रिय बाण्यानें युद्ध करावयास लाविलें. गोग्रहणाचे वेळीं तुवां एकट्यानें अकरा अक्षौहिणी जिंकल्यास. हा क्षत्रिय तेजाचा प्रताप होय. तो स्वभाव तुला झुंज करावयास लावील. असें पहा कीं, रोग्याला रोग आवडतो का? दरिद्रयाला दारिद्र्य गोड वाटतें का? परंतु दैव प्रतिकूल बलिष्ट जें त्यास भोगावयास लावतेंच, तेंच दैव अनुकूलतेनें ईश्वरी सत्तेनें कार्य करीलच. ती ईश्वरीसत्ता तुझ्या हृदयांत नांदत आहे, वसत आहे.

**प्रेमपान्ह्यानें भुलावलेली आई आपल्या मुलाजवळ मोकळेपणानें बोलते, तशी आमची प्रीति करावयास लावीत आहे :—**

गीता हें वाङ्मयाचें प्रसिद्ध सार. ह्यायोगें '**आत्मा**' नांवाचें रत्न हातीं येतें. वेदांतानें ह्याला '**ज्ञान**' अशा प्रौढ नांवानें वाखाणलें आहे. अशी ह्याची ख्याति जगांत पसरली आहे. ह्याच्या प्रकाशानें बुद्धि, मति इत्यादि शक्तींना देखणेपणा येतो. तसेंच ज्याच्याद्वारें मी सर्वद्रष्टा, साक्षीभूत नजरेस पडतों, तें हें '**आत्मज्ञान**' होय. अव्यक्त असा मी, त्या माझें हें अगदीं गुप्तधन आहे. परंतु तुझ्यापासून मी तें कसें लपवावें बरें? म्हणून आम्हीं दयाप्रेमानें ओतप्रोत भरल्यानें हा गुप्त ठेवा तुला उघड केला आहे.

प्रस्तुत प्रसंगीं तें असें आहे कीं आकाशच गाळून घ्यावें किंवा अमृताची साल सोलावी, दिव्य जें आहे त्याला दिव्य करण्यास लावावें, ज्याच्या अंगच्या प्रकाशानें पाताळांतील अणुरेणु प्रकाशित होतो, त्या सूर्याच्या डोळ्यांत दिव्य अंजन घालण्यासारखें हे होय.

**दहाव्या अध्यायांतील विभूतियोग; विश्वरूप अथवा ईश्वरनिदर्शनयोग; पांचव्या अध्यायांतील "भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्, सुहृदं सर्व भूतानां ज्ञात्वामां शांतिमृच्छति" प्रकृति ज्याच्या सत्तेंत वर्तत असते, त्या ईश्वराला शरण जा, त्याचा आश्रय कर, त्या ईश्वरांत प्रविष्ट हो.** जसें गंगाजळ महासागरांत मिळतें, व मग त्या ईश्वराच्या प्रसादानें शांतिरूपी तरुणीशी समागम होऊन आत्मानंदानें स्वरूपांत रममाण होशील. तेथें संभव विसांवा अनुभवरूपी आत्मरूप पीठाचा राजा होऊन असशील.

हृदयरूप आकाशांत सर्वभूतांच्या अंतःकरणांत ईश्वररूपी सूर्य चित्तवृत्तीच्या हजारों किरणांनीं उदयास येतो. लोकत्रय जें अवस्थात्रयरूपी त्यांना प्रकाशित करतो. मायेच्या भुलावणीनें यात्रेकरू जीवांना भुलवून जागें करतो. दृश्य वस्तुरूप (देह) पाण्याच्या सरोवरांत विषयरूपी कमलावर आपलें तेज फैलवून तो ईश्वररूपी सूर्य पांच ज्ञानेंद्रियें व मन असे सहा पाय आहेत. अशा जीवरूपी भ्रमराला दृश्य वस्तुविषय एकसारखा चारीत असतो. असें रूपक हें असो.

हृदयस्थ ईश्वर अहंकाराचा बुरखा घेऊन नेहमीं विलसत असतो. (स्वाम) आपल्या प्रकृति–मायेच्या पडद्याआडून सर्व सूत्रें हालवितो. बाहेर जगाच्या रंगभूमीवर चौऱ्याऐंशीं लक्ष कोटींची चराचराची चित्र-विचित्र छायाचित्रें नाचवितो. ब्रह्मदेवापासून क्षुद्र किड्यापर्यंत सर्व भूतमात्रांना ज्याच्या त्याच्या योग्यते-प्रमाणें सजवून–मिरवितो. जो देहाकार ज्याच्यापुढें साजरेपणानें तो मानतो, तो जीव देहच मी आहें, अशा

भावनेनें त्या देहाला जडतो. सुत जसें दुसऱ्या सुताशीं गुंतावें, गवताची पाती जशी दुसऱ्या पातीशीं गुरफटून जावी, लहान मुलानें आपलें पाण्यांत पडलेलें बिंब हातांनीं कवळावें, त्याप्रमाणें देहाकार रूपानें आपलीच दुसरी तीं छाया पाहून जीव त्या ठिकाणीं आत्मबुद्धि धरूं लागतो. हृदयस्थ ईश्वर देहरूपी यंत्रावर भूतमात्रांना बसवून प्राचीन कर्माचीं सूत्रें हालवीत असतो. तेथें जें प्राचीन सूत्र, ज्या भूतांशीं स्वतंत्र रीतीनें बांधलें असेल, तें भूत त्या सूत्रानें मिळणाऱ्या गतीला घेऊं लागतें. अर्जुना, वारा जसा गवताच्या काड्यांना का पाचोळ्याला आकाशांत एकसारखा फिरवितो, तसा ईश्वर भूतमात्राला स्वर्ग व संसार यामध्यें एकसारखा भोंवंडत असतो. जसें का चुंबकमण्याच्या आकर्षणानें लोखंड गिरकी घेतें, तसें ईश्वराच्या सत्तेनें हें भूतमात्र चलनवलन करीत असतें. चंद्राचें निकटपण हेंच एक कारण. या कारणानें समुद्रादिक आपापल्या चेष्टा करतात, म्हणजे **समुद्राला भरती येणें, सोमकांत मणी पाझरणें, कुमुदें व चकोर** पक्षी यांचा तेजोहीनपणा जाऊन **त्यांनीं उल्हासास येणें होतें.** तसें एकच ईश्वर सर्व भूतमात्रांना मूळ प्रकृतीच्या अनुरोधानें निरनिराळ्या रीतीनें नाचवीत असतो. तोच ईश्वर तुझ्याहीपण हृदयांत नांदत आहे.

अर्जुनपण अंगीं लावून न घेतां आपण मी आहों अशा प्रकारचें स्फुरण जें उसळतें तें **'मी'पण तेथें प्रकृतीची सत्ता, ईश्वर चालवील हें निःसंशय, आणि तुझ्या मनांत नसलें तरी ती प्रकृति तुला झुंजावयास लावील** यांत तिळमात्र शंका नाहीं. ईश्वर हा सर्वाधिकारी आहे. प्रकृतीची नियंत्रणा तो करतो. प्रकृति ती आपल्या इंद्रियांना चाळविते. [ईश्वर गोसावी। तेणे प्रकृती हे नेमावी। तिया सुखें राबवावी। इंद्रियें आपुली ॥१३१७॥ अ. १८ वा] तेव्हां येथें आतां तूं युद्ध करावेंस कीं नाहीं, हें प्रकृतीकडे सोंपवून ती ज्याच्या सत्तेनें वर्तत असते त्या ईश्वराला अहं स्फूर्तीनें कायावाचामनें शरण जा, ईश्वराचा आश्रय कर. जसें गंगाजल महासागरांत मिळतें, तसा तूं ईश्वरांत प्रविष्ट हो, व मग त्या ईश्वराच्या कृपाप्रसादानें पूर्ण शांति लाभून आत्मनंदानें स्वरूपांत रममाण होशील. जेथें संभव, विसांवा व अनुभव यांचा लाभ घडतो, त्या आत्मरूपपीठाचा तूं अक्षय्य राजा (मालक, धनी) होशील असें भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले.

(साररूपानें)

## अध्याय ११ वा

## ('स्थायी भाव', प्रस्तावना पान २)

# रस, भाव व साक्षात्कार

### १ ज्ञानेश्वरी तत्त्वज्ञान—

योग रूपास आला = अनेक योगांचे वैभव खुले केले, वेदांनीं अबोला घेतला, येथून गीतावल्ली उदयास आली, अमृतासाठीं पैजेने जिंकणारी रसिके अक्षरे मिळविली. सौंदर्य माधुरी ही 'सरगम' जी संगीताची रोहण करणारी, तिच्याहीपेक्षां येथील माधुरी चंद्रिका ही विशेषशीं आहे. रसाळपणामुळें कानाला जिभा उगवल्या, इंद्रिये ही भांडण करूं लागली. सहजपणेंच शब्द हा विषय श्रवणाचा पण रसनेने तो रस माझा म्हणून अमृताची खाणीच अशीं ती वाणी रसवंती आहे. सुगंध हा घ्राणाचा विषय पण तो पुण्यभाव होऊन आहे. बोलणें हे दृष्टीपुढें रूपाची खाण उभी करीत आहे. काय अहो हे सौंदर्य! एक शब्द आनंद देतो वर वाक्यच मुखांतून बाहेर पडले तर आनंदाला पारावारच नाहीं. शब्दास शब्द जोडून वाक्य बोलिले कीं मन हेंच उभारून येत आहे. काय अहो सौंदर्य! ते मन आविष्कारानें बाहेर धांव घेऊन आलिंगन द्यावयास चारी भुजा पुढें करीत आहे असा आविर्भाव दृग्गोचर होऊन आहे. इंद्रिये आपापल्या भावांनीं प्रफुल्लितपणें झोंबी करूं लागत आहेत. अहमहमिकेनें तेथें समजुतीस पटविणें होत आहेत. ज्ञानसूर्यच ह्या देशीमध्यें उगवला आहे. असा हा सूर्य एकटाच ह्या जगास चेतन देऊन आहे. बोलाची ताटे कैवल्यरसानें वोगरलेली आहेत. आत्मप्रकाशरूप समईच्या प्रकाशानें येथें चित्ताला हलुवारपणा आणून शब्दांशिवाय बोलावे : "हे शब्देविण संवादिजे। इंद्रिया नेणता भोगिजे। बोला आधी झोंबिजे। प्रमेयासी ॥५८॥ (अध्याय १) अशा गंभीरपणें अंतःकरण स्थिर करून जो योग्यतेनें जाणील तो हे मानणें मानील–जाणील–जेवील त्यासच ते भेटणारे होईल. "भावज्ञा फांवती गुण चिंतामणीचे" असा हा ग्रंथ निष्कामाकरितां आहे. शब्दावरचें टरफल काढून आंतील गाभ्याने ब्रह्मचर्य घडिले तरच सुखानें सुखामध्यें रहाता येईल. हे सांगितल्याप्रमाणें केले तरच उपयोग, नाहींतर नुसती एक गोष्ट मुक्या बहिऱ्याची (कल्य = शुभभाषण, अन्न सोडणे, पहांट, शिकविलेला, अभिनंदन, शुभवार्ता, दक्ष, उपयोक्ती, न्याहारी, क्षुल्लक वस्तू.) !!!

(२) **'श्रीज्ञानेश्वरी हा ग्रंथ जगतांत लोकोत्तर असून सर्वांना अत्यंत प्रिय आहे.** 'ब्रह्मानंदवल्लि' 'ज्ञानदेवी' 'ब्रह्मसाम्राज्यदीपिका' 'गीतावल्ली' अशीही अनेक नांवे असली तरी "**भावार्थदीपिका**" हेंच नांव सार्थ होय. श्रीमाउलीने दिलेले ते स्नेहाळतेने प्रेमाचे नांव मानवाच्या बुद्धीस आकळले होऊ शकते.

श्रीतुकोबारायाने "**भाव तेथे देव**" म्हटले आहे. मानव या जगांत बुद्धि व मन या साधनानें व्यवहार करीत असतो. मन हें प्रारब्ध कर्मानुसार सर्व जगांतील वासना गोळा करीत असते; व बुद्धि ही निरूपयोगी इच्छा टाकून प्रकृतीस मानवणाऱ्या वासनांची निवड करीत असते. बुध्दीचे क्षितीज मोठे असल्यामुळें ती शब्दांच्या गुंफामध्यें अडकून पडते व तिला मार्ग सांपडत नाहीं. मग भावाचे रूपाचे–दर्शन लांबच राहिले पण श्रीगुरुकृपा झाल्यास—, जयाचेनि आठवे। शब्दसृष्टी आंगवे। सारस्वत आघवे, जिव्हेस ये !!!

वक्तृत्व गोडपणे। अमृताते पारूष म्हणे। रस होती वोळंगणे। अक्षरासी ॥

**—श्रीगुरूंच्या केवळ स्मरणाने चमत्कार होतो;** मनाचें मनपण विरून जाते बुद्धिचें शाब्दिकपण प्रेमभावाच्या चित्ताने विरघळले जाऊन तेथें फक्त "**रस**" शिल्लक राहातो. जोपर्यंत मनुष्य

केवळ मनाप्रमाणे (उच्छृंखळपणें) चालतो तोपर्यंत तो वासनेच्या आहारी असतो. त्याच्या वासनेला जर **चित्ताने** प्रेमभावाचे वळण लाविले तर तोच भावाच्या अवतरणाने तत्त्वबोध जाणण्यास पात्र होतो व मनाचा हिणकटपणा गेल्यास एक **रस** फक्त उरतो तेथें रज तम गुण झडले जाऊन मनुष्य हा गुणवंत झाल्याने निंदा का बुद्धि ती तो जाणून कां जाणली जाऊन समतेवर येतो; द्वेष नाहीसा होतो; तो त्या चित्त उद्दीप्त रस भावाकडेच नेणार !! (चित्ती परतून आपलेपणास पाहून म्हणते ते मी आहे तत्व ते मी !)

**चित्त** जर द्रवले नाहीं, तर नुसत्या अहंकाराने एकमेकांची या जगी ओळख होत नाहीं. अनुभव हा रसावर अधिष्ठित असतो. अंतःकरणी जिव्हाळा असल्याशिवाय वाणी **रस** उत्पन्न करू शकत नाहीं. ज्याच्या वाणीतून अमृतमय सौख्यकारक अक्षरमाला स्त्रवत असते तो दैवीच म्हटला पाहिजे. कारण **"जाणे जीविचा जिव्हाळा। तोचि दैवाचा पुतळा"** हे संतवचन सर्वश्रुत आहे. उदरांत उत्पन्न होणाऱ्या पाचक रसास इतर सर्व अन्नें पचविण्याचें सामर्थ्य येते, तसें या मनाविरहित (अमनस्क) मानवाच्या देहांत उत्पन्न होणाऱ्या रसांत सर्व तऱ्हेनें वाङ्मयीन **रस** सहजच सामावले जाऊन तो रस चित्ताची खूण गांठ बांधतो. या देहातच प्रारब्धानें वेष्टिलेले मन व आनंदाने भरलेले चित्त, या दोन्हींचा समावेश असल्यामुळें रसिकतेवर भावना उत्पन्न झाल्यानें "रस" हा रसज्ञ होऊन "रूप (भाव; देव) पाहातो, देव देखणा होतो जीवित साफल्य प्रत्यक्षतेनें पाहातो, जाणतो, त्याची इहलोकीची क्रिया ही प्राकृतिक न रहाता, मनबुद्धीच्या पलिकडील तत्वाशी मिळणी झाल्यानें ती क्रिया (योग्य क्रिया) दैवी होते.

"व्यक्तः स तै विभावाद्यैः
स्थायी भावो रसः स्मृतः ॥ इति.

इतर अनिर्वाच्य विभाव, अनुभव, व्यभिचारी भाव असले तरी या दैवी प्रकृतीचा भाव भक्ताला सहज कळतो व **देवच मुळीं तेथें भक्ताची सेवा करावयास येतो.**

"महाभाव" जाणणाऱ्याचे मौनच एक ! स्वरूपी लीन होणेच एक. !

**काव्य**—कवित्व—सरस वाक्य—**"काव्येषु नाटकं रम्यं तत्रापिच शाकुंतला"** काव्य, रस संबंधीं ज्ञानेश्वरीमध्यें असलेल्या ओव्या.

**अध्याय पहिला—**

देखा काव्य नाटका। जे निर्धारिता सकौतुका।
त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका। अर्थध्वनि ॥ ७ ॥
का तीर्थे जिये त्रिभुवनीं। तिये घडती समुद्रावगाहनीं।
ना तरी अमृत रसास्वादनी। रस सकळ ॥ २६ ॥
ना तरी सर्व सुखाची आदि। जे प्रमेय महानिधि।
नाना नवरससुधाब्धि। परिपूर्ण हे ॥ २९ ॥
म्हणोनि हा काव्यारावो। ग्रंथ गुरुवतीचा ठावो।
एथूनि रसा झाला आवो। रसाळपणाचा ॥ ३३ ॥
एथ चातूर्य शहाणे झाले। प्रेम रूचीस आले।
आणि सौभाग्य पोखलें। सुखाचे एथ ॥ ३५ ॥
माधुर्या मधुरता। शृंगारा सुरेखता।
रूढपण उचिता। दिसले भले ॥ ३६ ॥
आणि पाहांता नावेक। रंगी सुरंगतेची आगळीक।
गुणां सगुणपणाचे बिक। बहुवस एथ। ॥ ३८ ॥

कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रकटे जैसी आगळी । अंगनाअंगी ॥ ४२ ॥
ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था ।
मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया ॥ ४८ ॥
जे अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।
सोहंभावे पारंगती । रमिजे जेथ ॥ ५३ ॥
तियापरी श्रोता । अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण चित्ता । आणुनिया ॥ ५७ ॥
हे शब्देंवीण संवादिजे । इंद्रिया नेणतां भोगिजे ।
बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥
का आपुला ठावो न सांडिता । आलिंगिजे चंद्रु प्रकटता ।
हा अनुरागु भोगिता । कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥
ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिला तोचि जाणे । मानू (मातु) इये ॥ ६१ ॥

**अध्याय दुसरा—**

श्रोत्रादि इंद्रिये आवरिती । परि रसने नियमु न करिती ।
ते सहस्रधा कवळिजती । विषयी इहीं ॥ ३०४ ॥
तो उदकाचेनि बळें आधिके । जैसा आडवेनि आंगे फांके ।
तैंसा मानसी विषय पोखे । रसनाद्वारे ॥ ३०६ ॥
येरा इंद्रियां विषय तुटे । तैंसा नियमूं न ये रस हटे ।
जे जीवन हे न घटे । येणेंविण ॥ ३०७ ॥
जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी ।
जे मनाते सदा मुठी । धरूनि आहाती ॥ ३११ ॥

**अध्याय ४ था—**

जैसा पंचमालापु सुगंधु । की परिमळु आणि सुस्वादु ।
तैसा भला जाहला विनोदु । कथेचा इये ॥ ३ ॥
या जगदीश्वराचे प्रेम । एथ दिसतसे निरूपम ।
कैसे पार्थे येणे सर्वोत्तम । पुण्य केले ॥ ११ ॥

**अध्याय ६ वा—**

माझा मराठाचि बोल कौतुकें । परि अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसी अक्षरे रसिके । मेळवीन ॥ १४ ॥
जिये कोंवळिकेचेनि पाडे । दिसती नादीचे रंग थोडे ।
वेधे परिमळाचे बीक मोडे । जयाचेनि ॥ १५ ॥
ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा ।
बोले इंद्रिया लागे कळंभा । एकमेका ॥ १६ ॥
शब्दु तरी विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे रसु हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७ ॥

नवल बोलतीये रेखेची वाहाणी । देखतां डोळ्यांही पुरों लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥
जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरे ।
बोलु भुजांही आविष्कारे । आलिंगावया ॥ १९ ॥
ऐशी इंद्रिये आपुलालिया भावी । झोंबती परि तो सरिसेपणेचि बुझावी ।
जैसा एकला जग चेववी । सहस्रकरू ॥ २० ॥
तैसे शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।
पाहातया भावज्ञा फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥
परि ते असो आतां आघवे । न लगे श्रोतयाते कडसावे ।
जे अधिकारिये एथ स्वभावे । निष्कामकामु ॥ २७ ॥

**अध्याय ९वा—**

अहो तान्हयाचे लागता झटे । तेणे अधिकचि पान्हा फुटे ।
रोषे प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि ॥ १८ ॥
सहजे तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा ।
तरी दोंदे पेलती अक्षरा । प्रमेयाची ॥ २६ ॥
अर्थ बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायाते विये ।
भावाचा फुलौरा होत जाये । मतीवरी ॥ २७ ॥
म्हणुनि संवादाचा सुवावो ढळे । 'तऱ्ही हृदयाकाश सारस्वते वोळे ।
आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥ २८ ॥

**अध्याय १० वा—**

जी दैविकी उदार वाचा । जे उद्देशु दे नाभिकाराचा ।
ते नवरस सुधाब्धीचा । थावो लाभे ॥ ७ ॥
देशियेचेनि नागरपणे । शांतु शृंगाराते जिणे ।
तरि ओविया होती लेणे । साहित्यासि ॥ ४२ ॥
उदयालिया (उठावलिया) भावारूप । करितां रसवृत्तीचे लागे वडप ।
चातूर्य म्हणे पडप । जोडले आम्हां ॥ ४६ ॥

**अध्याय ११ वा—**

म्हणोनि भलतेणे एथ सद्भावें नाहावे । प्रयागमाधव विश्वरूप पहावे ।
येतुलेनि संसारासी द्यावे । तिलोदक ॥ १० ॥
हे असो ऐसे सावयव । एथ सासिन्नले आथी रसभाव ।
तेथ श्रवणसुखाची राणीव । जोडली जगा ११ ॥
जेथ शांताद्भुत रोकडे । आणि येरा रसां पडप जोडे ।
हे अल्पचि परि उघडे । कैवल्य येथ ॥ १२ ॥
मग हे रसभाव फुली फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुरवाडु जगा ॥ २० ॥
तो सहजेचि स्नेहाचे अवतरण । आणि येरू स्नेहा घातले आहे माजवण ।
ऐसिये मिळवणी वेगळेपण । उरे हेंचि बहु ॥ ४२ ॥

**अध्याय १२ वा—**

नवरसी भरवीं सागरू । करवी उचित रत्नांचे आगरू ।
भावार्थाचे गिरिवरू । निफजवी माये ॥ ११ ॥

**अध्याय १३ वा—**

वक्तृत्व गोडपणे । अमृताते पारूखे म्हणे ।
रस होती वोळंगणे । अक्षरासी ॥ ३ ॥
भावाचे अवतरण । अवतविती खूण ।
ह्राता चढे संपूर्ण । तत्त्वभेद ॥ ४ ॥
दाऊ वेल्हाळ देशी नवी । जे साहित्याते वोजावी ।
अमृताते चुकी ठेवी । गोडसपणे ॥ ११५७ ॥
बोल वोल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे ।
रसरंगी भुलावणें ( रसरंगा भुलवणें ) । नादु लोपी ॥ ११५८ ॥
खेचराचियाही मना । आणी सात्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ११५९ ॥
तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसी विश्वभरूं ।
आनंदाचें आवारू । मांडूं जगा ॥११६० ॥

**अध्याय १८ वा—**

परि मऱ्हाटे बोल रंगे । कवळिता पै गीतांगें ।
तै गातयाचेनि पांगे । हेकाडता (एकाव्यता) नोहे ॥ १७३६ ॥
तैसा गाणिवेतें मिरवी । गीतेवीणही रंगु दावी ।
तो लोभाचा प्रबंधु ओवी । केला मिया ॥ १७४१ ॥
तेणे आबालसुबोधें । वोवियेचेनि प्रबंधे ।
ब्रह्मरस सुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ १७४२ ॥
तैसेनि आइतेपणें । कवित्व जाले हें उपेणें ।
मनन निदिध्यास श्रवणें । जिंतले आतां ॥ १७४६ ॥

**अध्याय १८ वा—**

(सार अलंकार—श्रेष्ठता, हीन गुणत्व, इत्यादींच्या उत्तरोत्तर आधिक्याचें वर्णन—

(१) "राज्ये सारं वसुधा, वसुधाया पुरं, पुरे सौधम् ।" इत्यादि

(२) तृणाल्लघुतरस्तूलस्तूलादपि च । याचकः । इ०)

ऋतु बरवा शारदु । शारदी आथी चांदु ।
चंद्री जैसा संबंधु । पौर्णिमेचा ॥ ३४४ ॥
कां वसंती आरामु । आरामीही प्रियासंगमु ।
संगमी आगमु । उपचाराचा ॥ ३४५ ॥
वाचे बरवे कवित्व । कवित्वी बरवे रसिकत्व ।
रसिकत्वीही परतत्त्व । स्पर्श जैसा ॥ ३४६ ॥

अ.—११ वा

नाना कमळी पांडवा । विकाशु जैसा बरवा ।
विकाशीही यावा । परागांचा ॥ ३४७ ॥
तैसी सर्व वृत्ति वैभवी । बुद्धिचि एकली बरवी ॥
बुद्धिही बरव नवी । इंद्रिय प्रौढि ॥ ३४८ ॥
इंद्रिय प्रौढि मंडळा । श्रृंगारू एकुचि निर्मळा ।
जे अधिष्ठात्रिया कां मेळा । देवतांचा जो ॥ ३४९ ॥

(३) **रस :—**

"समुचित ललित संन्निवेश चारूणा। काव्येन समर्पितैः । सहृदय हृदयं प्रविष्टैस्तद्धीय सहृदयता-सहकृतेन । भावनाविशेष महिम्ना विगलित दुष्यन्त रमणीयत्वादिभिरलौकिक विभावानुभाव व्यभिचारी शब्द व्यपदेश्यैः शकुंतलादिभिरालम्बन कारणैश्चद्रिकाभीरूद्दीपन कारणैश्रुपातादिभिः सहकारिभिश्च संभूय प्रादुर्भावितेनालौकिकेन व्यापारेण तत्काल निर्वर्तितानंदाशावरणा ज्ञानेनातएव प्रमुष्ट परिमित प्रमातृत्वादि निजधर्मेण प्रमात्रा स्वप्रकाशतया वास्तवेन निजस्वरूपानन्देन सह गोचरी क्रियमाणः प्राग्विनिविष्टवासना-रूपोरत्यादिरेव रसः ॥ " तथाच आहुः ॥—व्यक्तः स तैर्विभावाद्यैः स्थायी रसः स्मृतः ॥

अर्थ—–काव्यानें लिहिलेली रसिकांच्या हृदयांत प्रवेश केलेल्या त्याच्या जवळ जी रसिकता त्यामुळें एक विशेष भावना उत्पन्न होऊन–दुष्यन्तपणाचें रमणीयत्व नाहीसे होऊन–अलौलिक लोकामध्ये पहायला न मिळालेले असे **विभाव** (कारण) **अनुभाव** (बाह्यचिन्हे उमटणे) कार्य, **व्यभिचारी भाव ह्या शब्दांनीं** ज्याचा उल्लेख करतां येतो असें आलंबन कारण उद्दीपन कारण, प्रत्यक्ष दिसणारे कार्य आणि सहकारी भाव यांच्याशीं एकत्र होऊन प्रगट झालेला अलौकिक जो व्यापार त्यानें आनंद अंशाला झांकणारे जे पटल ते नाहीसें होऊन "मी एक जाणता आहे व हे ज्ञेय आहे" असें हे सर्व नाहीसे होऊन त्या जीवाने स्वयंप्रकाशमान असा आपला निज स्वरूपानंद याच्यासह प्रगट होणारा वासनारूप जो (निश्चल आत्म-विलास स्वभाव आत्मबल अभिप्राय म्हणजे) **स्थायीभाव तो 'रस' होय.** पहिले आनंदावरिल झांकण (हिरण्मय झांकण)=देह ते अलौकिक विभाव इत्यादिकांनीं दूर होऊन जीवात्म्यामध्यें एका दिव्य परमानंदा-बरोबर प्रगट होणारा असा स्थायीभाव–-'सजातीय विजातीयैरतिरस्कृत मूर्तिमान् । यावद्रसंवर्तमानः स्थायीभाव उदाहृतः ॥' त्याला **रस** म्हणतात. ती गोडी सांगता येणार नाहीं. तो तदाकार होय. ("व्यक्तःसतैर्विभावाद्यैः **स्थायीभाव रसस्मृतः**" इति)

**रसोवैसः**=परमात्मा हाच रस होय. रस उचंबळून आला म्हणजे मन तदाकार होण्यानें इंद्रियाची चळवळ बंद पडते तेव्हा वृत्ति स्वरूपाकार होऊन असते. तेव्हां रस वर आला आहे असें होतें.

**रसः—**

रस ६ षड्रस— कडू, तुरट, तिख, इत्यादि.

रस हा २४ गुणापैकीं एक.

रस **हे** नाट्यामध्यें—'शातस्य शम साध्यत्वान्नटेचतदसंभवात् । अष्टावेव रसा नाट्ये न शांस्तस्तत्र-युज्यते ।' असें आठच रस आहेत. त्यांत शांत रस मिळविला म्हणजे नऊ रस. त्यांत आणिक **वात्सल्य** रस मिळविला म्हणजे १० रस होतात.

**रसव्यक्त :**—आंतमध्यें जो चिदानंद आहे त्यायोगेकरून आनंद प्रगट होतो व त्यामुळें हा रस व्यक्त होतो.

प्रत्येकाजवळ आनंदरूप परमात्मा आहेच–तोच **परमानंद ह्या रसानें प्रगट होतो. म्हणून**

**त्या रसाला परमानंदत्व आले आहे.** "ब्रह्मविद् परमाप्नोति" "शोकं तरति च आत्मविद्", **"रसो ब्रह्मरसं लब्ध्वाऽनंदी भावति नान्यथा"**

**रस भाव चित्ताच्या रसरूप स्थितीस भावरूप अभिप्राय प्रगट होतात ती रतिः**

एकमेकांवर अवलंबून असलेला, प्रेम नांवाचा **चित्तवृत्ति विशेषः भाव**='रति' तो स्थायीभाव होय. **"स्त्रीपुंसयो अन्योन्यालंबणः प्रेमाद्द्यः चित्तवृत्ति विशेषः रतिः**=स्थायी भावः"

ताटस्थेन रस प्रतीतावना स्वाद्यत्वम् ।। आत्मगतत्वेन तु प्रत्ययो दुर्घटः।

**नवरस कोणते तें :—**

"श्रृंगार करुणः शान्तो रौद्रो वीरोऽभ्दुतस्तथा । हास्यो भयानकश्चैव बिभत्सश्चेति ते नव ॥"

**नवरसांना स्थायीभाव**=(स्वभाव विलास किंवा आत्मबल, कामचेष्टा, स्थैर्य) **आहेत.**

हास्याचा—हास, करुणरसाचा—शोक, रौद्ररसाचा—क्रोध, वीर रसाचा—उत्साह, भयानकाचा—भीति, बीभत्स—जुगुप्सा (तिरस्कार) अद्भुताचा—विस्मय, शांत रसाचा—शम (निर्वेध-नित्यानित्यतेवर-आरूढ झालेला विषय विराग) श्रृगाराचा—रति.

(२) **नवदुर्गा** ही नवरूपे धारण करणारी देवी आहे.

(३) कां **एकुचि पुरुषु** जैसा । अनुसरत नवां रसां । नवविधु ऐसा आवडो लागे ॥३३२॥ अध्याय १८ वा)

(४) **नऊही रसरूप** अथवा सर्वरसस्वरूप **भगवान तो**—भोजपतीच्या रंगमंडपांत बसलेल्या सर्व लोकांना त्यांच्या त्यांच्या अभिप्रायाप्रमाणें (श्री भगवान तो) कसा दिसला तर—

मल्लांना वज्र (रौद्र रस), सामान्यांना श्रेष्ठपुरूष (अद्भुत), स्त्रीयांना मूर्तिमंत मदन (शृंगार) गोपाळांना नंदादिक गोपांना-स्वकीय हा तर आपला गोवळी, गोपाल सखा (हास्य) अयोग्य अभिलाषी राजांना, त्यांचा नियंता (वीर), आईबापांना-वसुदेव देवकी यांना-बालक (वात्सल्य), भोजांचा राजा कंस त्यास कर्दनकाळ (भयानक), अज्ञ जीवाला विराज (शोभा), योग्यांना-परमतत्व (शांत) व यादवांना, अनंतकोटी ब्रह्मांडनायक, आपले प्रेम आराध्य-, परम देवता-, आनंदमूर्ती, ग्वाल बाल, परमप्रीय, वाटला. (भक्तिरस.)

याप्रमाणे बलरामासह श्रीकृष्ण रंगमंडपांत शिरला असता एकच श्रीकृष्ण असून तो अनेक प्रकारचा भासला.

**(६) प्रत्येक रसाला भाव असतात—चित्ताच्या रसरूप स्थितीत (विशेषसी चित्तवृत्ती -आंतील धर्म, रूप) भाव प्रगट होतात.**

(१) **स्थायी भाव** (२) **अनुभाव** (३) **विभाव**=१ बाह्य चिन्हे. २ कारण. (आलंबन व उद्दीपन). ४ **महाभाव**=लीला, चरित्र, आठव. ५ **संचारी भाव** (उत्कंठा, उद्वेग, आर्तता इ. रसप्रवाह चालू असतांना **अविरोध भाव-रसांतर भाव व विविध भाव उत्पन्न होणारा** ['पायखू झाला संचारू नवल । वेदे विधान लाविले । म्हणे विठ्ठल विठ्ठल । नेणे तहानभूक नाहीं लाज अभिमान !!!'] (६) **प्रेमभाव** (७) **आतुर भाव** (विरह) (८) **ध्यास**-ध्यान (९) **कांता भाव** (१०) **राधा भाव-गोपी भाव, हास्य भाव** इत्यादि भगवंताच्या लीला-आठव असल्यानें ते भाव भक्ताचे ठायीं प्रगट होत असतात.

**(६) सतत स्थितीशील असतो तो स्थायी भाव—**

अनुभाव व संचारी भाव प्रगट झाल्यावरही ज्याचें स्वरूप झांकले जात नाहीं, व जो विरूद्धाविरूद्ध सर्व भावांना आत्मसांत करतो, असा सतत स्थितिशील असणारा तो स्थायीभाव—

"सजातीयविजातीयैरतिरस्कृत मूर्तिमान् ।
यावद्रसंवर्तमानः स्थायीभाव उदाहृतः ॥

(७) **रतिरूप स्थायीभाव भक्तिरसांत परिणत** झाल्यावर त्याच्या चार स्थिति संभवतातः

(१) पूर्वराग (२) प्राप्ति (३) विरह=(१) वेगे आणावा तो सये, प्राणु माझा (२) दूध भरूनि वाटी लावीन तुझें ओठी (३) पुन्हां केव्हां भेटेल बरे ! (४) हे देव देव ! भुवनैक बंधो ! करूणैक सिंधो ! (वर्तमान) डोळयातून अश्रु, मूर्छा, स्मित, गीत, कटाक्ष. (४) मीलन.

(भगवंताविषयीं प्रीति त्यामुळें **ध्यास** गुणश्रवणामुळें चित्तात प्रथम प्रेमोत्पत्ती तो **पूर्वराग,** भगवदनुग्रहानंतर भगवत् साक्षात्कार–दर्शन–हीच **प्राप्ती** भगवद्विषयक रति उत्पन्न होते–सत्समागम आणि तदभावानें **विरह** पुन्हः धावा करण्याने **मिलन**ः

सत् श्रवण झाल्यानंतर भगवद्विषयक रति. तेथें मन तन्मयतेमुळें व प्रेमवृद्धिमुळें भगवंताच्या आनंद-मय स्वरूपाचे स्फुरण होते. भक्तिरसांत माधूर्य आहे. माधूर्यात आनंद आहे. आनंदांत शांतरस आहे. शांतरस प्रेमाला पोषक आहे. आनंद शांत रसाला पोषक आहे. भक्ति रसाचा विभाव म्हणजे कारण भगवत् मूर्ति हा आहे. उदाहरणें—उद्धव, यशोदा, गोपी, भक्तवृन्द, यशोदा पुत्रवात्सल्य.

(८) **वात्सल्य रसाचा अनुभाव** (बाहेर चिन्हें उमटणे ते) बालकास आलिंगन, शिरचुंबन पहात रहाणें इत्यादि, पान्हा, रोमांच, आनंद, (वात्सल्य) वत्सलरस, आनंदमय दर्शन, सहर्ष होणे हे अनुभाव होत.

(९) प्रह्वीभाव–(नम्रता) [प्रह्वतः–हृष्ट मनस्तृप्तःप्रह्लन्नःप्रमुदितप्रीतः । प्रह्वः=नम्रता, तल्लीन, तत्पर, अनुकूल, आसक्त, प्रसन्न, वांकलेला. प्रह्वणं=नम्र होणे, पूजा करणें. प्रह्वायः=आमंत्रण, बोलावणें]

(१०) **भक्तीरस—प्रेम** हेंच भक्तीचे विलाससर्वस्व आहे. **अष्टसात्त्विक भाव** प्रेमांत आहेत. प्रेमभावामध्यें भगवंताचे **तेजकिरण** आहेत. मूर्तिदर्शनानंतर **रतिरूप स्थायीभाव**, भक्ति-रसाचे रूप धारण करतो. (**भक्तिभाव**=स्वयंफलद्रुपता.)

**भक्तीरसाचे अनुभाव** (म्हणजे बाह्यचिन्हें उमटणें ते—)

(१) **भक्तिरसांत भक्तस्थिति**=भगवंताचे गुणगान संकीर्तनांत वाणी सद्गदित होते. चित्त प्रेमाने आर्द्र होते. भक्त भक्तिप्रेमाने वारंवार अश्रु ढाळतो. केव्हां हांसतो. निर्लज्ज होऊन नाचतो. असा भक्त त्रिभुवनाला पावन करतो. ["**तीर्थी कुर्वन्ति तीर्थानि ।" भक्ता एकान्तितो मुख्याः** ॥ कंठावरोधरोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयंति कुलानि पृथिवींच ॥"

"**नास्ति तेषु जाति विद्यारूप कुलधनक्रियादिभेदः** ।"] भगवत्प्रेमाकरितां भक्ति मुखचंद्र दर्शनांत आल्हाद हेंच भक्तीचें सौभाग्य ! अशा आनंदातील विहार हा येथें (भक्ति करणाचे कार्य विहार तो) **अनुभाव** आहे. अजिंक्य देवाला जिंकले म्हणून भक्तास **हांसू** येते. बहुकालानंतर प्रभु भेटला म्हणून **विस्मय** वाटतो.

(११) (२) **अष्टसात्त्विकभाव**—१ स्तब्धता, २ स्वेद, ३ रोमांच, ४ कंठ भरून येणे, ५ कंप, ६ विकलता, ७ आनंदाश्रुचें पूर, ८ जीवभावाचा लय. हे अष्टसात्त्विकभाव भक्तिरसाचे अनुभाव-बाह्यचिन्हे उमटणे ते आहेत.

(१२) **भगवत् विरह**--

भक्तिरसाच्या उत्कटतेमुळेंच भगवत् विरहांत भक्ताच्याठायीं प्रतीत होणाऱ्या **अवस्था (१)** उत्कृट स्मृति (२) निद्रा अभाव (३) उद्वेग (४) कृशता (५) शरीरविषयक उपेक्षा (६) विसंगत, असंगत प्रेमोद्गार (७) पीडा (८) आत्मविस्मृति (९) मूर्छा (१०) देहसमर्पण–देह आसक्ति उपेक्षा. उदाहरणे— गोपीजन, वैष्णववृन्द,

**(४) १ [शृंगार]** रसाचे **शृंगार-शांत-अद्भुत-अनुभाव**-स्त्रीचे मुख पाहाणे, तिचे गुणानुवाद श्रवण करणें, स्वतः वर्णन करणें, इत्यादि जे सात्त्विकभाव (**सात्त्विकभाव म्हणजे शरीरासंबंधीचे भाव**) त्याचे नांव **अनुभाव**.

**व्यभिचारी भाव :—**

"यानि सहचरंति तानि व्यभिचारी शब्देन ।"

आपल्याबरोबर असणारे–पति अथवा स्त्री न पाहिल्याने ग्लानि येणे, क्षय, मोह, विषाद, चिंता औत्सुक्य, दीनता, देह जड होणे, जडता, **हे व्यभिचारी भाव होत.**

तसा जरी शृंगाराचा शांत संबंध नसला तरी ते समजण्यासाठीं शृंगाराची उदाहरणें दिली आहेत.

(२) **शांतरस :—निर्वेद स्थायीभावः**

नित्यानित्यतेवर आरूढ झालेला विषय विराग हा **शांत रसाचा स्थायीभाव** आहे.

**शांतरसाचा आलंबन विभाव**=जग हे अनित्य आहे असें मानणें हा आलंबन विभाव--

**शांतरसाचा उद्दीपन विभाव**—वेदांत श्रवण, तपोवनांत जाणें, तापस दर्शन इत्यादि इत्यादि हे शांत रसाचे उद्दीपन विभाव होत.

**शांतरसाचा अनुभाव** (कारणाचे कार्य) विषयाबद्दलची अनावड, शत्रुमित्राबद्दलचा उदासीनपणा, चेष्टा, हानि म्हणजे हालचाल बंद, नासाग्र दृष्टि, कुणाकडेही न बघणें, कुणाच्याहि तोंडाकडे न पाहाणें. (आंत शांतरस प्रगट झालेला असला म्हणजे ही कार्ये बाहेर दृष्टीस पडतात.)

**शांतरसाचा व्यभिचारी भाव**—हर्ष उन्माद स्मृति, मति इत्यादि हे व्यभिचारी भाव. निर्वेद हा मुख्यत्वे स्थायीभाव. त्या **विषयविरागावरच मुळीं शांतरस म्हटला जातो.**

शांतरसाचा **विभाव** :—(१) कारण (२) स्थायीभावास आधार व उत्तेजन देणारी कारणें त्यास **विभाव** म्हणतात.

"एवं एषां स्थायीभावानां लोके तत्तनायकगतानांयानि आलंबनतया उद्दीपनतया वा कारणत्वेन प्रसिद्धानि **विभाव** शब्देन व्यपदिश्यंते ।"

(३) **अद्भुत रस—विस्मय हा स्थायीभाव** : अलौकिक वस्तुदर्शन "जन्मा आश्चर्याख्या विस्मयः"—

**अनुभाव** :—श्रीकृष्णाचे मुख पाहून ('चराचर जगत् जाल सदनं, वदनं तव, गलत् गगनं गांमिर्यं, विक्ष्य अस्मि हृतचेतना) देहभान हारपले.

**आलंबन विभाव** :—हे (आपले) मुख (कारण) त्या भगवंताच्या मुखांत पहाण्यास मिळाले, 'ते रूप' म्हणून आलंबन विभाव. **उद्दीपन**-आंतमध्यें (भगवंताच्या मुखामध्यें) स्थावरजंगमात्मक जे जगत् त्याचे दर्शन झाले म्हणून हा **उद्दीपन विभाव.**

देहभान हारपले त्यायोगे लक्षांत येणारे रोमांच नेत्रस्फारणं **हे अनुभाव म्हणजे अद्भुत रस**

**प्रगट झालेला आहे त्याचे कार्य** –, त्यावेळेला बरोबर असतात ते संचारी किंवा **सहचारी भाव** भीती उत्पन्न होते, त्रास वाटतो. हे **व्यभिचारी भाव** होत.

**सगुणदर्शन--प्रेमभाव, वेणूनाद, चतुर्भुजमूर्तिदर्शन.**

(५) अंतःकरण अंतर्मुख होऊन देहबुद्धि विराम पावते. भेदभाव शांत होतो. **विश्वात्म** ऐश्वर्य प्रगट होते.

सगुण स्वरूपांत विश्वोद्धारासाठीं भगवंतांनीं केलेल्या लीला दिव्य प्रेमभावनेनें वर्णिल्या जाव्यात, नामस्मरण परम मंगल-साहित्य गंगा, हृदयांत निर्माण होऊं द्यावी. भाविक हृदयांत मानवी जीवन सार्थकतेचा आनंद जीवन भगवान श्रीकृष्ण-जीवनाची ज्योत तेथें **प्रेमरस पान्हा** चित्तांत उदित झाल्यावर **चित्त चैतन्यरूप** होते असा अनुभव भक्त जनांना-संकीर्तनामुळें-झालेला असतो.

भक्तांचे हृदयांत भगवंत बसून विश्रांतीस येतो भक्त-भजन **वेणूनाद** श्रवणाने भगवंत आनंदानें डोलतात-कृपाळु श्रीकृष्ण भक्ताना दर्शन देऊन कृतार्थ करतो-भक्त आपले सर्वस्व प्रभुचरणीं अर्पण करतो-**धांवा** करण्यावर प्रभु धांव घेतो विलंब लावित नाहीं.

**प्रभुकृपेत शांती**--शांती हीच आनंद ज्योति, ज्योतिर्मय प्रकाश, प्रेमानुसंधान, उषेच्या सुवर्ण रंगाचे नेत्र संतुष्ट होतात. आयुष्याचा उषःकाल अंतःकरण जागृतीत आहे. अंतःकरण निर्मळ तरच तेजोमय प्रकाशात लय पावणें होते.

**अमृततुल्य परमात्मा सर्वत्र आहे—**

परमात्मा संतांच्या कृपेत विश्रांतीस आला, भक्ताच्या बाहूंत सांपडला, अंतःकरणाच्या स्फूर्तीत प्रगटला, प्रेमाच्या प्रार्थनेतून उगवला, नेत्राच्या अश्रूंत निर्माण झाला भगवंताच्या लीला-आठवानें भक्ताचे-ठायीं प्रगट होतो, प्रेम ज्वाळेत स्वतःचे हवन करण्याकरितां प्रगटलाच प्रगटतो.

असा हा आहे तरी कोठें?

असा ध्यासच एक भगवंतास प्रगट करतो. लाकडात सर्वत्र अग्नि आहे. ज्या भागाला घर्षण होतें तो भाग अग्निरूप होतो-चिंतनाच्या घर्षणानें वनमाली प्रगट होतो.

(अवघे ब्रह्मरूप रिता नाही ठाव) प्रतिमा तो देव कैसा नव्हे?

**प्रतिमा, मूर्ति, प्रगट, (स्पष्ट) रूप दर्शन--**

लोखंडात सुवर्णात तोच आहे. जडात चेतन पदार्थ तोच आहे. प्राणमय शक्तीत तोच आहे.

लोखंड व सुवर्ण यांतील सुप्त शक्ति जागृत भस्म करण्यानें केली, तर त्यातील सूक्ष्म परमाणु आरोग्य संवर्धन करतातः चैतन्य वस्तु त्यांत ओतप्रोत भरलेली आहे.

दिव्य रत्नें जगाला प्रकाशमान करतातः प्रेमभावे करून आनंद-प्रेमाचा प्रेम आनंदाचा वर्षाव सर्वत्र करतात.

**साक्षात्कारांत**—साक्षात्करण्यांत **विश्वातील आनंद आहे**. आनंद कल्लोळात विश्वशांती आहे.

दिव्य आत्म्याचे दिव्य प्रगट करण्यास, तसेंच मार्गदर्शक होण्यास, मधून मधून दिव्य आत्मे प्रगट होतात. भाविकांना त्यांचे त्यांचे ते ते दर्शन देऊन सुखी केले होते.

**दर्शन रूपवर्णन स्मरण**--चिकुरं बहुलं विरलं भ्रमरं मृदुलं वचनं विपुलं नयनम्। अधरं मधुरं ललितं वदनं चपलं चरितं च कदाऽनुभवेत्॥

**साक्षात्कार ग्रंथिभेद—**

"न द्वेष्टिसप्रवृत्तानि न निवृत्तानिकांक्षति ।
उदासीन वदासीन ग्रंथिभेदस्तदुच्यते ॥

माझ्या साक्षात् प्रगटण्यानें–, साक्षात् परमात्माच सर्व तेजोमयाचा, ज्ञानबोधच तो, उदय घेऊन आल्यानें, विश्वात्मक आत्मरूप ते, उदयास आले, व आतां–, अहंकाराची (भूतादींची) वारी फेरी संपली, त्याचा लोप झाल्यानें द्वैतबुद्धीची भाषा ती मुळींच पाहूं येईना, दुजेपण ते संपले! येथें अहंकाराची वारी संपते, अहंकाराची भेट होत नाहीं–व त्याचा लोप झाल्यानें द्वैत नाहींसे होतें; द्वेषभाव नाहींसा होऊन, जिकडे तिकडे व्यापक भावच पुढें येत असल्यामुळें, प्रेमामुळें होणाऱ्या सगुणानंदाचें दर्शन होतें. (२) **महान् साक्षात्कारामध्यें** जो आनंद होतो तो **बोधच एक** म्हणून तो निर्गुण आनंद म्हटला आहे. प्रेमांत सगुण आनंद आहे तो अत्यंत दुर्मिळ. इंद्रिये नेहमी आडवी येतात.

**७ रस, भाव, वगैरे शब्दांच्या व्याख्या.**

**रस**=भाव येण्यानें, सर्व भावानें, उद्दीप्त झालेला जो परमात्मा तो अंतःकरणांत उगवला म्हणजे उद्दीप्त चित्तवृत्ति जी तिला '**रस**' म्हणतात.

**भाव**=रूप; चित्तवृत्ति विशेष; आंतील धर्म, **विभाग**=१ बाह्यचिन्हें उमटणें जे १ कारण, स्थायीभावाला उत्तेजन देणारे व आधार होणारे कारण, **स्थायीभाव**=आनंदावरील झांकण अलौकिक विभावादी कारणानें दूर होऊन जीवात्म्याला एका दिव्य परमानंदाबरोबर प्रगट होणारा जो तो '**स्थायीभाव. ह्याला रसही म्हणतात**. तेथीलची ती गोडी सांगताही येत नाहीं, कारण तो तदाकार होय. सतत स्थितीशील असणारा भाव **आलंबन** हा विभाव होय. ज्या वस्तूंवर प्रेम किंवा स्थायीभाव स्थिर असतो ती वस्तू आश्रय किंवा आधार म्हणजे "आलंबन" **उद्दीपन विभाव**=वेदांत श्रवण, तपोवनांत जाणें, नामस्मरण वगैरे, **अनुभाव**=यानिच कार्यतया तानि अनुभाव शब्देन–कारणाचे जे कार्य त्यास अनुभव अंतःकरण उचंबळून येणें, देह रोमांचित होणे असें जे कार्य तो अनुभव.

**महाभाव**––भक्तांचेठायी जो भगवद्लीला चरित्र आठव.

**संचारी भाव**––उत्कंठा, उद्वेग, आर्तता,

**प्रेमभाव**––भगवत् तेजकिरण,

**व्यभिचारी भाव**—आपल्याबरोबर असणारे पति अथवा स्त्री न पाहिल्यानें ग्लानि, क्षय, मोह, विषाद, औत्सुक्य, दीनता, जडत्व, हे व्यभिचारी भाव.

**विरह**=आतुर भाव, उत्सुकता,

**भक्तिभाव**=स्वयंफलद्रुपता-स्वयंरूप,

**वात्सल्यभाव**=भावनेंत चमत्कार आल्हाद विशेष असल्यामुळें वात्सल्य हा रस आहे.

**प्रह्वीभाव**=नम्रता.

**अवस्था**—शुभेच्छा इत्यादी सात

**संप्रदाय**—स्वरूप, प्रकाश, चैतन्य, आनंद.

**काव्यनाटका**—शांत हा शम साध्य. नाट्यामध्यें शांतरस नाहीं म्हणून आठ रस म्हटले नाट्यामध्यें.

(८) **टीप**:—प्रत्येक रसाला भाव, विभाव, अनुभाव, (उद्दीपन आलंबन भाव) स्थायीभाव, भक्तिभाव, गोपीभाव, इत्यादि इत्यादि अनेक भाव आहेत. यासंबंधी संपूर्ण विवेचन करणें म्हणजे ग्रंथहि पुरणार नाहीं. येथें जे या विषयीं लिहिले आहे ते रसिकांच्या दिग्दर्शनाकरितांच केवळ मण्डुकवृत्तीनें थोडक्यांत मांडले आहे.

# ‘ विश्वरूपदर्शनयोग ’

## अनुक्रमणिका

## अध्याय ११ वा

# अध्यायसंगति किंवा विषयप्रवेश

**यादवराव श्रीकृष्ण म्हणत आहेत कीं :—**

मुनीलोकांत 'श्रीव्यासदेव, श्रीव्यासमुनि' मी, व कवीश्रेष्ठांमध्यें (म्हणजे कवीश्वरांमध्यें) धैर्याचा ठाव असे धैर्यवान शुक्राचार्य तो मी जाण. (२९५) याप्रमाणें वेगळाल्या सृष्टींपैकीं उत्पत्तीमध्यें एकएका विभूतीचें नांव देत गेलों तर (विभूति–नामसुता एकेकी) सगळया पूर्ण आयुष्याच्या म्हणजे हजारही जन्मांनीं अवलोकनांत घेतल्या, तरी अर्ध्यासुद्धां संपणार नाहींत. (२९८) ज्या ठिकाणीं ऐश्वर्य व दया ह्या दोन्हींचें एकत्र वास्तव्य झालें असेल, ती हे धनंजया, माझी विभूति समज. (३०७) तें ओळखण्याची हीच खूण (संज्ञा) जें का जगानें वंदन करावें (जे जगें नमस्कारिजे आज्ञा), ज्याचा उपदेश हितकर आज्ञा आहेत (असे अथि–अस्ति आस्थी) ते हे जाणत्या पार्था, (प्राज्ञा) माझेंच अवतार समज. (३११) तेव्हां अर्जुनानें म्हटलें, कीं, हें देवांनीं आपले आपणच तें जाणावें. पण एवढें मात्र खचित आहे कीं, सर्व जग तुझियानेंच पूर्णपणें भरलें आहे. (३२७) असा हा चित्तास झालेला अनुभव–बोध बुद्धींत उतरावा डोळयांसमोर, यावा, हृदयाआंतुली प्रतीति, बाहेरही, (बाहेरूनही) डोळयांना दिसेल असा डोळयांप्रति अवतरावा, अशा उत्कंठेच्या पावलांनीं बुद्धि सरसावली–(आर्तीच्या पाउली मति उठती झाली); (३३१) म्हणून विश्वरूप विचारण्या-पुसण्यास पार्थ कोणत्या बाजूंनीं का पद्धतीनें आरंभ करील, रिगता होईल, तें पुढील प्रसंगीं सांगेन, असे श्रीनिवृत्तिदासांचे श्रीज्ञानदेव म्हणत आहेत. (३६५)

**विश्वरूप दर्शन योग–अकराव्या अध्ययामधील प्रधान आणि गौण काव्यरस :—**

आतां ह्यावर एकादश अध्यायांत [(अकराव्यांत) जो कांहीं काव्यामध्यें भावनेच्या उत्कर्षाला रस म्हणतात तेथें] शांत व अद्‌भुत ह्यांच्या प्रेमभावांची दोनच रसांत कथा आहे. जेथें का पार्थाची विराट स्वरूपाशीं भेट होईल (पार्थास विराट स्वरूपाचें-विश्वरूपाचें दर्शन होईल), (१) जेथें कीं अहो! ज्ञान, भक्तिभावादि विषयांचे, जे शांतरस–स्वाभाविक–कायम स्थान तेथें नवरसांपैकीं अद्‌भुत रस पाहुणचारास आला आहे व आतां अद्‌भुताबरोबर पंक्तीस बसणाऱ्या दुसऱ्या सातही रसांचा तर सन्मान झाला कीं प्रसंगविशेषीं इतर रसही खुलतील. (२) जेथें (म्हणजे ह्या अकराव्या अध्यायांत) शांत व अद्‌भुत हे रस प्रत्यक्ष शोभत आहेत व इतर रसांनांहीं तेथें महत्व मिळत आहे. असे हे अल्पस्वल्प तरीपण तर येथें उघडें कैवल्यच एक जोडत आहे. (१२) तो किरीटी तर विश्वरूपाकडे उत्कंठा लावून (दिठी घालोनि) प्रथम गोष्ट ती कशी बोलला. (२८) हें सर्व विश्व परमेश्वर असा (अनुभवें) कळलेला प्रियकर आवडता '(पतिकरु प्रतीतिगत) तो बाहेरही डोळयांना दिसावा, इंद्रियगमन व्हावा ; तो बाहेरही इंद्रियगम्य असा डोळयांना व्हावा कीं दिसावा. (२९)

**मागील अध्याय संदर्भासहित चालू विषय :—**

म्हणून अर्जुनाच्या (बोलण्याप्रमाणें) अर्जुनाच्या बोलण्यासरिसा देव सहजच आपण विश्वरूप होईल व तोच अर्जुनास विश्वरूप दाखविण्याचा पहिला योग ऐकावा तरी कीं! (४३) मग अर्जुन देवास म्हणतो कीं, हे कृपानिधे! तुम्हीं मजकारणें, न बोलण्याजोगें जें गुह्य असें तें मजला बोलून दाखविलें, उघड केलें, मज वाच्य केलें. (४४) गुह्य तें मजला बोलून दाखविलें; त्यायोगें अहो! महाराज! जी! माझी भ्रांति नाहींशी होईल, माझा मोह जाईलच, येथें विस्मय तो कसचा? तुमच्या पायांची शपथच कीं माझा उध्दार झाला, उध्दरलों कीं, कारण काय, तर तुमचे पाय शिवंतिले आहाती. (६८) आतां ज्याच्या मूळ संकल्पानें का इच्छेनें ही लोकपरंपरा होते, हारपते, विश्वाचा अनादिक्रम निर्माण होतो, तसेंच लय पावतो, त्या

ठायासच स्वतः (आपण) मी असें म्हणतों. (८२) तें मूळचें तुझें स्वरूप मुद्दल असें तें जेथून का दोन हातांचीं, तसेंच चार हातांचीं रूपें तीं देवांच्या काम निमित्तानें वरचेवर तुम्हीं घेतलीं होतात. (८३) असें जें अगाध तुझें विश्वरूप मी कानांनीं ऐकिलेंच ऐकिलें, तें पाहाण्यास हे देवा! माझें चित्त उत्कंठित झालें आहे. (८६)

### मुद्दल विश्वरूप पहाण्याची अर्जुनास इच्छा :—

तरीपण येथें हे श्रीजनार्दना! माझी (संभावना) योग्यता ती विचारास आणावी, घ्यावी, (विचार करून पहावी, लक्षांत घ्यावी) व मगच कीं विश्वरूपदर्शनास आरंभ (उपक्रम) करावा जी. (९३) त्या प्रसन्नपणाच्या सामर्थ्यानें कृपाळु अशा श्रीकृष्णांनीं गर्जना करून मोठ्या आवाजानें म्हटलें कीं पार्था, पाहा! पाहा! ही माझीं अनंत स्वरूपें पहा! (११५)

**श्रीभगवान म्हणाले :—हे अर्जुना (तुवां) तूं तर तें एकच विश्वरूप दाखवा म्हणितलेंस व** तेवढेंच एक दाखवूं केलें तर दाखविलें का पाहिलें असें, विशेष कांहीं पाहिलें असें तुला वाटणार नाहीं, म्हणून आतां देख कीं, अवघें सर्व कांहीं माझ्याच स्वरूपानें भरलें आहे. (१२३)

**करुणरस**—(ओव्या १२३ ते १३२)

### देव विश्वरूप दाखवितात—

यांप्रमाणें नाना प्रकारच्या आकृती पाहतां पाहतां तर ह्या आकृतींचा पारच लागत नाहीं. येथें तर हे सुभद्रापति, ह्या एकेकाच्या अंगविभागामध्यें जगच हें कीं पहा. (१४०)

### अर्जुनाची स्तब्धता—

असें विश्वमूर्तींनीं, श्रीकृष्ण मुर्तींनी–भगवन्तांनीं पूर्णपणें दयाळु अशा देवांनीं म्हटलें–तेव्हां तर हा अर्जून पाहातो आहे किंवा नाहीं, हें देवांना कळेना, व तोहीपण तसें तें विश्वरूप पाहात आहे की नाहीं असे कांहीं बोलेना. तो तर स्वस्थच होता कीं. (१५२) जें अतींद्रिय इंद्रियांस अगम्य म्हणून ज्ञानदृष्टीनेंच दिसणारें अशा व्यवस्थेचें केलें आहे तें तर ज्ञानदृष्टीनेंच कळणारें, तें तुम्हीं चर्मचक्षूंपुढें लौकिकाच्या डोळयांसमोर केलें, पुढें ठेविलें कीं. (१५९) याकरितां ते देवांचे राव–श्रेष्ठ म्हणत आहेत, कीं हें पार्था! तुजला ती तशी विश्वरूप पाहाण्यास योग्य दृष्टि देऊं, कीं ज्यायोगें तूं समूळ विश्वरूप देखशील. (१७६)

### अर्जुनास दिव्य दृष्टि प्राप्ति—

यावर मग दिव्य-चक्षु-प्रकाश प्रगटला, अलौकिक अशा लोकोत्तर दृष्टीचा प्रकाश उत्पन्न होऊन, अर्जूनाची ज्ञानदृष्टि वाढली, दृष्टीस ज्ञानचक्षुरूपी फांटा फुटला व याप्रमाणें देव ते अर्जुनास आपलें ऐश्वर्य, ईश्वरी सामर्थ्य, विश्वरूप दाखविते झाले. (१७९) तें ऐश्वर्य–तेज एकदम प्रगट झालें; तेथें चमत्काराचे एकार्णव अपारपण झालें; [जिकडे तिकडे चमत्कारमय झालें–चमत्कार वाटूं लागला! तेव्हां अर्जुनाचें चित्त अतिशय आश्चर्यांत पडलें.] चित्त तें आश्चर्याचें अफाटपण होऊन विस्मयाच्या समाजीं बुडोनि ठेलें. (१८६)

**चमत्कारच चमत्कार :**—तो तसाच आश्चर्यभरीत होऊन कौतुकानें पाहूं लागला, तेव्हां समोर जें चतुर्भुज रूपडें होतें, तेंच अनेक रूपांमध्यें चहुंकडे भरून राहिलें (नाना रूप मांडोनि ठेलें). (१९३)

**शृंगार रस**—अर्जुन तर चरणौनि म्हणजे पायांपासून तों मस्तकापर्यंत विश्वरूपाचा मोठेपणा पहातो आहे. जें रूप अनेक रत्नें व भूषणांनीं शोभत होत आहे, मिरवत होत आहे, दिसत होऊन आहे. (२१०) श्रीकृष्ण भगवान आपण स्वतः, आंग, (अवयव), आपण स्वतःच अलंकार (दागीने) आपण स्वतःच हात, आपण स्वत: हतियार (शस्त्र), आपण स्वतः जीव, आपण स्वतः शरीर, (देह), चराचर तें देवांनीं

कोंदलें भरलें आहे असे देखत पहात आहे. स्थिरचर सर्व देवानेंच भरलें आहे असें अर्जुन पाहात आहे. (२१५) स्वभावें करूनच कीं, (स्वभावतः) देव ते, ब्रह्मदेवच की–, धाता म्हटलेले विश्वतोमुख ते असा तो परमात्मा स्वभावतःच सर्व बाजूंकडे मुखें आहेत असा, व तो पांडवानें की स्वतःला विश्वरूप दाखविण्यासाठीं –प्रार्थियेला–प्रार्थना केलेली जो तोच आतां अवघें सर्व कांहीं होऊन आहे कीं. (२३३) पाहिलें असतां निश्चित दिसतें. यांत नवीनपणाचा नवलाव तो कसचा ! पण न पाहातांहि त्यास तें रूप दिसत आहे असे कौतुकच कीं एक. (२३९) आणि त्या विश्वरूपांत एकीकडे, एका बाजूस, सर्व जग आपल्या विस्तारानें आहे जसें कां महोदधीमध्यें–(सागरांत का मोठ्या समुद्रांत) बुडबुडे ते वेगवेगळे दिसतात. (२४२)

**अर्जुन म्हणाला** :—हे त्रैलोक्यपति ! बहुत काय सांगावें? पण किंबहुना तुमच्या एक एकाच अवयवरूपी भिंतीवर तर, चौदा भुवनें हीं (सात भुवनें व सात पाताळें) चित्राप्रमाणें अंकुरलीं, उमटलीं आहेत. (२६४) तरी अहो ! आतां तर दृष्टीचा दोष नाहींसा झाला–तुम्हीं सहज दिव्यदृष्टि दिलीत (ज्ञान चक्षु दिव्य केलात) म्हणून यथारूपें खरें असलेल्या स्वरूपांत तुमचें सामर्थ्य, तुमचें ऐश्वर्य, तुमचा महिमा मी पाहिला. (२९२)

## आपाद मस्तकांत, विश्वरूप निरीक्षण—

### अद्‌भुत रस—

अहो ! येथें तर अद्‌भुत रसाच्या लाटेमध्यें चौदाही भुवनांस वेढा पडला (कडियाळी) अशा आश्चर्यास मी कोठवर जाणूं ! किती आकळूं ! (३१६) तेज पहावें तों फारच प्रखर, अधिकाहूनहि अधिक-तर असें, अति उष्ण–जाज्वल्य असें, धगधगीत तें न्याहाळीत असतांना (का पाहतांना) तर दिव्य चक्षूंसही त्रास होत आहे–चक्षु ते दिपतात कीं ! (३०३)

असें एकच शरीर ! पण विचित्र, चमत्कारिक आणि भयंकर अशीं तोंडें, पुष्कळ डोळे व अनेक हात, शस्त्रयुक्त असे, (सशस्त्रे अनंत भुजा). (३४०) विश्वरूपास अनेक सुदर हात, अनेक सुंदर पाय, अनेक रंग, नानावर्ण वदनें व प्रत्येक तोंडास आवेशाचा उन्मत्तपणा–आवेशाचे मातलेपण. (३४१)

### भयानक रस—

असें हें असो; वर दांत व दढांची ती दाटी इतकी मोठी कीं दोन दोन ओंठांनींही झांकली जाईना. अशा पुष्कळशा दांत दाढांची दाटी ती लागलेली कीं शस्त्रांचीं जणूं मोठी दाट कुंपणेंच. (३७६)

असें हें नव्हे !' पण अहो ! रोकडें असें अगदीं नगदतेचें उघड बोलणें तें म्हणजे पुष्कळपणें आपलीं सर्व तोंडें पसरून चोहोंकडे सैन्यें हीं कवळीत आहांत. (३९१)

### रौद्ररस—अवयवाचा भयंकरपणा व तेथीलची भयंकर कृति, समर्थता, कौशल्य—

हे कांहीं ते कौरव कुळींचे वीर नव्हत. हे तर आंधळया धृतराष्ट्राचे कुमर ! ते अहो ! आपल्या परिवारासह तुमचिया वदनामध्यें गेले, गेले कीं ! (३९२)

### विश्वरूप दर्शनहेतु—

'जो कांहीं मी मारिता व कौरव मरते अशा फारच भ्रांतींनें गुरफटलों गेलों होतों, मोहानें बहुत मी वेटाळलों होतों, तो मोह मोडण्यासाठीं, भ्रांति नाहींशी करण्यासाठींच कीं, भगवान श्रीअनंतांनीं हें आपलें निजरूप–विश्वरूप जें दाखविलें. (४०७)

**बीभत्स रस, ४२७ ओवी**

म्हणून सत्वर (वहिला) ऊठ! मी अगोदरच मारले, निर्जिव केले आहेत! आतां तूं यांना निवट (नाथिलिया) नसलेल्याच **शोकरूपी संकटांत रिघूं नको, शिरूं नको.** (४७८) अशी ही सर्व कथा त्या अपूर्ण मनोरथास (ज्याचे मनोरथ पूर्ण होतच नाहींत अशा धृतराष्ट्रास, कुरुनाथास संजय) सांगत आहे, असें श्रीज्ञानदेव म्हणतात. (४८३). मग पुन्हः तसाच भीत भीत विश्वरूपाचे पाय जोहारौनि, नमस्कारून अर्जुन म्हणूं लागला कीं, अहो! विश्वरूपा आपण असें (खालीलप्रमाणें) बोललांत कीं (४९१)

**विश्वरूपाचें बोलणें—**

हे अर्जुना, खराच कीं मी काळ (सर्वांचा नाशकर्ता) आहें, व नाश करणें का मिळावें मिळवून घेणें ही माझी क्रीडा आहे, असें हें देवाचें बोलणें खरें आहें असें आम्ही समजूं—समजतों—मानतों. (४९२) यावर संकेतानेंच म्हणजे उत्पत्ति—स्थिति—लय हे स्थिति अनुरूप असतां आज स्थितिकाळींच संहार तो कसा? तर ह्या दोन्हीं सैन्यास आयुष्य पुरें झालें आहे, त्यांचें भरण सरलें आहे, तेंच तुला प्रत्यक्ष दाखविलें; व येर यथाकाळीं म्हणजे इतरांचें ते योग्यकाळीं समज. (५००) आतां **अर्जुन म्हणतो कीं** देवा! तुम्हीं विश्वाचे सूत्रधार, मुख्य नियंते, सूक्ष्म कौशल्याचे असे, येथें विश्व हेंच नाटक असावयाचें एक आणि दाखवावयाचें दुसरें, अशा कला दाखविणारे असे तुम्हीं व आतां जग—लोक हा तर पुन्हः पूर्णपणें पूर्व-स्थितिवर आला आहे. (५०२)

**विश्वरूपास न्याहाळून वारंवार नमनः—**

नंतर त्यानें त्या सायंत अशा विराट स्वरूपी श्रीमूर्तीस आरंभापासून शेवटपर्यंत न्याहाळिलें व पुन्हः वर म्हणत आहे कीं, देवा तुम्हाला नमस्कार असो! अहो प्रभु, तुम्हांस नमस्कार असो! (५२५) बहुत काय सांगावें पण याप्रमाणें—या प्रकारानें—अर्जुनानें हजार वेळां नमन केलें व पुन्हः म्हणत आहे कीं हे देवा! श्रीहरी! तुम्हां सन्मुखास नमो! समोर भागीं असणाऱ्यांस नमस्कार असो! मी नमस्कार करतों. (५३०) माझ्या पाठीशीं उभे आहांत म्हणून तुम्हांस पाठमोरे—पाठीमागें म्हणावें; पण जगासंबंधीं तुम्हांस समोर का मागें म्हणतां येत नाहीं. (तुज जगेसी सन्मुख विमुख न घडे). (५३२)

**अर्जुनास श्रीकृष्णाशीं वागणुकीचा पश्चात्ताप—**

पण अशाही तुम्हांस, हे स्वामिन्! हे प्रभो! विशेषत्वेंकरून जाणत नसल्यानें, आम्हीं तुजशीं सोयरेसंबंधधर्मीं, आप्तसंबंधीं कर्तव्यानेंच कीं, तुम्हांशीं राहाटलों—वागलों. (५३८)

**अर्जुनाचे ठायीं सात्विक भावाची उत्पत्ति—**

असें अर्जुनानें म्हटलें व नंतर पुन्हः पडलेल्या काठीप्रमाणें दंडवत घातलें—देवांना साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां अर्जुनास तर कंप, स्वेद, रोमांच, स्वर—भंग, इत्यादि आठ सात्विक भाव दाटून आले. (५६८)

**पुन्हां दंडवत व विनंति—**

वर तो म्हणत आहे, म्हणू लागला कीं, देवा! प्रसन्न व्हा. प्रसन्न व्हा! देवांनीं प्रसन्न व्हावें. वाचा सगद्गद प्रेमभरित होत आहे. महाराज अहो! मजला ह्या अपराधरूपी समुद्रांतून काढा. (५६९) हे विश्वरूपाचे आनंदोत्सव अनुभव घेऊन, भोगून माझे डोळे तृप्त झाले व आतां तर पूर्वींची श्रीकृष्णमूर्ति दिसत नाहीं म्हणून दृष्टि चांचपडत आहे, हपापत आहे. (६०७) श्रीकृष्णमूर्ति दर्शनाची उत्कंठा! अहो देवा! आम्हांस संसार आणि मोक्षाच्या ठिकाणीं सगुणरूपावांचून सुखाचें असें कांहीं नाहीं. (श्रीमूर्ती

वांचौनि नाहीं.) (६०८) आणि म्हणून तुम्हीं त्याच पूर्वींच्या साकार आकृतीचे व्हावेत ! हे विश्वरूप ! अहो, हे आपले विराटस्वरूप ! (सांवरीं) आटोपून घ्या ! (६०९) असें वाक्य अर्जुनानें म्हणतांक्षणींच– (तो भगवान) **पुन्हां देव (श्रीकृष्णरूपानें) मनुष्य दिसूं लागला.** असें हें कांहीं विशेष नवल नव्हे पण त्या श्रीकृष्णार्जुनाच्या परस्पर प्रेमाचें तें विशेष कौतुकच, प्रेमाचा नवलावच एक. (६४१)

**भक्तप्रेमास्तव पुन्हः कृष्णरूप व पूर्ववत् संग्रामदृश्य—**

(त्यानंतर) अर्जुनानें त्या **बाणाच्या मांडवांत** मांडव किंवा छत दिल्याप्रमाणें पुष्कळ (दाट) बाण सुटत होते त्यालीं **पूर्ववत् स्थिर केलेला विजय रथ पाहिला.** रथाच्या धुरेवर–पुढें श्रीकृष्ण सारथी होऊन बसले आहेत व अर्जुन स्वतः रथाखालीं उभा आहे (असें दृश्य त्यानें पाहिलें). (६६२)

**श्रीकृष्णाची स्तुति**—हे द्वारकेंत रहाणाऱ्या मित्रा ! द्वारकाधीशा !! निजमूर्तिरूपी विश्वरूप दर्शनानें मी सुकून गेलों होतों ; तों आपण मेघ होऊन मजवर वर्षाव केला. (६७०)

**श्रीकृष्णाचें प्रत्युत्तर**—त्या पार्थाच्या बोलण्याबरोबर देव म्हणाले, कीं हे असें काय म्हणत आहेस, असलें कसलें हे बोलणें बोलत आहेस ? ['तुवां तर विश्वरूपी प्रेम ठेवून (यावेस) कीं'] विश्वरूपाच्या ठिकाणीं तुझी आवड असूं दे. (६७४) आतां यावर तो पंडूचा कुमर अत्यानंदित झाला, थोर अशा आनंदरूप संपत्तीनें भरलेला झाला, श्रीकृष्णाच्या (पायीं) चरणीं शरण जाण्यांत कुशल असा एकच कीं तो ह्या जगीं जाणावा. (७०२)

**व्यापक विश्वरूपापेक्षां एकदेशी कृष्णरूपांत विशेष गोडी.**

त्यानें देवाच्या दोन्हीं मूर्ति, विश्वरूप व श्रीकृष्णरूप पूर्णपणें मनानें निरखिल्या, चित्तीं न्याहाळिल्या तेथें तर त्यास विश्वरूपापेक्षां कृष्णरूपांतच (सगुण विशेषांतच) हित वाटलें, लाभ दिसला. (७०२) ओंजळ पुढें करून आहे, अशा नम्र स्थितींत सुलभ सरळ अशा ओवी (बद्ध) छंद ग्रंथ रचनेनें (प्रबंध–कल्पना) कथा गोष्ट मौजेनें सांगितली जाईल. विनोदा विनोदानेंच पुढील विषय सोप्या अशा ओवीबद्ध (छंदानें) सांगितला जाईल, ती छंदरचना आनंदानें परिसा–ऐका, असें श्रीज्ञानदेव म्हणतात. (७०७)

ॐ तत्सत्

# अध्याय ११ वा—विश्वरूपदर्शनयोग—

## सारांश

विभूतींना अंत नाहीं, एकाच अंशानें हें सर्व जग मी व्यापून उरलों आहें. असे ते अद्भुत भगवंताचें रूप तें कसें असेल? तें पहावेंच पहावें, असें अर्जुनाच्या मनांत आलें व तें भगवंतांनीं दाखवावें यासाठीं त्यानें भगवान श्रीकृष्णाची प्रार्थना केली :—

भगवान श्रीकृष्णांनीं अर्जुनास, **विश्वरूपामध्यें**– (त्यांच्या आपल्या शरीरामध्यें–) समस्त चराचर प्राणी, देवदेवता, मनुष्य, पशुपक्षी (आदिकरून) यांच्यासह आश्चर्यकारक दृश्यें तसेंच ब्रह्मांडही पहा असें सांगितलें. श्लोक १–४

पण चर्मचक्षूंनीं विश्वरूप दिसणें अशक्य म्हणून त्यास **दिव्य दृष्टि** दिली, व तिनेंच ते विश्वरूपाचें योगसामर्थ्य–ईश्वरी स्वरूप–त्याजकडून पाहवविलें. श्लोक ५–८

तें त्या अर्जुनास कसें दिसलें हे (अनेक वक्त्र, नयन, दिव्यमाल्यांबरधर, सूर्य सहस्रस्य भा: देव, देव शरीरे, देव कृत्स्नं जगत्) **संजय** धृतराष्ट्ररायास सांगतो कीं, त्या रूपाच्या दर्शनानें अर्जुन अतीशय हर्षित झाला, विस्मित झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले व भगवंतास शिरसा प्रणाम करून कृतांजलि अशा त्यानें भगवंताची स्तुति करण्यास (बोलण्यास) सुरवात केली. श्लोक ९–१४

त्या स्वरूपांत अर्जुनानें काय काय पाहिलें तर ब्रह्मदेव, शंकर, ऋषि, उरग, अनेक बाहू, नेत्र, वक्त्र असा अनंतरूप परमात्मा आदिअंत नाहीं ज्याचा असा तेजोराशी, किरीट, मुकुट, कुंडलें धारण केलेला असा विश्वस्य परम निधान, शाश्वत धर्म गोप्ता, सनातन पुरुष–अनन्त बाहु शशिसूर्य नेत्र, हुतांश वक्त्र दीप्तं, विश्वंतप जसा :

त्वया एकेन, द्यावा पृथिवी अंतर व्याप्त, अद्भुत रूप उग्र असे तें रूप पाहून तिन्हीं लोक व्यथित झाले आहेत–देव तुम्हांस आपलेंसें करीत आहेत, भ्यायलेले ते स्तुतिस्तोत्रांनीं प्रार्थना करीत आहेत. क्षेम स्वति असो, असे महर्षि आशिर्वाद मागत आहेत–रुद्र आदित्य इत्यादि विस्मित होऊन पहात आहेत–तुमचे महत्‌रूप बहुमुखें नेत्र असलेले, बहु बाहु, उरू, पाद, उदर, दंष्ट्रा असलेले ते पाहून लोक हवालदिल झाले आहेत. आकाशास भिडलेलें असें तें रूप, आनन, व्यात्त विशालनेत्र, दीप्त असें पाहून धैर्य येईना, सुख वाटेना. दंष्ट्राकराल मुख पाहून दिशा समजेनात धृतराष्ट्राचे मुलगे सर्व अवनिपालांसहित तुमच्या मुखांत शिरत आहेत. नर लोकींचे वीर तुमच्या विज्वलंति अशा मुखांत शिरत आहेत, असें उग्ररूप धारण करणारे तुम्हीं कोण तें सांगा. ते तसेच त्या स्वरूपाच्या आद्यंत आणि लीला कळावी अशी इच्छा अर्जुनानें प्रदर्शित केल्याबद्दलचें सविस्तर व विस्तारपूर्वक **संजयानें** वर्णन केलें आहे. श्लोक १५–३१

श्रीभगवंतांनीं आपण कालस्वरूपी आहोंत, भीष्मद्रोणादिकांना अगोदरच आवरिलें आहे, त्यांचा धाक बाळगूं नको असें सांगून युद्ध करण्याकरितां त्यास उत्तेजित केलें–उत्तेजन दिलें. श्लोक ३२–३४

**संजय म्हणाला**—भगवान श्रीकृष्णाच्या विश्वरूप दर्शनानें अर्जुनास (आनंद) हर्ष झाला खरा, पण त्याहूनहि तो अधिक भयभीत झाला आणि हात जोडून सगद्‌गदतेनें भीत भीत त्यानें भगवंताची स्तुति करण्यास आरंभ केला. श्लोक ३५–४४

शेवटीं पूर्वीं कधींही न पाहिलेलें रूप पाहून त्याजला आनंद झाला खरा, पण त्याचें मन भयानें व्याकूळ झालें. त्यामुळें त्यानें देवेशा! विश्वमूर्ते! प्रसन्न व्हा! व आपले चतुर्भुज रूप दाखवा म्हणून विनविलें. श्लोक ४५–४६

भगवंतांनीं प्रसन्न होऊन आपले तेजोमय विराट रूप–जे दुसऱ्या कोणीही ह्यापूर्वीं पाहिलें नाहीं असें ते दुर्लभ महिम्याचें–(रूप) ते योगसामर्थ्यानें अर्जुनास दाखविलें व हे अर्जुना! तुला येथें भीति बाळगण्याचें कारण नाहीं कारण तूं जन्मतःच दैवी संपत्तीचा आहेस; म्हणूत तूं येथें घाबरूं नकोस (फक्त तुझा मोह जावा म्हणूनच आम्हीं येवढें मोठें विश्वरूप ध्यान रचिलें) असें आश्वासन देऊन त्यांनीं त्याच्या इच्छेप्रमाणें पूर्वीचें श्रीकृष्णरूप धारण केलें. श्लोक ४७–५०

ते श्रीकृष्णरूप पाहून अर्जुन पूर्ववत् सावध झाला, शुद्धीवर आला, त्याचें मन स्वस्थ झालें. श्लोक ५१

फक्त अनन्य भक्तीनेंच भगवंताला यथार्थ जाणणें व त्याजमध्यें प्रवेश करणें शक्य होतें. वेद, तप, दान, यज्ञ इत्यादींनीं तें रूप पाहाणें शक्य नाहीं. श्लोक ५२–५४

**असा इत्यर्थ सांगून शेवटीं :—**

**अनन्य भक्तीचें स्वरूप व फल :—** सर्व कर्म मत्प्रीत्यर्थ करून मत्परायण होऊन आसक्तिरहित भक्ति करणारा व कोणत्याही भूतांच्याठायीं वैर धरीत नाहीं तोच मला मिळतो. श्लोक ५५

— ॐ तत्सत् —

# ' विश्वरूपदर्शनयोग '

## अध्याय ११ वा

## अनुक्रमणिका

(स्पष्ट) ओव्या

**(१) एकादशी शांत अद्भुत-रस कथा; विश्वरूपाशीं पार्थाची भेट—** १-१२

**श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात**—अकराव्यात शांत व अद्भुत रसांची कथा आहे. जेथें पार्थाची विश्वरूपाशीं (ईश्वराची) भेट होईल. शांत रसाच्या घरीं अद्भुत रस हा भाव देवरूपी पाहुणा, पाहुणचार घेण्यासाठीं आला आहे. त्याबरोबर इतर रसांचाही मान सन्मान होत आहे. वधु व वर यांच्या लग्नप्रसंगी वऱ्हाडियांना अलंकार, (लुगडी) वस्त्रें इत्यादींचा आहेर केला जातो, होतोच, तसें देशी भाषेच्या सुखासनी रस मिरविले—पण शांत (शमितं प्राथितं—) व अद्भुत (विस्मयोद्भुतमाश्चर्य चित्रमपि अथ भैरवम्) हे डोळयांच्या अंजुळी घ्यावेत. चक्षु रूप सूर्य-रूप ते डोळे भरून पहावे, दिव्य ज्ञान मौल्यवान् पूज्य असे सन्मानाचे करून गंध, पुष्प इत्यादि देणे देऊन जसे ह्या देहातील "वासनात्वासुदेवस्य" लोक विष्णु, (एकोविष्णुर्महद्भूतं) जीवदशेचा (अहंभाव) अभिमानी जो श्रीहर त्यास भेटू आला, आलिंगून आहे, परस्पर मित्रत्व करीत आहेत : कसें तर जसे कां अमावास्येस चंद्रसूर्याची दोन्ही पूर्ण बिंबे ती सरसेपणानें परस्परांस गांठीभेटीची झाली, त्याप्रमाणें रसांनीं येथें एकमेकी मिलाफ केला आहे. शांत अद्भुत–, गंगा यमुना–, जीवित सुवर्ण–काळा सुरमा–, यांच्या जोडीनें रूप ते सूर्य डोळा रूप डोळे भरून पाहाणें,—तेथें दिव्यज्ञान पूजन होत आहे. जसें, गंगा यमुनेचे ओघ, प्रवाह (व्यवहार, अखंडपणा, प्रवृत्ति, उत्तम घोडा) ते मिनले, मिळाले तसें रसांना प्रयाग यज्ञपण आले आहे, इंद्रच तो एक तो यज्ञ वाहून आहे. जीवित सुवर्ण–घोडाच की एक तो तेथे रसांना प्रयाग क्षेत्र कीं हे झाले आहे, क्षेत्र हें प्रयाग झालें म्हणून अवघे जग येथें सुस्नात झालें; ओघ गीता ही गुप्त सरस्वती ओघ मूर्त शांत व अद्भुत रस असे हे तिन्ही ओघ उचित असा की भक्तीच जगास भेटली फावली आहे. तुका म्हणे देव भक्ताचा संगम। तेथे नामओघ त्रिवेणीचा ॥ गीता तीर्थ सेवन सोपें. संस्कृत गहनें तोडून मराठी शब्द सोपान रचिलें. भलत्यानेंही तेथें सहभावानें आंघोळ करावी (इंद्र चंद्र घोडा) प्रयाग (श्री कृष्ण विष्णु) माधव विश्वरूप पहावें व संसारांत उत्तीर्ण व्हावें. रसभाव भरास म्हणजे धारण करण्याचे वैपुल्यतेस आले आहेत (ऐकणें अभ्यास कीर्ती वेद) श्रवणसुखाचें साम्राज्य जगास लाभलें आहे–शांत व अद्भुत नगद रोख–दुसरे रसही महत्व पावले आहेत असे अल्प पण उघडें कैवल्यच कीं येथें.

**(२) हा अकरावा अध्याय म्हणजे देवांचें-आपल्या स्वतःच्या सर्वस्वाचे -विश्रांती ठाव स्थान होय.—** १३-२०

हा अध्याय देवांचे विश्रांतीस्थान, – अर्जुन भाग्यवान येथें पोहोंचला–अहो, एकटा अर्जुनच काय पोहोचला पण तेथें भलत्यालाही, आवडेल त्यानां तसेंच आवडतयांना–ही

*गीतार्थ मराठींत* असल्यामुळें सुकाळ झाला आहे. विनवणी कीं तुम्ही सज्जनांनीं येथें **अवधान लक्ष द्यावें**. आपणा संतांच्या सभेंत सलगी करणें बरें नव्हे, तरी पण मज आपल्यावर लोभ ठेऊन या अपत्यास मानावेंच, पाखरास बोलण्यास शिकवावें, व तसें तें बोलूं लागलें तर तुम्ही माना डोलवितां. बालकाचें कौतुक केलें तर माय रिझते, संतोषते, तसें मी जें कांहीं बोलत आहें तें अहो प्रभु, स्वामिन्, आपलेंच कीं शिकविलेलें तें. तें आपलें आपणच ऐकावें असें आहे. सारस्वताचें गोड झाड आपण लाविलें लक्ष शिंपण्यानें तें वाढीस लागेल असें करावें—तरच तें रस-भावरूपी फुलांनीं फुलेल, फळभारानीं बहारास येईल. आपल्या धर्मप्रतिष्ठेनें सर्व जगास देवत्वाची सुखविश्रांति योग जवळचा झाला—जग योगासच आलें असें होईल.

ओव्या

**(३) श्रीगुरु निवृत्तिदेव ज्ञानदेवांच्या विनंतिवर प्रसन्न होतात—** २१–२५

ह्या बोलानीं संत रिझले व तोषले, भले केलें असें म्हणत आहेत, आतां अर्जुनानें जें कांहीं येथें बोलीले तें सांगावें: निवृत्तिदास म्हणतात, श्रीकृष्ण व अर्जुनाचे बोलणें तें मी प्राकृत काय सांगू जाणतो, पण तुम्हीं तें सांगवा: रानींच्या पालेखाईऱ्याकडून लंकेश्वराचें निर्वाण करविलें, तसें, येथें एकला अर्जुन तरी अठरा अक्षौहिणी काय नच जिणेल? जिंकीलच! **समर्थ जें जें कांहीं करी तेंच चराचरी होईल,** त्याप्रमाणें तुम्हीं संत मला बोलवा. आतां बोलतों कीं, अहो निका हितकारक असा गीता भाव जो श्रीवैकुंठनायकाच्या मुखांतून निघाला तो :—

**(४) श्रीगीता ग्रंथाची थोरवी, आख्यायिका, प्रशस्ति, स्तुति :—** २६–२७

अहो बाप! बाप! गीता ग्रंथ! वेदांनी प्रतिपादनास घेतलेली देवता, भगवान श्रीकृष्ण! तोच ज्या ग्रंथामध्यें वक्ता आहे असा ग्रंथ गीता! बाप बाप! गौरवाचा असा! तो कसा वानावा? जेथचे तें वर्णन श्रीशंभूच्या मतीसही नच अंगवणारें तें आतां जीवेंभावें नमस्कारावें हेंच भलें.

**(५) पहिली गोष्ट अर्जुनानें कशी केली?** २८–३९

विश्वरूपी उत्कंठा दिठी—मिठी घालून पहिली ती गोष्ट पार्थ कसा करता झाला तो प्रसंग ऐका, हे सर्व सर्वेश्वर आहे. असा प्रतीतीस आलेला पत्कर तो डोळ्यांनी बाहेरही प्रगटावा दिसावा, गोचर व्हावा, अशी माझ्या जीवी चाड आहे: पण देवांना ती माझी आवड कशी सांगावी? गूढ विश्वरूप तें कसें विचारावें पुसावें? असें संकटच एक मजला वाटत आहे. मागें कुणीही तसें पुसिलें विचारिलें नाहीं तें देवांनीं अगदीं सहज सांगावें असें कसें म्हणावें बरें? सलगीचा मी न्हांगु–, आयिसी–, गरुड,, सनकादिक, गोकुळीचे प्रेमळ लेंकुरपणें तया झकविलें—अंबरीषाचे गर्भवास सोसले पण विश्वरूप दाखविण्याचें राहिलें—राहविलें—: कुणासही तें विश्वरूप भगवान श्रीकृष्ण की दाखवीचनात! हा ठाव! वर, गुज असे! ह्याच्या अंतःकरणीं निज (आपलें असें) ते उठाउठि मजला कसें बरें त्या देवाला विचारण्यापुसण्याचें होईल तें वर नच विचारावें असें म्हटलें तर विश्वरूप पाहिल्याशिवाय सुख नाहीं! वर जगणें तेही पण मुश्किल असेंच! कदाचितच! विचारिलेलें तें काय, अगदीं यःकश्चित् गोष्ट–, असें देवांना वाटावें व मग तें जसें वाटेल तसें करोत—असा उद्देश पुढें करून पार्थ बोलूं लागला. तेंच असें व्हावें कां अशा हेतूचें व्हावें कीं एक दोन उत्तराबरोबर की सर्व विश्वरूपाचा झाडा देऊन देव ते दाखविण्याचे करतील.

ओव्या

**(६) देवाचे मुद्दलस्वरूप पाहाण्याची पार्थाची इच्छा :—** ४०-४३

वासरू पाहिलें म्हणून गाय मोहानें खडबडून उठते मग स्तनामुखाभेटी! तेथें पान्हां केव्हांही ती धरतेच कीं! पांडवाच्या नांवानें रानांवनामध्येंहीं ज्यांचा प्रतिपाळ करण्यास धांवतो तो भगवान श्रीकृष्ण, त्यास अर्जुनानें विचारावें तों तें सहनच करील काय? नच साहिल! वर पुसलेलें तें तो एकदम पुरते करील! भगवान श्रीकृष्ण ते सहजच स्नेह अवतरण व पार्थ तो तर स्नेहास माजवणच एक घातले आहे असा; अशा मिळणीवर वेगळेपण उरत आहे हेंच विशेष कीं! म्हणून अर्जुनाच्या बोलाबरोबर देव आपैसोच विश्वरूप होतील, असा तो पहिला प्रसंग! तरी ऐकावाच ऐकावा.

**श्लोक १ ला** ४४-६८

**अर्जुन म्हणाला की** अध्यात्म अशा संज्ञेचे तें परम गुह्य, मजवर अनुग्रह करण्यासाठीं, जें कांहीं आपण बोलणें, (नच बोलण्यासारखें जें वेदांनांही कळत नाहीं) बोलिलात त्यायोगें माझा मोह बाजूस झाला आहे.

मग पार्थ श्री देवांना म्हणाला कीं हे कृपानिधे! तुम्ही मजसाठीं—जें बोलतां यावयाचें नाहीं, जें वाचेचा विषय नाहीं—तें ब्रह्म आपण बोलिलात! जेव्हां महाभूतें ब्रह्मी आटतात, जीव महदादीचे ठाव नाहींसे होतात तेव्हां जें कांहीं देव होऊन असतात, असें तें शेवटचें विसंवणें, जें हृदयाच्या परिवारामध्यें होतें, तें कृपणाप्रमाणें कीं सेवीत होता! वेदांना, शब्द ब्रह्मास, जें चोरून ठेविलें, जें नच कळू दिलें, ते आपले हृदय आज तुम्हीं मजपुढे उघडें केले, मोकळें करून सांगितलें: जें अध्यात्मज्ञान ज्यायोगें श्रीहराचे ऐश्वर्य हें फिरफिरून अनुभव घेऊन शुद्ध असें ऐश्वर्याचें केलेलें: तुम्ही अहो स्वामिन ती वस्तू मजला एकदम देऊन टाकिली असें म्हणावें तर अहो! (तुम्ही व आम्हीं कांहीं दोन नव्हत) तुम्हांपासून आम्हो कांहीं निराळे नव्हत. पण खरोखरीच मी महामोहाच्या पुरामध्यें शिस (डोक्या) पर्यंत बुडालेला पाहून तुम्हीं स्वतः आंत उडी घालून मजला बाहेर काढलेत. ह्या विश्वामध्यें एका तुम्हांवाचून दुसरे कोणीही नाहीं: तरीपण काय कर्म पाहा कीं, आम्ही तर तूं व मी असे बोलत आहोत, आम्हीच एक आहोत असें म्हणत आहोत: तुम्हीं एक निराळे व मी एक निराळा असे बोलत आहोत. ह्या जगीं 'एकटा मी अर्जुनच काय तो!' असा देहाभिमान अंगी वाहून आहे व कौरवांना तर आपुले स्वजन असें म्हणत आहे. वर मी या कौरवांना मारीन त्यामुळें मजला गति ती कसली मिळेल! जे कां पापच कीं मजला लागेल, असें दुःस्वप्न मी पाहात होतो, तों इतक्यांत तुम्हीं मजला जागे केलेत. देवा, आकाशांत गंधर्व नगरीच्या–ढगांच्या कल्पित वस्तीमध्यें होतोः पाणी म्हणून मृगजळच कीं, पीत होतोः किरडु पाहावे तो कापसाचे पण लहरी तर खऱ्या चेतून होत्या असे वायांच मरणाऱ्या जीवास, वांचविण्याचें श्रेय तुम्हीं घेतलेत! आपलेंच प्रतिबिंब पण तें नेणून सिंह तर आतां कुव्यामध्यें उडी घालणार तें पाहून (असा भाव धरून–) हे श्रीअनंता! तुम्ही मजला राखिलें: येऱ्हवी तर माझा एवढा निश्चय होता कीं, आतांच जरी (सातही सागर एकत्र मिळाले), सर्व जलमय झाले, हें सर्व युग जरी बुडूं लागलें, वर आकाशही तुटून पडावें तरी पण मजला गोत्रजांबरोबर झुंजणें न घडावें. अहो! बरें झालें कीं आपण जवळ होतां, एरव्हीं कुणी बरें मजला बाहेर काढलें असतें, तें? खोटेंच आपणा स्वतःस एक मानलें, आज नव्हतेंच जें त्यासच नाम, गोत्र

असें ठेविलें : अहो ! असें मोठेंच कीं वेड लागलें होतें ! पण तुम्हीं रक्षिलें कीं, पूर्वी जळत जोहरामधून बाहेर काढले, वांचविले तेव्हां तर अहो ! नुसत्या देहासच भय होतें, पण आतां तर अग्नि पीडा निराळीच एक चैतन्यासकटही कीं, आगीनें उपद्रवाचें करणें होऊन येत आहे : दुराग्रहरूपी हिरण्याक्षानें माझी वसुंधरारूपी बुद्धि आपल्या बगलेत मारून (घेऊन) तो तर कश्मल–अर्णवरूपी गवाक्षामध्यें शिरून तेथेच दडला, राहिला. (माझा दुराग्रह हाच कोणी हिरण्याक्ष, त्यानें बुद्धीरूपी वसुंधरा बगलेत घेऊन तो मोहरूपी विवरात दडून बसला आहे.) स्वामी, तुमच्या गोसावीपणानें एक वेळ बुद्धीच्या ठावाचे होणे, बुद्धीच्या महत्त्वास येणें म्हणजे एक नवीनच वराह होणे तुम्हांस येऊन पडले आहे : असें अपारपणाचें तुम्हीं स्वतः केलेलें तें एकाच ह्या वाचेनें मी काय बोलूं पण आपण मजला प्राणदान दिलेत; माझे पंचप्राण मजला परत दिले आहेत कीं ! असें हें व्यर्थ बोलणें तें कशास ? पण अहो ! भले भले असेंच यश आपण देवरायांनीं घेतलें आहे ! जे का माझी मायाचमुळीं सायंततेनें निरसिली गेली. अहो ! आज आनंदसरोवरांतील कमळेंच असे तुमचे डोळे–मजला डोळे भरून पाहात आहेत. आपल्या प्रसन्नतेची ती राउळे जशीं, जय अंगिकारून आहेत 'जयोऽस्मि' करून आहेत. ती ज्यास स्वीकारून, अंगीकारून आहेत, त्यास आणि मोहाची भेट अशीं ही एक वेडगळ गोष्ट कीं ! वडवानळ विझविण्यास मृगजळानें त्यावर वृष्टि केली म्हणावी जशी. अहो दातारा ! तुमच्या कृपेच्या गाभाऱ्यांत शिरून मी ब्रह्मरसाचा चारा घेत आहे : त्यायोगे माझा विस्मय जाईलच, येथें विस्मय तो कसचा, पण तुमचे पायीं लिगटून आहे म्हणून उद्धरलो कीं जी. ओव्या

## (८) श्लोक २ ६९–८०

भूतांचा भव (संसार) व अव्यय (लय) ह्याविषयीं मी तुम्हांपासून विस्तारानें ऐकलें तसेंच तुमचें (अव्यय) नाशरहित असें महात्म्यही पण तुम्हांपासून ऐकिलें.

कमलपत्राप्रमाणें आयत विस्तीर्ण आहेत डोळे ज्याचे, कोटिसूर्याप्रमाणें तेज आहे ज्याचें अशा अहो शिव–महेशा ! हे मी तुम्हांपासून आज ऐकिलें; जें कां, ही भूतें ज्या कांहीं तऱ्हेनें होतात अथवा तीं कशीं लयास जातात तें :: अशी ती प्रकृति मजपुढें देवांनीं विस्तारपूर्वक बोलिली मजला सांगितली. मायेचा झाडा दिला (प्रकृति उगाणा दिधला.) परमात्म्याचें मूळस्थान दाखविलें. ज्या परमात्म्याचा महिमा पांघरून वेद वस्त्रानें सुशोभित झाला. निःशब्द वेदराशी वाढते, अस्तित्वांत राहाटते, धर्मासारख्या रत्नास वीते, तें तर येथच्या परमात्म प्रमेचे, कांतीचे पायच कीं सेविलेत आश्रयिले, आळविले म्हणून कीं. अहो असें ! अगाध महात्म्य (प्रताप महिमा) सकळानेक मार्गांनी एकपणास आल्यानें जाणले जाणारे जे स्वतःस आत्मानुभवानें रम्य झालेलें तें महात्म्य याप्रमाणें दाखविलें. आभाळांतील अभ्र नाहींसें झालें म्हणजे दृष्टी ही सूर्य मंडळीमध्यें रिघते : हातांनीं शेवाळ बाजूंस केल्यानेंच जळ पाहाणें होतें. सर्पाचे वेढे उकलण्यानें चंदनास आलिंगन देणें घडतें. विवशीं (भूत) पळून गेल्यावरच मग द्रव्य (निधान) हातीं येतें : त्याप्रमाणें प्रकृती जी आड होती ती देवांनीं परती केली, बाजूस सारिली. व मगच कीं परब्रह्म तत्त्वामध्यें मति–बुद्धीनें शेजार केला; परतत्त्व तें शेजाराचें–शय्यागाराचें केलें : म्हणून ह्या परतत्त्वांसंबंधीं मजला भरंवसा झाला आहे. पण आणिक एक इच्छा आहे, हेवा विचार एक मनांत आला आहे व तो विचार जर तुमची भीड धरून तुम्हांपुढें

मांडला नाहीं तर दुसऱ्या कुणास बरें त्याबद्दल तें पुसावें ? आम्हीं तर, तुम्हांवांचून दुसरा एखादा जाणतेपणाचा ठाव जाणत नाहीं, तुम्हींच एक आम्हांस जाणतेपणाच्या ठावाचे असे आहांतः आम्ही कांहीं आमच्या ठावाचे नव्हत पण तुम्हींच कीं पराकाष्ठेचा असा, धन्यवादाचा असा आमचा ठाव पुण्यवंतनेचा, स्तुतीचा, आभारांचा भाग्यवान, कृतार्थ, प्रशंसेचे पात्र, असे आहांत जळचर जळाचा आभार धरील–म्हणजे ओझें–भार मानील तर, बाळक स्तनपानास विरोध, प्रतिबंध करील तर, मग तेथें जगण्यास जियालेपणाचे होण्यास दुसरा कांहींही उपायच नाहीं. म्हणून भीड, धरवत नाहीं, संकट वाटत नाहीं, ह्या जीवी आवडतें तें तुम्हांपुढें अगदी खुशाल बोलावें असें वाटतें. तेव्हां देव म्हणाले कीं, उगी रहा ! गप्प बैस ! स्थिर ऐस ! जी कांहीं आवड, चाड, तुझ्या मनी आहे ती तुवां सांगावीस. ओव्या

(९) श्लोक ३ रा :— ८१-८८

हे परमेश्वर ! हे पुरुषोत्तम !! तुम्ही आपले यथार्थत्त्व जसे आहांत तसे–आत्म्यास –आपणांस वर्णिलें जें, तें तुमचें रूप ऐश्वरम्–षड्गुणैश्वर्य ईश्वरी सामर्थ्य ऐश्वर्यरूप–महात्म्य मी पाहूं इच्छितो; तुमचें देवा ऐश्वर्यरूप मला दाखवावें !

यावर कीरीटी म्हणाला कीं, तुम्हीं हे भगवन् जी गोष्ट केली (कीं सर्व विश्वांत परमात्मा भरून आहे.) त्या गोष्टीची प्रतीती मजला आल्यानें माझी दृष्टी निवालीः आतां ज्याच्या (ब्रह्माच्या) आदि संकल्पानें ही लोक परंपरा होते व हारपते ज्या ठायास स्वतः आपण मी म्हणता, तें तुमचें मुद्दल स्वरूप ज्यापासून देवकार्याच्या निमित्तानेंच ही दोन भुजांची तसेंच चार भुजांची सगुण साकार रूपें नेहमीच्या नेहमीं घेऊन असतां जलशयीच्या रूपानें असणारी, अथवा मत्स्यकूर्मादि अवताराना शोभित करणाऱ्या वस्तूं मिरवल्या होतात व खेळ संपल्यावर तुम्हीं गुणवंत जेथें सांठविलें होऊन असतां.

जे **उपनिषदें** गातात, जे **योगी** अंतःकरणामध्यें (शिरून) पाहातात, ज्यास **सनकादिक** ते पोटी धरून (पोटाळून) आहेत, असें ते तुमचें अगाध विश्वरूप मी **कानानीं ऐकावें जे, ते पाहण्यास** अहो देवा ! माझें चित्त उताविळ झालें आहे. तें सांकड देवानीं फेडावें. चाड का आवड ती विचारली पुसिलीः तरी हीच एक [पीडा (दुःख, आजार)] आर्ति मजमध्यें वाढीची होऊन आहे. तुमचेंच सर्व विश्वरूप माझ्या दृष्टीस गोचर व्हावें, अशी मोठी आशा ह्या जीवास लागली आहे.

(१०) श्लोक ४ ८८-१२२

योगेश्वर असें आपलें सामर्थ्य की, मजला आत्मरूप दाखवण्यावर, म्हणून ते पाहाणें शक्य असल्यास आपलें अविनाशी अव्यय रूप मला दाखवावे.

विश्वरूप देखण्याची योग्यता माझ्या अंगी आहे किंवा नाही (हे मी जाणत नाही.) जसे रोग्यानें आपल्या रोगाचे निदान नाहीं. आर्तीच्या भारामुळें आर्त आपली हाकी विसरतो. तान्हेल्याकडून उत्सुकतेमुळें त्यास समुद्रही आपली तृषा शमविण्यास पुरेल कीं कसें अशी आकांक्षा संभवत नाहीं. प्रबळ इच्छा मुळीं आपली अपेक्षा संभाळवत नाहीं. बालकाची योग्यता माऊलीच जाणते. माझी पात्रता लक्षांत घ्यावी व मगच विश्वरूपदर्शन आरंभ व्हावा. कृपा करा. दर्शन देण्यावरच योगेश्वर असें. नाहींतर दर्शनापुरतें नाहीं म्हणा. बहिरा जो

त्यास पंचम आलापाचे सुख कसचें तरीपण गाणें बंद होत नाहीं. बापियासाठीं जगापुरतें वर्षतोच, पण खडकावर वृष्टी होईल म्हणून काय मेघानें वर्षणाचें सोडलें नाहीं! चकोरास चंद्रामृत सांपडलें तें इतरांना शपथ घालून प्रेमाचें कोरडेपण दूर केलें. पण तुमचें औदार्य स्वतंत्र असें आम्हीं जाणतों. आंधळयास चंद्रप्रकाश तो काय डोळयाशिवाय वायाच जसा म्हणून विश्वरूप दाखवालच असा मला भरवसा आहे जे का ज्ञात्याचें का अज्ञात्याचें ठायीं तुम्हीं नित्य नवे असे असतां उदारपणानें देतांना पात्रापात्र न म्हणतां देतां, अहो कैवल्यासारखें पवित्र तेंहि तुम्ही वैरियास दिलें कीं. मोक्ष तुमचे पाय आराधितो तुम्ही धाडतां तेथें तो तुमचा चाकर म्हणून जातो. सनकादिकाच्या मान्यतेवर पूतनेस (जी विषाच्या स्तनपानानें मारू आली तीस) सायुज्यता दिलीत. ज्यानें राजसूय यज्ञाच्या सभासदीं त्रिभुवनाची मांदि पाहून शतधा दुर्वाच्य शिरी निंदिलें अशा शिशुपाळासही आपल्या स्वतःच्या ठायीं ठाव दिला. ध्रुव बाळास अढळपदाची आवड ती काय? पित्याचे मांडीवर बसावें म्हणून तो वनास आलेला तो तर चंद्र सूर्यापेक्षांहि स्तुत्य केला. असें वनवासियांना दानशूरत्वें तुम्ही कृपाळूपण पुरविलें. अजामिळानें पुत्रास आळविले म्हणून तुम्ही स्वतःसच दिले. भृगुची उरी लाथ ती वाहून आहांत वैरियाच्या कलेवराला तुम्ही अजूनही विसरत नाहीं.

असा अपकारियावर तुम्ही उपकार केलेत. अपात्रियानांही उदाहरण दाखविलें. बळीस दान मागून त्याचे द्वारपाळ झालांत. तुम्हांस आराधित नव्हती, तुमचें ऐकतहि नव्हती, कौतुकानें कीं पोपटास बोलवीत होती अशा गणिकेस तर वैकुंठीचा वास दिला.

पाउला पाउली तुमचीं अशीं निमित्तेंच. आपण स्वतःस देवा **वानवशा** म्हणून ते देवा तुम्ही आज मजसीं असे कांहीं निराळेच पूर्ण आभासाचें असें एक करीत आहांत.

दुधदुभत्याच्या विस्तारानें जी सर्व जगाचें संकट निवारिते त्या कामधेनूचें वत्स पाडे काय भुके असति? म्हणून मी जें कांहीं विनविलें तें देव दाखविणार नाहींत असें नाहीं. पण दाखवाल तें पाहाण्यास मजला पात्रता असावी, पात्रता द्यावी जी.

तुमचें विश्वरूप आकळत आहे असे माझे डोळे देखणे व्हावेत. असे आर्तीचे डोहाळे ते पुरवावेत. अशी यथायोग्य शब्दांनी विनंति पार्थानें केली, तेव्हां तर त्या षड्गुण चक्रवर्तीस तें साहवेचना.

भगवान कृपामृतानें ओथंबलेले मेघ, अर्जुन तो जवळ आलेला वर्षाकाळ अथवा श्रीकृष्ण कोकिळ, अर्जुन वसंत. पूर्ण चंद्रबिंब पाहून क्षीरसागर उचंबळतो तसा दुप्पटीहीवर भगवान तो उल्हासला आहे मग त्या प्रसन्नतेच्या भारानें कृपा पूर्ण (व्याली) हे पार्था! पाहा! पाहा! माझी अमुप! अनंत! स्वरूपें! पाहा असें म्हटलें.

(११) **श्लोक ५ वा:** १२३-१४०

## **विश्वरूप दर्शन** (नमो नमस्ते)

**श्रीभगवान म्हणाले**—हे पार्था! अनेक प्रकारची, अनेक रंगाची, अनेक आकृतीची, शेंकडो, हजारों, तीं माझीं दिव्य रूपें येथें ह्या माझ्या देहामध्यें पाहा पाहा!

हे अर्जुना! तूं एकच रूप दाखवा म्हणालास पण तेवढेंच रूप दाखविल्यानें तुला विश्वरूप पाहिल्याचें समाधान होणार नाहीं. म्हणून ह्या माझ्या विश्वरूपांत काय काय सामावलें आहे तें पाहा; सर्व विश्व ह्या माझ्या रूपांत भरलें आहे.

ओव्या

दिव्य तेजाच्या प्रकाशाची रंग, रूप, वर्ण एकसारखी नाहींत अशी अनेक रंगाची अनेक प्रकारची, अनेक आकृतीची अशीं शेंकडोच्या शेंकडो रूपें पाहा, त्यांतील कांहीं रूपें कुंकमवर्णाची–लालसर–दिसतील तर कांहीं = सुनीळ–अंजन कर्णाची (पहाटेची) सुवर्णासारखी –श्यामळ भिन्नभिन्न वर्णाची–आकृतीत एकसारखेपणा नाहीं. कांहींना लाजून जाऊन मदनही शरण रिघाला इतकीं सुंदर साकारतेची प्रेमतनु लावण्यवंत मनोहारी, श्रृंगारलक्ष्मीची भांडारेंच उघडलीं जशीं, पुष्ट, बांधेसूद–एक भयंकर बिकट मोठ्या डोक्याची आकृती पाहातां पाहातां त्याचा पार लागत नाहीं. आकार व रूपें, शरीरें, आकृतींना अंतच नाहीं एका एका शरीरावर सारें जग तुला दिसेल.

(१२) **श्लोक ६ वा :—** १४१–१४७

**विश्वरूप दर्शन** नमो ! नमस्ते !—

हे भारता ! बारा आदित्य, अष्टवसू, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, एकुणपन्नास मरूद्गण, तसेंच पूर्वीं जी कांहीं नच पाहिलेलीं अशीं आश्चर्यें तीं ह्या माझ्या देहामध्यें पाहा !

विश्वरूपांपैकीं एकाद्यानें डोळे उघडले कीं, आदित्य निर्माण होतात, व डोळे मिटले कीं ते मावळतात. वदनाच्या उष्ण श्वासाबरोबर अवघे सर्व ज्वालामय होऊन त्यांत पावक आदिकरून ते वसु अष्ट त्याचा समूहच की अग्निच्या पावित्र्याचा होत आहे. भिवयाचे शेवट कोपयुक्त होऊन जेव्हां मिळणीचें होऊ पाहातात तेव्हां तर रुद्र अकरांचे संघाट कीं उगवत आहेत असें दिसत आहे. उष्ण श्वास तो आतां रूपाच्या ठायीं सौम्य झाला कीं, रूपास प्रिय, रम्य असा ओलावा येऊन मिती नाहीं असें **अश्विनौ देव** अवतरतात तेव्हां कानामध्यें तर अनेक वायुदेव प्रंचप्राणाचे असें (श्रवणी होत जिभा असें) जन्मत आहेत.

याप्रमाणें एकएका आदित्याच्या सृष्टिरचना, लीलेमध्यें सुरांची, देवांचीं तसेंच सिद्धांचीं कुळेंच जन्मली होत आहेत. शांत, अपार, विशाल, अशी ही रूपें पाहा. ह्या रूपाविषयीं सांगतांना, वेद बोबडावले. काळाचेंही आयुष्य थोडेंच; ब्रह्मदेवासही तेथीलचा ठाव सांपडत नाहीं. अशीं तीं रूपें (ज्या सृष्टींना तिन्ही वेदांनीं रक्षण द्यावें.) ह्या रूपाबद्दलचें वर्णन वेदांच्या ऐकण्यात नाहीं अशीं तीं रूपें प्रत्यक्ष येथें पाहा. ऐश्वर्याची आश्चर्याची कौतुकेंच तीं महासिद्धीचीं अशीं त्यांचा उपभोग घे.

(१३) **श्लोक ७ वा** १४८–१६२

विश्वरूप दर्शन नमो नमस्ते

हे गुडाकेश ! – निद्रेस जिंकणाऱ्या पार्था ! येथें ह्या माझ्या देहामध्यें सर्व जग एकस्थ असें आद्य, चराचरासहित पाहा ! तसेंच दुसरें जें कांहीं पाहूं इच्छितोस तेंही येथेंच पाहा.

ह्या विश्वमूर्तीच्या रोम मुळाशीं अनेक सृष्टी त्या कशा दिसत आहेत, तर सुरवृक्षाच्या तळीं जसें कोंवळया गवताचे अंकुर उगवतात तसे, कां चंड वाताच्या प्रकाशानें चंडवातामध्यें उडत असलेले परमाणु दिसावेत तशीं अवयव संधीमध्यें ब्रह्मांडेंच (भ्रमत) फिरत आहेत तीं पाहा. येथें एक एकाच्या अवयव प्रांताच्या (देशाच्या) ठायीं–विस्तारासहित विश्व पाहा–विश्वाच्याहि पलीकडील कांहीं वर्तत असेल तेंही पाहाण्याचें मानतोस तरी ह्याविषयीं येथें कांहीं सांकडें नाहीं. तुला आवडेल तें, ह्या माझ्या देहामध्यें तूं सुखानें पाहा (पाहाशील) !

असें त्या परमदयाळु, कृपाळु विश्वमूर्तींनीं, कारुण्यपूर्ण विश्वमूर्तींनीं म्हटलें. पण हा देखत आहे की नाहीं, पाहावें तों हा पार्थ तर निवांतच होता. येथें असा हा कां बरें उगाच आहे म्हणून श्रीकृष्णांनीं त्यास पाहिलें तो 'विश्वरूप' पाहाण्यासाठीं जसा का उत्कंठित तसाच तो आर्तिचे लेणे लेइलेला होता. **ओव्या**

मग देव (स्वगत) म्हणाले कीं, ह्याची उत्कंठा कांहीं कमी झालेली दिसत नाहीं. ह्यास विश्वरूपदर्शन आनंदाची सोय सांपडेना, याहीवर दाखविलेलें जें तेंही ह्यास खरेपणें आकळेना कीं. असें बोलून त्यांनीं सहज हास्य केलें व हांसून देखणाऱ्या त्या पार्थास त्यानीं म्हटलें कीं, आम्हीं विश्वरूप तुजला दाखविलें पण तूं तर तें पाहातच नाहींस कीं! देवांच्या ह्या बोलण्यावर पार्थ (आश्चर्यानें) म्हणाला—कीं अहो देवा! तें उणें तें कुणाचें बरें? आपण तर बगळयासच चांदणें चरऊ पाहात आहांत असें आश्चर्यच की ना हे? अहो! आपण तर आरसा स्वच्छ करून आंधळयासच तो दावूं बसलेत! अहो! हृषीकेशा! बहिऱ्यापुढें गाणिकं करा कां! पुष्प-पराग-मकरंद चारा जाणूनबुजून बेडकांना घालून वाया घालवीत आहांत व वर अहो शार्ङ्गधरा रागावता ते कुणावर! अहो! जे अतिंद्रिय असें व्यवस्थिलेलें, जें केवळ ज्ञानदृष्टीनेंच भागास येणारें, तें तुम्हीं मज चर्मचक्षूंपुढें ठेविलें, तें मी कसें बरें देखूं पाहूं? पण तुमचें उणें नच बोलावें तें मी सहन करावें हेंच उत्तम! यावर श्रीदेव म्हणतात कीं, बाप्पा! अर्जुना हें आम्ही मानतों, कीं बाप्पा! विश्वरूप दाखवावयाचें तर तें पाहाण्या देखण्यास अगोदर सामर्थ्य यावें हें खरें पण बोलतां बोलतां प्रेमभावामुळें विसरून गेलों. हें कसें झालें म्हणावें तों भूई नच वाहाता, सिद्ध करता, (मशागतीची नच करतां) पेरावी तर तो वेळ शिकल्या शिकल्याच जातो शिकण्यासंवरण्यात जातो; करितां आतां माझे निजरूप तें तुजकडून पाहूं देखूं येईल अशी दृष्टि तुजला देऊं! —तूं पाहूं शकशील अशी दृष्टी तुजला देऊं.

(१४) **श्लोक ८ वा :—** १६३

**'विश्वरूप दर्शन' नमो! नमस्ते!**

तुझ्या आपल्या ह्या डोळयांनीं मला पाहाण्यास जर तूं समर्थ कां योग्य (होत) नाहींस, तर तुजला दिव्य चक्षु मी देतो व आतां तूं माझें '**योग ऐश्वर्य**' ते पाहा!!

हे पांडवा! मग त्या दिव्य दृष्टीनें आमचा अवघा सर्व ऐश्वर्य योग देखून तूं आपल्या अनुभवानें तो उपयोगाचा कर.

(१५) **श्लोक ९ वा :—** १६४–१९६

संजय म्हणाला :—हे राजा याप्रमाणें बोलून त्या महायोगेश्वर श्रीहरींनीं ऐश्वरम् परमम् रूप–पार्थास दाखविण्याचें केलें

(आमुचा ऐश्वर्ययोग पाहून देखून तो अनुभवांतर्गत होऊन अनुभव–माजिवडा–सान्निध्याचा, सद्वर्तनाचा, लायकीचा कर) वेदांतानें ब्रह्मविद्येनें जाणण्यांस योग्य असें जें, लोकांचें आद्य जगाचे आराध्य त्या श्रीकृष्णांनीं असें म्हटलें. संजय म्हणाला हे राजा मला हाच विस्मय वाटतो कीं, काय कोणी **श्रियेपेक्षां** ह्या जगीं सदैव आहे? **श्रुतिमाऊली** वांचून खुणेचे बाणण्यांस ह्या जगीं कोण ते? **शेषाच्याहि** अंगी सेवकपण आहे कीं? **योगी** आठही प्रहर ज्यासाठीं सोस करून शिणत असतात. **गरुडा** ऐसे कोणी अनुसरले

आहे कां? हे सर्व एकीकडेसच केले. सांप्रत श्रीकृष्ण सुख एकंदरतेस आले, पाण्डव जन्मले त्या दिवसापासून—पांचा पांडवा आंत अर्जुनास श्रीकृष्ण सहज स्वाधीन आधीन झाले. अंगनेने कामुक आपलासा करावा जसा, पढविले पांखरू क्वचित् पढविल्याप्रमाणें बोलणार क्रीडामृगही कदाचित् क्रीडा करणार? दैव येथें कसें वश झालें आहे पाहा! अर्जुन खरा भाग्यवंत! त्याचे डोळेच भोगावेत म्हणून श्रीकृष्ण अर्जुनाच्या तोंडचे शब्द कसें झेलीत आहेत पाहा! तो रागावला तर निवांतपणें सहन करतो आहे. रुसला तर त्याची समजूत घालीत आहे. नवल नवल कीं, देवास पार्थाचे वेड लागले आहे! शुकादिक दादुले विषय जिणून जन्मले पण विषय वाखाणण्यांवर ते त्या विषयाचे भाटच झाले. अहो राया! माझें मन विस्मय करून आहे कीं जो भगवान श्रीकृष्ण, योग्याचे समाधि-धन–, तो तर आज पार्थाच्या आधीन होऊन आहे! पण अहो! कौरवेशा येथें विस्मय कसचा कारण श्रीकृष्णांनीं ज्यास म्हणून स्वीकारलें त्याचा भाग्योदय हा केव्हांही व्हावयाचाच आणि म्हणूनच कीं तो देवाचा राव भगवान् श्रीकृष्ण पार्थास म्हणत आहे कीं, हे पार्था तुजला दृष्टि देऊं! ज्यायोगें तूं विश्वरूपाचा ठाव पाहाशील (देखसील) अशी श्रीकृष्णाच्या मुखांतून अक्षरें निघतात न निघतात तोंच अविद्येचें आंधारें नाहींसें होऊं लागलें: देवदेवांच्या मुखांतून निघालेली ती अक्षरें नव्हती पण ब्रह्मसाम्राज्य दीपिका-रूपी ब्रह्मतेज, सार्वभौमत्व चित्कळिका—चैतन्याच्या कळ्याच श्रीकृष्णांनीं उजळिलेल्या होत.

## विश्वरूप दर्शन :—

याप्रमाणें देव—देव आपले ऐश्वर्य पार्थास दाविते झाले जे कां दिव्य डोळा प्रगटला त्यास ज्ञान दृष्टीचा फांटा फुटला—याप्रमाणें श्रीवैकुंठानीं आपलें ऐश्वर्य देखविलें: जें का हें सकळ अवतार ज्यां तेज समुद्रीचे कल्लोळ तेथच्या तेज रश्मिमुळें विश्व हें मृगजळासारखें दिसतें: जें आदि अशा नीट भूमिकेवर चित्र रूपानें चराचर उमटते जे कां.

श्रीपतींनीं बाळपणीं एकदां माती खाल्ली होती तेव्हा यशोदेनें कोपून जाऊन, हातोहात धरिला, तेथें मग भेणें भेणें मुखीं झाडा देण्याच्या निमित्ताने तिजला चौदाही भुवनें सावकाशपणें दाखविली. मधुवनामध्यें ध्रुवाच्या गालास शंखानें शिंवतले तो तो तर वेदांच्याही मतीस जे राहून गेले होते (आकळिले नव्हते) तें बोलूं लागला. श्रीहरींनीं धनंजयावर अनुग्रह केला, आतां माया अशीं गोष्टच राहिलीं नाहीं (कवणींकडेही माया) म्हटली जाणारी अशीं—भाषा—गोष्ट उरलीच नाहीं. एकाएकीं तेज ऐश्वर्य पाहिले उगवले तेथें सूर्यच कां पूर्ण तेजाचा समुद्रच जसा, असा चमत्कारच कीं,! जेथें चित्त विस्मयाच्या समाजामध्यें अंतरिक्षामध्यें बुडून राहिले! जसा कां एकाकीं मर्कंडेय सर्व ब्रह्म उदकी पूर्णपणें पोहत आहे तसा विश्वरूपामध्यें कौतुकानें कीं पार्थ लोळत आहे. केवढें येथें गगन होतें तें कुणीं बरें कोठें नेलें? तें चराचर कोठें गेलें! ती महाभूतें! काय झालीं? दिशांचें ठाव हारपले, अध ऊर्ध्व काय झाले! कोण जाणे! लोकांचें आकार ते स्वप्नांतून जागा झाल्यानें जसे नाहींसे झाले; अथवा सूर्य तेजाच्या प्रतापानें जसा चंद्र तारांगणासहित लपतो; त्याप्रमाणें विश्वरूपानें प्रपंच रचना गिळून टाकिली आहे: आतां मनास मनपण स्फुरेना—बुद्धि आपणा स्वतःस सांवरू शकेना, इंद्रियाचें रश्मिकिरण परत माघारी हृदयवरी भरून आहेत: तेथें ताटस्थ्या ताटस्थ्य पढले, औदासीन्या औदासीन्य, (सान्निध्या सान्निध्य, संन्निधतेस संन्निधता, हजर असणेंस हजर असणें,) ठकासि ठकपण ठेले स्तब्धतेस

स्तब्धता पातली (–निश्चलास निश्चलपण आले, स्थिर–दृढ कायमचे तेथें, स्थिरता आली, दृढपण पोहोचले, कायमपण स्थिर झाले), विचार जातांवर मोहनास्त्र घातल्यासारखें झालें: तसा विस्मित होऊन कौतुकानेंच कीं, सहज पाहातो तों पुढें जें चतुर्भूज रूपडें होतें तेंच अनेक रूप होऊन चहुंकडे मांडले गेलें आहे: वर्षाऋतूंतील मेघ उत्कर्षानें वाढतात, महाप्रळयींचे तेज जसें वाढतें तसें आपणाशिवाय कुणीकडेहीं कांहीं दुसरें नाहींच; अर्जुन आपणच एक चहुंकडे उरून आहे. **रूप समाधान, अर्जुन प्रथम पावून आहे, डोळे उघडतो तों विश्वरूप पाहात आहे.** ह्याच दोन्हीच्या दोन्हीं डोळयांनी सकळ विश्वरूप पाहावें तों मनचा सोहळा श्रीकृष्णांनी पुरविला–पुरता केला !

## शृंगाररस :— १९७–२४५



### ‘विश्वरूपदर्शन’–परमंरूपं ऐश्वरम्

अनेक मुखें, अनेक नयन, अनेक अद्भुत दर्शनें, अनेक दिव्य अलंकार, वस्त्रें परिधान केलेली, हातामध्यें दिव्य आयुधें होतीं.

**अनेक वक्त्रें:—** विलास, विहार, रमानायक राजभुवनें, लावण्यश्रीची आनंदवनें, सौंदर्य सुरेखता, मनोहर–भयानकें असाधारणें, सौम्यें.

**अनेक नयन:—** अनेक वर्ण कमळवनें, आदित्याची झाडें, काळेभोर डोळे, कल्पांत विजूंच्या स्फुटि, पिंगट वन्हि दृष्टि, भ्रूभंगातळि.

**अनेक अद्भुत दर्शनें :—** अनेक **चरण** कुणीकडे, **मुकुट** ते कोणते? **दोर्दंड** कुठचे तें पाहाण्याची चाड पाहाण्याचे मनोरथ विफल नच होणारे, काय शंकराच्या धनुष्यामध्यें वायां जाणारे असे बाण नच; ब्रह्मदेवाच्या वाचेमध्यें लटक्या अक्षराचें सांचे केव्हांही नसणारच !

**अपाराचें साद्यंतपण :—** वेदांना ज्याची सोय सांपडत नाहीं त्या परब्रह्म वस्तूंचें सकळ अवयव एकाच वेळीं पार्थाच्या दोन्हीं डोळयांनीं भोगिले (पाहिले).

**दिव्य आभरणें :—** चरणापासून तो मुकुटापर्यंत विश्वरूपाची थोरी———जे कां.

**रत्न अलंकार अनेक :—** रत्नांच्या, प्रभेच्या, झळाळानें, रविचंद्रमंडळ उजळले–महातेज जिव्हाळा ज्यायोगें विश्व हें प्रकटत आहे, प्रकाशत आहे, दिसत आहे.

**दिव्यतेज श्रृंगार :—** कुणाच्या मतीला स्पष्ट होणारे ते, देव, देव स्वत: लेइले आहेत. **ज्ञानाचा डोळा**, सरळ करपल्लव, ज्वाळा कल्पांतीच्या त्या तोडीत आहेत; उद्यत आयुधे अशीं शस्त्रें हातीं आहेत.

**आपण आंग :—** आपण अलंकार, आपणच हात, आपण हतियार, आपण जीव–आपण शरीर, **चराचर देवदेवांनीं कोंदले आहे. परब्रह्म तेजाच्या** किरणाच्या निखाऱ्यानें, पोळल्यामुळें वन्हि तर समुद्रीं जाऊन लपावें म्हणत आहे. **महाविजूंची अरण्येंच** उमलली असे **अपार कर** उद्यत आयुधी देखिले.



विश्वतोमुख, देव देव अनंत, दिव्य माल्य अंबर धर, दिव्य गंध अनुलेपन, सर्व आश्चर्यमय देव देव ! देखिले.

पार्थानें भिऊन जाऊन दृष्टि बाजुस केली; कंठ, मुगुट, देवसृष्टि, ज्यापासून झालेली, **कुसुमें** महासिद्धीची मूळपीठें, शिणलेली, कमलादेवीस जेथें विश्रांती होते, **पूजाबंध** अनेक मुगुटावर ठायीं ठायीं: **कंठी** अलौकिक लोकोत्तर पुष्पहार रूळत होते. **नितंबावर पितांबर झळकत आहे.** जसें कां स्वर्गानें सूर्याचें तेजच पांघरलें आहे. उत्तम सुवर्णानें मेरू मढविला आहे श्रीमहादेवांनीं कापुराची उटी लाविली आहे. कैलास पर्वत पारदानें डंवरिला आहे. क्षीरसागराचे उदक ते क्षीर अर्णवच जसा कां तशीं **चंदन पिंजरी** सर्वांगी चंद्रमयाची घडी उकलून गगनाकडून बुरखाच घेवविला जसा अशीं ती होती. जिच्या स्वप्रकाशानें स्वप्रकाशच कांतीस चढत आहे. **ब्रह्मानंदाचा ऊष्मा का दाह मोडत आहे** ज्या उटीनें वेदवती पृथ्वीसच जीवित सौरभ्य जोडत आहे. जिचा लेप साधुत्वास अनुसाधुत्वाचे करतो, अनंग मदन तो जी सर्वांगी धरतें त्या सुगंधाची थोरी कुणीं बरें वानावी ती ! ओव्या

**शृंगार शोभा** :—देव बसला आहे कीं उभा आहे तें नेणें, अवघे मूर्तिमय, स्वस्थ बसला तरी, आंतही तसेंच दिसत आहे. समोर पाठिमोरे रूप श्रीमुख, कर, चरण तसेंच दिसत आहेत. न पाहाताहि दिसत आहे असें नवलच !

**अनुग्रहाचें करणें** पाहाणें, न पाहाणें तें कसें, करून ठेविलें आहे. आश्चर्याच्या पुरामध्यें पडला. तिरावर उभा राहतो, तोच आणिक एका नव्याच आश्चर्याच्या पुरामध्यें पडला—तिरावर उभा राहतो तोंच आणिक एका नव्याच आश्चर्याच्या पुरामध्यें पडत आहे. **विश्वतोमुख** :— कसा तो पहावा म्हणून प्रार्थिलेला दर्शनाच्या कौशल्यानें व्यापून घेतला. सर्व बाजूस मुखें आहेत असा **ब्रह्मदेव विश्वतोमुख परमात्मा** अवघें सर्व कांहीं होऊन आहे अवघें सर्व व्यापून आहे.

**दिव्यदृष्टि** :— ती दिवियामुळें कां सूर्यामुळें दिसते, दिवा लोपल्यावर दिसणें नाहींसें होत आहे, अशी कांहीं ती वैकुंठानी दिलेली दृष्टि नव्हती अर्जुनास **अंधारांतही दिसत आहे.** एरव्हींही दिसत आहे अशी ती पाहाण्याची शक्ति होती. असें हस्तिनापुरी संजय रायास (राजास) सांगत आहे. तो म्हणत आहे कीं, अनंत अलंकारांनीं शोभलेले ते **धातयाचें विश्वतोमुख विश्वरूप पार्थानें पाहिलें.**

**(१८) श्लोक १२ वा** :— २३७-२४१

## विश्वरूपदर्शन

त्या महान् परमात्म्याच्या भासाची तेजस्विता, विश्वरूपाच्या प्रभेसारखी कदाचित् ! अवताराचे युगपद युगायुगाचें ठायीं होणारें एकाच वेळीं आकाशामध्यें हजारो सूर्य उगवल्यानें जशीं तेजस्विता प्रगटेल तशी—**विश्वरूपाच्या अंगप्रभेचा नवलाव**—बाराही सूर्यांचा मेळावा जसा एकाच वेळीं हजारो दिव्यसूर्य उदयले तरी त्या तेजाची थोरी उपमिता येत नाहीं. अंगच्या तेजाची थोरी—**महातेजाच्या अवघ्या विजूंचा मेळावा** —प्रळयाग्निची सामग्री, महातेजाचा दशकही मिळवावा त्या अंग-प्रभे सारखे कांहीं कांहीं तसें तेज थोडेंसें पण त्या विश्वरूपासारखें केव्हांहीं नाहीं.

**श्रीहरीचें सहज माहात्म्य** :—सर्वांगीचें तें परब्रह्म तेज फांकत आहे तें मुनिकृपा मज दृश्य झाले (असें संजय म्हणत आहे.)

(१९) **श्लोक १३ वा :—** २४२–२४५

**विश्वरूप दर्शन :**—अनेकधा प्रविभक्त ते अवघे विश्व देव देवाच्या शरीरीं पांडवानें पाहिले.

**विश्वरूपी** एकीकडेसच **जग** आपल्या पवाड्यानें **एका कोंपऱ्यांत आहे** जसें महासागरामध्यें बुडबुडे निरनिराळे आकाशांतील ढगांप्रमाणें कल्पित नगर जसें, पृथ्वीवर **मुंग्यांनी बांधलेले वारूळ**, घर जसें, मेरू पर्वतावर **सुवर्णकण** उजाळ्याचें परमाणू बसले आहेत जसें, तसें विश्वदेव **देव चक्रवर्तिच्या शरीरी त्यावेळेस अर्जुन देखता जाहाला. पार्थाचे दुजेपण विराले**–एक विश्व, एक आपण, असें जें दुजेपण होतें, तें निमाले–तेथें **अंतःकरण सहज विरून गेलें.**

(२०) **श्लोक १४ वा :—** २४६–२५४

**विश्वरूप दर्शन :**—अर्जुन आश्चर्यचकित, सर्व अंगावर रोमांच उभे आहेत, दोन्हीं हात जोडून मस्तक लववून नमस्कार प्रणाम करून श्रीकृष्णास म्हणाला.

**अष्टसात्त्विक भाव :—**

**स्वरभंग :**— महान् आनंदास जागृती आली. **स्तंभ :**— बाहेर गात्राचें बळ हारपून गेलें. **रोमांच :**— आपाद मस्तक रोमांचानीं आच्छादिलें, जसें वर्षाऋतूच्या आरंभीं पाणी वाहून गेल्यावर शैलांग जसें.

**स्वेद :**— चंद्रकिरणांनीं शिवंतलेला सोमकांत द्रवतो, तसें घर्मबिंदु अर्जुनाचे शरीरी दाटून आहेत.

**वेपथु :**— कमलामध्यें भ्रमरकुलामुळें (समुदायामुळें) कमळकलिका पाण्यावर आंदोळते–आंतल्या सुखाच्या लहरीनें बाहेर कांपू लागला.

**अश्रु :**— नेत्रांतून अश्रंचे थेंब पडू लागले. कर्पूर केळीमध्यें कापूर दाटल्यामुळें तुषारकण गळतात त्याप्रमाणें—

**वैवर्ण्य :**— समुद्र भरलेला तरी चंद्रोदयामुळें भरतो–समुद्रास भरती येते, तसा आनंदाच्या ऊर्मींनीं वरचेवर उचंबळत आहे.

**प्रलय :**— अष्टसात्विक भावांना, परस्पर हेतु, हेवा वाटत आहे, जीवदशेस राजीवतेचे ब्रह्मानंदाचें राज्य प्राप्त झालें.

**द्वैताचा सांभाळ केला :**— त्या सुख अनुभवावर कीं, मग त्यानें उच्छ्वास घेऊन देहाकडे पाहिलें तों तो ज्या सोयीनें बसला होता त्याच बाजूकडे मस्तक खालविलें, देवदेवांना नमन केलें, हात जोडून स्तुतीचें बोलणें करूं लागला.

(२१) **श्लोक १५ वा :—** २५५–२६५

**अद्‌भुत रसः— विश्वरूप दर्शन**—देवदेवांच्या देव देहामध्यें सर्व देवांना, विशेष भूत संघाना, कमलासनस्थ ब्रह्मदेवाला, ईशासही, ऋषींना तसेंच दिव्य उरगांना, अर्जुन म्हणाला मी पाहात आहे.

आम्हीं प्राकृतानीं विश्वरूप पाहावें तें तुम्हीं कृपा केली म्हणून ! ह्या सृष्टीस आश्रय आहांत ! अहो गोसावी स्वामी ! **अर्जुन पाहात आहे**—स्वर्गीच्या संबंधी ठिकठिकाणीं हिंस्र पशूंची अरण्यें, तशीं तुम्हां **देवदेवाच्या देहामध्यें अनेक भुवनें** आकाशाच्या

पोटांत **ग्रहणांची कुळें** महावृक्षावर पक्षीजातांची घरटी जशीं तुमच्या विश्वात्मक शरीराच्याठायीं **देवगणासहित स्वर्ग महाभूतांचें पंचक अनेक** अनेक **भूत सृष्टीचे** एक **एका भूतग्राम सत्य** लोकीचा **ब्रह्मदेव** तोंच हा येथें ! नव्हे कां ! दुसरीकडे **कैलासही**. तुमच्या एका अंशामध्यें **भवानीसहित महादेव**, हे **हृषीकेशा** तुम्हांसही तुमच्या देवदेहामध्यें पाहात आहे तुमच्या स्वरूपांत **कश्यपादि ऋषिकुळें** व **पाताळासहित पन्नगही** मी पाहात आहे. हे त्रैलोक्यपति तुमच्या एकाच अवयवाच्या भिंतीमध्यें १४ **भुवनेंही** चित्राप्रमाणें अंकुरली आहेत असें जाणावेत. तेथचे **लोक तेच कीं, ती चित्ररचना** अनेकतेची असें तुमचें **अलौकिक गांभिर्य.** **ओव्या**

(२२) **श्लोक १६ वा :—** २६६-२९३

विश्वरूप विश्वेश्वर, अपरिमित, अनेक बाहू अनेक उदरें, अनेक वक्त्रें, अनेक नेत्र असलेले सर्वतः अनंतरूप—न अंत—न मध्य—न आदि.

**पार्थ म्हणतो कीं मी देखत आहे कीं, :—**

(१) दिव्य दृष्टीच्या पैसपणावर चहुंकडे पाहावें तों हें जसें कां बाहुदंडानीं कोंमेलें—आकाशासच हात उगवले आहेत असें.

(२) तुमचे कर एकेचि काळीं अवघे सर्व व्यवहार (व्यापार) करीत आहेत.

(३) महाशून्याच्या पैसपणावरच कीं, महाशून्याची भांडारें उघडिली तशीं तुमची अपार उदरें.

(४) सहस्रशीर्ष जो **पुरुष** त्याचें दाखले एकाच वेळीं, कोटिवरी होत आहेत जसें कां वदन फळांनीं परब्रह्मच मोडून आले.

(५) तुमची **वक्त्रें** जेवढीं केवढीं तेवढीं विश्वमूर्ति तसेंच **नेत्रपंक्ती** अनेक पुष्कळ.

(६) सर्वतः अनंतरूप, स्वर्ग, पाताळ, भूमि, दिशा, अंतराळ अशीं विवक्षा (बोली) नाहीं हे सकळ कांहीं मूर्तिमय.

(७) तुम्हीं इतकें व्यापिलें आहे कीं, एकादीकडे परमाणु एवढाहि अवकाश सांपडत नाहीं.

(८) महाभूतें जेवढीं सांठविलेली तेवढा विस्तार तुम्हीं कोंदला आहे.

(९) तुम्हीं बैसले आहांत कां उभे आहांत ? कोणत्या मायेच्या पोटीं होता ? तुमचें ठाण केव्हडे.

(१०) **वय काय ? तुम्हां पलिकडे काय आहे ?** तुम्हीं **कशावरती आहांत !**

(११) **देवदेवा तुमचाच तुम्हांस ठाव,** तुम्हीं कवणाचेहि नव्हत ; अनादिपणें आईतें आहांत.

(१२) उभे ना बसलेले, उंच का खुजे, तुम्हां तळी, वरी वैकुंठा तुम्हीच !

(१३) **रूपानें तुम्हीं तुम्हांसारखेंच,** तुमचें वय तुम्हीच पाठि पोट तुमचें तुम्हांस तुम्हींच होत.

(१४) **तुम्हींच सर्व कांहीं** आहांत, बहुत काय पण असें वारंवार पाहाता मला जाणवलें.

(१५) **रूपांत एक उणीव**—आदिमध्य आंतु नाहीं एरव्हीं सर्वांठायीं सांपडत

आहे पण कुठेंही सोय लागत नाहीं हीच ती उणीव म्हणून त्रिशुद्धी आदिमध्य अंत हे तिन्हीं येथें नाहींत. ओव्या

(१६) अपरिमिता! आदिमध्यांतरहिता! विश्वेश्वरा! असें तुम्हांस तत्त्वतः मी पाहिलें देखिलें कीं.

(१७) तुम्हां महामूर्तीच्या अंगी अनेक पृथक्मूर्ति उमटल्या आहेत, तुमचा वाण फारच उत्तम अनेक रंगाची अंगरखी तुम्हीं लेईली आहेत असें तुम्हीं आवडत आहांत.

(१८) पृथक् मूर्तीच्या द्रुमवल्ली फळांनी फुलांनीं सांचलेल्या, त्या दिव्य अलंकार तुमच्या स्वरूप महाचळीं कीं,

(१९) महोदधि तुम्हीं तरंग हेलावा मूर्ति झालांत—मूर्तिफळीं फळलेलें वृक्षरूप तुम्हीं बरवें असे आहांत, शोभविले भूतीं भूतळ गगन नक्षत्रांनीं आच्छादिलें तसें तुमचें रूप एक एका अंग प्रांतीं होय जाय—ते त्रिजगती मूर्तिमयांनीं भरलेलें होत जात आहे; एवढ्या मूर्ति एकएका रोमाच्या ठायीं; असा विश्वाचा पवाड मांडून आहांत : तुम्हीं कोण कुणाचे ते आहांत ?

(२०) तें पाहिलें तेव्हां तर आमुचा सारथि जो तो तूंच कीं हें जाणलें.

(२१) हे मुकुंदा! तुम्हीं भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं त्या मुग्ध स्वरूपास सदा सर्वदा अनुसरतां.

(२२) चार भुजांचें हें सांवळें रूप पाहिलें असतां मन व डोळे (निवत आहेत) शांत होत आहेत. आलिंगन देण्यानें तर ह्या दोनच बाहूंनी ते आवरिलें होत आहे.

(२३) मूर्ति सुंदर ती कृपाच विश्वरूप झाली—काय सांगावें कीं अहो! आजच्या दृष्टीच त्या दूषित आहेत कीं जे कां तुम्हांस सामान्यत्वें कीं आम्हीं पाहात—लेखित आहोत.

(२४) दृष्टीचा विटाळ गेला सहजच कीं, तुम्हीं चक्षू तो दिव्य केलात म्हणून तुमचा महिमा यथारूप देखवला.

(२५) मकरतुंडा मागिलीकडे मनुष्याप्रमाणें बसलेला होता तोंच तूं तुम्हीं येवढे विश्वरूप झालात, असें मी खरें ओळखिलें, जाणलें.

(२३) श्लोक १७ वा :— २९४–३०६

डोळ्यानें पाहाणें अशक्य, दैदीप्यमान अग्नि व सूर्याप्रमाणें, अंदाज न करतां येण्यासारख्या तेजाची राशीच, सर्व बाजूंनीं प्रकाशमान, मस्तकीं मुगुट, हातीं गदा व चक्र धारण करणारें असें तुम्हांस मी चहुंकडे पाहात आहे.

नविन नव्हे पण तोच **मुकुट** श्रीहरी आपण मस्तकीं लेईले आहांत ; पण आतांचे तेज व थोरीव ती अप्रतीमतेची, नवलाची अशी! वरच्या हातीं तेंच कीं **चक्र** परजण्याच्या आयतीवर सांवरितासि श्रीविश्वमूर्ति ते खूण मोडत नाहीं. पूर्वी जी **गदा** तुमचे हातांत होती तीच आंताही तुमच्या हातांत आहे कीं दोन्हीं भुजा आयुधरहित तेथें **वाग्दोर** (अनीन) श्रीगोविंदा संसारलेल्या सांवरण्याकरितां आहेत. हे विश्वेशा! सहसा **अतर्कित वेगावर** व माझ्या मनोरथाबरोबरच तुम्हीं **विश्वरूप झालांत** असें मला उमजत आहे, पण कसचें बा! हें नवल! कांहीं **विस्मयाचें मी व्हावें, असें योग्य** नव्हे पण चित्त तर **आश्चर्यामुळें थक्क** होऊन जात आहे. हें सर्व कांहीं खरेंचि आहे की नाहीं अशा म्हणण्याच्या विश्वासासच (स्पष्टतेसच विवरण्यास) येईना अहो विश्वरूपा! आपल्या

आंगच्या **कांतीची नवलाई**–नवी नवलाची अशीं ! कांती ती दाटपणें सर्वत्र भरलेली कोंदलेली आहे ! **ओव्या**

परब्रह्माच्या आंगच्या कांतीच्या नवाईनें तर येथें **अग्नीचीहि (दृष्टी) दिठी करपत आहे** : सूर्य तर खद्योतासारखा हारपत आहे. असें अद्‌भुत तीव्रपण ह्या परब्रह्म तेजाचें कीं ! महान् अशा तेजाच्या महान् अशा समुद्रामध्यें अवघी सर्व सृष्टी बुडून गेली. **युगाचा अंत होण्याचे वेळेस, विद्युल्लतेच्या पदरांनी तर सर्व गगन आच्छादिलें होतें**, आच्छादते असें होऊन आहे. प्रचंड अशा (संहार) तेजाच्या **ज्वाळा तोडून अंतराळावर माच बांधला** कीं काय ! व आतां (दिव्य दृष्टीच्या कां) दिव्य अशा ज्ञानाच्या डोळ्यासही कीं तें विश्वरूप–परब्रह्म–तेज पाहावेना ! पाहावत नाहीं ! अधिकाहून अधिक उजाळा धडाडत आहे तेथें अत्यंत दाहकपणामुळें **दिव्य अशा चक्षूलाही ते न्याहाळिताना त्रास होत आहे.** डोळे दिपत आहेत जसा कां महाप्रळयीचा भडाड अग्नि तो तर काळ अग्नि **रुद्राच्याठाई गूढपणें** जो होता तो त्या **तृतीय नेत्राचा–शंकराचा तृतीय नेत्र !** मढ फुटला म्हणावा जसा कां तसें पसरलेल्या प्रकाशानें पुष्कळसें पांच ( १ दक्षिण, २ गार्हपत्य ३. आहवनीय, ४. सभ्य, ५ आवसथ्य अथवा १ प्रळयानळ २ विद्युदनळ ३ वडवानळ ४ शिवनेत्रानळ ५ हा आदित्यानळ हे पांच अग्नि ) अग्निच्या ज्वाळांचे वळसें ते पडले असतां **ब्रह्म कटाहाचे, ब्रह्मांडाचे तर कोळसेच जणूं होत आहेत. असा अद्‌भुत तेजोराशी जन्माचें नवल म्यां देखिला आहे तुम्हां परब्रह्मरूपाच्या–विश्वरूपाच्या व्याप्तीचा–कांतीचा–पार नाहीं.**

(२४) **श्लोक १८ वा** **३०७–३०९**

तुम्हीं परम अक्षर, ह्या विश्वाचे निधान, शाश्वत धर्माचे रक्षक सनातन पुरुष आहांत असें माझ्या मतीस जाणवता.

**अविनाशी अक्षर** :— देवा **साडेतीन मात्राच्याहि पलीकडील** तुम्हीं आहांत : सर्व विश्व सांठविण्याचें–आकाराचें स्थान, आयतन–निधान, आहांत. **अविनाशी विष्णु गहन** असें आहांत; **अनादिसिद्ध** असें नित्य नवे; **धर्माचा जिव्हाळा,** ओलावा आहांत, सदतिसावे पुरुष आपण विश्वेशा ! आहांत.

(२५) **श्लोक १९ वा** **३१०–३१४**

अहो देवदेवा ! तुम्हीं अमर्याद (अपरिमित), शक्तिमान, अनंतभुजा, चंद्रसूर्य डोळे आहेत ज्याचे असें, तुमचें मुख प्रज्वलित अग्निप्रमाणें, असे तुम्ही आपल्या तेजानें जगास, विश्वास, तेजवान् करीत आहांत : तपवीत आहांत.

विश्वचरण, विश्वबाहु, स्वसामर्थ्य, मध्यांतरहित, असे तुम्हीं **चंद्र चंडांशु डोळा असलेले** तुमचा कोणास प्रसाद झाला तर **चंद्राच्या आल्हाददायक कृपादृष्टीनें लीला दाखविता !** कोणावर संसार–प्रकृतीच्या–(तमाच्या) डोळ्यानें रुसता; कोणा एकास कृपादृष्टीनें पाळता.

**स्वरूपाचें अद्‌भुतपणः—**

**षडैश्वर्यपैकीं वैराग्य वर्णनः—**

**तुमचें वदन वक्त्र प्रळयाग्निच्या धडाडित प्रकाशाचें असें वणव्यानें पेटलेले पर्वत** कवळून घेतल्यानें **ज्वाळांचे भडाड उठत आहेत. दांत, दाढा चाटित जिव्हा आंत लोळत आहे.** वदनीच्या उबाऱ्यानें, सर्वांग कांतीच्या प्रभेमुळें, विश्व तापले होऊन अति क्षोभास जात आहे, असें आपणांस मी पाहात आहें. ओव्या

(२६) श्लोक २० :— ३१५–३२६

**'अद्‌भुत रूपम् उग्रम्'–अद्‌भुत रस तो आश्चर्यकारक**

हे महात्मन्! सर्व दिशा, तसेंच 'रोदिसि'–आकाश व पृथ्वीमधील अंतर, तुम्हीं एकट्यानें व्यापिले आहे. तुमचें **अद्‌भुत असें उग्र रूप पाहून, तिन्ही लोक अस्वस्थ** होऊन राहिले आहेत. **भूलोक, पाताळ, पृथिवि, अंतराळ, दश दिशा तेजचक्र हे अवघे तुम्हीं एकट्यानें भरले आहे;** असें कौतुकच कीं एक मी पहात आहे; वर सकटही गगनासारखी भयानके, तीही तुम्हांमध्यें बुडून आहेत.

**अद्‌भुत रस तो आश्चर्यकारक, विस्मयोत्पादक,** त्याच्या लाटामुळें चौदाही भुवनांची गठडीच वळली होत आहे. **माळाच झाल्या आहेत असे आश्चर्य** आकळणे! वर वर्णनास येणें तें कसचें! **व्याप्ति असाधारण** आवरेना! रूपाचें उग्रपण साहवेना, सुख दुरी गेले! प्राणही मोठ्या कष्टानें सांभाळून आहे. देवा! तुम्हास **पाहून भयाचें भरते कां बरें जन्मावें?** ते व्हावें ते कांहीं समजेचना! आतां तिन्हीं भुवनें दुःखाच्या कल्लोळानें झळंबत आहेत. तुम्हां महान् आत्म्यास देखिले तर कां बरें! दुःखाचे जे ते मिळविले व्हावे वर **तेथचा गुण तो सुख तर नव्हेच** असें मला जाणवत आहे. जोपर्यंत तुमचें रूप दृष्टीस पडलें नव्हतें तोपर्यंत संसारिक ते जगास गोमटे वाटत होते आतां तुम्हीं देखिलासि म्हणून तर विषयाविषी त्रास वाटत आहे. **मन विषयावर त्रासले, विटले आहे** तुम्हांस देखिले म्हणून देखिल्या देखिल्या पहिल्या पहिल्या काय एकदम तुम्हांस मिठी देता येईल? नच जर मिठी झाली शोकरूपी संकटामध्यें जगावे ते कसें? ते! म्हणून संसार हा मागे पडो! जो अनिवारपणे आम्हांस अडवीत आहेः पुढें पाहावे तो **तुम्हीं परब्रह्म अनावर असें नच आवरिले** होत आहांत. अशा तऱ्हेनें ह्या **दोन संकटाच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें त्रैलोक्य होरपळत आहे** त्रैलोक्याचा हुरडा होत आहे. असा हा ध्वनी (टाकीचा अर्थ मुग्धार्थ) मजला सूचित कां स्पष्ट झाला आहे.

**अग्नीनें होरपळल्यामुळें शांत व्हावें म्हणून समुद्रास येतो, तो पाण्याच्या कल्लोळ तरंगामुळें आगळाच भिऊं लागतो आहे की! तसें ह्या जगास झालें आहे.** हे जग तुम्हांस पाहून दिपून जाऊन तळमळत राहिले आहे; ह्या मध्यें **पैल पैल पलिकडचे ते ज्ञान शूरांचे मेळावे भले होत कीं!**

(२७) श्लोक २१ वा :— ३२७–३३१

हे सुरसंघ–देवसमुदाय–तुमचा आश्रय करून आहेत; कांहीं भय पावलेले ते, प्रांजळपणें तुमचा जयजयकार करीत आहेत! तुमचें गुणगान गात आहेत; महर्षि व सिद्धांचे समुदाय, जगाचे स्वस्ति क्षेम असो! म्हणून पुष्कळशा स्तुतींनी तुमचा जयजयकार करीत आहेत.

**कर्म ब्रह्मार्पण योगी जसे :—** देवसमुदाय तुमच्या परब्रह्माच्या [तेजाच्या अंगाने कां] आंगच्या तेजानें सकळ कर्मांची बीजे जाळून का भाजून टाकून तुमच्या आंत तुम्हांशीं आपल्या स्वतःच्या सद्भावानें मिळताहेत; त्यामध्यें हे जे कोणी एक सहज भयभीत ते गंभीर होऊन तुमचा मोहरा धरून, दोन्ही हात जोडून तुम्हांस प्रार्थित आहेत. तुमचा धांवा करीत आहेत; देव-देवा! ईश्वरासंबंधीच्या अज्ञान समुद्रामध्यें (आम्ही) पडलो आहोंत! विषयरूपी जाळ्यांत अडकलो आहोत! एकीकडे स्वर्ग एकीकडे संसार अशा दोन्ही भागी वांटलो गेल्यामुळें मोठ्या पेचांत पडलो आहोत! अशी आमची अवस्था झाली आहे. आतां येथें तुम्हांशिवाय ह्यांतून कोण बरें आम्हांस सोडविणार? सिद्ध उपदेव ते आम्हीं तुज देव देवा सर्व प्राणें शरण आहोत असें म्हणत आहेत. महर्षी, सिद्ध, उपदेव; विद्याधराचे अनेक समूह तुम्हांशी 'स्वस्तिवाद' कल्याणकारक बोलणें करून आपला आशीर्वाद मागत आहेत, तुमचें स्तवन करीत आहेत. ओठ्या

" कोण जगीं! दुसरें नां, माऊली म्हणावया।
शांत दीन संतप्ताना साउली तुझी दया " ॥

(२८) श्लोक २२ वा :— ३३२-३३९

विश्वरूपांतर्गत हे रुद्र! जय! जय! हे आदित्य! जय! जय! हे अष्टवसु जय! जय! हे साध्यदेव जय! जय! हे अश्विनौदेव जय! जय! हे मरुतदेव! जय! जय! हे उष्मपपितर देव जय! जय! गंधर्व, यक्ष, सुर सिद्धसंघ! जय! जय!

रुद्रांचें समुदाय आदित्याचे मेळावे अष्टवसु साध्यदेव सर्व अश्विनौदेव वैभवाचे असें विश्वदेव वायूदेव, पिता, गंधर्व यक्ष रक्षगण ह्या सर्वामध्यें महेंद्र मुख्य देव, तसेंच सिद्धदेव आदिकरून सर्व हे आपआपल्या लोकामध्यें देवकी महामूर्ती देखणी ती अवलोकण्यास उत्कंठित होऊन आहेत. पाहता पाहांता क्षणोक्षणीं अंतःकरणीं विस्मित होऊन आपली मस्तके तुम्हांपुढे लववीत आहेत-आपले मुकूट तुजवरून प्रभुजी ओवाळण्याचे करीत आहेत.

ते जय हो! जय हो! अशा योग घोषांनीं, नादांनीं शब्द मंजुळ शब्दानीं, अवघे एकवीस स्वर्ग गाजवीत आहेत. नमस्कारार्थ आपल्या ललाटावर करसंपुट ठेवून आहेत विनयरूपी वृक्षाच्या अरण्यामध्यें बागेत-सात्विकाची वसंतलक्ष्मी जी माधवी ती अनुकूल झाली आहे, म्हणून तुम्ही करसंपुट पल्लवामध्यें फळच (ब्रह्म शब्द) एक तें होता आगाध असें तुमचें विश्वरूप त्यानी पाहिलें आतां तर डोळे ऐश्वर्य पाहात आहेत लोचनास भाग्य येऊन आहे मनास सुखाचा (पुण्य पावन) सुकाळ झाला आहे हे तिन्ही लोकी व्यापक असें आपले रूपडे पाहावेंच कां पाहातांना देवांनाही धाक वसतो आहे अशा ह्या विश्वरूपाचें सन्मुखपण, मोहरेपण तें भलत्यास कसचें बरे लाभणारे! तें !!

(२९) श्लोक २३ वा :— ओव्या

**भयानक रस** :—(**दारुणं भीषणं भीष्मं, घोरं भीमं, भयानकं**) ३४०-३५२

हे महत् रूपा! हे महत्तत्त्व बुद्धिरूपा! हे महाबाहो हे विश्वरूपा! तुमचें रूप अनेक वदनें, अनेक नेत्र, अनेक बाहू, अनेक पाद, अनेक उदरे, अनेक कराल दंष्ट्रा असलेलें तें पाहून लोक हे प्रव्यथित, भयभीत झाले आहेतः मीहीपण त्याचप्रमाणें अस्वस्थ झालो आहे. भयभीत झालो आहे.

**अहो हे विश्वरूप दर्शन! अहो हे विश्वरूपा! अनंतभुजा! आपणांस नमस्कार असो! आपला जय जय असो!**

**एकच** (रूप) **रूपडें पण तें चमत्कारिक** (कां विचित्र) अशी अनेक **भयानक वक्त्रें असलेलें, पुष्कळ डोळे असलेलें,** (महाबाहु) बहु बाहु, **सशस्त्र हात असलेलें,** असें अनंत भुजांचें तें, अहो! **अनंत भुजा! अनंत चारु उरु, बहु चरण, बहु द्रष्ट्रा, बहु उदर, आणि अनेक वर्णाचे तें!** कसें प्रत्येक **वदनाचे, ते आवेशाचें मातलेपण!** (उन्मत्तपण ते तेथे येऊन आहे) महाकल्पाच्या शेवटीं रागावलेल्या **यमानें जिकडे तिकडे प्रळयाग्निचे भडके** (आगठिया) **पसरल्या आहेत.** जणूं काय प्रत्येक मुख, प्रळय रुद्राचे यंत्रच, **प्रळय भैरवाचे क्षेत्र!** ती यंत्रें कां क्षेत्रें ती जशीं का युगांत करणारी शक्तीची पात्रेंच—भांडीच अग्नि अस्त्रेंच! **भूतांच्या प्राण्याच्या नाशाकरितां प्राप्त झाली आहेत** जशीं कां! तशीं तुमची हीं प्रचंड वक्त्रें! ज्या त्या कडे, जिकडे तिकडे, असें दर्शन! **सिंहच दरीमध्यें उफाळत आहेत असे दांत रागीट ते!**

**काळरात्रीच्या अंधारामुळें घातुक भुतें** (संहार खेचरे) उल्हसत **बाहेर निघतात; अशा तुमच्या वदनामध्यें प्रळय रुधिरानें किटलेल्या दाढा आहेत,** असे हे असो! पण काळानें रणच कीं आवंतिले आहे! अथवा सर्व संहारामुळें मरणच कीं मातले आहे! तसे **तुमच्या वदनामध्यें अतिशय भयानकपण आहे!** दिनवाणी! **बापुडी! अहो! ही लोकसृष्टी!** नवलच एक कीं, अशी ही! हे बाप्पा! ही **महामारी! विसूचिका! अशी ही हिला नांव विश्वरूप जरी कां!** तर अहो! ही तर भयानकपणें भयासच हारीस आणीत आहे! **भयासच हारी देत आहे!** जिंकीत आहे! थोडीशी अशी **लोकसृष्टी! बापुडी ही!** तुवा दृष्टीने पाहिलेस की! **दुःख कालिंदीच्या तटी! वृक्ष होऊन आहे!** महदद्भुतानें पछाडल्यामुळें झाड होऊन आहे! **तुम्हां महामृत्युरूपी सागरामध्यें आतां त्रैलोक्य जीवितरूपी नौका ही तर शोकरूपी दुर्वात लहरीमुळें वादळाच्या हेलकाव्यानें आंदोळत आहे.** येथें आतां जरी श्रीवैकुंठानीं कोपास येऊन कदाचित म्हटलें कीं, **तुला ह्या लोकांचें ते काय** (लोकांच्या वाटेचे तुजला ते काय?) वाटत आहे? **तूं आपला ध्यान** (धन्य) **सुख भोगीत ऐस!** तरीपण ह्या लोकांचें तें मर्त्यपणानें मृत्यूलोकीचें असणें तें तेथें मजला आडोसा घेतल्यासारखें म्हणणें तें! व्यर्थच कीं! अहो, **येथें तर सहसा माझेच प्राण थरथर कांपत आहेत की!**

**अहो, ज्या मला प्रळयरुद्र भितो, ज्या माझ्या भीतीनें यमसुद्धां**

ओव्या

**लपून बसतो**। तो मी आज येथें **अंतर्बाह्य थरथरां कांपत आहे** असें अहो! तुम्हीं हे विश्वरूपा केलेत पण अहो बाप्पा! ही (महा) मोह मारी! विसूचि नवलाची की! आणि हिला नांव विश्वरूप जरी का तर ही कीं अहो! **आपल्या भ्यासूरपणानें –आपल्या भयानकपणानें तर भयासही हारी देत आहे** भीतीसही हारी आणीत आहे. **भीतीच नाहीशी करीत आहे.**

(३०) श्लोक २४ वा :— ३५३-३७४

हे विष्णो! हे विश्वरूपा! आकाशास भिडलेले, दीप्त प्रखर तेजाचें, असें अनेक वर्णाचें, मोठ्या अशा आननाचें, विशाल व दीप्त डोळ्याचें, हें आपलें रूप पाहून माझा अंतरात्मा भयभीत झाला आहे. धैर्य येईना, शांती भेटेना !! अंतःकरण स्थिर होईना !!

**हटातटानें महाकाळाबरोबर भांडून आहेत** अशीं किती एक रागीट मुखें, त्यांनीं तर **आकाशच पायातळींचें करून स्वर्गही धाकटें लहानगेंच असें केलें आहे. गगनाच्या मोठेपणामुळें विस्तृतपण तें गगनास आकळेना.** त्रिभुवनांमधील **वाऱ्यांनासुद्धां आवरेनात,** वेढून घेता येईनात–,अहो ह्याच्या **मुखाच्या वाफेनें तर अग्निही जळत आहे,** कसें तें मुख प्रखर तेजानें धडाडत आहे, पाहा : मुख तें **एकासारखें एक नाहीं, येथें रंगरूपांत, वर्णावर्णांत भेद फरक आहे.** प्रळयाचे वेळीं अग्निही कीं ह्याची सोबत लाभतो. **वन्हिही ह्याचे साहाय्य घेणारा होतो,** सोबतीचा होतो. ज्याच्या **आगीची प्रखरता येवढी कीं त्रैलोक्यही मिश्री राखोंडीच केली होत आहे** त्या प्रखरतेसही तोंडें आहेत. व त्या **तोंडामध्यें दांत व दाढाही; कसा वायूसच धनुर्वात झाला. समुद्र तरी महापुरांत पडला, विषाग्नि तरी वडवानलास मारण्यास प्रवर्तला,** प्रवृत्त झाला. हलाहल विष तें अग्नि प्याले, नवलच कीं अहो **मरण जें तेंच मारण्यास पेटलें,** हटास चढले, तसें ह्या **संहार तेजासच वदन आलें आहे.** असें नवलच कीं **विशाळपणाचें परिणाम कोणतें म्हणावें** तर जसें कां **अंतराळच तुटलें** कां (पक्षि मंडळ फिरकीची) **नभासच वेढा पडावा**–मिठी पडावी तसें झालें. अथवा अहो! विश्वरूपा! असें झालें आहे कीं, जेव्हां कां बुद्धि **वसुंधरा बगलेंत मारून हिरण्याक्ष विवरांत महाबिल, आकाशांत रिघाला तेव्हां हाटकेश्वरांनी पाताळीचें छिद्रच उघडलें** कंठ उघडा केला, गुहा उघडिली **तसा ह्या वक्त्राचा विकाश विस्तार, मध्यें जिव्हांचा आवेश** अधिक, तेथें **विश्वच मुळीं घांस घेण्याइतके पुरेना** म्हणून कोड कौतुकावर, घांस घेईना **तेव्हां पातळीच्या सर्पाच्या फूत्कारामुळें, ओकलेल्या गरळाच्या ज्वाळा, अंबरी लागत आहेत.** तशीं ही वदन दरी–**मुखरूपी गुहा पसरली व तिजमध्यें जिव्हा ही की प्रळयीच्या विजूंचे जुंबाडे, झुपके** समुदाय काढून गगनीचे बुरुज जसें ते शृंगारिले तसें आलुवावर ओठावर तर धगधगित अशा दाढांचें, वांकडे पिळदार आंकडे **ललाटरूपी कपाळाच्या खोलीमध्यें कसें भयासच भेडसावीत आहे** असें **जसें कां महामृत्यूचे उमाळे ठिपकेच** का कडवसेंच होऊन राहिले आहेत. असें **भयाचे सोंग महत्व दावून कसलें तें काज निपजवूं पाहात आहांत** तें समजत नाहीं पण मजला तर **मरण भयच आलें आहे विश्वरूप पाहाण्याचे**

**डोहळे त्याची फळें पावलो.** जे कां 'बा' देखिलासि कीं **आतां डोळे निवावेत तसे निवाले आहेत.** ओव्या

**देहास अति काकुळतीपण येऊन आहे**:—पार्थिव–माती–पृथ्वी **देह केव्हांहीं जायचाच त्याची काकुळती–रदबदली का कींव ती कुणास बरें!** पण माझे **चैतन्य येथें कदाचित् वांचेल** की नाहीं कोण जाणे! एरव्हीं भयामुळें **अंग कांपत आहे** क्षणभर **मन विलक्षतेनें तापतें वर बुद्धि भयभीत** झाली आहे. **अभिमान विसरला** आहे **अहंभाव गळाला** आहे पण ह्या सर्वांहि वेगळा जो आनंद केवळ का आनंद ऐक्य कळा त्या **अंतरात्म्यासहि शहारे कां शिसारी** आली आहे **बाप बाप साक्षात्काराच्या प्रत्यक्ष दर्शनाच्या प्रतापानें वेधाने, छंदानें, बोध उपदेश जाणीव, जागृति विचार तर दिगंतरास गेला** देशधडी गेला. **गुरुशिष्य संवाद येथें क्वचितच कदाचितच नांदत आहे. पसंत का मान्य होत आहे.** देवा! तुमच्या **दर्शनानें देहास विकलपण आलें आहे.** (केवल ज्ञान, मोक्ष, कैवल्य, अंतःकरणांत उपजले आहे.) **ते सांवरण्यासाठीं मी धैर्य आपलेसे करीत आहे.** पण माझ्या ह्या **व्यक्तित्वाच्या नांवामुळें धैर्यच नाहीसें झालें.** धैर्य गळाले. **त्याहीवर विश्वरूपदर्शन झाले.** अहो भले केले की, मन ते ह्या **उपदेशांतच सर्वैथैव कीं गुरफटविले** का गुंतविले गेले आहे. हा बापुडा **जीव विसांव्यासाठी धांवाधांव करीत आहे.** पण त्याची कुठेंही आनंद सोय लागेना, असें **विश्वरूपाच्या महामारीमुळें जीवित्व चराचरी गेले आहे जीव अहो न बोलेल तर काय करील?** कसें बरें तें महाविष्णू राहातील कां घरीचे होतील तें!

**(३१) श्लोक २५ वा :—** ३७५–३९१

तुमची वदनें दांत, दाढा, विक्राळ अशीं ती प्रळय काळच्या अग्निसारखीं तीं पाहून मी दिङ्मूढ झालो आहे. माझें सुख नाहींसें झालें आहे करितां हे देवदेवा! जगन्निवासा! मजवर प्रसन्न व्हा! मजवर अनुग्रह करा! मजला आपला प्रसाद द्या!

पण माझ्या **डोळ्यापुढें जसें कां एकसारखें महाभयाचे भांडे–मुखच ते पसरले आहे–त्यातून अनेक भयेंच पुढें झालीं तशीं तुझीं वदनें कुलुपी मुखें** मी पाहात आहे. दांत दाढांची दाटी ती कांहीं ह्या **दोन ओठांनी झांकवेनात तेथें पुष्कळ दाट अशी प्रळय शस्त्रांची कांटी कां कुंपणच** एक, जसें का तक्षकासच मोहरूपी **सर्पासच विष भरलें, अद्भुतास–अज्ञान व रात्र तेथें भूत लागलें, काल रात्र तेथें रात्री भूत लागलें, भूतच संचरलें. वज्राग्निवर आग्नेयास्त्र प्रेरिलें** जसें का तसें, तुझ्या **प्रचंड वदनांचा आवेश बाहेर सांडत आहे** त्याचें आम्हावर तर **मरण रसाचे लोंढेच येऊन आहेत, संहार वेळेचा उष्ण झंझावात** व **महाकल्पांतीचा प्रळय वन्हि** ह्या दोहोंचा मेळ झाल्यावर तर सर्व कांहीं जळणारे! **तेथें जळत नाहीं असें कांहींही नाहीं.** तशीं तुमची संहार करणारी मुखें तीं पाहून मजला आम्हांला **धीर पारखा होत आहे,** आतां मी भुललो, **दिशा समजत नाहींत** मी स्वतःला जाणेना! मी आपल्या **स्वतःच्या सर्वस्वासही पण नेणून आहे!**

देवाधिदेवा! प्रसन्न व्हा! प्रसन्नतेस या आपली माया आवरा! मला ह्या महाभयापासून सोडवा. करुणा करी जनार्दना! अहो थोडेसे थोडकेसे कुठे ह्या डोळ्यांनीं विश्वरूप पाहिलें तो सुखास आवर्षण पडलें. अस्ताव्यस्त असें आपलें स्वरूप आतां आवरतें घ्या. (आतां) येथें आपण असें असें करणार होता—हें सर्व विश्व गिळणारच होता—हें जर का मजला जाणवलें असतें तर मी विश्वरूप दर्शन द्या असें म्हटलें नसतें.-(नीट जाणल्याशिवाय ह्या गोष्टी भुललों, दिशा समजेनात, स्वतःचें सर्वस्व जाणवेना.) आतां एकवेळ ह्या स्वरूप प्रळयापासून वांचवा! हे स्वामिन्! ओव्या

अहो श्री अनंता! तुम्हीं तर आमचे स्वामी आहात; माझ्या जीवितावर कांहीं पांखर घाला, कांहीं आडोसा करा! व ह्या महामारीचा—विसूचिकेचा—पसारा आवरा! अहो सकळ देवांचे परदेवते! विश्ववसते चैतन्य तुम्हीं आहांत हे विसरलांत; व आतां तर जे उपरतें तेंच संहारण्याचें करीत आहांत. अहो हे देवराया! वेगी प्रसन्न व्हा! आपुली माया ही आवरा! मजला (महामारीच्या) महाभयापासून सोडवा. असें ठावाचें परमसीमेचे म्हणणें तेंच मी तुम्हांस पुन्हः पुन्हः बहु काकुलती येऊन म्हणत आहे. हे विश्वमूर्ते असा कसा मी तुमच्या धाकामुळे भेकड झालो आहे, कोण जाणें! अमरावतीवर धाड आली तेव्हां एकट्यानेच मी परतविली. अहो विश्वरूपा! काळाशींही दोन हात करण्यास तोंड देण्यास—मी भीत नाहीं. पण येथें तर मृत्यूसीच मुळीं मरणासारखा चढावा करून सकल विश्वासहित तुम्हीं आमचाच घोट भरावा कीं, असें होत आहे. प्रळयाची वेळही नव्हती तरी तूंच काळ भेटलास! त्यामुळें हा बापुडा त्रिभुवन गोल अल्पायु झाला कीं, अहाहा! विपरीत दैवा! देवशांतीकरितां तेथें विघ्नच एक उठले काय (मोठी) कटकट कीं अहो सर्व विश्व तुम्हीं ग्रासू लागला आहांत कीं, विश्व ते गेले गेले पाहा! देव शांत होण्याचे ते बाजूसच राहिले वर—तुम्हीं आपली तोंडे पसरून अवघी सैन्ये चहूंकडून कवळीत आहांत पाहा.

(३२) श्लोक २६ वा :— ३९२-४१४

रौद्र रसः— 'भयंकरं प्रतिभयं रौद्रं उग्रम्'

अवनिपाल संघासहित धृतराष्ट्राचे पुत्र, तसेंच भीष्म, द्रोण, कर्ण व आमच्यामधील मुख्य योद्धे हेही तुमच्या मुखांत शिरत आहेत पाहा!

कौरव कुळीचे वीर, अंध धृतराष्ट्राचे कुमर सहपरिवार तुमच्या वदनीं गेले गेले! यांच्या सोबतीला देशोदेशीचे राजे आले होते त्याचें कांहीं एक सांगण्यास मागे कोणीही (उरणार) उरले नाहीं असे सरसकट तुम्हीं कवळीत आहांत. मदमस्त हत्तीच्या समुदायाचे जीवन घटघटा घेत आहांत. माहुताच्या टोळ्यांना मिठी देऊन आहांत जंत्रावरील मार करणारे पायदळाचे भार तुमचे मुखामध्यें हारपत आहेत. 'एक एक शस्त्र विश्वासही गिळणारें अशीं ती कोटिवरी शस्त्रें, सगळीच्या सगळींच गिळित आहांत.

चतुरंग परिवार जो हत्ती, घोडा, पायदळ, (घोडे जोडलेले) रथ तो तर तुम्ही **हे परमेश्वरा! दांतही न लाविता सगळाच्या सगळा तसाच गिळित आहांत** वर कसें बरवे तुष्टलात कीं, सत्य, शौर्य, निपुण असा **भीष्मा ऐसा कोण दुजा! त्याच्यासह द्रोण ब्राह्मणही अहो काय** कटकट (झटपट) **तुम्हीं त्यांना ग्रासिलेत** कीं, सहस्र किरण जो सूर्य त्याचा पुत्र **कर्णवीर तोही येथें गेला** गेला पाहा तुमच्या वदनांत. व **आमच्यामधील सर्वांचा तर तुम्हीं केरच काढून टाकिला** आम्हांस तर पाचोळ्यासारखे केरकचऱ्यासारखे उडविलेत कीं!

काय कटकट कीं, अहो धात्या **ब्रह्मदेवा! अनुग्रह व्हावा म्हणून प्रार्थिले तो जगासच कीं मरण आणिले कोण प्रसंग तो!** (अशा दुःखानें अर्जुन हृदयीं शिणत आहे पण येथें देवाचा अभिप्राय तो त्यास जाणवेना). **पूर्वी थोड्या बहुत विभुति सांगितल्या आतां तेवढ्या विभूतींनी ईश्वर पूर्ण समजला नाहीं. या हेतूनें पुन्हां विभुति विचारण्याचा हट्ट धरिला** म्हणून भोगतृत्व हे त्रिशुद्धिही चुकत नाहीं. होणाऱ्यासारखी बुद्धि होते. **माझ्या कपाळीं लोकांनीं दोष आरोपावेत ते कसें टळेल?** पूर्वी अमृत हातां आले पण नसते देवच तृप्त झाले ते उगीचच उगे राहिले व देव नव्हत जे तेंच उगवले वर श्रीहरीने कालकूटच जसें उठविले पण तेंच तेंच एकपरीने थोडे त्यानें तर प्रतिकारामध्यें वेडच केले गेले—प्रतिकारास माजवण झाले—कुडी आत्म्याविषयीं शोक करूं लागली तेथें मरण अहो श्रीशंभूनी ते संकट निवारिले.

आतां अहो जळता वारा कोण बरें वेटाळून घेईल! कुणास हे विषानि भरलेले गगन गिळवेल! महाप्रळयाबरोबर अंगबळे खेळे असा कोण बरें!!! अंगबळानें सामर्थ्यानें महाकाळाबरोबरही खेळेल—दोन हात करील असा कोण आहे? अशा दुःखानें अर्जुन शिणला! त्याचा जिवाचा अंतच होत आहे अशा शोकामध्यें तो पडला! त्याने जीवाचा अंतच मोडला! तो शोक करून आहे. पण प्रस्तुतच्या प्रसंगामधील तो अभिप्राय त्यानें ओळखिला नाहीं. त्यास जाणवला नाहीं, जो 'मी' मारता हे 'कौरव' मरते अशा वृत्तीने गुरफटून होता, तो त्याचा मोह फेडण्यासाठीं श्रीअनंतांनीं आपले निज नित्य स्वरूप त्यास दाखविलें. बा अर्जुना! येथें "कोणी कोणाते न मारी। येथें मीच हो सर्व संहारी।" हेंच विश्वरूपाच्या निमित्तानें श्रीहरीनीं प्रगट केलें व हे न कळल्यामुळें अर्जुनाच्या देहबुद्धीचे कांपरे वाढत होते—तो व्यर्थ शिणत होता. पण तेव्हां त्यांस ते चोजवेना समजेना! तो नव्हताच (नुसताच) भयकंप वाढवून आहे. तेथें तो म्हणत आहे कीं, अहो! पाहा पाहा आभाळें जशीं गगनीं जावीत तशीं दोन्हीही दळे असि व कवचासहित ही वदनी गेली कीं. महाकल्पाच्या शेवटीं जेव्हां कृतांत ह्या सृष्टीमध्यें कोपला होतो रागावतो तेव्हां पाताळासहित एकविस स्वर्गासही मिठी देऊन असतो अथवा दैव उदासीन झाले असता द्रव्य संग्रह कां संचय करणाराची कृपणाची वैभवे ती कां ठेव ती जेथच्या तेथेंच स्वभावेकरून विलयास जातात, (नाहींशी होतात) : तशीं एकवट झालेली, एकत्र जमलेली, सांचलेली सैन्ये उठाव घेऊन मुखामध्यें प्रवेशली, एकहीपण त्या तोंडून सुटेना! कसें कर्म पाहा! अशोक वृक्षांचे कोंभ उंटानें चघळावेत तसे लोक ते मुखामध्यें वायांच गेले.

(३३) श्लोक २७ वा :— ओव्या

**रौद्ररस :—** ४१५-४२२

तुमच्या कराल भयंकर मोठे दंष्ट्रा दांत असलेल्या भयानक अशा वक्त्रामध्यें अतित्वरेनें आपोआपच जात आहो. कांहीं तर दांताच्या फटींतून बाहेर आलेली ती उत्तम अंगासहित चुरा होऊन आहेत.

पण मुकुटासहित मस्तके दांताच्या सांडसामध्यें पीठ होऊन गेली अशी दिसत आहेत. ती रत्ने मस्तके दाताच्या सांपटीत सांपडल्यानें तुकडे कां पीठच झालेली जिव्हेच्या बुडाशीं लागलेली त्यानी दांताची अग्रे माखली गेली दांतांची टोंकेच भरली.

अहो विश्वरूपी काळानें लोकांची शरीरे व बळें ग्रासिली पण जीवित्वरूपी देही आत्म्याची सालपटे अवश्य कीं रक्षिली ती जशीं कां जीवात्म्याची खरेपणाची उत्तम आंगे ह्या शरीरामध्यें होती ती जरी महाकाळाच्या तोंडीच पडलेली तरी शेवटी उरलींच, वांचलीच मग म्हणू लागला कीं अहो जन्मलेल्यास तर कांहीं दुसरे आनंदाचे ठिकाणच नाहीं. दुसरा मोहराच पुढेही नाही जग तर आपसुखच कीं वदन डोहामध्यें संचरत-संचारत आहे. ह्या अवघ्या सर्व सृष्टी वदनाच्या वाटेस लागल्या आहेत व हा विश्वरूपी ईश्वर तर जेथच्या तेथेच कीं मिठी देऊन ग्रासून राहिला. ब्रह्मा आदिकरून ते तर उंचा भक्ति झाली, उंचा मुखीकडे धांव घेऊन आहेत, इतर सामान्य असें ते अलिकडच्या वदनामध्यें कीं भरत आहेत. आणिकही भूत जात ते उपजल्या उपजल्याच ग्रासित आहेस कीं, हे विश्वरूपा ! अहो याच्या मुखामधून तर कांहींहीं मुळींच सुटत नाहीं.

(३४) श्लोक २८ वा :— ४२३-४२४

पुष्कळशीं नदीची तोंडे समुद्राभिमुखच कीं प्रवाहानें धांवत असतात. त्याप्रमाणें हे नर लोकीचे वीर तुमच्या पेटलेल्या मुखामध्यें शिरत आहेत.

जसें महानदीचे ओघ सिंधूचे आंगीच कीं मिळून जातात व तसें सर्व बाजूंनी हे जग मुखांत प्रवेशत आहे. आयुष्य पंथाने प्राणिगण अहोरात्रीच्या पायऱ्या करून अतिवेगाने मुख मिळवणी साधीत आहेत-अहोरात्र आयुष्येंच ती मरण्यासाठीं मुखामध्यें प्रवेशण्याचे करीत आहेत.

(३५) श्लोक २९ वा :— ४२५-४२६

पतंगांच्या झुंडी तर जळत्या गिरीच्या झोंकावरच की त्या वाहत जाऊन पडत आहेत तसें समग्र लोक ह्या विश्वरूपाच्या वदनीं जात आहेत ( जेवढें शिरले तेवढे तर ) तापलेल्या लोखंडानें पाणि गिळावें तसें त्यांच्या वहिवाटीचे नांव निशाण न राहाता पुसिले गेले.

(३६) श्लोक ३० वा :— ४२७-४४३

**बीभत्स रस ( गर्ह्य, क्रूर, ओंगळ, हास्य )**

हे विष्णो ! हे विश्वरूपा !! आसमंतात् समग्र लोकांना ग्रसणारे ज्वलत् वदनांनीं तुम्हीं आपल्या जिभांनीं चाटीत आहांत-सर्व जगत् आपल्या असह्य तेजानीं व्यापून तुमचें उग्र भास जगास ताप देत आहेत.

समग्र लोक तुमच्या वदनीं पडूनही (त्यांतले लोहे पाणी गिळिले-नामरूप वहिवाटी

पुसिले.) **इतुल्या माजणानें क्षुधेस उणेपण नाहीं** कसें असाधारण असें भुकेचे तीव्रपण आहे : **तापामधून उठलेला रोगी, कां दुष्काळ पाहिलेला भिकारी जसा, तसा जिभाचा लळलळाट ओठ चाटतांना** होत आहे. **आहाराचे नांवानें तर तोंडापासून कांहींही सुटत नाहीं** असें भुकेलेपणाचें तें चमचमित नवेपण. अहो! काय **सागराचा घोट भरावा, पर्वताचा घांस करावा.** ब्रह्म-टेकडीच **ब्रह्मांड कवटीच अवघी दाढेखालीं घालावी; सगळ्या दिशा गिळाव्यात, चांदण्या चाटून घ्याव्यात असें तुमच्या वदनास हांवरेपण** येऊन आहे. **भोगाने काम वाढतो, इंधनानें अग्नीस** (हकाक) **चढ येऊन असतो तशीं तुमची तोंडें खात खातच** किं (हसासित) **खा खा करीत आहेत.** वडवानलामध्यें कवठ तसे त्रिभुवन (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) **जिव्हेच्या अग्र-भागीच टेकले आहे. एकच (वदन) केवढे तरी पसरलेले आहे.** अशीं अपार वदने पण तेथें **तितकी त्रिभुवने प्रत्येक वदनाला देण्यासाठी कुठची ती आणावयाची** ती (एकाच आचमनामध्यें अगस्तीनी, समुद्र प्राशिला व आता बाकी राहिलेली तीं आचमने ती कशाने करावयाची ती जसे). ओव्या

**हे विश्वरूपा! तुम्हाला आपल्या उग्रपणाची सेच नाहीं :—**

**सर्व जग तोंडाच्या ज्वाळामध्यें सांपडले आहे. बापडा हा लोक वदनीच्या ज्वाळांनीं आपलासा केला आहे:** मृगें ही वणव्यानें वेढिलेपणांत सांपडली. तसें ह्या जगतास आतां झाले आहे. अहो देव नव्हें तर कर्मच पुढें आले : **जगरूपी जलचरांना पकडण्यासाठीं काळाने कर्मरूपी जाळेच पसरलें आहे.** ह्या अंगप्रभेच्या ज्वाळा पाशातून—वागुरामधुन चराचरानें कोणीकडून कसें निसटावे असें झाले आहे. **ही वदनें न हत तर जळती जोहरेच कीं, आम्हां जगांना प्रसंगाचे करीत आहेत. आग आपल्या दाहकपणानें कशी पोळविते ते कांहीं ती जाणत नाहीं** पण ज्यास लागते त्यानें जीवेंप्राणें सुटणेंच नाहीं. **शस्त्र आपल्या तिखटपणावर शस्त्र कसें निवटते ते शस्त्र कांहीं जाणत नाहीं.** तशीं **तुम्हांला आपल्या उग्रपणाची सें (आठवण) नाहीं अलीकडिल मुखामध्यें जगाची खाईच होऊन आहे.** जग हे पेटलेला चरच जसा कां, होऊन आहे.

**याचना-प्रार्थना-विनंति :—** अहो विश्वरूपा! तुम्ही तर आत्माच आहांत व **आम्हांस कां बरें अंतकसें प्रसंगाचें करीत आहांत** मी तर जीवित्वाचीं चाड सांडिली तुम्हीं कांहींही संकोच धरूं नयें **जें कांहीं आपल्या मनीं असेल तें सुखाने उघड बोलावें. अहो भगवंता! उग्ररूपा!! आपल्या ह्या उग्ररूपास किती वाढवीत आहांत.** अहो बाप्पा! आपल्या आंगीचें भगवंतपण विश्व पाळण्याची ती कृपा दया, आठवा आपलें ब्रीद सांभाळा! नाहींतर मजपुरती तरी कृपा पाहा. **अहो विश्वपालका मजपुरती तरी कृपा दाखवून**—(ऋतं—तरी) आपण **कृपेचें संरक्षण करावें**

(३७) श्लोक ३१ वा :— ४४४–४५०

विश्वपालकरूपी आपण कृपा, (दया) ती रक्षण करावी निदान मजपुरती तरी दाखवून आपलें ब्रीद तें सांभाळावें. हे विश्वरूपा! मजवर कृपा करा! (दया करा),

तुम्हांस हे उग्ररूपा! मी नमस्कार करतो. नमो नमो! हे देवश्रेष्ठा! प्रसन्न व्हा! **ओव्या**
उग्ररूप असे आपण कोण आहांत! तें मजला (प्रसिद्धपणें) उघड सांगा! आपलें आद्यं विशेषसे असे माहितीचे ते आपण कथन करावें असें मी इच्छितो!–"तव **आद्यं विज्ञातुं इच्छामि**"–तुमची प्रवृती आकळणें, आलोकणें होत नाहीं.

**विश्वरूपास (पुन्हां) विनवणी :—**

**विश्वपालक परमात्म्याचें तें कृपा बीद** (दया) **सांभाळावें**, निदान प्रसंगाचा तो प्रसंग येथेंच कीं, संरक्षावा. विश्ववंद्या! वेदवेद्या!! त्रिभुवनेक आद्या, **विनवणी आपले चरणीं ती एक वेळ तरी निदान ऐका! हे देवश्रेष्ठा!** नमोनमस्तेऽतु **प्रसन्न व्हा!** असें बोलून पार्थ वीरानें त्यांचे चरणावर मस्तक ठेविलें व विश्वरूपास म्हणाला कीं, देवदेव सर्वेश्वरांनीं माझी विनंती ऐकावी. अहो देवश्रेष्ठा! मी **समाधान व्हावें म्हणून विश्वरूप ध्यान** (पुसलें, विचारिलें,) **जाणण्याची इच्छा केली व तुम्हीं तर सरसकट त्रिभुवनच गिळूं लागलात.** तुम्हीं असें उग्ररूप तें कोण आहांत! इतकीं भयानक वदनें कां एकत्र केलीं आहेत? आपण आपल्या सर्व हातांमध्यें कां बरें शस्त्रें ती परजून आहांत जेव्हां तेव्हां **रागीटपणानें गगनापेक्षांही उंच होऊन तुम्हीं गगन लहान-उणें केलें आहे तें कां बरें! डोळे भिंगुळवाणें करून भेडसावीत आहांत!** अहो देवदेवा!! येथें **कृतांता-बरोबर आपण हेवा करून आहांत** (कृतांतपण दाखवीत आहांत–कृतांताही वरचढ होऊन हेव्याने आहांत) ते कां बरें कशासाठीं? तो आपला अभिप्राय **मनांतील आशय हेतु मजला सांगावा.** ह्या बोलण्या पुसण्यावर श्री अनंतानी म्हटलें कीं, पार्था! **मी कोण आहे तसेंच उग्रतेनें कां वाढत आहें हें तूं विचारीत आहेस तर आतां ऐक–**

**(३८) श्लोक ३२ वा :—** ४५१-४६८

**श्रीभगवान म्हणाले :**—वेळ आहे मी! काळ आहे मी! लोकक्षयकृत् असा लोकक्षय वेढून आहे असा; फार वाढलेला ह्या ईह लोकांना (समाहर्तुं) घेण्यास, जमा करण्यास, प्रवृत्त झालेला आहे. तुजशिवाय सर्व हे जे प्रत्येक रांगेमध्यें योद्धे उभे आहेत ते उरणार नाहींत (न भविष्यंति) हे खरेंच की **काळ मी आहे! लोक संहारण्या-साठीं मी वाढत आहे.** पुष्कळशी तोंडें पसरली आहेत **आतां अवघे ग्रासीन.** अहो! काय कटकट ही असें अर्जुन म्हणाला, **मागच्या संकटास त्रासलो म्हणून सर्वेश्वर विनविला, आळविला, तो हा देवदेव तर चांगलाच कीं,** (पथ्यावर पडला. उसळून का) **प्रगटून आहे** कीं. श्रीकृष्ण म्हणतात येथें आतां कांहीं दारुण का कठिण बोलावें तर (आशा निराशा केल्यानें) अर्जुन कष्टी होईल म्हणून म्हटले की हे कीरीटी! येथें आणीक कांहीं एक गोष्ट आहे. जे कां आतांच कीं तुम्हीं पाण्डव ह्या संहार बाधेमधून संकटाच्या बाहेर आहांत!

महामारीरूपी मरण गांवी गेलेला तो आतां पुन्हां सावध झाला. पार्थाचे प्राण जातच होते, निमे अर्धे गेले होते जे कां, तेथें हें वाक्य ऐकता क्षणींच त्यानें आपले प्राण सावरीले. व **देवदेवांच्या बोलण्याकडे तो चित्त देऊं लागला** त्याला देव असें म्हणत आहेत, कीं अर्जुना! **तुम्हीं पाण्डव माझे आहांत** असें जाणावेत. **दुसरें अवघे**

**मी ग्रासिले आहेच** असें समज प्रचंड **वज्राग्निमध्यें लोण्याची उडी पडावी तसें जग हे माझ्या तोंडी कीं तुवा पाहिलेच** आहेस म्हणून त्यामधील कांहींही उरणार नाहीं. ही सैन्यें वायांच की मिरवत बडबडत आहेत जे हे **मेळे मिळवून वीर-वृत्तीच्या बळावर कुंथत आहेत,** जय व्हावा म्हणून जगदळे=गजदळे–हत्ती घोडे, पायदळ, रथ=ह्यांना वाखाणीत आहेत व म्हणत आहेत की **आम्हीं तर सृष्टीवरही प्रतिसृष्टी करूं शपथेवर मृत्यूसही मारूं जगाचा घोटच एक भरूं: सगळीच पृथ्वी गिळूं, आकाश ते वरच्यावर जाळूं, वाऱ्यांस तर बाणावरच बांधू खिळवू !** तें चतुरंग संपदेवर महाकाळाशीही स्पर्धा करीत आहेत. **वाटिवेच्या म्हणजे पराक्रमाच्या गर्वास चढले आहेत !** शस्त्रापेक्षांही तिखट बोल, अग्निपेक्षांही ज्यास्त मारकपणें कालकूट असें ते बोल मधुर होत असे ते म्हणत आहेत ! हे गंधर्व नगरीचे उमाळे, कल्पित आकाराचे लोट, पोकळीचे पेंडवडे, ओसपणाचे गुंताडे, **चित्रिचे पुतळे,** चित्रिव फळे, असें हे वीर पहा; रंगाच्या लेपाचे रूप केले त्या हाती शस्त्र दिले **चैतन्याशिवायच कीं मांडले.** मोडले आहे तसे दिसण्यास उग्ररूप, वीरवृत्तीरूप कीं! मृगजळाचा हा पूर आलेला! **सैन्य नव्हे तर वस्त्राचा साप केला** नुसत्या कातीच कीं, कातडीच कीं शृंगारून (मांडिल्या) ठेवल्या आहेत. चेष्टविणारे का हालचाल करणारे जे ह्याचे दुसरे बळ **ते तर मी पूर्वीच कीं ग्रासिले** आवरून घेतले आहे व आतां हे **कुंभाराने मातीचे केलेले जसे कां पुतळे तसें निर्जिव आहेत** असें समज स्तंभावरील हालचाल करणाऱ्या बाहुलीची दोरी तुटलेली **ती भलत्यानेही लोटली ढकलिली तर उलथून पडतेच** (तसें हें सर्व सैनिक जाण.) ओव्या

**(३९) श्लोक ३३ वा :—** ४६९–४७२

**हे** सव्यसाची! जागा हो! यश मिळीव, शत्रूंना जिंक, समृद्ध अशा राज्याचा उपभोग घे : **हे** सर्व मी पूर्वींच आवरून ठेविले आहेत तूं निमित्तमात्र (पुढें) हो.

ह्या सैन्याचा डौल, **मांडणी मोडतांना मुळींच वेळ लागणार नाहीं.** त्वरित जागा हो, वेगानें शहाणा हो! गोग्रहणाचे वेळेस तुवां मोहनास्त्र घातलें पण विराटाच्या उत्तरानें वस्त्रें हरवून नागविलें त्याहीपेक्षां निकृष्ट येथें झालें आहे–**रण आईते पडिले आहे ते निवट यश घेई.** अर्जुनानें एकट्यानेंच कीं सर्व रिपू जिंकीले, नुसते यशच नव्हे तर समग्र राज्यही आले आहे. **सव्यसाची तूं निमित्तमात्र हो!**

**(४०) श्लोक ३४ वा :—** ४७३–४८२

द्रोण, भीष्म, कर्ण, जयद्रथ तसेंच दुसरे वीरही **मी केव्हांच जिंकिले आहेत,** तूं भिऊं नको, लढ! रणामध्यें विजयी होशील. सपत्नानाही जिंकीले आहेस.

द्रोण, भीष्म, कर्ण, जयद्रथ तसेंच आणीक वीर जे जे, ते **चित्रिचें आकार समज** उजू ओल्या हातानें पुसून घ्यावेत हा **आभासच सर्व;** कसचा तो झुंजण्याचा झुंजाचा मेळावा! बाकी **सर्व मी ग्रासिले आहेच,** ते जेव्हां माझ्या वदनीं पडलेले पाहिलेस **तेव्हांच त्यांचें आयुष्य संपले** व आतां रीतसर ते अति सोपे जाण. म्हणून लौकर जागा हो: ऊठः **मिया मारिलेचः तूं निवट;** रिकाम्या शोक संकटात पडूं नको. आपणच चेंडू लगोरीचा खेळ मांडून (खेळून) लगोरी पाडावी, तसें तुझें निमित्त आहे हें जाण : हे बाप्पा विरुद्ध जे झाले ते **उपजताच कीं वाघाने नेले.** आतां

राज्यासहित संचलेले ते यश, तूं भोग. दायाद उतत होते; जगीं बळिये असे दुर्मद ते; ते **सायास न लागताही स्पष्ट वधिलेच** कीं. अशा ह्या गोष्टी विश्वाच्या वाक्पटी हे किरीटी लिहून घाल, विजयी हो. **ओव्या**

(४१) **श्लोक ३५ वा :—** ४८३–४९१

**संजय म्हणाला :—** याप्रमाणें केशवाचें वचन ऐकून कंपित झालेल्या अर्जुनानें हात जोडले व वरचेवर म्हणजे पुन्हः पुन्हां देवांना नमस्कार केला व भीतभीतच आणीक पुन्हां नमस्कार करून तो म्हणूं (बोलूं, प्रार्थुं लागला) आदरला कीं,

**श्रीज्ञानदेव म्हणतात :—**

अशी ही अवघी सर्व कथा अपूर्ण मनोरथ जो राजा धृतराष्ट्र, त्यास संजय सांगत आहे. **"एतद्वचनं केशवस्य"** सत्य लोकाहून गंगाजळ सुटलेलें तें खळाळपणें वाजत आहे तशी बोलतां विशाल आहे वाचा ज्याची असे ते केशव! वाचा ती महामेघाचे उमाळे एकदमच की घडघडिती! का घुमघुमिला क्षीरसागर मंदराचळानें जसा, तसें ह्या महानादांनीं गंभिरानीं, अगाध अशा विश्वकंदानी-**विश्वरूपांनीं वाक्य बोलिले,** तें अर्जुनानें थोडेसें ऐकिलें; त्यायोगें **त्यास भय वाटलें का सुख झालें हें कांहीं माहित नाहीं.** पण त्याचें सर्व आंग थरारले कंपित झालें, सखोलपणानें शरीराची मोटच वळली जशी. तेथें (कृताञ्जली, हात जोडलेले, नमस्कृत्वा) वेळोवेळीं, अर्जुन आपलें ललाट, देवाचे चरणावर ठेवीत आहे, कांहीं बोलावें म्हटलें तर त्याचा गळा–कंठ सगदगदूतेने कोंदाटला आहे, **हे सुख का भय असें तें तुम्हींच विचार करून पाहा!** पण तेव्हां देवांच्या बोलण्यामुळें अर्जुनास असें झालें होतें, हें मी श्लोकाच्या पदावरून पाहिलें, जाणलें. मग भीत भीत त्यानें तसेंच पुन्हां आणखी एकदां देवांचे चरण नमस्कारिलें व म्हणत आहे कीं आपण देव असें बोलिलात कीं हे अर्जुना! **मी काळ आहे, व ग्रासणें हा माझा खेळच कीं." हा देवा** (तुमचा) **अढळपणाचा बोल तो आम्ही मानावाच कीं.**

(४२) **श्लोक ३६ वा —'विश्वरूपदर्शन'—** ४९२–५०७

अर्जुन म्हणाला, हे हृषीकेशा! योग्यच कीं, आपल्या कीर्तीच्या उत्कर्षानें, जग हें, आपणावर, अनुरक्त झालें आहे; प्रीतीस आलें आहे; रक्षोगण भिऊन जाऊन प्रवाही होऊन सर्व दिशांस जात आहेत, सिद्धसंघ तुम्हांस नमस्कार करीत आहेत.

"हे अर्जुना! **मी काळ आहे व ग्रासिजे हा माझा खेळ आहे."** असा आपण म्हटलेला बोल आम्हीं मानतो, पण स्थितिच्या वेळेस तुम्हीं ग्रासणें हें विचारास पटत नाहीं.––आंगचें तारुण्य कसें काढावें? नव्हे ते वार्धक्य कुठून आणावें? म्हणून करूं म्हणसी तें बहुत करून होतच नाहीं. **दिवसाचें चार प्रहर भरल्याशिवाय सविता कोणत्याहि वेळेस मावळणार नाहीं काळासहीपण वेळा आहेत.** स्थिती काळी उत्पत्ति प्रलय नच मिरवितातः उत्पत्ति काळी स्थिति प्रळय हारपतात. प्रळयाचे वेळीं उत्पत्ति–स्थिति मावळते असे **अनादि हें कशानेही ढळत नाहीं.** आज भोगाने भरलेली स्थिती जगी वर्तत आहे तेथें तुम्हीं ग्रासावें हें जीवी मानवत नाहीं. यावर संकेतानें **देव म्हणत आहेत कीं दोन्हीं सैन्यास मरण पुरलें आहे तें**

प्रत्यक्ष तुवां पाहिलेंस आतां येर ते यथाकाळे हा संकेत बोलण्यास वेळ लागला असेल नसेल तोच अर्जुनानें लोक पूर्ववत् यथास्थित पाहिला—मग म्हणतो अहो देवा! **तुम्हीं विश्वाचे सूत्रधार लाघवी असे देव** जग–(गज) पुन्हः पूर्व स्थितीला आला आहे, पण दुःखसागरांत पडल्यास तुम्हीं ज्या परीनें बाहेर काढतां त्या तुमची कीर्ति हे श्रीहरी मी आठवीत आहे; कीर्ति आठविता महासुखाचा सोहळा भोगित आहे. **हर्ष अमृत कल्लोळांत मी लोळत आहे.** जियालेपणानें जग हें तुमच्यावर प्रेम करीत आहे. अनुराग करीत आहे. पण तें अधिकाधिक वांकडेपणच एथें करून आहे. **त्रिभुवनांतील राक्षसांना तुम्हीं हृषीकेशा महाभयच आले असें आहांत** म्हणून पैल दूरवर ते दाही दिशास पळत आहेत–तें कां बरें! तुम्हांस नच नमतील, तुम्हाशी ते का नरे विनयशील असें नच होतील? सुर सिद्ध किन्नर ते तुम्हांस देखून हर्षे निर्भर झाले आहेत –ते तुम्हांस नमस्कार करीत आहेत. **ओव्या**

(४३) **श्लोक ३७ वा :—** ५०८–५१४

**हे** अनंता! हे देवश्रेष्ठा! हे देवेशा! **हे** जगन्निवासा! हे महान् आत्मन्! हे ब्रह्मदेवाचेहि आदिकर्ते तुम्हीं अक्षर जे सत् असत् त्याहि पलिकडचे त्या तुम्हांला ते कां बरें नच नमतील! ते नमतीलच! (व विनयशीलतेनें सुशिक्षित असे होतील)!

कोणत्या कारणास्तव–कशासाठीं बरें राक्षस ते हे देवदेवा श्रीनारायणा! तुम्हांस नच नमतील, तुम्हांपुढें नम्र होतील, तुमच्या पायास न शिवतां ते (द्रवत) पळतच राहिले आहेत; पण हें तुम्हांला कशास पुसावें तें! कारण आम्हांसही इतकें जाणवतें कीं, **सूर्योदय झाल्यावर तमानें उरणेंच नाहीं!** हे महान् आत्मन्! हे विश्वरूपा! तुम्हीं आत्मप्रकाशाच्या स्वसर्वस्वाचे आगर असे आतां गोचर होऊन आहांत. आणि म्हणूनच कीं ह्या **अज्ञानाच्या आश्रयानें चालणाऱ्यांचा केरकचरा नाहींसा झाला आहे.** देवदेवा! देवाधिदेवा! अहो! श्रीरामा! हे इतुके दिवस आम्हांस कांहीं जाणवतच नव्हतें पण आतां तुमचा महिमा गंभीर असा पाहात आहोत. तुमचें गांभीर्य आम्ही देखत आहोंत! नाना सृष्टीच्या ओळी भूतग्रामाच्या त्या वेलीरूपानें पसरतात, त्या महान् ब्रह्मांस, महामूर्ती देविकी इच्छा प्रसवली, व्यायली आहे : अहो! देव देवश्री! अनंता! निस्सीम गुणदेव! देव देव! निखळ सदोदित! नेहमीं उदित असलेले! – सत्त्व! देवदेव! साम्य समा! सततचें! नरामधील इंद्र! मालक तो देवाचा समजावा! **नर शार्दूल देवाचा आपला म्हटलेला! तो मनुष्यांमधील** (पर्जन्य देवताच इंद्र कीं नर देवाचा जाणावा! मनुष्यांमधील) **तो राजा जाण.** देवदेवा! **तुम्हीं त्रिभुवनांना जिव्हाळा, ओलावा!** देवदेव सदाशीव! अक्षर! **सत् असत् तुम्हींच! व त्याच्याहि पलिकडचें जें तेंहीपण तुम्हींच!**

(४४) **श्लोक ३८ वा :—** ५१५–५१९

**देवदेव श्रीराम स्तुति! प्रार्थना! श्रीअनंता! देवदेवा!** तुम्हीं आदिदेव! पुराण पुरुष! ह्या विश्वाची श्रेष्ठ अशी ठेव! तुम्हीं जाणते असें! तुम्हींच जाणण्यांस योग्य असें आहांत! तुम्हींच श्रेष्ठ असें धाम! देवदेवा! विश्व हे तुम्हीं (व्यापलें आहे.) विश्व तुम्हीं व्यापून आहांत. **देवा! तुम्हींच शिवशक्तीची–प्रकृति पुरुषाची आदि! देवा! तुम्हीं बुद्धी जी महत्तत्त्व तिची सीमा अवधि! देवदेवा!**

**तुम्हींच स्वयं पुरातन असें अनादि!** देवदेवा! **सकळ विश्वास जीवन तुम्हींच!** जीवास तुम्हीच ठेवीचे असें भूतभविष्याचे ज्ञान तुमच्याच हाती आहे. तुम्हीं वेदांना अभिन्न असें स्वरूप सुख त्रिभुवनीच्या ठिकाणांना तुम्हीं महत् ठिकाण. तुम्हीं परमधाम असें तुम्हांस महाधाम म्हणावें कीं कल्पांती महत् ब्रह्म तुमच्याच अंगी रिगते. **तुम्हीं देवांनी अवघे विश्व विस्तारलें आहे 'अनंतरूपा!' तुम्हां कुणी ते वानावें का वर्णावें तें!!** — ओव्या

(४५) श्लोक ३९–४० :— ५२०–५३७

**देवदेव! श्री अनंत! विश्वरूप! स्तुति! महति! प्रार्थना! नमन—**

तुम्हीं वायूदेव—
तुम्हीं यमोदेव—
तुम्हीं अग्निदेव—
तुम्हीं वरूण देव—
तुम्हीं शशांक देव—
तुम्हीं प्रजापति—
तुम्हीं प्रपितामह देव—

} त्या तुम्हांला सहस्रकृत्वा अपि, नमोनमस्ते, पुन्हः च अपि भूयः, नमो नमस्ते। **'विश्वरूपांतर्गत व्यक्तिगणिक देवतेस नमस्कार!'**

हे विश्वरूपा! **तुम्हांस पुढून नमस्कार-पृष्ठतःपाठीशी उभा, म्हणून = पाठमोरे—नमस्कार**—सर्वपणें सर्व असें तुम्ही–नमो नमो! नमस्तेऽस्तु तुम्हांस नमस्कार असो **तुम्हीं, हे विश्वरूपा! अनंत वीर्य!—अमित विक्रम! हे सर्व** कांहीं आवरून आहांत म्हणून सर्व कांहीं तुम्हींच आहांत.

**तुम्ही हे विश्वरूपा! काय एक नाहींत-सर्व कांहीं आहांत-तुम्ही कुठें नाहीत असे नाहीं; सर्वांठायीं आहांत** पण जसें आहांत तशा तुम्हां नमो! नमो! नमस्कार असो! तुम्हा, हे विश्वरूपा! वायूदेवांना नमस्कार! तुम्हां हे विश्वरूपा यमो देवांना नमस्कार! तुम्हां हे विश्वरूपा! प्राणिगणामध्यें वसणाऱ्या अग्नि देवांना नमस्कार! तुम्हां विश्वरूपा = जलचरांचा आत्मा वरूण देव! जो त्यांना नमस्कार! तुम्हां विश्वरूप देवा **पितामहाचेहि आद्यजनक** त्या देवांना नमस्कार! श्रीजगन्नाथ! अहो! आणीकही जें जें कांहीं रूपाचे असे असो अथवा नसो; त्या तुम्हां तशानाही हे श्रीजगन्नाथ प्रभो! नमस्कार असो! याप्रमाणें अनुरक्त चित्तानें सप्रेम होऊन अर्जुनानें स्तवन केले, नमस्कार केला. वारंवार, हे प्रभो! नमस्ते! नमस्ते! असें म्हणत आहे श्रीमूर्तीस साद्यंतपणें न्याहाळिले व पुन्हां नमस्ते नमस्ते म्हणत आहे. **देहप्रांत पाहाता पाहाता चित्त समाधान पावत आहे.** पुन्हः पुन्हः हे प्रभो जगन्नाथा! तुम्हांस नमस्ते नमस्ते! नमस्कार असो! नमस्कार असो! असें अर्जुन म्हणत आहे.

(४६) श्लोक ४१–४२ :— ५३८–५६१

हे अच्युता! आपल्यास शरण आलेल्यास मज अपराध्यास क्षमा करावी : सखा–मित्र म्हणून तुमचा महिमा न जाणतां अमर्याद बोलल्लो असेन ते 'हे कृष्ण! हे यादवा! हे सखे!' प्रमादानें प्रणयानें म्हणा–अवहासार्थ म्हणजे थट्टामस्करीनें असत् कृत म्हणजे अविद्यमानत्वे म्हणा! केलेले विहार, शय्या, आसन, भोजन, एकटा अथवा दुसऱ्यासमक्ष ते हे अच्युता! मला तुम्हां अचिंत्य प्रभावाकडून मजला क्षमा केली जाईल असें व्हावे.

अशा तुम्हां **देवदेवाना आम्हीं नेणो,** जाणेना; देवदेव आमचेच सगेसोयरे समजून रहाटलो; खेदाची गोष्ट जे अमृत ते सडासंमार्जनाच्या झाडण सारवणाच्या कामी लाविले (उपयोगाचे केले) शिंगरू (कोकरूं) घेऊन कामधेनू देऊन टाकिली. परिसाचा पर्वत मिळाला तो फोडून आम्हीं गाडोरा गडगा घातला; **कल्पतरू तोडून शेतास कुंपण घातले,** चिंतामणीची खाण लागली तिजमधील रत्नें ती ओढाळ हटविण्याच्या कामीं योजिली. आजचे हे स्पष्ट ते कवण झुंज! केव्हडे हे उघडे परब्रह्म पण सारथी केले गेले आहांत! कौरवाच्या घरास व्यवहार शिष्टाईसाठीं, जागेश्वरा अहो तुम्हीं दातारा धाडिले गेलांत थोडक्यासाठींच कीं, श्री सर्वेश्वरा आम्हासि विकिले गेलांत, पारखे झालांत, अनोळखी झालांत कीं !!! **ओव्या**

तुम्हीं देव देवा! योगियाचे समाधिधन! त्या तुम्हांस मी मूर्ख जाणेच नां! सन्मुख तुम्हांशीं उपमर्द विरोध करीत आहोत तुम्हीं अनादि विश्वाची आदि-समेमध्यें बैसतां नातलगसंबंधी शब्द पुढें घेऊन विनोद कलहाने बोलत होतो, बोलत आहोत. राऊळांत येऊ तर देवावरही मान सन्मान पाहूं नच मानाल तर रूसून जाऊ व वर पाया लागून तुमच्याशी मेळ घालू पाहावा अशी बहु करणी केली, सज्जनपणाची वाट तुम्हांपुढें उरफाटे बसणें हे काय योग्यतेचे म्हणावे! पण आम्हीं चुकलो! देवाशीं कोलकाठी दांडपट्टा करू. देवाला अडवून धरूं. आखाड्यामध्यें झोंबी लोंबी करू! सारीपट खेळतांना घराची चोरी करून निकरानें भांडू, चांगले ते ताबडतोब मागूं! तुम्हां सर्वज्ञाना बुद्धीवाद सांगू! वर तुमचे आम्हीं कांहीं लागत नाहीं म्हणू असा येतुला अपराध आहे—**अपराध त्रिभुवनी मावत नाहीं** पण नेणतपणेच तुमचे चरण देखिले सेविले आहेत! **भोजनाचे वेळेस स्नेहामुळें आठवण करणें तेव्हां रिकामा गर्व माझा अडून बसतो** देवाच्या शरीरांस शयनीं-बिछान्यांत शिरून तुम्हांपुढें निजतो 'कृष्णा' म्हणून **तुम्ही यादवच एक असें समजतो,** सहज जाता येता आपली शपथच की घालतो. एकासनावर बसतो. तुमचा बोल न मानणें हे ओळखीच्या दाटपणामुळें बहुत घडलें कीं, म्हणून आतां श्रीअनंता! काय काय ते सांगत बसूं पण **ह्या समस्त अपराधाची राशीच मी आहे!** या कारणास्तव पाठीमागे जी जी कांहीं वोखटी राहटलो असेन ती जननीप्रमाणें हे प्रभो! पोटी घालावीत पोटी सामावून घ्यावीत! अहो! ज्यावेळेस **नदी खडुळ पाणी घेऊन येते ती सिंधु जळानें आपणांत सामावून घ्यावीतच** ह्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. जरी प्रीतीनें अथवा प्रमादावर देवाच्या व माझ्या द्वंद्वपणावर देवांनीं मज विरूद्धत्वें जी कांहीं बोलणी बोलाविली असतील ती श्रीमुकुंदानीं उपासाहावीत! देवदेवाच्या क्षमत्वे क्षमा भूतग्रामाचा आधार झाली आहे—म्हणून तुम्हांस विनवूं ते थोडेच! अहो! **अचिंत्य प्रभाव असे तुम्हीं!** ते मज आपल्या शरणागतास ह्या अपराधाची क्षमा करावी कीं जी अहो देव देवा!

**(४७) श्लोक ४३ वा :—** ५६२-५६७

**देवदेव! प्रभु श्रीराम! महती! श्रीविश्वरूपाची प्रार्थना!** ह्या चराचर लोकीचे अद्वितीयत्वे पिता आहांत : पूज्य असे गुरुश्रेष्ठ आहांत : तुम्हांसारखा दुसरा नाहीं, तुम्हांहून आणिक तो कोठून आणावा! तुम्हीं तिन्ही लोकांमध्यें अप्रतीम अशा प्रभावाचे आहांत!

देवदेवांचें साचे असें महिमान मी आतां जाणितले : **देवदेव ! चराचराचें जन्मस्थान होत** ! हरिहर आदि समस्त देवांना तुम्हीं श्रेष्ठ अशी देवता आहांत ! वेदांनाही तुम्हींच कीं पढियंते आहांत ! तुम्हीं आदिगुरू आहांत ! ओव्या

**अहो देवदेवा ! प्रभु श्रीरामा ! श्रीरामचंद्रा ! तुम्हीं गंभीर ! अनेक भूतें तरी ती एकसमा एकस्थ अशीं तुम्हांमध्यें** ! सकळ गुणांमध्यें तुम्हीं अप्रतीम ! असें अद्वितीय कीं अहो ! तुम्हांस सरिसे कोणी नाहीं ! असें प्रतिपादन तरी, कायसे तें ! तुम्हीच मुळीं सर्व आकाश ! जगच कीं लोक झाल्यानें ! **जग हें तुम्हां आंत सामावून आहे !** आकाश हें तुम्हीच झाल्यानें जग साम्य सामावलें ! तुमच्या जगरूपी विस्तारावर हे सामावले म्हणावें तर लाजणेंच एक होऊन आहे ! आणिक अधिक ते बोलणें कसचें तें ! म्हणून **त्रिभुवनामध्यें तुम्हींच एक ! तुम्हांसारखा दुसरा कोणी नाहीं !** तेथें अधिक तो कुठून आणावा ! तुमचा महिमा लोकोत्तर असा ! तो वर्णनाम येत नाहीं, वाखाणण्याचा होत नाहीं !

**(४८) श्लोक ४४ वा :—** ५६८–५७९

म्हणून गंभीर लोकोत्तर, अप्रतीम अशा अद्वितीया हे अहो ! श्रीरामराया ! देवप्रभु श्रीरामचंद्रा ! आपणाला मी प्रणाम करतो ! शरीरानें काया समर्पण करून, साष्टांग नमस्कार घालतो ! अहो ! अहो ! तुम्हीं प्रसादास यावेत ! अहो देवदेवा !! तुम्हीं प्रसन्न व्हावेत !

तुम्हां ईशाना ! (ईज्य) पूज्य अशांना ! प्रार्थना करितो कीं, **हे देवदेवा ! हे विश्वरूपा ! प्रेमळ पिता हा आपल्या पुत्राच्या कल्याणार्थ, पति हा पत्निचे प्रेमास्तव, मित्र हा मित्राचे हितार्थ अपराध सहन करितो**; तसें तुम्हीं देवदेवा ! विश्वरूपा ! प्रभु श्रीरामचंद्रा ! मज अपराधा,—माझे अपराध—सहन करावेत हेंच बरें ! हेंच योग्य कीं ! देवदेवा अहो !!!

**(४९) श्लोक ४५ वा :—** ५८०–६००

अहो श्रीजगन्निवासा ! पूर्वीं न पाहिलेलें पाहून मला आनंद झाला ! पण भयानें माझें मन अधिकाधिक व्यथित झालें आहे म्हणून तेच पूर्वींचें देवरूप मला दाखवा ! देवाधिदेवा प्रसन्न व्हा !

देवाशी सलगी करून **विश्वरूपाची आळी घेतली ती स्नेहाळांनी पुरविली** देववृक्षाची झाडे अंगणांत लावावीत व खेळण्यास कामधेनुचे वत्स द्यावे, नक्षत्रावर डाव पाडावा तो चंद्रच चेंडू म्हणून तुम्हीं द्यावा असा हा छंद तुवा माऊली सिद्धिस नेला. लेशभर अमृतासाठीं सायास पडणारे त्याचा तर चार महिने पाऊसच केला. **वाफ्या-वाफ्यांनी पृथ्वी वाहून चिंतामणी पेरिले** याप्रमाणे हे स्वामी मी कृतकृत्य केला गेलो आपण फारच कीं लडिवाळपणाचा लळा पाळला (हरांनी का ब्रह्मदेवांनीही जे ऐकणें का पाहाणें नाहीं तें) हराच्या का ब्रह्मदेवाच्याही कानी न पडणारें तें दाखविलें—**ज्याची उपनिषदांनाही भेट नाहीं तें पाहाणें** देखण्यासंबंधीच्या गोष्टी कसच्या पण ती अंतःकरणातील गांठ मजकरितां आपण सोडिली—ब्रह्मा, विष्णू, महेशाचे तिही कल्प त्यासहित आजची घडी धरून जी कांहीं माझीं जन्में झाली त्या सर्वांचा झाडा घेऊन आंत

पाहिलें तो तें विश्वरूप देखिल्या ऐकिल्याची गोष्ट मुळींच आढळून येत नाहीं. **ह्याच्या आंगचें आंगण बुद्धीनें जाणणे ते सांपडत नाहीं, शब्दाच्या हांकेस अनुसरणें तेही अंतःकरणानें साध्य करवत नाहीं** तेथे विश्वरूप डोळ्यांनी देखिले झाले आहे अशी गोष्टच नाहीं, बहुत काय पण असें कधीं दृष्ट का श्रुत **असें नाहींच विश्वरूप देखिले जे त्यायोगे माझे मन हर्षित झाले आहे.** पण आतां अशी जीवी चाड आहे कीं, आपणाशी गोष्ट करावी आलिंगनासाठीं जवळीक भोगावी तर कोणत्या त्या एका वदनाबरोबर मी चावळावें बोलावें. म्हणून **वाऱ्याबरोबर धांवणें टिकत नाहीं,** गगनास आलिंगणें घडत नाहीं, समुद्रीं जलक्रीडा करणें ते कसचें होणारे ! म्हणून एथचे हे देवा ! मज भय वाटत आहे. पण आतां एवढा लळा पाळा कीं आतां हे विश्वरूपाचें होणें तें पुरें की ! चराचर विनोदानें पाहाणें झाल्यावर सुखानें घरीं राहावें तसें **तुमचें चतुर्भुज ते आम्हांस विसांवा आहे** आम्हीं ह्याच अनुभव यावा म्हणून योगजात अभ्यासावेत–शास्त्रें शिकावीत यजनयाजन करावे, त्याचें फळ हें चतुर्भुज रूप होय. पूजनें याजने, पूजा, दान, पुण्य त्याचें फलित होते म्हणजेच हे चतुर्भुज रूप अशी ह्या जीवास ह्या चतुर्भुज रूपाची आवड, इच्छा, म्हणून ते **चतुर्भुज देखण्यासाठीं मी ज्या अडचणीत फसून आहे** ती अडचण दूर करावी अहो आपण जग वसविणारे ह्या जीवीचें जाणते आहांत, म्हणून देवाचिया देवा आपलें पूजन करणाऱ्यावर मजवर प्रसन्न व्हा ! कृपा करा ! **ओव्या**

(५०) श्लोक ४६ वाः— ६०१–६१०

महाबाहो ! विश्वमूर्ति ! सहस्रबाहो ! मुकुट धारण केलेले हातांत गदाचक्र असलेले असें आपणास मी पाहूं इच्छितो म्हणून आपण तसें चर्तुभुज रूपाचे व्हावें.

**नीळवर्णः**—ज्या वस्तूंची अंगप्रभा, कांती, नीळ कमळांना राबवीत आहे, चाकरीस घेत आहे.

**आकाश निळें**:—आकाश जें निळें त्यालाही तें निलिमा देत आहे. (मनुष्यपण –मनुष्यें).

**नीळमणि**:—इंद्रनीळास आपल्या नीळवर्ण तेजाची कांतीची वोज दाखवीत आहे.

**यांच मणि सुवास**:—पाचु मण्यास (पुण्य) सुवास आला.

**आनंद**:—आनंदासच भुजा निघाल्या (साकार जग विश्व)

**मदन शोभा, सौंदर्य बीज**:—मदनास जानुवर, कमरेवर सौंदर्य बीज आले आहे. मस्तक मुगुट झाले. अलंकार श्रृंगार जें तेच लेणें लाभले. **वैजयंतीने सारंगपाणीस आवरिले आहे.**

**इंद्रधनुष्याची बैठक**:—मेघ हें गगनरंगणी इंद्रधनुष्यावरच कीं, बैठकीचें तसें वैजयंतीनें शारंगपाणीस आवरिलें आहे.

**गदा आसुरांना मोक्ष देणारी**:—आतां उदार गदा, असुरांनांही मोक्ष देणारी कशी ती.

**चक्र**:—सौम्य तेजानें चक्र तें मिरवत आहे.

**श्रीस्वामींना पहाण्याची उत्कंठा लागली आहे :**—श्रीस्वामी दिसावें म्हणून मी उत्कंठित झालों आहे. म्हणून तसें आपण हातीं गदा चक्र अललेले असे चतुर्भुज व्हावेत. **ओव्या**

**सोहळे :**—विश्वरूपाचे सोहळे भोगून माझे डोळे निवाले ते आतां श्रीमूर्तीसाठीं हपापले आहेत. ते श्रीकृष्णरूप साकारतेचे पाहावें त्यांवाचून त्या डोळ्याना इतर कांहींही पाहणे आवडत नाहीं. **डोळे ते श्रीमूर्तीरूप पाहिल्याशिवाय हे जिवित (सुख) थोडे थोडे मानित आहेत.**

**भोगण्याचे जागी श्रीमूर्तिच एक म्हणून तसें साकार व्हा !** व हे विश्वरूप आवरा ! हे ऐकून विश्वरूपास आश्चर्य वाटलें व असा अर्जुना ऐसा धसाळ कोणीही पाहिला नाहीं असें ते म्हणाले.

**(५१) श्लोक ४७ वा :—** ६११–६१७

**श्रीभगवान म्हणाले :**—तुजवर प्रसन्न होऊन–मी–ही तूं पावलेली वस्तु जें विश्वरूप दर्शन, श्रेष्ठ असें रूप आत्मयोगाच्या बळानें तुजला दर्शविलें–देखणें केलें. तें तेजोमय विश्व अनन्त आद्य असें हें माझें तें तुजवांचून दुसऱ्या कोणीहीं पूर्वीं पाहिलेलें नाहीं.

**अप्रतीम वस्तू पावला आहेस : त्याचा लाभ तुष्टि मानीत नाहींस ;** वर भिऊन जाऊन असें काय हेकाड बोलत आहेस तें की हें साकार व्हावे हे आपले विश्वरूप सावरून घ्या–बाबा आम्हीं प्रसन्न होणें तें अंगच सर्व देणें व तसें नच अंग वेंचलें तर जीव कुणासाठीं वेंचावयाचा तो : तुझ्या आवडीमुळें हें 'आजीवाचे' दळवाडे आत्मयोगानें कीं कामऊन केवढें ध्यान रचिलें असें **तुझ्या प्रेमासाठीं का आवडीवरच की आमची प्रसन्नता वेडी झाली म्हणून** ही गौप्याची गुढीच कीं जगीं उभारिली. अपारासही अपार असे परात्पर माझें विश्वरूप येथूनच की कृष्ण आदिकरून हे अवतार झालेले, हे ज्ञान तेज केवळ विश्वात्मक अनंत अढळ आद्य हे अर्जुना तुजवांचून दुसऱ्या कुणासही श्रुत दृष्ट नाहीं. कारण काय तर हे साधनास योग्य नव्हे.

**(५२) श्लोक ४८ वा :—** ६१८–६२३

वेदानें, वेदपठणानें, यज्ञानें, अध्ययनानें, दानानें क्रियांनीं (क्रियायोगानी) अथवा उग्र तपानीही असे [(एवं) रूपः मी] अशा अशा रूपाचा मी परमात्मा ह्या नरलोकी पाहाणे तुजवांचून, हे कुरुश्रेष्ठा ! शक्य नाहीं.

**याचा आनंद लाभला म्हणून वेदांनीं मौन घेतलें,** यज्ञ तर स्वर्गाहूनहि परत येथें आले. साधकांनी आयास पाहिला म्हणून योगाभ्यास वाळिला गेला. कारण काय तर येथें अध्ययना–पठण अभ्यासामध्यें (पढविणे शिकविणे त्यांत) कांहीं गम्यता सौरस वाटेना ! सीमेची सत्कर्मं, स्वधर्म संभ्रम भ्रांति मूळ होऊन धांवली जी त्यांनी तर बहुत श्रमानेंच कीं सत्यलोक गांठला. तपांनीं–तपश्चर्या करणारांनीं ऐश्वर्य देखणें देखिले पाहिले, व उभ्या उभ्याच कीं उग्रपण टाकून दिलें. म्हणून तपसाधन ते अपार अशा अंतरावरच कीं पुराणामध्यें जाऊन पडलें :: जसें कां अनायासें करूनच कीं तुवां विश्वरूप हे पाहिलेंस जे तें ह्या मनुष्यलोकीं कुणासही अनुकूल नाहीं फावत नाहीं : **आज ध्यान**

**संपत्तीसाठीं तूंच एक ह्या जगीं महत्वानें आहेस असें हे श्रेष्ठ भाग्य ब्रह्मदेवासही (लाभलें) नाहीं.**

**(५३) श्लोक ४९ वा :—** ६२४-६४७

असें हें माझें घोर रूप पाहून मनोव्यथेचा का संसारव्यथेचा होऊ नकोस : विमूढ भावही पण घेऊ नको; निर्भय होत्साता, प्रीतीचा होऊन पुन्हः, तेंच की हे माझें रूप तूं पहा.

**विश्वरूपाच्या लाभानें धन्यता मान;** येथचें भय घेऊं नको, **ह्याशिवाय कांहींही चांगलें आहे असें समजूं नको.** अमृताचा समुद्र भरलेला तो अकस्मात अंगावर आला त्यांत बुडून प्राणास मुकूं म्हणून कोणी तो टाकून दिला आहे काय? सुवर्णाचा डोंगर उचलणार नाहीं म्हणून त्याचा अव्हेर केला होतो? चिंतामणी पेहनावा तो ओझें म्हणून (त्यागावा) सांडावा! कामधेनु पोसवत नाहीं म्हणून दवडावी काय? चंद्रमा घरीं आला तो उबारा होत आहे, उबारा करतो आहे, म्हणून त्यास कोणी बाहेर नीघ म्हणेल काय! दिनकरा पडछाया करीत आहेस म्हणून परता सर, बाजून हो असें कोणी म्हणेल काय? **ऐश्वर्यरूपी महातेज सहज हातीं आलें आहे येथें तुजला गजबज ती कां व्हावी?** धनंजया, नेणसीच जाणत नाहींस कीं, काय आतां तुजवर रागवावें? **आंग सांडून** (प्रतिबिंब, शोभा) **छायाच एक आलिंगित आहेस कीं** अहो! छाया ती कांहीं मी नव्हे! हे जो साचा मी ते नव्हे! येथें मन वाचे करून {(अभिमान भंग, मानखंडणेचे.) [गौरव-अपमान]} अवगणियेचे जे चतुर्भुज प्रेम तेच धरीत आहेस, करितां अजुनही पण ही **छायेची आस्था सोड.** विश्वरूपाची अनास्था करशील पण तसें करूं नको. हे रूप जरी घोर थोर विकृत तरी हेंच कृतनिश्चयाचे घर कर! जसा कृपण ठेव्याजवळ चित्तवृत्ति रोवून असतो व मग नुसत्याच देहानें आपण असतो— पंख नच फुटलेल्या पांखराजवळ पक्षिणी आपला जीव वसविते, व मगच अंतराळी जाते. **अथवा धेनु डोंगरी चरते, पण तिचें चित्त वत्साकडे बांधलेले असतें-तसें ह्या विश्वरूपाविषयीं प्रेम स्थान-पति कर-चित्त ओसरलेले ते बाह्य सौख्य सुखापुरते करून चतुर्भुज श्रीमूर्तीस भोगावे-विश्वरूपापासून आपल्या सद्भावास निघूं न द्यावा,** हे कांहीं पूर्वी देखिलें पाहिलें नव्हतें म्हणून तुजला भय उपजलें पण तें आतां सोड व येथें तूं आपलें प्रेम असूं देत.

आतां तुझ्या म्हणण्याप्रमाणें करूं असें विश्वतोमुखानीं बोलून पूर्वील तें रूप सुखानेंच तूं न्याहाळ असें म्हणत म्हणतच **देव मनुष्य झाले.** असें हें असो, पण आवड जी तिचें नवलच एक तो श्रीकृष्णजीच उघडे कैवल्य, वर विश्वरूपाएवढे सर्वस्व त्या अर्जुनाच्या हातीं दिलें तरी तें त्यास आवडेचना : वस्तु घेऊन टाकावी, वाळावी, त्यागावी, बेपरवाईची करावी, जसें कां रत्नास दूषण देयावें! अहो! कन्या निरक्षून हे कांहीं मनास येत नाहीं म्हणणें : विश्वरूपाएवढी दशा तेथें प्रीतीचा वाढु कैसा : येथें तर उपदेशाचा शेलका भाव देवांनीं अर्जुनास दिला. सुवर्ण रवा तोडून लेणे घडिले ते जीवा नावडे म्हणून परत आटवावे जसें तसें शिष्याचे प्रीतीनें झालेलें कृष्णत्व विश्वरूप केलेलें तें मनास येईना म्हणून परत पुन्हां कृष्णपणास आणिलें : असा हा ठावच एक शिष्याची कसास लाविलेली बुद्धि साहाणारे गुरू कोणा देशी आहेत तें नेणिजे पण आवड ती कशी ते नच जाणणें होत आहे असें संजय म्हणत आहे.

**(५४) श्लोक ५० वा :—** ६४८–६६७

संजय म्हणाला :— याप्रमाणें साकार व्हा विश्वरूप सावरा अशा अर्जुनाच्या मागण्यावर देव म्हणाले कीं पूर्वीचें तें रूप न्याहाळून पहा! विश्वरूपाबद्दल अनादर, अनास्था बाळगूं नको. चतुर्भुजाबद्दलची आशा सोड; बाह्य सौख्यापुरतीच कीं श्रीमूर्ती भोगावी : असा हा बोल विसरूं नये. विश्वरूपापासून सद्भाव निघूं न द्यावा; नव्हते तेंच देखिलें म्हणून भय वाटलें : तें भय सोड; व विश्वरूपांतच येथें प्रेम संचलेलें असूं देत : पुन्हां एकदां तेंच रूप पाहा : असें म्हणत म्हणतच देव मनुष्य झाले.

असें बोलून वासुदेवानीं पुन्हः आपलें रूप अर्जुनास दाखविलें तेव्हां सभोंवार विश्व व्यापून जें दिव्य तेज प्रगटलें होतें तें श्रीकृष्णरूपी परत पुन्हः सामावले—त्वंपद जसें तत्पदीं सामावते द्रुमाकार जसा बीजी सांठवला **स्वप्न संभ्रम भ्रांति जागी झालेली जीवदशा गिळिले** तसा श्रीकृष्णांनीं **योग हा उपसंहारिला** बिंबीच प्रभा कां मेघ संपदा नभांत हारपली, भरती सिंधु गर्भी शिरली, श्रीकृष्णाकृतीच्या वळणावर जी विश्वरूप वस्त्राची घडी होती ती अर्जुनाच्या आवडीसाठीं उकलून दाखविली—तेथीलचे प्रमाण व रंग तो सहज नीट पाहिला पण गिऱ्हाईकाचा लाग लागेना, म्हणून पुन्हः घडी केली. **(विश्व) रूपाच्या बहुवसपणावरच ज्यानें विश्व जिंकिले ते रूप आतां सौम्य गोजिरवाणें साकार झाले** बहुत काय लिहावे पण श्रीअनंतानीं पुन्हः धाकुटपण घेतले, स्वीकारले, धरिले. भ्यायलेल्या पार्थास आश्वासन दिले, स्वप्नांत स्वर्गी गेलेला तो एकाएकीं जसा जागा व्हावा का झाला, तसा कीरीटीस विस्मय झाला अथवा **गुरुकृपा झाल्याबरोबर सर्व प्रपंच ज्ञान ओसरल्यामुळे तत्त्वच एक स्फूरत राहावे** तशी श्रीमूर्ति पांडवानें पाहिली, पार्थाच्या चित्ताआड जो विश्वरूपाचा पडदा होता तो निघून जाऊन बाजूस झाला असें हें बरें का भलें झालें कीं. काळास जिंकून आला, कां वावटळ मागे सांडिली सातही समुद्र हातांनीं तरला असा बहु चित्तानें संतोष अर्जुनास विश्वरूपानंतर श्रीकृष्णास पाहून झाला. सूर्य अस्त पावला गगनीं तारा उगवल्या त्याप्रमाणें (डोळ्यामध्यें) डोळ्यापुढें लोकासहित पृथ्वी पाहूं लागला तो तेंच कुरुक्षेत्र तसेंच दोन्हीं बाजूस गोत्र व संघटावर वीर शस्त्र अस्त्रें वर्षत आहेत त्या बाणाच्या—मांडवा आंत—(मंडपाखालीं) तसाच निवांत रथ आहे रथाच्या—अग्रभागीं-धुरेवर लक्ष्मीकांत व आपण(अर्जुन) रथाखालीं याप्रमाणें पूर्वीचें होतें तसेंच कां मागितले होतें तसेंच त्या वीरविलासानें पाहिलें व मग म्हणाला कीं आतां मात्र जगलो असें झालें (आहे) बुद्धिला सांडून ज्ञानानें अथवा नांवाच्या खुणेस का बुद्धिस सोडून भीतीमुळें रान घेतले होते, अहंकारासहित मन देशोधडी झाले होते **इंद्रिये प्रवृति भुलली वाचा प्राणास वाचकपणास चुकली अशी ह्या शरीरग्रामी दुर्दशा झाली होती.** ती (बुद्धिमान, अहंभाव, इंद्रियप्रवृति, वाचा) सर्व पुन्हां जिवंत होऊन प्रकृतीस भेटली आतां सांप्रत मी ह्या श्रीमूर्तीस जीवित वा जिवंत केलेले पण जीवन झालों आहे (जीवन) होऊन आहे की.

**(५५) श्लोक ५१ वा :—** ६६८–६७६

**अर्जुन म्हणाला :—**तुमचें हें सौम्य मनुष्यरूप पाहून मी आतां वृत्तीवर आलों आचरणानें कां छंदानें झांकलेला =(संवृत्तः) आहे. (सचितः = मन, ज्ञान, सजीवता) चित्त

ठिकाणावर आलें आहे. (प्रकृतिगतः देहधारीपणानें चालू असा) सत्य प्रकृतीच्या स्वभावाचा तबयतीचा मी आतां झालों आहे. **ओव्या**

अर्से श्रीमूर्तीरूप जिवंत केलेलें पण जीवन मी होऊन आहे हें सुख जीवी मानलें व मग श्रीकृष्णास म्हटले की जी अहो देवो! तुमचें हें मनुष्यरूप मी पाहिलें असें हें मनुष्यरूप देवराया! दाखविणें म्हणजे चुकलेल्या मज अपत्याला बुझावून समजावून माया स्तनपान दिलें कीं! विश्वरूप सागरामध्यें जो मी वायाच की वावानें तरंग मोजीत होतो वीतीनी गगन मोजावें तसें हातांनी लाटा फोडित होतों तों आतां ह्या निजमूर्तीच्या तीरावर निघालों ऐकावें जी अहो द्वारकापुर मित्रा मज सुकत असलेल्या झाडास ही नुसती भेटीच नव्हे तर मेघांचा वर्षावच कीं झाला. तहानेनें सहजच फुटला त्यांस अमृत सिंधु भेटला **आतां जीवीतांचा अभरंवसा नाहींसा झाला जीवित भरंवशाचे झाले आहे** माझ्या हृदय भुवनामध्यें हर्ष रूपी लतांचीं वेलीची, लतिकांची लावणीं होत आहे, मी सुखानेंच समजुतीस आलों आहे. (सुखानीं सुखाच्या गोष्टीं सांगणें होत आहे. ह्या पार्थाच्या बोलण्यावर श्रीदेवांनीं म्हटलें कीं असें हें काय म्हणतोस "**पण अरे बाबा! तूं विश्वरूपी प्रेम ठेवून यावेंस कीं व मगच सडिया अईती ह्या श्रीमूर्तीस भेटावे.** अशी शिकवण ती विसरलास वाटतें! अगा **हपापलेल्या अर्जुना हपापले पणावर मेरूही हातास आला तरी तो मनानें (महत्व पावत नाही) लहानच वाटतो—असा ह्या मनाचा चुकीचा भाव दुःस्वभाव असतो** कीं.

(५६) श्लोक ५२ वा ६७७–६८२

**श्रीभगवान म्हणाले**:—असें हें रूप जें माझे तूं देखणा पाहाता झालास तें सहज चांगलें पण तें सुलभ असून दुर्मिळ असें! देव जरी तरी देव सुद्धां ह्या विश्वरूपाच्या दर्शनाचे सुभगत्वासाठीं सौभाग्य दर्शन कल्याण करणारें ते या साठी नेहमीं उत्सुक उत्कंठित असतात. (कांक्षिणः)

**विश्वात्मक रूपडें जे आम्हीं तुला खरेंच दाविलें तें तपेंकरून शंभू जरी झाला तरी त्यास जोडत लाभत नाहीं.** अष्टांग योगाच्या–संकटानें–श्रमानें कीरीटी योगी श्रमतात–शिणतात पण विश्वरूप दर्शनाची भेटीची वेळच वेळेस येत नाहीं. तें विश्वरूप एखादे वेळेस किंचित् थोडें बहुत कसें बरें देखो येईल असें स्मरतां विचार करतां करतां तर देवांचा काळच्या काळ जात आहे (तेथे म्हातारपणच परिणाम करीत आहे) आशेची ओंजळ हृदयाच्या कपाळावर ठेवून चातक निराळी (आकाशी) लागले जसें तसें देव श्रेष्ठ, का सुरवर ते उत्कंठाभरित होऊन, अष्टौप्रहर भेटीच की ज्याची घोकीत असतात, (बोलांनीं गातात) तरीसुद्धां **स्वप्नामध्येंही विश्वरूपासारखें** (कांही एकादे) **रूप कोणीही पहात–देखत नाहीत.** असें तें हें तर तुवां प्रत्यक्षच कीं, सहज सुखानेंच पाहिलेंस कीं.

(५७) श्लोक ५३ वा:— ६८३–६८६

मी, वेद पठणानें तपश्चर्या करण्यानें, दान देण्यानें, ईज्या पूजा करण्यानें तूं एवंविध म्हणजे मजला जसा पाहिलास तसा देखिला पाहिला जाणें शक्य नाहीं.

ओव्या

हे सुभटा! त्या विश्वरूप दर्शन उपायास वाटा वाहात आहेत असें नाहीं. वाहात्या होत नाहीत; चारी वेदांनी सहा शास्त्रांसहित येथें माघारच घेतली (ओहोटणेच पाहिलें) विश्वरूपाच्या–, माझ्या मोहऱ्यानें–, चालण्यास, हे धनुर्धरा! तपाचें भारानींही पण लाग सांपडणारा होत नाहीं, दान आदिकरून तर कानडे मनास तेथें अवघड वाटणारें असेंच, यज्ञानेंही मी तसा सांपडत नाहीं जसा कां सुकाळपणानें सुखानेंच देवदेव तुवां देखिला पाहिलास; जाण कीं, **एकाच परीनें मी सांपडतो जरी का भक्ति येऊन (चित्ताल ती) वरील तर.**

**(५८) श्लोक ५४ वा :—** ६८७–६९६

हे अर्जुना! परंतपा! 'मी एवंविध' पहाणे देखणे–मी जाणणे, मी पाहाणे, का तत्त्वानें मीच होणें, ते फक्त अनन्य भक्तीनेच शक्य आहे.

**पण ती अनन्य भक्ती कशी असावी तर जशीं कां पर्जन्याची सुटका, धरा (पृथिवी) शिवाय (दुसऱ्या वृत्तीची) दुसऱ्या गतीची होणारी नच! अनन्य गती गंगा जशी आपली सकळ जळसंपत्ती घेऊन समुद्रास मुळात मिळालेलीच पुन्हः मिळते त्याप्रमाणें सर्व भाव संभारानें अनावर अशा प्रेमानें तूं मीच होऊन मजमध्यें संचर. मी कसा तर क्षीराब्धि क्षीराचाच सर्व थडीला जसा तसाच मध्येंही सरिसेंपणाचाच असतो. मजपासून तो मुंगीपर्यंत चराचर सृष्टीला भजनास मीच एक तेथें दुसरी परी नाहीं; (भ्रांति नाहीं.) भजनच एक तेथें ते प्रमाण त्याच क्षणांस मी एवंविध जाणवतो, व जाणल्यास स्वभावें करूनच कीं, दिसला होतो.**

इंधनी अग्नि प्रदीप्त तेथें इंधनही असें बोलणें नाहीं; तें तर मूर्त अग्निच कीं होऊन असतें–सूर्य (तेजाकार) उगवला नाहीं तो पर्यंत गगनच कीं अंधारें होऊन असतात पण सूर्य उदय झाल्यावर सर्व गगन ते प्रकाशच होतें. तसा माझा साक्षात्कारी–माझा साक्षात्कार झाल्यावर **अहंकाराची वारी सरते, अहंकाराची भेट होत नाहीं–अहंकाराचा लोप झाल्यानें द्वैत नाहीसे होते;** मग मी, तो असें हें सर्व अवघे स्वभावें करून मीच होतो बहुत काय पण मजशीं समरस होऊन तो समरसी सामावून असतो; **आत्मानुभवातच समरसून असतो.**

**(५९) श्लोक ५५ वा :—** ६९७–७०९

**भरत वाक्यः**—आत्मभावनेंत सर्वांच्या सर्व अंगांनीं अंग, प्रत्यंग, उपांग, सांगांग–महत्त्व देऊन आहे. भूताचें अनेकत्व विसरला त्याच्या सृष्टींत मीच एक भरला आहे. म्हणून निर्वैर असा सर्वत्र मीच 'पूजन नमस्करण भजन!' इहलोक, परलोक ज्या त्या लोकीचें मीच एक केवळ मोक्ष कैवल्य–जीवित साफल्य मजला नांव दिलें बोलणें नाम करणें मजला उद्देशून होत आहे. माझ्याच प्राप्तीवर जीवित साफल्य–भूतें असें बोलणें नाम करणें मीच एक सृष्टींत भरून आहे. एकात्मक महत् भूततेचे सर्वत्र भजत श्वसत विश्वसत आहे निर्वैर केव्हांहि.

मजसाठीं कर्मे अंगीं वाहात आहे. मजशिवाय जगीं कांहीही चांगलें वाटेना. **दृष्ट का अदृष्ट केवळ मीच एक** जिणं हे जिणेयाचे फळ हे मजसीज नाम ठेविले. भूतें अशी भास–भाष विसरला **दिठीमध्यें मीच एक बांधला म्हणून निर्वैर असा सर्वत्र भजत आहे** असा जो भक्त होतो त्याचें त्रिधातुक–कफ, वात, पित्त–ते तेव्हांच नाहीसें होऊन तो मीच, सीमेचा असा, होऊन असतो. जगत् हेच मोठे दोंदिल पोट ज्याचें अशा, कारुण्यरस रसात्मकतेनें श्रृंगारविलेले अशा, देव श्रीकृष्णांनी असें बोलिलें असें संजय म्हणत आहे. आनंद संपदेनें जगी थोर झालेला पांडुकुमर तोच की एक अहो कृष्ण चरण चतुर ह्या जगी. त्यानें देवाच्या दोन्ही मूर्ती आपल्या चित्तामध्यें न्याहाळिल्या. तो विश्वरूपाहूनहि कृष्णाकृतीमध्यें लाभ पाहिला. पण त्याच्या त्या जाणिवेस देवानी मानिलें नाही जें कां एकदेशी ती कृष्णाकृति ती व्यापक विश्वरूपाहून केव्हांहि श्रेष्ठ अशी नव्हेच म्हणून हेच समर्थन करण्यासाठीं एक दोन चांगल्या उपपत्ती (मूळ कारण संगती) शार्ङ्गी ते त्यास दाखविते झाले. त्या सुभद्राकांतानें ऐकून चित्ती म्हटलें कीं दोहीमध्यें जी बरवी अशी तीबद्दल पुढें पुढील प्रसंगी पुन्हः विचारू या असा जीवी विचार करून आतां पुसण्या विचारण्याची ती बरवी अशी प्रश्न करण्याची पद्धत स्वीकारून अति आदरानें तो पार्थ श्रीदेवांना विचारण्याचें करील. ती कथा ऐकावी प्रांजल ओवी प्रबंध रचनेनें सहज विनोदानेंच कीं, गोष्टी सांगण्याचें श्रीनिवृत्तिनाथाच्या प्रसादानें होईल जें तें आनंदानें ऐकावें असें श्रीज्ञानदेव म्हणतात.

सन्मानार्थ केलेली सद्‌भावाची ओंजळ भरून ओवियारूपी मोकळी फुलें श्रीविश्व-रूपाच्या अंध्रियुगुली अर्पिली.

शुभंभवतु

अनुक्रमणिका संपूर्ण

# अनुक्रम

## अध्याय ११ वा

**श्रीगीता ग्रंथाची महति अप्रतीमतेची**—विश्वरूपाशीं अर्जुनाची भेट जशी का हरिहराची मिळणी—गीतातीर्थीं सहज स्नान—प्रयागमाधव विश्वरूपदर्शन श्रीनिवृत्तिदेव दातारांनीं संस्कृत गहनें तोडून मराठी धर्म निधानें रचल्यानें गीतातीर्थीं स्नान करणें सोपें झालें आहे.

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—आतां येथें ह्या अकराव्या अध्यायांत शांत व अद्‌भुत अशा दोन रसांची रसभरीत अशी कथा आहे. जेथें पार्थाची विश्वरूपाशीं भेट होईल. (१) अहो, शांत अशा रसाच्या घरीं अद्‌भुत रस हा भावदेवरूपी पाहुणचार घेण्यासाठीं आला आहे व त्या निमित्तानें येथें बसलेल्या इतर रसांचाही पण सन्मान होत आहे. (२) अहो, वधुवरांच्या लग्नप्रसंगीं वऱ्हाडियांसही वस्त्र, पोशाख, दाग-दागिने, अलंकार, लेणी लुगडी यांचा आहेर होतोच ना! तसेंच देशी भाषेचें सुखासनावर शांत व अद्‌भुत-रसांचें आरूढ होणें झाल्यानें, हे तर दोन्हीं रस सन्मान पावलेतच; परंतु इतर रसांनांही सन्माननीयपण लाभलं आहे. (३)

येथें आतां शांत व अद्‌भुत बरवे रस डोळयांच्या ओंजळीनें घ्यावेत, जसें का हरि व हर हे प्रेमालिंगन भावास येऊन आलिंगन देत आहेत. (४)

अहो, आंवसेच्या दिवशीं सूर्य व चंद्रबिंब हीं दोन्ही मिळतात तसा तेथें ह्या दोन्हीं रसांचा एकवळा मिलाफ झाला आहे. (५) जसें का गंगायमुनांचे ओघ मिळाल्यानें प्रयाग माधवच एक आणि म्हणून तर येथें सर्व जग स्नान दानानें सुस्नात–पवित्र होत आहे. (६). येथें गीता ही गुप्त सरस्वती व शांत अद्‌भुत हे दोन्ही रस मूर्त ओघ म्हणून त्रिवेणी संगमाची अशीही गीता जगास लाभली आहे. (७)

अहो! माझ्या दातारांनीं दानशूर उदार अशांनीं ह्या गीतार्थामध्यें श्रवणाच्याद्वारानें गीता तीर्थ करणें –गीतारूप होऊन असणें–सोपें केलें आहे. (८). त्यांनीं श्रीनिवृत्तिदेवांनीं संस्कृताचीं गहनें तोडून मराठी धर्मनिधानेंच असे शब्द सोपान रचिले आहेत. (९). व आतां भलत्यानेंहि (कोणीहि) येथें सद्‌भावानें न्हावें–आंघोळ करावी. प्रयाग माधवरूपी विश्वरूप पाहावें–विश्वरूपाचें दर्शन घ्यावें व एवढ्यानेंच मुळीं संसारास उत्तीर्ण व्हावें. (१०). हें असें असो; पण येथें मूर्त असे अवयवासहित रसभाव भरास आल्यानें येथें तर अहो! श्रवणसुखाचें साम्राज्य कीं, जगास लाभलें आहे. (११). शांत व अद्‌भुत रस नगदतेचे असे रोकडे येथें दुसऱ्या रसांनाही महत्व येऊन आहे, असें ते अल्प, थोडेच पण येथें अहो उघडे कैवल्यच कीं एक. (१२). (१–१२)

**हा अकरावा अध्याय म्हणजे देवांचें विश्रांतीस्थानच होय**—देवांचा, सर्वस्वाच्या विसांव्याचा ठावच: एकटा अर्जुनच काय पण आवडतयानांही येथें सुकाळ आबादानी सज्जनांना विनवणी—पांखरूं पढविलें, ते बोलले तर प्रसन्न होणें होतें. आपण आपला माथाच डोलवितो तसें प्रभु तुम्ही लावि-लेलें, सारस्वताचें गोड झाड लक्ष शिंपण्यानें तें रस फळ फूल भारास येईल. जगास देवत्वाची विश्रांतीच आपल्या धर्मानें होईल:—

तो हा अकरावा अध्याय देवांचा आपल्या स्वतःच्या सर्वस्वाच्या ठायींचा विसांव्याचा ठावच एक भाग्यवंतामध्यें श्रेष्ठ असा अर्जुन तो येथेंही पोहचला कीं. (१३). येथें नुसता अर्जुनच एकटा काय तो पोहोंचला म्हणावें तर असें नाहीं येथें तर आवडतयानांही पण गीतार्थ हा मराठींत आल्यामुळें, सुकाळच झाला आहे. (१४) एवढ्याचसाठीं माझी विनवणी ती ऐकावीच की अहो: सज्जनांनीं आपण येथें लक्ष देऊन असावेंच असावें. (१५) आपणा संतांच्या सभेमध्यें अशी सलगी करणें हें बरें नव्हे, तरीपण आपण मज-वरचा लोभ (कायम) ठेवून मज अपल्यास मानावेंच मानावें, लोभामुळें म्हणजे लाभाच्या इच्छेमुळें मह-

त्याचें हें आहे असें समजावेंच कीं. (१६) अहो, एकाद्या पांखरास आपणच बोलायला शिकवावें व तें तसें बोलूं लागलें तर आपण आनंदानें (माया तुकिजे) मान डोलावतोंच नां! माथा तुकवितोच नां! त्याचप्रमाणें बाळकाचें कौतुकच करविलें तेथें माय ती बाळकोद्देशी रिझते, तृप्त होते—संतोषते तिचें मन धाले (आनंदित) होतें. (१७) त्याप्रमाणें मी जें जें कांहीं बोलतों आहें, अहो प्रभु! स्वामिन् तें आपलेच कीं शिकविलेलें म्हणून अहो देवा! आपुलेंच शिकविणें आपणच ऐकावें असें येथें आहे. (१८) अहो, आपणच कीं हे सारस्वताचें गोड झाड लाविलें आहे. तरी ते आतां आपले लक्ष शिंपण्यानें वाढीस लागेल असें करावें. (१९) ज्या योगें कीं अथवा तरच मग हे रसभाव फुलांनीं फुलेल, तेथें रसभाव फुलले होतील, अनेक अर्थ फळभारांनीं फळाच्या बहारास येईल, अहो आपुल्याच धर्मे प्रतिष्ठेनें, तुमच्या धर्मानें सर्व जगास देवत्वाची सुख विश्रांतीच एक: तेथ योग जवळचा झाला, जगच योगास आलें असें होईल. (२०)

(१३-२०)

### श्रीगुरू निवृत्तिदेव ज्ञानदेवांच्या विनंतीनें प्रसन्न होतात—

संतांचें प्रसन्नपण; अर्जुनाचें मागणें का म्हणणें स्पष्ट करून सांगावें. प्राकृतानें मी तें सांगणें जाणणें नाहीं—करितां आपणच मजकडून सांगवा कीं, जी अहो, पालेखाईऱ्याकडून लंकेश्वराचें तिरस्काराचें असें पात्र करविलें गेलें: अर्जुन एकला तरी अक्षौहिणी त्यानें जिंकल्या नाहींत का? **'समर्थ जें करी तें होय चराचरीं'** म्हणून तुम्ही संत मज बोलवा जी अहो!

अशा ह्या ज्ञानदेवांच्या विनवणीनें संत हे प्रसन्न झाले व म्हणाले कीं आपल्या विनवणीवर आम्हीं प्रसन्न झालों आहोंत, तरी आतां येथें अर्जुनानें जें काय बोलणें केलें तें सांगण्याचें करावें. (२१)

यावर श्रीनिवृत्तिदास म्हणतात, कीं अहो, हे गहनतर असे श्रीकृष्णार्जुनाचें बोलणें तें मी प्राकृत कसें तें सांगावें हें जाणत नाही, पण तें आपणच मजकडून सांगवावें कीं जी. (२२) अहो रानीचा झाडपाला खाणाऱ्या वानरांकडून लंकेचा धनी, स्वामी, ईश्वर जो रावण त्याचा नाश, पराभव, करविला: अहो सैन्याच्या अक्षौहिणी होत्या, तरी त्या एकट्या अर्जुनानें जिंकल्या नाहींत काय?–, जिंकल्याच ना! (२३) म्हणून येथें 'समर्थ जें जें कांहीं करी, तें तें चराचरीं होय, होतें–तसें तुम्ही संत मज बोलवा कीं जी. (२४) आतां श्रीगीतेचा कल्याणकारक असा गहनतेचा जो श्रीवैकुंठनायकाच्या मुखांतून निघालेला तो सांगण्याबोलण्याचें करितों; तें ऐकावें की जी अहो! (२५) (ओव्या २१ ते २५)

### श्रीगीताग्रंथाची आख्यायिका, प्रशस्ति, स्तुति.

बाप ग्रंथ गीता—वर्णन गौरव ते श्रीशंभुसही अंगचें असें नेहमीचें करतां येईना. जें तें नर जीवेंभावें नमस्कारावें ह्यांतच भलेपण मेटणारें होय.

अहो बाप! ग्रंथ गीता! अहो! वेदांनीं समोर ओव्या २६-२७ प्रतिपादनास घेतलेली दान, संपादन, विवेचन शेवटास नेणें देवता, भगवान श्रीकृष्ण ज्या ग्रंथ'मध्यें वक्ते आहेत. (२६) तेथीलचे गौरव, जो आदर, का जें वर्णन, श्रीशंभूच्याहि बुद्धीस समजत नाहीं—, मतीस नेहमीचें असें आपलेसें करतां येईना. आपल्या अंगींचें करणें होत नाहीं; ते आतां जीवेंभावेंकरून नमस्कारावें, ह्यांतच भलेपण होय,—गौरव ते नमस्करण्यांतच भलेपण मेटणारें होय. (२७)

### पहिली गोष्ट अर्जुनानें कशी केली—

विश्वरूपी दिठी घालून अर्जुन मनांत म्हणतो, सर्व विश्व परमेश्वर स्वरूप आहे हें माझ्या मनाला कळलें, पण तें प्रत्यक्ष डोळ्यांनी पहावें अशी माझी इच्छा आहे; ती इच्छा पूर्ण करा असें श्रीकृष्णाला मी म्हणूं तरी कसें? तें पुसण्याविचारण्याचें संकट मला वाटत आहे: कारण विश्वरूप हें देवाचें तें गूढ व तें

उकलून दाखवावें हें असें कसें म्हणावें! कारण मागें कोणीही पढियंतयानें जें पुसिलें विचारीलेलें नाहीं, तें सहज सांगा असें म्हणावें तरी कसें! मी श्रीकृष्णाच्या सलगीचा तरी आई आयीसीहून जास्त अंतरंगाचा नव्हे! तीही ह्या प्रसंगाबाबत विचारण्यास भ्यायली; गरुड, सनकादिक; गोकुळीचे आवडते; देव तर विश्वरूपाच्या ठावापर्यंत गूढ असाच, तें दर्शन त्याच्या अंतरीचें निजब्रह्म असें तें उगीच सहजासहजीं दाखवा, असें म्हणण्याचें धाडस कसें करावें? बरें न पुसावें तर माझा जीव त्याबाबत अनिश्चित होऊन तें विश्वरूप देखिल्याविना एकसारखा तळमळत आहे; पण तेंच कांहीं एखाद्या खुबीनें विचारावें कीं तें लगेच प्रेमळ-पणाच्या पान्हयास येऊन त्या प्रश्नाचें उत्तर म्हणजे विश्वरूप दर्शनच एक तें देणारे होतील.

यावर आतां तो किरीटी अर्जुन (तेथें पहिलेपणच एक त्या प्रश्नास येणारें जसें का त्या गोष्टीनें.) विश्वरूपी मिठी–दिठी घालून पहिली गोष्ट ती कशी करता झाला? (२८) ती म्हणजे विश्वीं परमात्मा व्यापून असल्याची प्रतीति ती बाहेरही स्पष्टपणें अवतरो, रूपास येवो, स्पष्ट होवो : विश्व परमेश्वरस्वरूप आहे, हें माझ्या मनाला कळलें तरीपण तें प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनीं पहावें: सर्व जग ईश्वरस्वरूप, अशा-प्रतीतीचा सिद्धांत, बाहेर डोळ्यांना गोचर व्हावा, अशी माझी इच्छा पूर्ण करा असें भगवान् श्रीकृष्णाला म्हणावें तरी कसें? (२९) ही जीवाभावाच्या आंतील इच्छा खरी, तरी पण देवांना ती इच्छा पुरवा, असें म्हणतांना सांकडेंच वाटतें, एका अवघडपणाचें हें मन होत आहे, कारण विश्वरूप हें देवाचें आपल्या निज सर्वस्वाचें गूढच एक, तें उकलून दाखवा असें म्हणावें तरी कसें? तें दाखविण्याबाबत पुसावें तरी कसें? (३०)

तो मनांत म्हणाला कीं पूर्वीं कोणी कांहीं एकाद्या पढियंतयानें जें पुसिलें, विचारलें नाहीं, अहो, देवा तें अगदीं सहजच सांगा असें मी म्हणावें तरी कसें! (३१) जरी मी जास्त सलगीचा तरी काय आयिसीपेक्षां अधिकतर अशा अंतर रंगाचा कसचा? पण तीही ह्या पहिल्या प्रसंगाबाबत विचारण्या पुसण्यास भ्यायली, मागें सरली. (३२) अहो, माझी सेवा देवांना आवडतीशी झाली, त्यांच्या आपल्या मनासारखी झाली; तरीपण काय ती गरुडाच्या सेवेइतकी होईल? तोहीपण ही बोली विचारण्यापुसण्याचें करीचना. (३३). अहो, सनकादिकांहूनहि काय मी जवळचा? पण त्यांसही हा चाळा, ओढा, आवडला नाहीं–समजेचना, सांपडला नाहीं. अहो! "मी नच आवडे काय प्रेमळा ऐसा गोकुळीच्या त्या!" आवडतेपणानें मी गोकुळींच्या प्रेमळासारखा नव्हेच (३४) पण त्यांनांही (लेकुरवाळेपणानें) लेकरूपण तें अहो, लेकरूंच एक तें तेथें काय कसचें तें सांगण्याचें होणारें पण महत्व म्हणून विश्वरूप दाखविण्याचें राहविलेंच, तें नच दाखविलेंच— तेथें झकविलेंच कीं, चकविलेंच कीं, अहो, अंबरीषाचे तर गर्भवासही सोसले; पण विश्वरूप हें दाखविण्याचें (राहून गेलें) राहविले, तें कोणासच मुळीं तो दाखवीचना! (३५) हा देव विश्वरूपाच्या ठावापर्यंत तर गूढ असाच आहे. तें दर्शन तर त्याच्या अंतरीचें असें निजब्रह्म (निजनारायणच तो त्यानें आपलें रूप, दर्शन प्रगट, स्पष्ट, असें) तें अगदीं झटपट, सहजासहजीं दाखविलें असें कसें व्हावें? कसे तें उघडपणेंच मला पाहूं द्या असें कसें म्हणावें? तें मला एकदमच पाहातां येईल? येथें अवघडपणच एक येऊन आहे. (३६)

बरें न पुसावें असें म्हटलें तर (अनिश्चित होऊन) तें विश्वरूप देखण्यासाठीं माझा जीव एकसारखा तळमळत आहे. तें विश्वरूप देखिल्या पाहिल्याशिवाय सुख विश्रांति होईचना! वर जगणें तेंही पण कदाचितच की असें आहे. (३७) म्हणून आतां नाजुकपणाच्या हातोटीनें (हलुच हलकें असें नाजुकतेच्या खुबीनें—काय तें ह्या अर्जुनाचें मागणें म्हणजे कांहींच नाहीं. अल्प असें—थोडेंच आहे. की!!! अशा नाजुक प्रश्नांनीं तें विचारावें व मग इच्छेस येईल तसें ते करोत, अशा साहसानें पार्थ बोलूं प्रवर्तला. (३८) पण तें बोलणें अशा भावानें का इच्छेनें जें कां एक दोन प्रश्नोत्तरांवरच की देव ते अवघे झाडून सर्व विश्वरूप तें दाखविण्याचें करतील की. (३९)

**देवांचें मुद्दल स्वरूप पाहाण्याच्या अर्जुनाचा भाव इच्छा—**

**वात्सल्य महिमान; गाय व वांसरू; पांडव व भगवान श्रीकृष्ण; देव तर स्नेहाचें अवतरण: अर्जुन स्नेहाचे माजवण; मिळवणीनें वेगळेपण: तेथें तर सर्व उत्कंठाच एक बहुततेची—अर्जुनानें विचारिलें कीं लगेच देव ते विश्वरूप होतील, असा तो पहिला प्रसंग तो कसा, तो ऐकावा. ओव्या ४०–४३.**

अहो वत्सलतेचें महिमान! तेथें वासरूं पहाण्यासाठीं गाईस मोह, स्नेह, प्रेम अनावर होऊन ती खडबडून जागी झाली, उठली तेथें मग स्तनामुखाशीं एक गांठ भेटच झाली, तेथें काय अहो, ती पान्हा धरून आहे? कां पान्हयास येईल कीं नाहीं? असा विचार करणें करून असणें तें कसचें तेथें. (४०) अहो, पाहा पाहा! की भगवान श्रीकृष्ण तो तर त्या पांडवांच्या नांवांनें खरोखर रानावनामध्येंही की त्यांचा प्रतिपाळ करण्यास धांवतो (पांडवाच्या नांवाखालीं रानींहीपण जो प्रतिपाळ करण्यास) धांवावा तो आतां येथें काळवेळेचा प्रश्नचमुळीं बाजूस ठेवून पुसण्याविचारण्याचा अवकाश कीं लगेच प्रतिपाळरूपी विश्वरूप दर्शन—हे ठेविलेलेंच आहे, जसें कां कारण पांडवाचें ते प्रश्न पुसणें तो सहन करून असेल काय? त्यावर तो विचार करीत राहील काय?—, बसेल काय? (४१) अहो, भगवान ते तर सहजच एका स्नेहाची मूर्ति अवतरण, आणि अर्जुन हा कसा म्हणावा तर त्यानें तर ह्या स्नेहास एक माजवणच घातलें आहे. असा व अशा मिळवणीनें तेथें देवांमध्यें व अर्जुनामध्यें मुळींच वेगळेपण तें उरूंच नये असें तरी तेथें वेगळेपण उरत आहे हेंच बहुतेक—सर्व उत्कंठाच एक तेथें. (४२) म्हणून अर्जुनाच्या तोंडून शब्द बाहेर पडल्याबरोबर अर्जुनानें विश्वरूप दर्शनासंबंधीं विचारलें न विचारलें तोंच कीं देव तर आपण होऊनच कीं आपोआपच विश्वरूप होतील ऐसा तो पहिला प्रसंग तो तरी ऐकावाच. (४३)

श्लोक १ ला

**अर्जुन म्हणाला-माझा स्वीकार करण्यासाठीं जें न बोलणें तें मजकारणें वाच्य केलें, का मजवर कृपा करण्यासाठीं श्रेष्ठ असें अध्यात्म (स्वभाव) म्हटलेलें ज्ञान जें तुम्हीं मला सांगितलेंत त्यानें माझा मोह गेला.** (ओव्या ४४–६८)

**अर्जुनाची कृतज्ञता; सारें विश्व प्रेमस्वरूप आहे तें पाहाण्याची त्याची इच्छा :—**

अर्जुन म्हणाला, न बोलणें तें मजकारणें बोलिलात. जें महाभूतें ब्रह्मीं आटती, जीव व प्रकृति माया यांचा नाश होतो, तेव्हां देव जे कांहीं होऊन असतात, रहातातः असें तें गुह्य, परब्रह्म स्वरूप—, जें कृपणाप्रमाणें हृदयमंदिरांत वेदादिकांपासूनही चोरून ठेविलेलें तें आज आपण मजपुढें मोकळें—उघडें केलें. ज्या अध्यात्मावरून हरांनीं—श्रींशंकरांनीं आपलें ऐश्वर्य ओंवाळून टाकिलें, अशी ती वस्तु मला हे देवा, तुम्ही दिलीत; पण असें म्हणावें तर काय आम्ही तुम्हांपासून भिन्न आहोंत? एका तुम्हांवांचून ह्या विश्वीं दुजे असें कांहीं नाहींच,' पण आमचें कर्म कसें आहे पाहा कीं, जे का आम्हींच, आम्हीपणानें खरे आहोंत असें मानतों. पण महामोहाच्या पुरामध्यें मस्तकापर्यंत बुडालेला मी पाहून तुम्हीं स्वतः उडी घालून मला बाहेर काढलें.

ह्या जगीं अर्जुनच कीं एक असा अभिमान वाहून आहेः कौरवांना मी स्वजन मानीत आहें व यांना —कौरवांना मी मारीन असें म्हणतों, अशा तऱ्हेचें स्वप्न मला पडत होतें, तोंच आपण मला जागें केलेंत!

देवा! लक्ष्मीपति! आकाशांतील ढगांच्या कल्पित नगरीची वस्ती सोडून निघालों, अहो उदक —पिण्याच्या इच्छेनें मी मृगजळच पीत होतोंः कापडाचा साप पण वेदना, कंप मात्र खऱ्या सापाच्या चावण्याप्रमाणें होत होत्या. त्याप्रमाणें व्यर्थ अज्ञानानें मरत असणाऱ्या माझ्या जीवाला वांचविण्याचें श्रेय—पुण्य तुम्हीं घेतलेंत : आपलीच पडछाया विहिरींत पडलेली ती न जाणून तर सिंह आतां (विहिरीमध्यें) उडी

घालणारच असा प्रसंग जाणून तुम्हीं मला, हे श्रीअनंता, रक्षिलें, राखिलें. एरव्हीं, येथ पावेतों माझा निश्चय होता कीं, आतां जरी जळप्रळय झाला, का जगच अवघें बुडालें, आकाशही जरी वर तुटून पटलें, तरीसुद्धां गोत्रजांबरोबर माझें लढणें होऊं नये; अशा अहंकाराच्या अतिशयानें मी तर आग्रहच धरून होतों. बरें झालें कीं, तुम्ही जवळ होतां म्हणून मला बाहेर काढिलेंतः नसतेंच आपणांस स्वतःस एक मानिलें: नसणाऱ्याला नांव गोत्र असें दिलें. अहो, मोठें थोरलें वेड का पिसेंच कीं लागलें होतें. अहो, लक्षीपति! देवा! तुम्ही सांभाळिलें, रक्षिले, वांचविलें!

यानंतर पार्थ देवास म्हणाला, हे कृपासिंधो! हे कृपासागरा! हे कृपानिधे! जें बोलतां यावयाचें नाहीं तें आपण देवांनीं माझ्यासाठीं वाच्य केलें, बोलून दाखविलें, बोलास आणिलें कीं. (४४) भूतमात्र –महाभूतें हीं ब्रह्मस्वरूपांत आटल्यावर, लय पावल्यावर, उरणारें जें ब्रह्मस्वरूप, जेथें जीव व गुणमयी यांचे ठावच मिसळले, तेव्हां देव जें कांहीं होऊन असतात ते ब्रह्म जेथें विसावतें तें जें ब्रह्मस्वरूप (४५) अहो! परब्रह्मस्वरूप हृदयाच्या परिवरी कृपणाप्रमाणें रोवून ठेविलें होतें, तें परब्रह्म जें वेदानांही चोरलेलें, जें वेदांनांही कळत नाहीं. (४६) तें तुम्हीं आपलें हृदय मजपुढें उकललें. अहो, त्या अध्यात्मावरून तर श्रीहरानीं आपलें सर्व ऐश्वर्य ओंवाळून टाकिलें, वरचेवर अनुभव घेऊन चोखाळिलें तें अध्यात्म ऐश्वर्याचें केलें. (४७) हे स्वामिन्! ते वस्तु तुम्हीं तर एकदमच–एकिहेळा मजला तिचें ज्ञान करून दिलें असें म्हणावें तर आम्हीं तुम्हांपासून भिन्न न होत—आम्हीं काय तुम्हांपासून भिन्न आहोंत? (४८) पण खरोखरीच अहो! महामोहाच्या पुरामध्यें मस्तकापर्यंत बुडाला असें पाहून मजला बाहेर काढिलें, मजला वांचविलें. (४९) खरें पाहिलें तर एका तुम्हांवांचून ह्या विश्वामध्यें दुसरें कांहींच नाहीं व **जें कांहीं बोलणें तें सर्व तुम्हां विषयींचेंच होय.** [पण येथें दैव का कर्म कसें विचित्र आहे पहा! दैवाची का कर्माची गोष्ट ती विचित्रतेची कशी ती अजुनही आमच्या तोंडांतून मी आणि तुम्हीं (तुम्हांवांचून ह्या विश्वीं दुसरें कांहींही नाहीं तरीसुद्धां मी आणि तुम्हीं) अशी निराळेपणाची भाषा येते, निघते.]

येथें दैवच आपणांस आधी म्हणजे आम्हीं आहोंत असें म्हणत आहे, असें असूनसुद्धां आम्हीं तर मी आणि तुम्हीं असें म्हणत आहोंत.

खरेपणाचें असणें जें तुमचें आपलें देवस्वाचें तें आथि तरी तेथें मी व आपण, मी एक निराळा व आपण एक कोणीतरी दुसरे का निराळे आहांत, (अशी बोलण्याची भाषा होत आहे) असें येथें आम्हीं आथि म्हणत आहोंत. (५०) ह्या जगामध्यें एक मी अर्जुन असा देहीं अभिमान वाहात होतों, असा मला देहाभिमान वाटत होता, असा मला देहाभिमान चिकटून होता व ह्या कौरवांना (गोत्रजांना–स्वजन –भाऊबंद–ज्ञातीसमूह) आपुले स्वजन म्हणत होतों, म्हणत आहें. येथें आपलें आमचेपणच वागवीत होतों ध्वनि, प्रकृतिबद्ध मूळधर्म, मूळस्थिति, मूळ स्वभाव, वासना संस्कार–गणित ज्ञानामध्यें गुणक म्हटलेला (५१) ह्या कौरवानां (भाऊबंदाना–जनसमूह) मी मारीन असें म्हणण्यानें तेथें पापच लागत आहे तें कसें बरें निरसन होईल तें; मी कौरवांना–गोत्रजांनां–[मूळतत्वांना–प्रकृतिमंत–सविकार ध्वनि निवारल्यानें]– मारल्यानें (निवारणें, निरोध करणें, कुंठित करणें, मागें हटविणें, जेरीस आणणें जें, बाजूस सारणें, हाणून पाडणें, प्रतिबंध करणें, उलंघणें, पराजय करणें, निरास करणें, तेथें मला) पाप लागेल असें–दोष, बट्टा, दूषण, अपराध आक्षेप–दुष्ट स्वप्न मला पडत होतें न होतें तोंच कां अशा वेळीं आपण जागें केलें, माझा भ्रम आपण दूर केला. (५२) देवा, गंधर्व नगरीची–आकाशांतील ढगांच्या केलेल्या कल्पित नगरीची–वस्ती सोडून, अहो लक्ष्मीपति, निघालों–आर्त मी उदकाकरितां तहानेला पाणी अथवा जल म्हणून रोहिणीच म्हणजे मृगजळच मी पीत होतों. (५३) अहो, जी किरडूंच एक पण तें कापडाचें तरी तेथें साचेपणाच्या खऱ्या अशा कंपाच्या लहरी त्या (येत होत्या, चेतना, सजीवता, मन, ज्ञान) येत होत्या असें अहो, वायां

व्यर्थच की अज्ञानानें मरणाच्या माझ्या जीवदशेस जगविण्याचें श्रेय तुम्हीं घेतलेंत कीं. (५४) अहो! पहा कीं, सिंह जो विहिरींत पाहात होता, तेथें त्याला आपलेंच प्रतिबिंब पाहून [दुसरा कोणी तरी (शत्रु) आहे असें पाहून] विहिरींत उडी घालील असा भाव धरिला तेथें अहो, श्री अनंता, तुम्हीं मला रक्षिलें, मला राखिलें! (५५) एरव्हीं पाहिलें असतां माझा मोठाच कीं एक निश्चय होता तो असा कीं सप्तसागरही जरी एकत्र मिळाले, जरी जळप्रलय झाला, (५६) व जग बुडालें तरी, एवढेंच काय पण आकाशही जरी तुटून पडलें तरी गोत्रजांशीं झुंजणें मला घडूं नये, झुंजावें लागूं नये. (५७) अशा अहंकाराच्या ओढीनें अतिशयत्वानें आग्रहच धरून होतों (आग्रहांत बुडून होतों, आग्रहाचा सर्वथैव झालों होतों. आग्रहरूपी जळामध्यें बुडीच देऊन होतों. आग्रहच तिकडे ओढीत होता.) तो आपण जवळ असल्यानें चांग चांग–भले केले, देवराया कीं मजला. आपण अशा त्या अहंकारापासून रक्षिलें, एरव्हीं पाहिलें असतां कोण बरें मजला त्या पकडींतून सोडवून घेणारा, वांचविणारा झाला असता? बाहेर काढूं शकला असता? (५८)

अहो, जें नाहींच कांहीं तेंचमुळीं सर्वस्व आपलें असें एकत्वाचें एकत्रिततेचें आपलें स्वतःचें असें मानिलें, जें नव्हतेंच कांहीं त्यास गोत्र हें नांव दिलें, नांव ठेविलें, अहो, असें हें थोर वेड का पिसें लागलें होतें पण तुम्हीं–आपण–मला रक्षिलें कीं अहो देवराया चांग–भले भले केलें की जी. (५९)

पूर्वी जळत जोहर लाक्षागृह; आतां आगीचा उपद्रव चैतन्यासगट; दुराग्रह हट्टाचा करून होतो, बुद्धि वसुंधरा, बगलेंत मारून दुराग्रह हिराण्याक्ष; मोह कश्मल अर्णव अशा भगदाडांत रिगून राहिला; तुमच्या समर्थतेनें बुद्धीच्या ठायाचें होणें हें दुसरे वराह होणें तुम्हांस येऊन आहे; अशा अपार कृतीचें केलेलें तें एकाच वाचेनें काय बोलूं? पण माझे पंचप्राण मला परत दिलेत–मजला प्राणदान दिले, तें कांहीं बोलता येत नाहीं–भले यश सांपडून आहे मायाच मुळीं माझी निरसिली तुमचे रूप आनंद सरोवर कमळें प्रसन्नतेचीं जया साठींच जयोऽस्मि करून आहेतः अशांना मोह ही वेडगळ गोष्टच एक वडवानलाबरोबरीची मृगजळाची दृष्टि ती कसची! श्रीगुरो! आपल्या कृपेच्या गाभाऱ्यांत शिरून मी ब्रह्मरसाचा चारा (स्वाद) घेत आहें; माझा मोह नाहींसा होऊन आहे–हें आश्चर्य नव्हे! तरीपण तुमचे पाय शिवंतले–सेविले–आहेत, म्हणून उद्धरलों जी अहो, येथें आतां मी उद्धरूनच आहें. (ओव्या–४४–५९)

पूर्वी जळत जोहरांतून लाक्षागृहांतून बाहेर काढिलें, वांचविलें, तेव्हां तेथें एका देहासच भय होतें; पण आतां अग्निपीडा–आगीचा उपद्रव दुसरा एक निराळाच, तो तर वन्हिदुःख चैतन्यासकटचमुळीं–जीव, आत्मा, ज्ञान, सजीवपणासकट आगीनें उपद्रवाचें करणें ते होऊन येत आहे. (६०) जोराच्या हट्टाचा, जोराचा हट्टरूपी दुराग्रह–, आग्रहच ताण दिला गेलेला, तो हिरण्याक्ष माझी बुद्धिरूपी वसुंधरा बगलेंत मारून आहे, काखेंत धरून आहे; वर मग तो मोह कश्मल अर्णवरूपी भगदाडातच–गवाक्षामध्येंच जाऊन दडला, रिघून तेथेंच राहिला. (६१) तेथें आतां तुमच्या सामर्थ्यानें, गोस्वामीपणाच्या समर्थतेनें एक वेळ त्या बुद्धीच्या ठायाचें होणें, बुद्धीच्या महत्वास येणें हें नवेंच एक दुसरें वराह (हिरा, नाणें, मेघ, पर्वत) होणें तुम्हांस येऊन पडलें आहे. (६२) असें अपार कृतीचें तुमचें केलेलें (रचना, प्रदर्शन, आकार, प्रकृति, शब्द, अकार) ते त्या एकाच वाचेनें मी काय काय बोलूं? पण पंचप्राणच जसें पल्लव लावून, पल्लविले करून मजप्रति आपण दिले आहेत. आपण मजला प्राणदान दिलें आहे की, अहो. (६३) ते कांहीं बोलतां येत नाहीं, तेथीलचें बोलणें करणें तें वांयांच जसें होणारें, पण देवराया, भलें यश हेंच येथें सांपडलें होऊन आहे व त्यायोगें, माझी मायाचमुळीं साद्यंततेनें निरसिली गेली. (६४) आज आनंद सरोवरामधील कमळेंच जशीं तसे हे तुमचे डोळे, रूप हे तर मजला प्रसन्नतेचीं देउळें राउळेंच तीं एक जयासाठींच 'जयोऽस्मि' ज्याचेसाठीं करून आहेस (६५) व आतां अशासही पण मोह (कश्मल–दुराचारीपण, वाईट, निषेधात्मक वर्तन, वृत्ति, धडा) भेटावा अशी ही वेडगळ का पावळी गोष्टच एक अहो! वडवानळावर मृगजळाची

दृष्टी ही कसची ती. (६६) अहो, हें श्रीगुरो! हे श्रीगुरुराया! आपल्या कृपारूप गाभाऱ्यामध्यें शिरून मी तर ब्रह्मरसाचा चाराच (स्वाद) घेत आहें. (६७) येथें आतां माझा मोह नाहींसा होऊन आहे. हें कांहीं आश्चर्याचें असें नव्हेच, तरीपण अहो जी श्री! तुमचे पायच कीं मी शिंवतले आहेत, निर्धारून आहे— तुमच्या चरणीं मी लिगटून आहें, विनटलों आहें म्हणून उद्धरलों, उद्धरलों की! मी उद्धरून आहें की जी!!! (६८) (ओवी–६०–६८)

**श्लोक २ रा :—हे कमलपत्राक्षा! भूतांची उत्पत्ति व लय ह्यांविषयीं मी तुम्हां-पासून विस्तरशः ऐकिलें. तसेंच तुमचें अव्यय असें अविनाशी महात्म्यही तुम्हां-पासून ऐकिलें आहे.**

कमलपत्रसदृश विस्तीर्ण नेत्र आहेत ज्याचे अशा कोटिसूर्य तेजसा, महेशा, तुम्हांपासून मी आज परिसिलें : भूतें कशीं होतात व कशानें लय पावतात. कशीं तीं, प्रकृतीच मुळीं ती देवांनीं मजपुढें विवंचिली–विस्तारपूर्वक सांगितली. प्रकृति मायेचा झाडा दिला. परपुरुषाचाहि ठाव–मूळ स्थान दाखविलें. ज्याचा कां महिमा पांघरून तर आतां वेद धडधाकट (वस्त्रयुक्त, सुशोभित) होऊन आहे. जिच्यायोगें शब्दब्रह्म वेद अस्तित्वांत रहातो, धर्मासारख्या रसास वीतें तें (येथीलच्या प्रभेचे पायच आश्रय केले गेले आहेत म्हणून) याच श्रीकृष्ण परमात्म्याचे दिव्य प्रकाशाच्या कांतीचे पाय आश्रय करिते म्हणून ऐसें अगाध महात्म्य अनेक मार्ग एकत्वास आले सर्व मार्गांनीं एकच हें जाणण्यास योग्य तुम्हांमध्यें स्व–आत्म–अनुभवानें रम्य झालें तें याप्रमाणें दाखविलें. आभाळींचा केर–अभ्र संपल्यावर दृष्टीचा सूर्यमंडळींच प्रवेश होतो. शेवाळ बाजूस केल्यावर स्वच्छ पाणी हातीं येतें, स्वच्छ पाणी दिसूं लागतें, स्वच्छ पाणी पिणें होतें. सापाचे चंदनास पडलेले वेढे उकलले तरच चंदनास आलिंगन देतां येतें; भूत पळालें तरच निधान हातीं येतें, तसें प्रकृति आड होती, ती देवांनीं परती सारिली, बाजूस केली व मगच परतत्व बुद्धीच्या शेजाराचें केलें. बुद्धीला ब्रह्मत्व भेटलें म्हणून देवा ह्याविषयीं जीव भरंवशाचा झाला आहे, जीवास भरंवसा आला आहे; पण आणखी एक हेवा, हेतु, इच्छा, विचार उत्पन्न झाला आहे, तो तुमच्या भिडेनें का मर्यादेनें तसाच राहूं दिला तर तो दुसऱ्या कुणास बरें विचारण्यास जावें तें? अहो, तुम्हांवांचून दुसरा ठाव आम्ही जाणत नाहीं की. तुम्हीच आमचे असे ठावाचे होत ना! आहांत कीं. जळाचा आधार घेण्यास जळचर संकोच करील, भार आभार मानील. बाळ स्तनपान करण्याचा हट्ट न धरील तर जियालेपणच कसचें! तेथें जगण्यावांचण्यास दुसरा उपायच नाहीं. म्हणून तुम्हांस आवड सांगावीच, सांगावी–सांगतों–संकोच करवत नाहीं, जीवदशेस आवडतें तें तुम्हांपुढें बोलावें, बोलतोंच, यावर देव म्हणतात कीं तुझी ती आवड आम्हांस सांगावीच!!

अहो, कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत अशा, कोटि सूर्याच्या तेजाचे असे जे तुम्हीं, अहो, महेशा, त्या तुम्हांपासून मी आज ऐकिलें कीं, (६९) भूतें कशा तऱ्हेनें होतात, अथवा कशा तऱ्हेनें लयास जातात. येथें ती प्रकृतीच मुळीं देवांनीं मजपुढें विवंचिली, विस्तारपूर्वक सांगितली. (७०) येथें आतां प्रकृतीच आपलीशी केली गेली, मायाच मुळीं झाडून टाकिली, पर पुरुषाचाहि ठाव देखिला, परमात्म्याचें मूळ स्थान तें दाखविलें. असा तो आपला महिमाच पांघरून वेद हा धडधाकट सुशोभित असा वस्त्रयुक्त झाला आहे. (७१) वेद शब्दराशी वाढते अस्तित्वांत रहातें अथवा धर्मासारख्या रत्नास विते. ते तर येथीलच्या प्रभेचे, याच श्रीकृष्ण परमात्म्याचे पायचमुळीं आश्रय केले आहेत म्हणून (७२) सकळ मार्गांनीं का अनेक मार्गांनीं गेलें तरी एकत्वास येऊन जाणलें जाणारे जे कां स्वतःच्या आत्म अनुभवानें रम्य झालेलें असें तें अगाध माहात्म्य याप्रमाणें आपण मजला दाखविलें. (७३) आभाळांतील केर, अभ्र, ढग नाहींसे झाले म्हणजे दृष्टि ही सूर्यमंडळाच्याठायीं प्रवेश करते अथवा हातांनीं शेवाळ बाजूस करून पाणी पहाणें होतें, पाणी हातीं येतें, पिणें होतें. (७४) सापाचे वेढे उलगडल्यानेंच चंदनास क्षेम आलिंगन देणें होतें; भूत (पिशाच्च) पळूं लागलें तरच तें (धन ठेवा) निधान हातीं येतें. (७५)

तशी प्रकृति ही आड होती ती देवांनीं परती केली, बाजूस सारिली व मगच मुळीं तें परतत्व, श्रेष्ठतत्व, ब्रह्मत्व माझ्या बुद्धीला भेटलें–तें माझ्या बुद्धीच्या शेजारचें–शय्यागाराचें जसें केलें; (७६) म्हणून ह्या विषयींचा अहो देवा! माझ्या जीवाला भरंवसा आला आहे, झाला आहे; – पण देवा, आणखी एक विचार, हेतु आला आहे; (७७) तो आपल्या भिडेनें जर आपल्या आपणांस नच बोलावा, सांगावा का विचारावा तर दुसऱ्या कुणास बरें तो विचारण्यापुसण्याचा करावा, काय अहो! तुमच्यावांचून तर आम्हांस जाणतेपणाचा ठाव नाहीं. तुम्हांवांचून आम्हांस तुम्हींच मुळीं जाणतां येतील असा ठावच नाहीं. (७८) जळाचा आश्रय घेण्याचा जळचर भार मानील, ओशेंच समजेल, संकोच करील; स्तनपान करण्यास बाळक भीड संकोच करील–प्रतिबंध उपरोध करील तर अहो, हे श्रीहरी तेथें जियालेपणाचें होणें तें कसचें! (७९) म्हणून भीड न धरितां आवड ती सांगावीच कीं सांगतोंच की! भीड धरवत नाहीं, सांकडें वाटत नाहीं. जीवदशेस आवडतें तें तुम्हांपुढें बोलावें असेंच आहे–यावर देवांनीं तर आतां म्हणितलेंच की जी कांहीं का तुझी आवड असेल ती आवड आम्हांस सांगावीसच. (८०) (ओव्या ६९–८०)

**श्लोक ३ रा :—हे पुरुषोत्तमा! तुमचें तें षड्गुणैश्वर्य सामर्थ्याचें रूप मी पाहूं इच्छितों. अहो देवा! आपण जसे आहांत तसे आपणांस मी पहावें अशी इच्छा आहे; आपलें ऐश्वर्यरूप तें मला दाखवा.**

**अर्जुनाची विश्वरूप दाखविण्याविषयीं विनंति :—**

किरीटी म्हणाला, देवा तुम्हीं जी गोष्ट बोलिलांत तिच्या प्रतीतीमुळें माझें समाधान झालें; परंतु तुम्हीं ज्याला 'मी' म्हणतां असें तें (आदिसंकल्प लोकपरंपरा) हारपण्याचें जें ठिकाण, जें मुदल रूप, जेथून चार भुजांचीं साकारतेचीं व देवांचें कार्य निमित्तानेंच जीं रूपें उत्पन्न होतात. हेतूमुळें जलशायीच्या भगवंताच्या अंगिकारानें, त्यानें भगवंताचें सगुण, साकार होणें झालेले मत्स्यकूर्मादीनी मिरविणें तें खेळ संपल्यावर गुणी राया, तुम्हींच तेथें सांठविले होतां. ज्यास उपनिषदें गातात; योगी अंतःकरणी आपलेसें करून जें पाहातात. सनकादिक आपल्या पोटींचें करून असतात, असें अगाधतेचें विश्वरूप तें कानीं ऐकावें, डोळ्यांत भरून घ्यावें तें देखण्यासाठीं माझें चित्त उतावीळ होऊन आहे. देवांनीं सांकडें तें फेडावें–लोभानें देवांनीं माझ्या आवडीची विचारपूस केली ती हीच. विश्वरूप देखण्याची आर्ति ती वाढीची होऊन आहे–विश्वरूप दृष्टीस दिसावें अशी थोर आशा ह्या जीवजोडीनें केली आहे.

यावर किरीटी म्हणाला, कीं अहो देवा! तुम्हीं जी कांहीं गोष्ट (विश्वीं व्यापक देवो) केलीत त्या प्रतीतीनें माझी दृष्टि निवाली आहे, प्रसन्न झाली आहे. (८१) ज्याच्या आदिसंकल्पानें लोकपरंपरा होत व हारपते, ज्या ठिकाणास 'मी' असें आपलें सर्वस्व म्हणतात, (८२) तेंच तुमचें मुदल रूप, जेथूनचमुळीं ही दोन भुजांचीं का चार भुजांचीं सगुण, साकार अशीं रूपें तुम्हांस येऊन असणारीं तीं व अशीं फिरफिरून होणारीं देवकार्याचे निमित्तावरचमुळीं उत्पन्न होणारीं होत. (८३) जलशयनाच्या रूपानें, सोंगानें का वेषानें मिरवलेलीं तेथें खेळ संपल्यावर जेथें गुणी असे तुम्ही मांत्रिक का गारुडीच एक सांठवून असतां : अथवा मत्स्य कूर्म इत्यादि अवतार अलंकार सुशोभित करणाऱ्या वस्तु–खेळ संपल्यावर जेथें (तुम्हींच कीं ते गारुडी) सांठविले होऊन असतात. (८४) उपनिषदें ज्यास गातात, योगी आपल्या अंतःकरणीं रिगून आपलेंसें करून जयास पाहातात, सनकादिक हे तर ज्यास आपल्या पोटींचें करून असतात, (८५) असें अगाध जें तुमचें विश्वरूप तें कानीं ऐकावेंच जें तें पाहाण्या देखण्यासाठीं डोळयांत भरून घेण्यासाठीं; अहो देवा! माझें चित्त उतावीळ झालें आहे. (८६)

[ (श्रोतेविण) वक्ता तो वक्ता नव्हे, श्रोतेविण नाहीं श्रुतिपरौति माऊली जगा—म्हणून (श्रोतव्यस्य श्रुतस्यच)–श्रोता हा सूर्य किरणच एक चंद्रमण्यावर–मनावर परिणमून, उपयोजनानें–प्रयोजनानें (कारण)

होणारा ह्या मनाच्या चंद्रमण्याच्या द्रवण्यास-रस द्रावास येणारा, हा चंद्र-म्हणून चंद्राच्या ठायींच ती मनाच्या 'चंद्रमा मनसो जातः'-मुळीच तें परिणमणें होणारें श्रोते हे सूर्यकिरण म्हटलेः तेथें ऐकणें, लक्षणें, अनुसंधानात्मक होणें-अवधानाचें करणें अथवा अवधानानें असणें, तेथें परस्पर परीणाम होणारा तोच ह्या श्रोत्यांच्या भवसादृश्यतेवरच मुळीं, भव अनुभवावरच तें ज्ञान द्रव-रस-प्रसवणें-शारदा तेथें नटतें, नीति उपजते, व्यवहार व्यवहार्य होतो, कुटुंबवत्सलतेचें दृश्य दिसूं लागतें, जनलीला उगवते, परस्पर प्रेमाचें दृश्य हें प्रगटतेस येतें-तेथें वात्सल्यच प्रेमास आलें, धारणपोषणावर धर्म हाच धृतीस आलेला होय.

[अध्याय ९ वा, ओवी २९ वी]

म्हणून आतां देवांनीं सांकडें तें फेडावें. अहो, लोभानेंचमुळीं आपण देवांनीं माझ्या आवडीबद्दलची विचारपूस केली, तेथें हीच विश्वरूप देखण्याची आर्तीच मजमध्यें वाढीची होऊन आहे. (८७) तुमचें अवघें विश्वरूप माझ्या दृष्टीस दिसावें अशी ह्या जीव जोडीनें-जीवदशेनें थोर अशी एक आस इच्छा (बांधली) केली आहे. (८८)

**श्लोक ४ थाः—आपलें विश्वरूप तें मी पहाणें शक्य आहे असें आपणांस वाटत असेल तर—अहो! तरच कीं आपलें योगेश्वर असें सामर्थ्य आपलें असें—ते मजला आपण आपलें अव्यय आत्मरूप दाखवावें.**

अहो! शार्ङ्गी देखण्याची योग्यता माझे आंगीं आहे का न हें जसें, रोगी तो आपल्या रोगाचें निदान जाणत नाहीं; आर्ती, ताहानेला, तहान भागण्यास समुद्रही पुरे कीं कसें हें जाणत नाहीं, उत्सुकतेमुळें प्रबळ इच्छेमुळें आकांक्षा संभाळवत नाहीं; म्हणून बालकाची माऊलीच ती त्याची योग्यता जाणतेच. त्याप्रमाणें माझी योग्यता, माझा अधिकार श्रीजनार्दना, विचारांत ध्यावा व मगच विश्वरूपाच्या दर्शनाचा प्रारंभ तो करावाः दर्शन देण्याची कृपा करा, कारण दर्शन देण्यावरचमुळीं आपण योगेश्वर म्हटले जाणारे; नाहीतर हें रूप दर्शन देण्याच्या योग्यतेचे नाहींतरी म्हणा. अहो, जो बहिरा आहे त्यास पंचमाचें सुख आलाप कसचें! एकल्या बापियाची तृषा जगाची आर्तीच जशी ती तर जगापुरतें वर्षतेच. चकोरासच चंद्रामृत सांपडलें तें शपथ घालून प्रेमाचें कोरडेपण दूर करतो. डोळ्यांशिवाय उजाडलें, प्रकाशाचें झालेलें, तें वांयाच जातें. तेथें अहो! देखणें पाहिजेच म्हणून एकदमच रूप दाखविण्याचें कराल असा भरंवसा आहे. ज्ञात्याचे का अज्ञानाचे ठायीं ज्ञानी का मूर्खामध्यें तुम्हीं नित्यनवेंच असें तुमचें औदार्य स्वतंत्रता जाणते. योग्यता स्थापून तुम्हीं देता, देतांना पात्र का अपात्र हें नच पाहून देतां; पण कैवल्यचा सारखें पवित्र तें वैरियानांही दिलें कीः मोक्ष साधण्यास दूरच, पण तो तुमचे पाय आराधित आहे; म्हणून जेथें त्यास तुम्ही धाडतां तेथें तो तुमचा पाईक-चाकरच एक असा जातो-सनकादिकाच्या मान्यतेवर जी विषस्तनपानेकरून मारू आलेली त्या पूतनेस सायुज्य गोडी दिली. राजसूय यज्ञाचे वेळीं त्रिभुवनाच्या जमावामध्यें सभेमध्यें दुर्वादी शब्दानीं अपमानिले गेलात-अशा शिशुपाळास-अहो गोपाळा! आपल्याच ठायीं ठाव दिलातः अहो, उत्तानपादाचा मुलगा ध्रुव जो त्यास ध्रुवपदाची ती अढळपदाची ती काय बरें आवडी ती! अहो, दुःखग्रस्तांना वनवासीयांना दानशूरानें कृपाळुपण पुरविले, तसेंच अजामिळ-भृगुऋषि-वैरियाच्या शंखाच्या शरीराला तर तुम्ही मुळींच विसंबत नाहीं. (ओव्या ८९-१२२)

पण अहो शार्ङ्गी, तें तुमचें विश्वरूप देखण्याची योग्यता माझे अंगीं आहे किंवा नाहीं, (८९) हें माझें मी कांहीं जाणत नाहीं, पण देव जर म्हणतील कीं स्वतःच्या योग्यतेबद्दलची हमी ती-तूं का जाणत नाहींस; तर अहो देवा, येथें असें आहे कीं, अहो, रोगच ज्यास झाला आहे, त्यानें रोगाचें निदान केव्हांही समजणेंचमुळीं नाहीं. (९०)

आर्तीच्या आसक्तीमुळें—आतुरतेच्या भरामुळें आर्त तो आपली टाकीच मुळीं विसरतो, उत्कंठेमुळें वेडाच होतो जसा का तहानेला तो समुद्रहीपण तहान शमविण्यास—भागविण्यास पुरेसा होईल कीं कसें तें उत्सुकतेमुळें जाणतच नाहीं. (९१) प्रबळ इच्छेच्या भुलीमुळें अपेक्षा, आकांक्षा, इच्छा आपली ती सर्वथैव सांभाळवत नाहीं—आणि म्हणूनच म्हणणें होतें आहे कीं माउली तीच कीं बाळकाची योग्यता जाणते कां जाणणारी होय. (९२) त्याप्रमाणें अहो, श्रीजनार्दना! माझी योग्यता का माझा अधिकार जेव्हां आपण विचारास घ्यावा व मगच विश्वरूप दर्शनास प्रारंभ करावा!

[ मजला काय द्यावें लागणारें आहे तें पैसा, वस्त्र, शाल, आहेर, दागदागिना पांघरूण धडुत—प्रीतीचें आपलेच महत्व वाणलें, जेथें श्रीमंताची तेथें श्रीमंतीच त्या संभावनादि मागणाऱ्यांस पोहोंचती केली अशीं किं त्यायोगे तें देवपणाचें व्यापकत्वमुळीं दूरचें, कपोल प्रांत अथवा आंगच उभारिलें गेल्यानें तेथें प्रसंगच तो देवपणाच्या उत्तमतेस येऊन सर्वाठायीं पूर्णपणच एक नांदवू लांगला, डोकें, अंग, लक्ष रंगरूप रेखा ज्यास नाहीं, त्यास डोकें अंग लक्ष रंगरूप रेखेचें केलें, ज्ञान दान बुद्धीचें तें मंडन—सुमेधाच ती जगानें गाइली जाणारी तीच, येथें प्रसन्नविली गेली; तेथें मग सहजपणेंच तीं दूरचीं दिव्येंचमुळीं जवळचीं होऊन आपल्यास आपणा चरणींचीं होऊन आहेत—देव दिव्यतेच्या दिव्यानें दिपणारी—आम्हीं आहोंत, असें म्हणणारीं होतात. ] (९३)

**देवा, तुम्हींच माझी पात्रता पाहून विश्वरूप दाखविण्याची कृपा करा. कारण 'ततः योगेश्वरः' महायोगेश्वरोहरिः योगेश्वर आपण नाहींतर नाहीं म्हणून तरी स्पष्ट सांगा.**

करितां अशी कांहीं कृपा करा—विश्वरूपदर्शन द्यावेंच तरच बरें. अहो, आपल्या देवपणानें देवपण पाहूं दिलें, देण्याचें केलें तेथें कृपेशिवाय एरव्हींचें तें कसें बरें महत्वास येईल—एरव्हीं नव्हेच नव्हे. अहो, परामर्षानें समाधान होणारे आत्म्यास—तसें दर्शन दिसूं दिल्यानें—देखणें केल्यानें, देव का आत्मा तोच संमाधानास येणारा होतो. म्हणून आपली कृपादृष्टी असावी—कृपादृष्टीचा वर्षाव तेथें सकळ पुरुषार्थाची सिद्धि व्हावी म्हणून बुद्धि ही अमृतत्वाप्रत येते. – तेथें त्यायोगें दर्शन हेंच मुळीं आपल्या दर्शनास येण्याच्या, प्रगटतेस पाहील, एरवीं नव्हेच हें असें म्हटलेंच म्हणणें होतें, असें हे जाणून असा. अहो! बधिर, बहिरा जो त्यास पंचम आलापानें, सुस्वर अशा गाण्यानें सुख देणें हे कसचें होणारें! तरीपण गाणारा गाणें गाण्याचें करतोच, सोडीत नाहीं (९४) अहो, एरव्हीं पाहिलें असतां बापियाची तृषा ही जगाची आर्तीच जशी : अहो! अशा त्या बापियाच्या तृषेसाठीं मेघ जगासहीपण पुरता होऊन वर्षणारा होतो. पण झालेली ती वृष्टि जर का ती खडकावर झाली तरी पाऊस पडल्याशिवाय राहात नाहीं. (तेथें अक्षर बुद्धियोगाचें तें मिळविलें झालें तरच बरें नाहींतर एका त्या अगोदरच्या उपवासावरचमुळीं आणिक एका तर उपासमाराचें होणें होणारें तें.) (९५)

अहो, जगाची आर्ती दवडिली, चातकाच्या निमित्तानें,—मेघवृष्टीनें वर्षावाचा होऊन, एरव्हीं तर सर्वच्या सर्व हा देशभार जसा का तान्हेलेपणाच्या आर्ततेचा असा, अहो! विरहच कीं तो कां न म्हणावा? असेंच म्हणणें ते (सूर्य विकासिनीचें, चक्रवाकाचें व चकोराचें नव्हे का?) चकोरास चंद्रामृत सांपडलें तें त्यानें दुसऱ्यांना शपथ घालून प्रेमाचें कोरडेपण तें दूर करण्याचें केलें; पण डोळ्यांशिवाय प्रकाशाचें झालेलें तें तेथें, देखणें पाहिजेच, नाहींतर तें डोळ्यांशिवाय वांयांच जाणारें असें व्यर्थतेचें होतें. तेथें सूर्योदय पाहाणें तें कसचें! चंद्र हा प्रकाशावयाचा तो प्रकाशतोच, म्हणून मी पात्र नसलों म्हणून काय झालें? तुम्ही आपलें विश्वरूप दाखवालच अशी खात्री वाटतें. (९६)

म्हणून, अहो देवा, तुम्हीं ! सहसा म्हणजे एकदम—झटपट आपणांस दाखविणारे होतांः असा थोर संकल्पच एक कडाडा म्हणजे ज्ञात्यामध्यें, गर्हिसा म्हणजे अज्ञानामध्यें अज्ञानाचे का मूर्खाचे ठायीं तेथें तुम्हीं नित्याचे पाठीं—नेहमीचे असे तरी नवेंच सुंदर असे होतां कीं. (९७) अहो, तुमचें औदार्य हेंच स्वतंत्र असें आम्हीं म्हणतों अहो, देवाचें औदार्य जाणावें, ते स्वतंत्र म्हटलें. तेथें स्वतःच्या तंत्राचें तंत्रपण पात्रापात्रामध्यें द्यावें लागणारें व तें देतांना पात्र म्हणजे योग्य का अयोग्य असें तुम्ही म्हणणारे नव्हतच. अहो ! योग्यता स्थापून तें तुम्हीं देतां वर कैवल्यच केवलरूप रूपास आलें—आणलें असें मोक्षासारखे पवित्र म्हटलेलें ते वैरीयांनांही दिलेंच होत आहे, दिधलें कीं, जी. (९८).

## अर्जुनाची विश्वरूप दाखविण्याविषयीं विनंति

अहो, मोक्ष उपासनेनें साधण्यास दूर असा होय. तो नाहींच म्हटला होतो; पण तेथें तो मोक्षच मुळीं तुमचे पाय आराधण्याचे करतो. आणि म्हणून जेथें तुम्हीं त्यास धाडावें—पाठवावें तेथें तो पाईकच का दास जसा का अशा पायांनीं जाणारा होतो. (९९) तुम्हीं निर्गुण जे ब्रह्मपुत्र सनकादिक त्यांच्या महत्वामुळें सायुज्यपणाचा आनंद पूतनेस दिला जी का विषाच्या स्तनपानानें घात करण्यास—मारण्यास आलेली ती. (१००) अहो, जी राजसूय यज्ञाचे प्रसंगीं सभासद असतांना त्रिभुवनाच्या गर्दीनें तुम्हीं देखिला गेल्यानें कसे दुःसहवादानें निंदिले गेले होतां ! कसें (ऋषि—यस्य वाक्यं स ऋषिः) ब्रह्म वाक्यच दूर झाल्यानें शब्दानें विदीर्ण केलें गेलें, निस्तेज केलें गेलें होतां. (१०१) कीं ज्यानें अशा अपराध्यास शिशुपाळास, अहो गोपाळा, तुम्हीं आपल्या सर्वस्वाच्या ठायीं त्यास ठाय दिला त्यास सायुज्य मुक्ति दिली कीं. तसेंच उत्तानपादाच्या बाळास, ध्रुवास ती कसची ध्रुवपदाची आवड ती. (१०२) अहो, तो वनास यासाठींच आला कीं, पित्याच्या मांडीवर बसावें म्हणून; पण तो तुम्हीं चंद्रसूर्याप्रमाणें जगामध्यें प्रशंसनीय केला, त्यास अक्षय पद दिलें कीं अहो. (१०३)

याप्रमाणें वनवासी जे, दुःखग्रस्त जे, त्या सकळांना दानशूरतेनें औदार्य पुरविणारे, दानततेचे कृपाळुपणच तें देणारे असे एकच कीं तुम्हीं अहो ! धसाला ! उदारपणाचे देखणे तुम्हीं, 'आज्ञाचरण मित्याहुर्मुख्यमाराधनंसताम्' 'आज्ञागुरूणांह्य विचारणीया'. अहो, अजामिळानें पुत्रास आळविलें तेथें तुम्हींच मुळीं आपलें सर्वस्व, आपले सर्वस्वास आपणांस, त्यास देऊन टाकले जसे का (१०४) हातलासि—हाणितलासि—अहो, जशीं का तळव्याची आग मस्तकापर्यंत पोहोंचली, अशी उन्हामध्यें चालण्यानें होणारी ती दशा का उरी आदळणारी, ती वाक् दशा जर वागविली तर तेथें जीवित्वाची ती महति—महत्व स्वतःचें तें आपलेपण हें महत्वच मुळीं पाहाणारें होत नाहीं उरीं हाणितलासि जें तुम्हीं, ज्यानें उरावर लाथा हाणल्या, (हात लासि) अशाचे चरण हे श्रीगुरु दातारा, आपण वाहून आहांत; अजुनही पण वैरियाच्या शरिराला म्हणजे शंखाला —तुम्हीं मुळींच विसंबत—विसरत नाहींत. (१०५)

## आपण अपकार करणाऱ्यावरही उपकार करतां असे उदार आहांत :—

अपकार करणाऱ्यावर तुमचे उपकार, अपात्राच्या ठायीं पण दान देण्यास उदार, असे दोही ठायीं आपणच पुरते होणारे, 'दे दान' म्हणणारे, दान मागणारे, दान मागून बळीचे द्वारपाळ जाहाले आहांत; [दे दान गुप्त उपकार करी न बोले। मानी प्रमोद जरि मान्य घरासी आले। दावी न गर्व विभवें गुण घे परांचे। खड्गाग्रतुल्य विषम व्रत हें भल्याचें ॥] (१०६) आराधितही नव्हती तुम्हांस, ना तुमचें ती कांहींही ऐकत नव्हती, पण पांखरास—पोपटास मात्र कौतुकानें 'विठ्ठल, विठ्ठल' असें बोलण्यास शिकवीत होती. अशा त्या गणिकेस अहो, वैकुंठीचे योग्य केलें. (१०७) तुम्हीं, अशीं व्यर्थतेची निमित्तेंच पाहिलीं; पण तेच परीणाम करणारीं झाल्यानें आपण आपलें सर्वस्वच स्वेच्छेनें देऊं लागलांत. असें तुम्हीं आज

मजसंबंधांत–मजविषयीं, कां बरें पूर्ण अभावाचें मजला करीत आहांत ते ? (१०८) दुभतें भातें महत्व त्यासाठीं सर्व जगाचें सांकडें फेडावें अशा त्या कामधेनूचें वत्स (पाडे) काय भूकेलें राहातें ? कामधेनू जी आपल्या दुधाच्या विपुलतेनें जगाची अडचण निवारते तिचीं स्वतःचीं वासरें काय थोडीच क्षुधाग्रस्त असणार ! (१०९) म्हणून जी कांहीं रूपस्वरूपदर्शन दाखवावें म्हणून देवांना विनंति केली तें दर्शनस्वरूप देव दाखविणार नाहींत असें नाहीं; पण जें कांहीं देखणें दाखवाल तें पाहाण्याची पात्रता मजला द्यावी, तें पहाण्याची योग्यता माझे अंगीं अगोदर आणा : (११०) तुमचें विश्वरूप माझे डोळे आकळूं शकतील, असें जरी तुम्हीं जाणतसां तरीपण दर्शन अथवा ती डोळ्यांमधील पाहाण्याची योग्यता ती पुरवावीच; आर्तींचे जे कांहीं डोहळे ते पुरवावेतच. (दुःख, पीडा, आजार, दुःखी, ग्रस्त, रोगी अनाथ–तेंच जे कांहीं निवारण होण्याचें त्या तेथीलच्या दर्शनानें तें दर्शन पाहाण्याची योग्यता पुरवावीच.) (१११)

## अर्जुनाचें भाग्य—

अशी गोड, प्रेमळ, योग्य अशा शब्दांनीं केलेली (ठाया ठाव–शब्द गौरव शब्दांनीं सन्मानिला) योग्य विनंति जेव्हां का सुभद्रापति करता झाला, तेव्हां तर त्या षड्गुण चक्रवर्तीस तर मुळींच धीर धरवेना, ते त्यांना साहवेना (यश, श्री, औदार्य, ज्ञान वैराग्य, ऐश्वर्य, संधि, विग्रह, यत्न, आसन, संश्रय, द्वैध. (११२)

आतां अर्जुन म्हणजे जवळ आलेला वर्षाकाळच व श्रीकृष्ण कृपारूपी अमृतानें ओथंबलेले ते मेघ ओलाव्यानें परिपूर्ण असे किंवा श्रीकृष्ण कोकिळ व अर्जुन वसंत काळ; (११३) त्यामुळें श्रीकृष्णाच्या प्रेमाला दुप्पट भरते आलें—वाटोळे परिपूर्ण चंद्रबिंब पाहून क्षीरसागर उचंबळून येतो तसे दुपटीपेक्षांहीं जास्त (दुणेहिवरि) प्रेमबळानें उल्लसित जाहाले (११४) व मग त्यांनीं प्रसन्नतेच्या भारानें सकृपे, गर्जोन म्हटलें हे पार्था, पाहा पाहा, अमूप, अनंत, अशीं माझीं स्वरूपें पाहा. (११५) एक विश्वरूप तेवढें पाहावें–देखणें देखावें असाच एक मनोरथ पांडवानें केला होता; तों तेथें आतां पहावें तों काय त्यांनीं सर्व कांहीं विश्वरूपमय करून टाकलें–ठेविलें. (११६)

बाप देव अपरिमित उदार ! याचक सर्वस्वाची ऐच्छिक इच्छा स्वेच्छेनें करणारा असा, त्या याचकास तर (हजार वेळां आपलें सर्वस्व देणारा असा) मागितल्याच्या हजार पटींनीं, सदोदित जास्त देणारा असा. (११७) दृष्टिबंधानें, आपण स्वतः लपून असणारा, शेषापासूनही त्याचे डोळे ते विश्वरूप दर्शनासाठीं लपविले. शेष तर स्वतःच स्वतःकरितां चोरीला गेला. वेदहीपण दर्शनाबाबत झकविले गेले; तें गुज-रहस्य लक्ष्मीसही दाखविण्याचें राहविलें. (११८) **अर्जुनाचें भाग्य**—ते आतां अनेकधा प्रगट करून, ठेवच ठेविली, विशेष रूपें धारण करतांना : तो परमात्मा अनेक रूपांनीं प्रगटून, अर्जुनासाठीं विश्वरूपाचा धंदा–खटाटोप करीत आहे, कीं अहो. बाप अहो ! भले ! भले ! येथें तर पार्थाच्या अगाध भाग्यास पार नाहीं. तो मोठा भाग्यवान कीं. (११९) जो जागतांजागतांच स्वप्नावस्थेंत जातो, तो स्वप्नींचाच अवघा, सर्व जसा का असा होतो, त्याप्रमाणें, आपण स्वतःचमुळीं, अनंत ब्रह्मकटाह म्हणजे ब्रह्मांडें होऊन आहे. (१२०) जबरीनें का अविचारानें तें रूप कां ती अज्ञान दृष्टीची कां मनुष्यदृष्टीची मुद्रा सोडली, आणि स्थूल दृष्टीचा पडदाच फेडून का फाडून टाकला, मोडून काढला, किंबहुना अहो ! योगबळच ते कां योगसंपत्तीच ती तेथें उघड स्पष्ट अशी केली. त्यांनीं आपलें निजरूप उघडें केलें. (१२१) पण हा अर्जुन हें दाखविलेलें देखणें पाहील किंवा नाहीं, अशी कांहीं आठवणचमुळीं तेथें नाहीं : ते तर एकसारखें स्नेहातुरतेमुळें पाहा पाहा असेंच त्यास म्हणत आहेत. (१२२)

**श्रीभगवान उवाच**—श्रीभगवान म्हणाले, हे पार्था ! अनेक प्रकारचीं, अनेक रंगाचीं, अनेक आकृतींचीं अशीं शेकडों, हजारों तीं माझीं दिव्य रूपें येथें (ह्या माझ्या देहामध्यें) पहा, पहा ! (५).

**'करुण रस'—**

अर्जुनानें श्रीकृष्णाचें एकच रूप पहाण्याची इच्छा केली: पण श्रीकृष्णांनीं तर सर्व विश्व विश्वरूपमय करून दाखविलें. ओव्या १२३–१४०

श्रीभगवान म्हणाले—हे अर्जुना, तूं मला आपलें एक रूप दाखवा असें म्हटलेंस व तेवढेंच तें दाखवूं केलें तर कांहींच दाखविलें नाहीं असें होईल; म्हणून आतां हें अवघें सर्व विश्व माझ्या रूपींच भरलें आहे, तें पाहा, देख! माझ्या विश्वरूपांत काय काय सामावलें आहे तें पाहा; (१२३) किती निरनिराळया प्रकारचे आकार व रूपें त्यांत आहेत पहा: एक कृश, एक स्थूल, एक ठेंगणें-लघु-रहस्व, एक विशाल, एक पृथुतर म्हणजे जाडी अशी, एक अपार अमर्याद, (१२४) एक अनावर, एक प्रांजल, एक सरळ, सव्यापार, एक निश्चळ, एक उदासीन, एक स्नेहाळ, एक तीव्र तिखट प्रकृतीचे, (१२५) एक घूर्णित म्हणजे बेसावध धुंद, एक सावध, एक असलग म्हणजे सुगम सोपी, एक अगाध, एक उदार, एक अतिबद्ध, एक क्रुद्ध, एक कृपण अशी, (१२६) एक शान्त, एक सन्मद (आरजु माजुरी उत्कट कामेच्छेचे उन्मादतेचे, सौंदर्यवंत, एक स्तब्ध, एक सानंद, एक गर्जिते, एक निःशब्द, एक सौम्य, (१२७) एक साभिलाष, पण विरक्त, एक उन्निद्रिते म्हणजे निद्रेंतून जागें झाले, झालेले एक निद्रित, एक परितुष्ट संतुष्ट, एक आर्त, एक प्रसन्न, (१२८) एक शस्त्ररहित, एक शस्त्रसहित, एक रौद्र म्हणजे भयंकर, एक अति मित्रे, एक भयानक, एक विचित्र, एक लयस्थ समाधिस्थ, एक प्रकृतिलयाचे, (१२९) एक जन–(जनन) लीला विलासाचे उत्पत्तिकर्मात रंगलेले एक, एक पालनशील असे लडिवाळ, प्रीतियुक्त, एक आवडीच्या भराचे, एक सावेश क्रोधयुक्त संहारक, एक साक्षीभूत. (१३०)

याप्रमाणें अनेकविध पण पुष्कळशी, तसेंच दिव्य तेजाच्या प्रकाशाची पण एक एकासारखी रंगरूपाची वर्णाची नव्हत अशी, (१३१) एक तापलेल्या उत्तम सोन्यासारखी, तशी कपिल म्हणजे पिंगट वर्णाची, अशी अपार एक जसें कां सर्वांग सरागे जसे कां सेंदुरानें तेथीलचें आकाश माखलें आहे अशी माझीं अनंत रूपें हे अर्जुन! पाहा पाहा! (१३२)

एक सहज चुलुकी म्हणजे सुंदर का चमकणारी जसें का ब्रह्मांडच ते माणिकांनीं रत्नखचिततेचें केलें आहे अशीं, एक अरुण उदयासारखीं अशीं कुंकुम वर्णाची, (१३३) एक शुद्ध स्फटिकाप्रमाणें (सोज्वळ) उज्वल, एक इंद्रनीळ मण्यासारखी सुनीळ, एक अंजन वर्णाची पहांटेची का सकाळची अशी, एक रक्तवर्ण (१३४) एक दिव्य तप्त सुवर्णासारखी पिवळी, एक सजल नवजलद मेघाप्रमाणें श्यामळी, एक केवळ चांफेगौरीप्रमाणें गोरी, एक हिरवीगार (हरित) अशी, (१३५) एक तापलेलें तांबें तशी तांबडी लाल, एक श्वेत चंद्राप्रमाणें चोखट, निर्मल, स्वच्छ अशीं नानावर्णाचीं माझीं रूपडीं पाहा. (१३६) हीं माझीं रूपडीं जशी का आन आन म्हणजे भिन्नभिन्न वर्णाची, का वर्णच ते पाहा; तेथें आकृतीमध्यें ही एकसारखेपण नाहीं; कांहींना कां एक ती त्यांना लाजून जाऊन मदनही शरण रिघाला इतकी सुंदर, (१३७) एक साकारतेची अशी एक प्रेमतनुची अशी अति लावण्यवंत मनोहर अशीं शृंगारलक्ष्मीचीं भांडारें उघडलीं जशी का. (१३८). एक पुष्ट बांधेसूद अशी समांसाळ–मांसभरित गोंडस, एक शुष्क, एक अति विक्राळ, एक दीर्घकंठाची म्हणजे उंच मानेची अशी मोठ्या डोक्याची, एक बिकट म्हणजे भयंकर. (१३९). याप्रमाणें नानाविध आकृति पाहतां पाहतां त्यांचा पार लागत नाहीं. (निरनिराळया प्रकारचे आकार व रूपें निरनिराळया तेजाचीं म्हणजे पांढरी स्वच्छ, काळीकुट्ट, शेंदरी, लाल, निळीं व पिंगट, अशा वर्णाचीं रूपें आहेत, कोणी मदनाला लाजविण्याइतकी सुंदर, (स्त्री) शृंगार लक्ष्मीचीं भांडारें अशीं शरीरें आहेत. कोणी बेडौल, कोणी अकाळविकाळ, कोणी पुष्टमांसल अशीं ही आहेत; ह्या आकृतींना अंतच नाहीं; एक एका शरीरावर सारें जग दिसेल, अशीं तीं आहेत.) यांच्या एक एका अंगच्या प्रदेशांत शरीरावर तर सर्व जग, हे अर्जुना, तुला दिसेल. (१४०)

हे भारता! पाहा, हे बारा आदित्य, अष्टवसु, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, एकूणपन्नास मरूद्-गण, तसेंच बहुतशीं पूर्वी नच पाहिलेलीं अशीं अनेक आश्चर्येंही ह्या माझ्या देहामध्यें पाहा! (६)

## विश्वरूपदर्शन—

(ओव्या १४१–१४७)

ह्या विश्वरूपांपैकीं एकाद्यानें डोळे उघडले कीं येथें बारा आदित्य निर्माण होतात आणि डोळे (मिटल्या-वर विलीन होत असतात.) मिटले कीं ते मावळतात, नाहींसे होतात. (१४१) त्या वदनाच्या मुखाच्या वाफेबरोबर, उष्ण श्वासाबरोबर, अवघे सर्व कांहीं ज्वालामय होऊन त्यांत अग्नि, पावक आदिकरून ते अष्टवसु त्यांचा समुदाय समूहाप्रत पावतो. तेथें जसें का वसूंचा समुहच अग्नीच्या पवित्रतेचा होत आहे. (१४२) भ्रूलतांचें मिवयाचे शेवट कोपयुक्त होत्साते, एकवट अशा मिळणीचे होऊं पाहातात जेव्हां का तेव्हां तर तेथें रूद्रगणांचें संघाट, समुदाय अवतरत (उगवत आहेत), असें दिसत आहे पाहा. (१४३) जेथें उष्ण श्वास त्या रूपाच्या ठायीं तेथें सौम्यता आल्याबरोबर अथवा त्या रूपांनीं सौम्यता घेतली कीं (सम्यकतेचा प्रिय का रम्य असा) ओलावा येऊन ज्यांना मितीच नाहीं असे अश्विनौ देव ते अवतरतात तेव्हां ह्या कानामध्यें अनेक वायुदेव जन्मतात. (१४४) [('ज्ञानदेव म्हणे नयनाची ज्योति या नांवें रूपें तीं तुम्हीं जाणा') श्रोत्री म्हणजे कानामध्यें तर अनेक वायु पंचप्राणांचे केलेले ते जन्म घेऊन आहेत, वेदपारंगततेमध्यें श्रवणी होत जिभा जसें कां.]

याप्रमाणें एक एका आदित्याच्या सृष्टिरचनेच्या लीलेमध्यें सुरांचीं म्हणजे देवांचीं तसेंच सिद्धांचीं कुळेंच जन्मत का जन्मलीं आहेत. अपार अशी विशालतेचीं हीं रूपें पाहा. (१४५) ह्या रूपांविषयीं सांगतांना वेद हेहीपण बोबडावले–वेदांकडून नीट उच्चारही करवला नाहीं. अहो, हे पाहाण्यास तर काळाचेंहि आयुष्य तें थोकडें असेंच होय. अहो, धाता म्हणजे ब्रह्मदेव जरी, तरीपण तेथीलचा ठाव सांपडला होत नाहीं. (१४६) ज्यासृष्टींना ह्या तिन्हीं वेदांनीं संरक्षण द्यावें असें ते वेद तेही पण ह्या रूपा-बद्दलचें वर्णन ऐकूं शकत नाहींत. (श्रीगुरूवर जर तेथें, तरच ते जगत्रयांनीं ऐकिलें जाणारे) अशीं तीं रूपें येथें प्रत्यक्षच पाहून घे, अशी ती महासिद्धि–समृद्धि जी तिचा उपभोग घे, तिचा अनुभव घे. (१४७)

हे गुडाकेशा! निद्रेस जिंकणाऱ्या अशा पार्था! माझ्या ह्या देहामध्यें, इह, संपूर्ण जगत् आद्य असें तें, चराचरासहित, पहाः तसेंच दुसरें जें जें कांहीं पाहूं इच्छितोस तें ही पहाः (७)

## देवांनीं अर्जुनास विश्वरूप पोटभर पाहून घेण्यास सांगितलें; पण अर्जुन मात्र स्तब्धच बसला. तो देवांना म्हणाला कीं, अहो देवा, विश्वरूप पाहाण्याची पात्रता माझे ठायीं पाहिजेः

(ओव्या १४८–१५३)

(भगवान म्हणतात,) हे किरीटी, कल्पवृक्षाच्या (देववृक्षाच्या) खालीं जसे गवताचे अंकुर उगवावेत, तसें ह्या विश्व मूर्तीच्या रोमरंध्राच्यामुळीं सृष्टीचे अंकुर (फुटत आहेत) पाहा. (१४८) वातायनाचेनि प्रभासे दिवसा प्रचंड वावटळीमध्यें असंख्य परमाणु उडत असलेले दिसतात, त्याप्रमाणें ह्या मूर्तीच्या सांध्यांतून–मूर्तीच्या अवयवसंधीमध्यें ब्रह्माडेंही फिरत आहेत. (१४९) एक एका का प्रत्येक अवयवांत विश्वाचा विस्तार दिसेल अवयवाच्या प्रदेशामध्यें तर सर्व विश्वच विस्तारासहित पाहा! तसेंच विश्वाच्या पलीकडीलही जें पाहावेंसें वाटत असेल तर (१५०) तेंहीपण माझ्या स्वरूपांत दिसेलः तें तेथें आहेच आहे. असें तें येथें पाहावयास मिळेल की नाहीं अशी शंका सुद्धां मनांत आणूं नकोस. जें तुला पाहावेंसें वाटत असेल तें सर्व माझ्या ह्या देहामध्यें पाहा. (१५१)

असें त्या कारुण्यपूर्ण विश्वमूर्तीनें म्हटलें. तेथें अर्जुन हें रूप पाहात आहे की नाहीं, हें देवांना कळेना, तो कांहींच उत्तर करीना, तो त्या रूपाबद्दल कांहीं बोलणें न करतां निवांत राहिला. (१५२) तेव्हां हा अर्जुन स्तब्ध कां म्हणून जेव्हां तो श्रीकृष्णांनीं पाहिला तेव्हां तो तर पूर्वीसारखा विश्वरूप पाहाण्यास उत्सुक असा दिसला. (१५३)

परंतु, ह्याच तुझ्या आपल्या डोळ्यांनीं लौकिकांतील चर्मचक्षूंनीं तूं मजला पाहूं शकणार नाहींस, म्हणून दिव्य असे डोळे—लोकोत्तर दृष्टि तुजला देतो. माझें योगऐश्वरम् ईश्वरी सामर्थ्य, योग ऐश्वर्य ते पाहूं शकशील. (८). (ओव्या १५४–१६४)

**(अर्जुनाची स्तब्धता पाहून देव श्रीकृष्ण मनांत म्हणाले,)** कीं, ह्याची उत्कंठा कांहीं कमी झालेली दिसत नाहीं. ह्याम आनंदही झालेला दिसत नाहीं, तसेंच जें दाविलें तें ह्यास कळत—आकळत नाहीं. स्वरूप आकलन करण्याची शक्ति याच्यांत आलेली दिसत नाहीं. (१५४) असें म्हणून देव हांसले, व हांसत हांसतच देव अर्जुनास म्हणाले कीं, हे अर्जुना, आम्हीं तुजला विश्वरूप दाखविलें पण तूं तर कांहींच पाहात नाहींस असें कां ? (१५५)

अशा ह्या देवांच्या म्हणण्यावर कुशल अशा अर्जुनानें त्यास म्हटलें कीं, अहो देवा ! येथें कुणाचें उणेपण तें ? आपण तर बगळ्याकडून चांदणें चरवूं पाहात आहांत. तेव्हां येथें दोष कुणाचा का कुणाकडे ? (१५६) तुम्हीं तर अहो, घांसून पुसून स्वच्छ केलेला आरसा आंधळ्यापुढेंच धरीत आहांत. कां बहिऱ्या-पुढें गाणें गाऊन दाखवीत आहांत, गायन करीत आहांत. (१५७) पुष्पमधाचे का पुष्पमकरंदाचे कण कमलांतील केसररूपी चारा जाणून बुजून चिखलांतल्या बेडकांस चारून तो तर वायांच की घालवीत आहांत : वायांपणच एक तेथें अहो, शार्ङ्गधरा ! येथें कोप कोणावर करतां ? कुणावर ते रागावत आहांत ? (१५८)

अहो, अतींद्रिय म्हणजे इंद्रियांस अगोचर आहे अशा व्यवस्थिततेचें असलेलें तें तुमचें रूप, जें केवळ ज्ञानदृष्टीनेंच प्राप्त होणारें तें तुम्हीं चर्मचक्षूपुढें ठेविलें, तें मी अहो, कसें बरें पाहावें ? तें माझ्या ह्या चर्मचक्षूंना कसें दिसावें ? (१५९) पण हें देवाचें उणें देवांना कसें सांगावें ? याकरितां तें सहन करून मी स्वस्थ राहिलों, बसलों. यावर देव म्हणाले कीं, हे बाप्पा ! अर्जुना ! तुझें म्हणणें आम्हीं समजलों. (१६०) विश्वरूप दाखवितांना तें पाहाण्याचें सामर्थ्य अगोदर तुला द्यावयास पाहिजे होतें, पण बोलतां बोलतां, बोलण्याचे भारांत—प्रेमाचे ओघांत तें मी अगदींच विसरून गेलों. (१६१) हे कसें झालें म्हणावें तर भुई न नांगरतां तींत बीं पेरिलें, तर त्यावर केलेले श्रम (शिंपणें वगैरे मशागत) वायांच जातात. करितां आतां विश्वरूप पाहूं शकतील अशी दिव्य दृष्टि तुजला देतों. (१६२)

हे पांडवा ! आम्ही दिलेल्या त्या दिव्य दृष्टीनें आमचा अवघा ऐश्वर्ययोग पाहून अनुभवांतर्गत कर (अनुभवाजिवडा करि) (१६३) असें, वेदांतानें कां ब्रह्मविद्येनें जाणण्यास योग्य, सकळ लोकांनाही जे आद्य-वंद्य असे, जगानें आराधना करावी ज्याची असे ते भगवान श्रीकृष्ण म्हणाले :— (१६४)

**संजय उवाच:—**

संजय म्हणाला—याप्रमाणें बोलून नंतर, हे राजा ! महायोगेश्वर सर्व पाप हरण करणारे जे श्रीहरी त्यांनीं आपलें रूप ऐश्वरम् , परम श्रेष्ठ असें ईश्वरी रूप सामर्थ्य तें पार्थास दाखविण्याचे केलें. (९ )

(ओव्या १६५–१९६ )

**संजय म्हणाला :—**

**अर्जुन खरा भाग्यवंत ! देव त्याचे डोळेच भोगावते म्हणून श्रीकृष्ण अर्जुनाच्या तोंडचे शब्द कसे झेलीत आहेत पहा !!**

हे कौरव कुळाच्या चक्रवर्ती धृतराष्ट्र राया ! मला तर राहून राहून हेंच आश्चर्य वाटत आहे कीं, ह्या त्रिजगतामध्यें लक्ष्मीपेक्षां कोणी सदैव दैववान् आहे का ? (१६५) अथवा खुणेची ती गोष्ट वर्णन करण्यासाठीं वाखाणण्यासाठीं अहो, वेद श्रुति माऊली सारखे ह्या जगीं दुसरें कोण असणार ? सेवकपणाच्या आंगीं स्वीकार व भाग्योदय केव्हांहि असणारच ! सेवकपणावर सर्व योग्य असे जे, तेथेंच कृपाप्रसादाचें होणें होतें की. (१६६)

अहो, ज्याचा हव्यास घेऊन योगी आठही प्रहर सबंध दिवसाच्या दिवस शिणतात, गरूडाप्रमाणें सोबतीचा सेवक असें अनुलक्षून वागणारें कोण बरें आहे ? (१६७) पण ते सर्व ज्या दिवशीं पांडव जन्मले तेव्हांपासून ते एकीकडेसच राहिले व सद्यःकालीनचे कृष्णसुखाचेच ते एकंदरतेचे असे झाले. (१६८) ज्याप्रमाणें सुंदर स्त्री कामुक मनुष्यास आपलासा करते, हे धृतराष्ट्रा ! त्याप्रमाणें श्रीकृष्णास अर्जुनानें आपलासा केला आहे ही गोष्ट येथें कशी घडली हे एक आश्चर्यच होय. (१६९). अहो ! पढविलेलें पांखरूंही शिकविल्याप्रमाणें कदाचितच बोलेल, निरनिराळे खेळ शिकविलेला क्रीडा मृगही करमणुकीचे विहार विलास करणारा कदाचितच होणार ! पण दैव म्हणा का देव श्रीकृष्ण हे अर्जुनास इतके कसे वश झालेत, सुरवाडले आहेत तें कांहीं जाणतांच येईना, जाणवलें जाईचना. (१७०) आज हे सगळें समग्र परब्रह्म ह्या अर्जुनाचेच डोळे सदैव भोगण्यासाठीं कसे ते श्रीकृष्ण अर्जुनाच्या तोंडच शब्द झेलीत आहेत पहा ! (१७१) असें लळे–बोलण्यानें कृतकृत्य होत आहे–पाहा.

अर्जुन हा रागावला तर देव श्रीकृष्ण ते निवांतपणें सहन करून आहेत, हा अर्जुन रुसला तर ते त्यास समजावीत जात आहेत. अहो ! नवलाचे असेंच की ह्या पार्थाचें वेड देवांना लागलें आहे. (१७२) एरव्हीं शुक आदिकरून दादुले श्रेष्ठ पुरुष ते विषय जिंकून जन्मास आलेवर ते तर विषय वानिता वानितांच की त्या विषयाचे भाटच झाले, स्तुतिपाठकच बनले. (१७३)

हा परब्रह्म असा भगवान श्रीकृष्ण, ज्याचें योगीजन ध्यान करतात, ते तर त्या योगीजनांचें समाधिधन आहेत. ते तर सर्वथैव पार्थाच्या आधीन होऊन आहेत आणि म्हणून हे धृतराष्ट्र राया, माझें मन अति आश्चर्य करीत आहे. (१७४) पण ह्यांत आश्चर्य का विस्मय तो कसचा ? कारण ज्याचा श्रीकृष्णानें स्वीकार का अंगिकार केला आहे, त्याचा भाग्योदय केव्हांही होणारच ! त्यास भाग्याचा दिवस उगवतोच कीं ! (१७५)

आणि म्हणून तो देवांचा राव श्रीकृष्ण पार्थास म्हणूं लागला कीं, हे पांडवा ! तुजला विश्वरूपाचा ठाव पाहातां येईल अशी दिव्य दृष्टि देतो. (१७६) अशी श्रीकृष्णाच्या मुखांतून अक्षरें निघतात न निघतात तोंच मायेचीं, अविद्येचीं सर्व आंधारें एकदमच्या एकदम नाहीशीं होऊं लागली. अर्जुनाच्या अज्ञानाचा अंधःकार एकदम मावळला, विरघळला. (१७७) अहो, देवाच्या मुखांतून निघालेलीं तीं नुसतीं साधीं अक्षरें नव्हतीं तर ब्रह्मसाम्राज्य दीपिकाच–दिवट्याच–श्रीकृष्णांनीं अर्जुनासाठीं उजळिलेल्या कीं. (१७८)

**अर्जुनास दिव्य दृष्टि लाभ :—**

तेथें मग दिव्य तेजाचा चक्षु–डोळा प्रगटला. त्या डोळयास ज्ञान दृष्टीचा बुद्धि ज्ञानेंद्रियरूपी फांटा फुटला; याप्रमाणें की भगवान श्रीकृष्णांनीं आपलें तें विश्वरूप ऐश्वर्य अर्जुनास दाखविलें, देखणें केलें. (१७९)

(१७९) मत्स्यकूर्मादिक अवतार म्हणजे देवादिकांचें पृथ्वीवर येणें ते, ज्या आनंदसमुद्राचे कल्लोळ–(लाटा-तरंग–) तेथें त्याच्या त्या किरणांच्या योगानें दिसणारे की सर्व विश्व हे मृगजळाप्रमाणें. (१८०) ज्या नीट –स्वच्छ अशा अनादि भूमिकेवर–(अनादि ईश्वर अवस्था त्यावर हें चराचर चित्राप्रमाणें उमटतें तें आपलें स्वतःचें मूळ स्वरूप सर्वस्व श्रीवैकुंठांनीं त्या अर्जुनास दाविलें.) (१८०) मागें एकदां बालपणीं श्रीपतीनीं माती खाल्ली होती, तेव्हां रागावून यशोदा मातेनें माती खात असतां सांपडल्यामुळें–(त्यास शिक्षा करण्यासाठीं) हातीं धरलें. (१८२) तेव्हां भिऊन जाऊन–, भीतभीतच आपल्या श्रीमुखाचा झाडा देण्याच्या निमित्तानें चवदाहि भुवनें तिजकडून सावकाशपणें पाहाविली. (१८३) तसेंच मधुवनामध्यें ध्रुवास (कपोल का गाल) शंखानें शिवंतले तेव्हां वेदांनाही जें जाणतां येत नाहीं, असें तें तो ध्रुव बोलूं लागला. (१८४) तसें हे राया धृतराष्ट्रा! श्रीहरीनीं अर्जुनावर अनुग्रह केला तेव्हां माया नाहीशी झाली. (१८५) एकदम स्वरूपेंच तीं आपल्या ऐश्वर्य तेजानें तेथें उगवली अशी बोली का कल्पना त्या प्रकाशाच्या चमत्काराचें एकार्णवच झालें, चित्त समाजीं बुडून राहिलें, त्याला जिकडे तिकडे विस्मय–चयचमत्कृति–चमत्कार दिसूं लागला. (१८६)

जसा आब्रह्म परमात्मा तसें पूर्ण उदकच, तेथें त्यामध्यें जसा मार्कंडेय एकाकी एकटाच पोहत असलेला, तसा विश्वरूपाच्या कौतुकाचा–, विस्मयाचा होऊन पार्थ विश्वरूपाच्या चरणावर लोळणीच घालीत आहे. (१८७) मग म्हणूं लागला कीं, अहो, येथें गगन तें केवढें तरी होतें; तें कुणी कुठें नेलें, तें कोणीकडे गेलें–चराचरी असणारी ती महाभूतें ती काय झालीं कोण जाणे !!! (१८८) येथें भूतसृष्टीचमुळीं नाहींशी झाली, दिशांचा पत्ता लागेना, दिशांचा ठावच पुसिला गेला– दिशांच्या खुणाच लोपल्या, येथें अध का ऊर्ध्व तें काय झालें कोण जाणें !!! खाली का वर, किंवा वर का खालीं ही कल्पना नाहींशीं झाली, स्वप्नीं स्वप्नच एक प्रकाशलें, व जागें झाल्यावर स्वप्न नाहींसें होतें तसें लोकांकार लोक, जग, जन, अवलोकन, प्रकाशणें, तें, आकार, आकृति, चिन्ह लोक प्रकार ते तें नाहीसें झालें. (१८९) अथवा सूर्याच्या तेजप्रतापानें जशीं चंद्रासहित तारांगणें लोपतात तशीं विश्वरूपानें प्रपंच तीन वस्तूंची ती– संसार विस्तार ठकवणुक– रचना गिळिली, लपविली, आवरिली आहे कीं. (१९०) आतां मनाला मनपण स्फुरेना मनाचें संकल्प विकल्प करणें तें नाहीसें झालें, बुद्धि ही स्वतःस सांवरण्याचें पाहीना. इंद्रिय वृत्तिरूपी किरण, रश्मि, परत हृदयींच भरून आहे: इंद्रियवृत्ति त्या अंतर्मुख झाल्या. (१९१) तेव्हां तर ठकासच ठक पडले, ताटस्थ्यास ताटस्थ्य आलें तेथें ज्ञानावर का विचारजात जेवढें म्हणून त्यावर मोहनास्त्रच घातलें कां येऊन पडलें असें झालें. (१९२)

## चमत्कारच चमत्कार! चतुर्भुज तेंच अनेक रूपें करून चहूंकडे मांडले गेले—

जेव्हां अर्जुन विस्मित होऊन आवडीनें पाहूं लागला तों त्याच्यापुढें होतें जें चतुर्भुज तेंच चहुंकडे अनेक रूपांनीं मांडलें आहे असें झालें: (१९३) वर्षाकाळींचे मेघ का महाप्रळयींचें तेज तें वाढतें होऊन यावें, तसें आपणास्वतःशिवाय कोणीकडेही दुसरें कांहींच उरलें नाहीं; तेथें आपण एकटा चहुंकडे उरून आहे. (१९४) प्रथम स्वरूप समाधान आधीं पाहावें तों अर्जुनास स्वरूप दर्शनानें समाधान झालें; अहो, आत्मसाक्षात्कार झाल्यानें त्याचें समाधान झालें, व आतां सहज डोळे उघडून पहातो तों त्यास विश्वरूपच दिसत आहे. (१९५) याची देहीं याची डोळां सर्व विश्वरूप सोहळा पाहाण्याची अर्जुनाची इच्छा, हौस देवांनीं पुरती केली. (१९६)

## शृंगाररस—

तें विश्वरूप कसें होतें तर त्याला अनेक मुखें असलेली, असें तें अद्‌भुतदर्शनाचें होतें–अनेक नयन असलेलें असें तें अद्‌भुत दर्शनाचें होतें–तेथें अनेक अशीं अद्‌भुत दर्शनें होतीं, त्यावर अनेक दिव्य अशीं आभरणें अलंकार वस्त्रें घातलेलीं होतीं. तेथें (त्या रूपाच्या हातामध्यें) अनेक दिव्य अशीं आयुधें हातामध्यें उचलून धरिलेलीं होतीं. (१०) (ओव्या १९७–२१७)

## विश्वरूपदर्शन कशा रीतीनें प्रगट झालें—

विश्वरूप दर्शनांत अर्जुन पुष्कळशीं वदनें तो पाहात आहे. तीं वदनें म्हणजे रमानायक जो भगवान परमात्मा त्याची राहाण्याचीं राजगृहेंच, प्रकाशणारीं भुवनेंच का लावण्य संपत्तीच्या ठेवीच का निधानेंच तो पाहात आहे. (१९७) ती आनंदाचीं वनें सांचलेलीं जशीं का सौंदर्यास राजतेची शोभा जोडली आहे अशीं हरीचीं मनोहर वक्त्रें त्यानें पाहिलीं. (१९८) त्याहीमध्यें सहजपणेंच भयानक अशीं काळरात्रीचीं कटकें–सैन्येंच उठाव घेऊन आहेत. (१९९) किंवा मृत्यूसच मुखें जाहालीं आहेत कीं काय अशी ती भीतिदायक दुर्ग अथवा किल्लेच उभारलेत जसे, अथवा प्रळयकाळच्या अग्नीचीं महाकुंडेंच उघडलीं आहेत अशी. (२००) अद्‌भुत पण भ्यासुर–भयासुर–भयानक अशीं वदनें पार्थवीरानें तेथें पाहिलीं. तसेंच आणीकही वदनें असाधारण अशीं सौम्यतेच्या अलंकारासहित त्यानें त्या विश्वरूपामध्यें पाहिलीं. (२०१)

ज्ञानदृष्टीच्या पाहाण्यानें त्या वदनांचा शेवट दिसेना म्हणून तो कौतुकानेंच त्या विश्वमूर्तीचे डोळे (लोचन) पाहूं लागला. (२०२). तो अनेक रंगांचीं कमळवनेंच विकसित होऊन आहेत कीं काय असें अत्यंत तेजस्वी व काळेभोर असे त्या श्रीमूर्तिचे डोळे ते अर्जुनानें पाहिले. ते जशीं का आदित्याची सूर्याच्या का देवाच्या पंक्तीच त्या एकच मूर्तीमध्यें दिसल्या. (२०३) तेथें कृष्णमेघाच्या दाटीमध्यें कल्पांत काळीच्या विजेची ती प्रगटता स्फूर्ति, ती पिंगट वन्हिवर्णाची अशी भ्रूभंगांतळी–भिंवयाखालीं–दिसत आहे. (२०४)

असें हे एकाच त्या विश्वरायामध्यें एक एक आश्चर्य पाहातां विश्वरूप पाहातांना तर अर्जुनास विश्वरूप दर्शनाचें तें अनेकत्वानें असणें–तेथें पाहाण्याची त्याची ती इच्छा फलिततेची झाली, अनुभवास आली. (२०५) मग तो मनांत म्हणूं लागला कीं, ह्या विश्वरूपाचे चरण ते कोणीकडे आहेत ? मुकुट तो कसला आहे ? दोर्दंड म्हणजे बाहू–हात ते कोणते ? ते पाहावेत तरी अशी इच्छा आवडीचें महत्व घेऊन आहे. (२०६)

पार्थाचा भाग्यनिधीच जसा का उदय घेऊन आहे. त्याच्या मनोरथांना विफलता येईना. अहो, पिनाकपाणी जो श्रीशंकर त्याच्या भात्यामध्यें वायफळ जाणारे असे बाण केव्हांही नसणारच. (२०७) ब्रह्मदेवाच्या वाचेमध्यें लटिक्या अक्षरांचे सांचे (सांठे) केव्हांही नसणारच ! म्हणून आद्यंततेचे अपारपण का अमर्यादतेचे असे साद्यंतपणच त्यानें पाहिलें. (२०८)

## आपाद मस्तकांत विश्वरूप निरीक्षण :—

वेदांनांही ज्याचें रूप पाहातां येत नाहीं, कळत नाहीं, वेदांनांही आकळत नाहीं. अशा त्या विश्वमूर्तीचे सकळ अवयव अर्जुन एकाच दृष्टिक्षेपांत पाहूं लागला, व तें पाहून रूपाचे व्यापकत्वें अनेकत्व त्यास पटलें, त्यानें ती श्रीमूर्ति नखशिखांत न्याहाळून पाहिली. (२०९) चरणापासून अंगुष्टापर्यंत, पायांपासून मस्तकापर्यंत विश्वरूपाची–शिव ब्रह्मा व आतां विष्णुरूपानें असलेली, आलेली ती थोरवी ती त्यांनीं पाहिलीं, जी मूर्ति अनेक रत्न भूषणांनीं अलंकारिली–विभूषविली आहे–प्रकाशत आहे. (२१०) अहो, परब्रह्म श्रीकृष्ण आपल्याच अंगांनीं आपणच शोभा, अलंकार, शृंगार झाला आहे. ती लेणी कशासारखी दिसत होती ते मी सांगतो, ऐक. (२११)

ज्या प्रभेच्या झळाळानें चंद्र व आदित्य मंडळ उजाळाचे होतें, जो महातेजाचा जिव्हाळा, जेणें विश्वच मुळीं प्रगटतें, दिसूं लागतें, स्पष्ट होतें, (२१२) असा तो दिव्य तेज शृंगार कुणाच्या बरें मतीस आकळणारा ? तो शृंगार तर देवच स्वतः लेईले आहेत, असा धीरवान अर्जुन पाहात आहे. (२१३) तेथें मग ज्ञानाचा डोळा सरळ अशा पल्लवाना–हातांना पाहूं लागला, तों कल्पांतींच्या ज्वाळा तोडीत आहेत, अशीं शस्त्रें त्या हातांत झळकत असलेलीं पार्थास दिसलीं. (२१४) भगवान तो आपण स्वतःच अवयव, स्वतःच अलंकार

स्वतःच हात, स्वतःच शस्त्र, स्वतःच जीव, स्वतःच देह, किंबहुना अहो, सर्व स्थिरचर देवानेंच भरलें आहे; आपणच अंग, आपणच अलंकार, आपणच हात, आपणच हतियार, आपणच जीव, आपणच शरीर असें सर्व चराचर स्थिरचर देवानें भरलें आहे असें अर्जुन पाहात आहे. (२१५) अहो, त्या देवाच्या किरणाच्या प्रखरपणामुळें नक्षत्राचे जसे का फुटाणेच होत आहेत. त्या अस्त्राच्या तेजाच्या अग्नीनें तर नक्षत्रांचें फुटाणेच उडत होते. तेथीलच्या तेजानें चिडून जाऊन वन्हीनें म्हणूं केले कीं समुद्रीं रिघावें–जावें हें बरें! तेथें फुटाण्यासारखे फुटणें तरी होणार नाहीं. (२१६) महाविद्युल्लतेचे अरण्यच उमटलें आहे, कालकूट लाटांनीं कवळलेले तसें अपार कर उद्यत आयुधी–, शस्त्रें हातांनीं उचलेली आहेत–आयुधांनी हात मंडित आहेत असें अर्जुन पाहत आहे. (२१७)

विश्वरूपाच्या अंगावर दिव्य माला होत्या, त्यानें दिव्य वस्त्रें धारण केलीं होतीं. दिव्य अशा गंधाची उटी त्यानें लाविलेली होती. असें अत्यंत आश्चर्यकारक (अनेक आश्चर्यांनीं भरलेलें असें) असे ते देव अनंत विश्वतोमुख धाता–विश्वरूप–भगवंतांनीं अर्जुनास दाखविलें. (११) (२१८–२३६)

## देव सर्वव्यापी, सर्व विश्व आपणच आहोंत हें कशारीतीनें प्रगट झालें तें—

तेथून त्यानें भीतीनें दृष्टि बाजूस केली व कंठ आणि मुकुट पाहूं लागला; तों देवसृष्टि ही ज्यापासून झाली आहे (२१८) असे ते कंठ व मुकुट, जशीं कुसुमेंच तो पाहात आहे : अहो, तीं तर महासिद्धींचीं मूळपीठेंच–जेथें शिणलेली कमळा एका बाहूची होऊन–एक हाताची होऊन विश्रांति पावते, तशी अति चांगलीं कुसुमें मस्तकावर ठेविलेलीं होतीं. (२१९) गळयांत दिव्य पुष्पांचे हार होते, मुकुटावर पुष्पांचे गुच्छ होते, ठिकठिकाणीं अनेक पूजाबंध होते, कंठामध्यें लोकोत्तर अशा फुलांच्या लांब माला (मालादंड) होत्या. (२२०) स्वर्गानें सूर्यतेज नेसलें (वेढले, सभोंवार घेतलें) आहे कां पंधरा नंबराच्या सुवर्णानें मेरू पर्वत मढिला आहे, तसे नितंबावर पितांबराचें तेज झळकत आहे, (तसा कमरेला पितांबर कसलेला आहे). (२२१) श्रीमहादेव–कापुराची उटी लाविलेला, अथवा कैलासच सुवर्णाचें पूट दिलेला–पारदानें का पान्यानें–का सोन्यानें माखलेला (डंवरिलेला, लिंपलेला) आहे; जसा का क्षीरार्णव क्षीरोदकानें पांघरविला आहे. (२२२) चंद्रमण्याची घडी विस्तार केली–उकलून आकाशाला तिचें आच्छादन केलें. चंद्रमण्याची–फुली विस्ताराची करून–गगनाकडून गगनास पांघरूण घालावें, आच्छादन घेवविलें, तशी चंदनाची शुभ्र उटी त्या विश्व-रूपाचे सर्वांगीं त्यानें पाहिली. (२२३) ज्यायोगें स्वप्रकाशास कांति चढत आहे, ज्यायोगें ब्रह्मानंदाचा उष्मा, दाह शमतो आहे, मोडत आहे, ज्याच्या सौरभ्यानें–सुवासानें ह्या प्रकृति, वेधवति, उत्पत्ति, कर्त्रीस का ब्रह्मदेवासही जीवित जोडते, (२२४) ज्याचें लेपन साधुत्वास अनुसाधुत्व करतें, निर्लेप परमात्माही ज्या सुगंधाचे लेप करतो; अनंग जो मदन तोहीपण तो सुगंध संपर्कें, सर्वांगीं वाहून आहे; अशा त्या सुगंधाची थोरी कोण बरें वानूं शकेल? त्या सुगंधाचें वर्णन कोणाच्यानेंही करवणार नाहीं. (२२५)

अशी एक एक शृंगारशोभा पाहातां पाहातां अर्जुन हा तर क्षोभासच जात आहे; भांबावून जाऊं लागला, वेडावला होत आहे. अहो, ती शोभा पाहून अर्जुन तर जागच्या जागीं थिजून गेला: तसेंच देव उभा आहे का बसला आहे का शयानु म्हणजे निजलेला का योगनिद्रेंत आहे; का सन्मुख आहे हे कांहींच जाणवेना. (२२६) (बाहेर) दिठी उघडून बाहेर पाहातो तों, अवघें सर्व कांहीं मुर्तिमयच तो पाहात आहे–व आतां पाहातच नाहीं असा उगा राहातो. आंतहीपण तसेंच सर्व कांहीं मूर्तिमय पाहात आहे (बाहेर देवमूर्ति आणि अंतर्यामीही देवमूर्तीच–समोर जिकडे पाहावें तिकडे देवमयच! डोळे उघडले तरी देव, डोळे मिटले तरी देवच दिसूं लागले. (२२७) समोर अनावर अशीं मुखें पाहात आहे–(ती पाहाण्याची नकोत म्हणून) त्या पाहाण्यास भिऊन पाठीमोरे होऊन पाहूं लागला, तों तेथेंही श्रीमुखें व तसेंच कर-चरणही तो पाहात आहे, (त्यास दिसत आहेत. (२२८)

अहो ! (पाहाता प्रतिभासे प्रतिबिंबीत होत आहे.)–पाहिलें तर दिसतोच दिसतो, यांत नवल तें काय! तेथें नवीनपण तें कसचें न् काय ? पण न पाहातांही दिसतें–असें कौतुकच एक तें ऐकावें– न पाहातांही पण पाहिलें होत आहे, असें चोजच–कौतुकच एक अहो. (२२९) कसें तें अनुग्रहाचें–(कृपेचें–स्वीकाराचें) करणें जेथें का पार्थानें पाहावें का न पाहावें तरी, त्याहि सकट श्रीनारायणांनीं व्यापून घेतलें आहे. (२३०) म्हणून तो आतां आश्चर्याच्या एका पुरामध्यें पडला. तेथें तात्काळ तीरावर येऊन तो उभा ठाकतो न ठाकतो तोंच आणीक एका नव्याच आश्चर्याच्या महापुरामध्यें पडत आहे. (२३१) असा अर्जुन विलक्षणतेनें श्रीअनंतांनीं आपल्या दर्शनाच्या कौशल्यानें व्यापून घेतला. (२३२) स्वभावतःच सर्व बाजूंकडे मुखें आहेत, असा तो विश्वतोमुख धाता परमात्मा तोचमुळीं अर्जुनानें तो धाता विश्वतोमुख कसा तें पहावें म्हणून प्रार्थिलेला, तोंच आतां अवघें सर्व कांहीं, सर्वव्यापी असा ईश्वर होऊन आहे. (२३३)

आतां दिव्यानें, दीपानें का सूर्यामुळें तो देव विश्वतोमुख प्रगट होतो (का दिसतो–स्पष्ट होतो.) का तो दिवा का दीप झांकल्यावर, तो सर्वव्यापी ईश्वर देखण्याचें सामर्थ्य खुंटतें; तशी कांहीं ती श्रीवैकुंठ-नायकांनीं दिलेली ती दिठी–पाहाण्याची शक्ति–नव्हती कीं. (२३४) म्हणून अर्जुनास दोन्हीं तऱ्हांनीं तें त्याचें देखणें तें आंधारीही देखावेंचि पडताहे–देखे–(पाहूं शकतो). असें **संजय** हस्तिनापुरीं रायास सांगत आहे. (२३५) तो म्हणूं लागला कीं बहुतकरून मी ऐकिलें कीं नाना आभरणांनीं भरलेले असे ते धातयाचे विश्वतोमुख–, तें विश्वरूप पार्थानें देखिलें–पाहिलें. (२३६)

युगायुगांच्या ठिकाणीं होणारें जें युगपद अवताराचें जसें का; तसें आकाशामध्यें एकाच वेळीं हजारों सूर्यांच्या उगवण्यानें, जशी तेजस्विता प्रगटेल तशी त्या (महात्म्याच्या भासाची तेजस्विता होती) विश्व-रूपाच्या प्रभेसारखी कदाचित होईल. (१२)

### श्रीहरीचे सहज माहात्म्य; सर्वांगीचें तेज विश्व व्यापून आहे असें —

(ओव्या २३७–२४१)

अहो देवा ! हे राजा धृतराष्ट्रा ! त्या विश्वरूपाच्या अंगप्रभेचा नवलाव, कौतुक, कौतुहल, अभिलाष तो कशासारखा म्हणावा कीं, जसा का कल्पांतसमयीं बाराहि आदित्यांचा एकत्र (मिलाफ) मेळावा होऊन आहे. (२३७) तसें ते हजारो दिव्यसूर्य जरी का एकाच वेळीं उदय घेतील, तरीसुद्धां त्या विश्वमूर्तीच्या तेजाची महति का थोरी उपमेस येणारी नव्हे–तेथें उपमा ही उपमेसच येणें होणें कदाचीतच ! (२३८) अवघ्या सर्व विद्युल्लतेचा मेळावा करावा–केला, प्रळयाग्नीचीही सर्व सामुग्री आणावी–आणली–तसेंच (दश-संख्या रूप आवरणाग्नि–) दशावताराचें तेज मेळविलें का महातेजाचा दशकही जर मेळविला, तर कदाचित् त्या विश्वमूर्तीच्या अंगकांतीच्या प्रभेच्या बरोबरीचें तें, एकत्रिततेचें तेज, कांहीं थोडेंबहुत त्या विश्वरूपाच्या तेजासारखें होईल. (२३९) त्या तेजाच्या अंगाच्या प्रभेचें योग्य असें हें तेज कांहीं थोडेंसें असेंच होईल पण त्या तेजासारखें चांगलें असें केव्हांही (त्रिशुद्धीही) नव्हेच ! (२४०) असें सहज माहात्म्य त्या श्रीहरीचें (फांकले–) प्रकाशलें–(विकासून) आहे. संजय म्हणतो–ते श्रीव्यास मुनींच्या कृपेमुळें मजला दृश्य झालें. (२४१)

त्यावेळीं अर्जुनानें अनेक प्रकारांनीं विभागलेलें सर्व जग त्या देवदेवाच्या शरीरामध्यें (त्या विश्व-रूपाच्या ठायीं) एकत्र (एकस्थ) स्थित झालेलें पाहिलें. (१३)

### विश्वरूपाचें व्यापकत्व—सर्वव्यापी विश्वरूप—

(ओव्या २४२–२४४)

त्या विश्वरूपाच्या एका कडेस का एका कोपऱ्यांत हें सर्व जग आपल्या पवाड्यानें–विस्तारानें आहे. जसें का महान सागरामध्यें बुडबुडे ते निरनिराळे दिसतात. (२४२) अथवा आकाशांतील ढगांमध्यें कल्पित

असें नगर, भूतळीं–पृथ्वीवर (पिपीलिका–मुंग्यांचें घर) मुंग्या वारूळ बांधतात तसें घर, अथवा मेरू–सुवर्ण–पर्वतावर सपुर भरपूर–प्रकाशाचें–उजाळ्याचें अतिसूक्ष्म सुवर्णाचें अंश–परमाणु बसले आहेत. (२४३) त्याप्रमाणें अवघें विश्व त्या देवचक्रवर्तीच्या शरीरामध्यें अर्जुनास दिसलें. (२४४)

तें पाहून अर्जुन आश्चर्यचकीत होत्साता–व सर्व अंगावर रोमांच उभे राहिले आहेत असा तो, मस्तक लववून शिरसानमस्कार करून–दोन्ही हात जोडून प्रणाम करून, देव श्रीकृष्णाला म्हणाला :– (१४)

**अर्जुनाचे अष्टसात्विक भाव —**

(ओव्या २४५–२५४)

तेथें एक तें विश्व व एक तो आपण असें कांहीं थोडेंबहुत दुजेपण होतें, तेंहीपण आटून गेलें. तेथें त्याचें अंतःकरण एकदम विरलें आहे. जो अल्पसा अंश मीपणाचा–का अर्जुनत्वें भिन्नपणाचा त्याच्या मनांत राहिला होता तोहि नष्ट झाला : (२४५) आंतमध्यें आनंद संचरला, महान आनंदास जागृति आली, अंतर अंतःकरण आनंदोत्सवाचें झालें, (शरीर बळ गळून गेलें) बाहेर अवयवाचें–, गात्राचें बळ हारपून गेलें, नखशिखांत आपादमस्तक, रोमांचांनीं आच्छादिलें. (२४६) पावसाळ्याच्या आरंभीं वर्षाऋतूच्या प्रथम दशेंत, पाणी वाहून गेल्यावर शैल पर्वताचें सर्वांग जसें कोमल अंकुराच्या पालवीनें–अंकुरांनीं सुशोभित होतें–तसे रोमांच आले. (२४७) चंद्र ज्योत्स्नेनें शिंवतलेला सोमकांत द्रवतो तशा दाट स्वेदकणिका सर्व शरीरभर दाटून आहेत. (२४८) कमळामध्यें सांपडलेल्या अलिकुळांमुळें–भ्रमर समुदायामुळें– ती कमळकलिका जशी पाण्यावर आंदोळते, हालते, त्याप्रमाणें त्या आंतल्या सुखाच्या लहरींनी–सुखऊर्मीच्या बळानें, बाहेरही तो अर्जुन कांपूं लागला. (२४९) कापूर केळीची सोपें सोपटें उकलतांना, आंत कापूर दाटून भरल्यामुळें, पुलिका म्हणजे कण तुषार गळतात; त्याप्रमाणें त्या अर्जुनाच्या–पार्थाच्या नेत्रांतून अश्रूंचे थेंब पडूं लागले. (२५०) सुधाकराचा–चंद्राचा उदय झाल्यानें समुद्र जसा अगोदरचा भरलेलाच तो भरतो, त्याप्रमाणें वरचेवर आनंदाच्या लहरींच्या उर्मींनीं, भारानें उचंबळत आहे, भरून आहे. (२५१)

**अष्टसात्विक भावांत चढाओढ :—**

आतां अर्जुनाच्या अष्टसात्विक भावांना परस्पर हेवाच वाटत आहे–, परस्परांनीं परस्परांस वरचढ दिलेल्या ब्रह्मानंदाची त्या जीवदशेस राजीवतेची राणीव फावली, सुखाचा देश सांपडला, त्यास ब्रह्मानंदाचें राज्यसुख प्राप्त झालें. (२५२)

त्या सुखाच्या अनुभवानंतर द्वैताचा सांभाळ केला, मग उच्छ्वास घेऊन अर्जुनानें त्या देहाची वास पाहिली, देहाकडे नजर टाकिली. (२५३) डोळे उघडून पाहूं लागला, तेथें ज्या सोयीनें–संवयीनें तो बसला होता त्याच सवा म्हणजे बाजूकडे त्यानें मस्तक खालविलें, देवांना नमन केलें; व नंतर हात जोडून उत्तम असें स्तुतीचें बोलणें करूं लागला. (२५४)

**श्लोक १५ वा :—अर्जुन उवाच :—**

तुम्हां विश्वरूपाच्या देवदेहामध्यें सर्व देव मी पहात आहें; सर्व भूतांना मी पहात आहें : त्याच-प्रमाणें भूतविशेष संघानांही मी पाहात आहें. कमल आसनस्थ ब्रह्मदेव तसेंच ईश जो महादेव व सर्व ऋषी व दिव्य असे सर्पही, मी तेथें पाहात आहें (१५)

**अद्‌भुत रस अर्जुनाचे धन्योद्गार :—**

(ओव्या २५५–२६५)

(अर्जुनास दिव्यदृष्टि दिली, विश्वरूप दाखविणेस आरंभ केला,) तथापि अर्जुनाचे ठिकाणीं भक्त व देव यांचें द्वैत राहिलें होतें; म्हणून अर्जुन देवांस म्हणाला—

अहो स्वामिन् जय जय आजी! आज आपला जयजयकार असो! अहो! आपल्या कृपेचें नवल कोठवर सांगावें? की जें आम्ही प्राकृतांनीं आपलें हें विश्वरूप पाहावें–पाहिलें तें!! अहो देवा, मी तुमचा जयजयकार करतों, मी सामान्य जीव असूनही हें विश्वरूप पाहाण्यास समर्थ झालों आहें, हें केवळ तुमच्या कृपेमुळेंच. (२५५) तसेंच अहो, स्वामि गोसावी! खरोखरीच आपण मजला कृतार्थ केलें. धन्य अर्जुन! धन्य देव! धन्य योग! धन्य धर्म! धन्य योगेश्वर! धन्य जगत्! असा सर्व एक धन्यवाद त्याचा कृतार्थ होण्यास लाभला होता. आमचें भलें कल्याणच केलें कीं, मी सहज संतुष्ट होऊन आहें. अहो जी, ह्या सृष्टीस आधार असलेले आपण, मजला विश्वरूपदर्शन दिलेंत! तुम्हींचमुळीं ह्या सृष्टीस आधार, असे तें रूप मी देखिलें. (२५६) देवा, मंदर म्हणजे स्वर्गीच्या संबंधानें ठिकठिकाणीं हिंस्र पशूंचीं अरण्येंच अथवा अरण्यमार्ग तशीं ह्या तुमच्या देहामध्यें अनेक भुवनें, (जीवन, उदकें, जगें) असें मी पाहात आहें. (२५७) आकाशाच्या पोटांत ग्रहगणांचे समुदाय दिसतात, का महावृक्षावर पक्ष्यांचीं घरटीं (अविसाळें) जशीं, (२५८) त्याप्रमाणें अहो हे श्रीहरी! तुमच्या ह्या विश्वात्मकी शरीरामध्यें मी देवगणांसहित स्वर्ग तर निश्चितपणानें पाहात आहे. (२५९) अहो हे प्रभु! महाभूतांचें पंचक पांचांचे ते अनेक असे मी पाहात आहें. तसेंच एक एका भूतग्रामाचें का भूतसृष्टीचें तें. (२६०) जी अहो! सत्यलोक तुम्हांमध्यें देखिला तेथें चतुरानन–जो चर्तुर्मुखाचा चतुरानन पण पाहिला तो पूर्वीचाच होय. तो कांहीं नवा असा नव्हे. तसेंच दुसरीकडे पाहावें तों कैलासही मजला दिसत आहे. (२६१) श्रीभवानीसहित श्रीमहादेव तुमच्या एका अंशामध्यें दिसत आहें. तसेंच तुम्हांसही, हे श्रीहृषीकेशा, मी तुम्हांमध्येंच पाहात आहें. (२६२) तसेंच कश्यप आदिकरून ऋषिकुळें तसेंच सकळ पन्नगासहित पाताळें ह्या तुमच्या स्वरूपाचे ठायीं दिसत आहेत. (२६३) अहो हे त्रैलोक्यपति! ह्या तुमच्या एक एका अवयवाच्या भिंतीमध्यें चौदाही भुवनें (भूः आदि सप्त लोक व सप्त पाताळें) बहुतेक चित्ताच्या आकृतीनें अंकुरलेली, चितारलेंली, अशीं जाणली जात आहेत. (२६४) तेथीचें जे जे लोक ते तर अनेकांशीं चित्ररचना म्हटलीं असें लोकोत्तर तुमचें गांभीर्य (हीं चवदाहि भुवनें, स्वर्ग देवगण, पंचमहाभूतासारखें अनेक भूतसंघ, ब्रह्मदेवासह सत्यलोक, शंकर गौरीसह कैलास, कश्यपादि ऋषि, नाग लोक या सर्वांचीं चित्रें तुमच्या शरीरावर चितारल्यासारखीं दिसत आहेत.) मी एक देखत आहें. (२६५)

### श्लोक १६ वा:—

हे विश्वेश्वरा! हे विश्वरूपा! आपणांस अनेक बाहू अनेक उदरें, अनेक वक्त्रें, अनेक नेत्र आहेत, असें मी पहात आहें: तसेंच सर्वतः सर्वत्र सभोंवार, आपण अनंत रूप आहांत असें मी पाहात आहें. आपला आदि, मध्य व अन्त नाहीं असे आपण अनंत आहांत असें मी पाहात आहें. (१६)

(ओव्या २६६–२९३)

अहो देवा! त्या तुमच्या दिव्य चक्षूंच्या पैसपणानें, चहूंकडे पाहावें तों आकाश जसें का कोंभैले बाहुदंडांनीं अंकुर फुटलेलें. (२६६) देवा, असें तुमचे एक एक हात निरंतर अवघे सर्व व्यापार एकाच वेळीं करीत असलेले दिसतात. (२६७) अव्यक्त ब्रह्माच्या विस्तारानें महाशून्याच्या पैसारें–ब्रह्मांडांची भांगार गृहेंच उघडिली आहेत कीं काय, अशीं तुमचीं अपार उदरें आहेत. (२६८) सहस्रशीर्ष जो पुरुष त्याचेच हे दाखले देखिलेले, तेथें कोडीवरि वदनफळें एकेचि वेळीं होत आहेत, जसें का परब्रह्मचमुळीं वदनरूपी फळांनीं मोहून आलें आहे–मांडिले आहे. (२६९) वदनें जितकी निराळीं तितकीं तीं तुमचीं विश्वमूर्तीच तसें नेत्रांच्या रांगा–पंक्ती पुष्कळशा अनेक अशा दिसत आहेत. (२७०) हें असो! पण स्वर्ग, पाताळ, भूमि, अंतराळ असें हें बोलणेंच (विवक्षा) एक पण सकळ कांहीं मूर्तिमय असेंच–इतकेंच नाहींतर स्वर्ग, पाताळ, जमीन, दिशा, हीं सर्व तुमचे ठायीं विश्वरूपानें भरलेलें मला दिसतें. (२७१) तुम्हांवांचून एक परमाणुएवढाहिपण

अवकाश (जागा रिकामी) सांपडत नाहीं. असें सर्व तुम्हीं व्यापिलें आहे. (२७२) अनेक तऱ्हांनीं जेवढी केवढी महाभूतें सांठविलीं तेवढाहि विस्तार तुम्हा श्रीअनंतांनीं कोंदलेला आहे. (२७३) असें आपण कोठून आलांत ? येथें बसलेले आहांत कीं उभे आहांत ? काय करीत आहांत ? तुमची आई कोण ? तुमचे ठाण केवढें आहे ? (२७४) तुमचें रूप कसें, तुमचें वय काय ? तुम्हां पलीकडे काय आहे ? तुम्हीं कशाचे आधारानें आहांत ? हें सर्व मी पाहिलें. (२७५) तेव्हां अशीं जाणीव झाली कीं तुमचा ठाव तुम्हींच, तुम्ही कवणाचेहि नव्हत, अनादि, आयिते, स्वतःसिद्ध असें आहांत. (२७६)

तुम्हीं उभे ना बसलेले, उंच ना खुजट असे, तुमच्या तळामध्यें व तुमच्यावरतीं तुम्हींच, अहो हे वैकुंठा, आहांत (२७७) तुम्ही रूपानें, तारुण्यानें आपले आपणासारखेच आहांत, देवा तुमचें वयोमान तुम्हींच, तुम्हांस पाठ का पोट म्हणावें तों हे परेशा, ते तुमचे तुम्हींच आहांत. अहो, तुमचें रूप तारुण्य वय, सर्व कांहीं तुमचें तुम्हीच आहांत. (२७८) किंबहुना आतां हे श्रीअनंता, तुमचे तुम्हीच सकळ कांहीं अवघे आहांत—असें पुन्हः पुन्हः का वरचेवर पाहून मी निश्चित केलें आहे—निश्चयानें जाणलें आहे. (२७९) परंतु तुमच्या रूपामध्यें जी कांहीं एक उणीव मी पाहात आहे—निष्काम, निर्हेतुक, तेथें आदि, मध्य का अंत हीं तिन्हीं नाहींत. (२८०) एऱ्हवी सर्व ठिकाणीं शोधिलें तरी तुमचा पत्ता का शोध (आहेपणाच्या आनंदाचा) लागत नाहीं, म्हणून तुम्हीं अमुक एका आदीचे का अंताचे असे नाहींत, हें निःसंशय. (२८१) अहो, जी विश्वरूपा ! असें तत्वतः आदि—मध्य—अंतरहित—अशा आपणांस मी अपरिमिता, अमर्यादा, विश्वश्वरा असे देखिलें—देखत आहें (२८२) तुम्हां महामूर्तीच्या—दिप्तमूर्तीच्या—आंगीं पृथक् अशा अनेक मूर्ति उमटल्या आहेत. आपण नानापरीच्या वर्णाचीं, अनेक प्रकारच्या रंगारूपाचीं आंगडीं आंगरखी लेइलीं आहेत असें आपण आवडत आहांत, भासत आहांत, वाटत आहांत अवघडलेला दिसत आहांत. (२८३) अनेक पृथक मूर्ति त्या द्रुमवल्ली (वृक्षवल्ली) तुमच्या स्वरूपरूपी पर्वताचे (अचळाचे) ठायीं, त्या तर फुलेंरूपी अथवा फळरूपी दिव्य अलंकारच तुम्ही परिधान केलेले आहेत. वृक्षरूपी वल्ली वल्लीरूपी वृक्ष हे परस्पर परस्परांना आंगीकारून पसरल्या आहेत, भरास आल्या आहेत. (२८४).

॥ जीव-प्रकृति (सृष्टि); प्रकृति-पुरुष; जीवात्मा-परमात्मा ॥

अहो देवा ! तुम्हीं जे का महान् असे उदधीच व त्यावरील तरंगरूपी मूर्ति हेलावा असलेले असे तुम्हीं बरवा गुणश्रेष्ठ असा वृक्षच, मूर्तिरूपी फळांनीं फळास आलेला असा, मूर्तिरूपी धनाच्या पेव्याच जशा, शरीरधारी भौतिक प्रतिमाच जशा, फळें तीं जशीं का भूतांनीं भूतल मांडिलें आहे, त्या भूतसृष्टीचे सर्व पृथ्वीतळच आकारास आणिले आहेत, शोभविले आहेत असें. कसें तर नक्षत्रांनीं आकाश जसें आच्छादिलें आहे, व्यापिलें आहे, तसें तुमचें रूप मूर्तीमयांनीं भरलेलें दिसत आहे. काय शरीर, काय प्रतिमा, काय भौतिक, असें हें सर्व मी देखत आहें. (२८६) जे कांहीं एक एका (शरीराच्या, रूपाच्या) प्रतिमेच्या आंगप्रांतामध्यें होत जातें तेंच त्या जगतीं त्रिजगतामध्यें होत जात आहे, घडत मोडत आहे, एवढ्या मोठ्या इतक्या अवाढव्य मूर्ति तुमच्या आंगीं आहेत त्या जशा का तुमच्या एक एका रोमाचे ठायींच झालेल्या. (२८७) असा जगाचा विस्तार व्यापून, आच्छादून मांडून असलेले असे तुम्हीं कोण आहांत, कुणाचे ते आहांत असे जेव्हां पाहिलें तों काय सांगावे कीं ! आमचा सारथी जो, तेच तुम्हीं भगवान श्रीकृष्ण आहांत की (असें मला कळून चुकलें, दिसून आलें). (२८८) मज पहातां म्हणजे मला वाटतें हे श्रीमुकुंदा ! तुम्हांविषयीं विचार करितां असें कळतें कीं तुम्हीं सदासर्वदा असेंच व्यापक असून, केवळ भक्तावर अनुग्रह करण्याकरितां मग असे गोड, मुग्ध, सुंदर, सगुण रूप धारण करीत असतां, हे खरें की ! (२८९) ते चहुंभुजांचे कसें सांवळें रूप तें पहाता पाहातां तर मन व डोळे निवतात, शांत होतात, व आलिंगन—खेंव—देऊं जावें, तर तें रूप त्या दोन्हीं बाह्यांनीं आकळिलें होत आहे, दोन्ही हातांत सांपडत

आहे, वेढलें जात आहे (२९०) अहो, मनोहारी गोजिरवाणी सुंदर अशी कृपाच ती विश्वरूप होण्यास आली, मूर्तीची झाली, पण काय सांगावें कीं आमच्याच दृष्टि त्या सलेपा म्हणजे दूषित आहेत, (अज्ञानांध) मलिन अशा जे कां तेथें सामान्यपणेंच एक आम्हीं पाहात आहोंत कीं. (२९१) आतां येथें दिठीस झालेला (दृष्टरूपी) विटाळ तो गेला, दोष तो नाहींसा झाला, तुम्हीं अगदीं सहजपणेंच की माझी दृष्टि स्वर्गीय, सुंदर दिव्य केली आणि म्हणूनच कीं तुमचा महिमा मजकडून यथार्थ यथारूप देखवला. (२९२) परंतु रथावरच्या मकराकृतीच्या मागें साधारणपणते, साधारण सामान्य मनुष्याप्रमाणेंच बसलेला होतास तोच तूं –तुम्ही, एवढें रूप (विश्वरूप) झालांत हें म्यां खरेपणानें ओळखलें. (२९३)

**श्लोक १७वा :**—मस्तकीं मुगुट, हातांत गदा व चक्र धारण करणारे, असे तेजाचे राशीच एक, सर्व बाजूंनीं प्रकाशमान, अग्नि व सूर्य ह्यांप्रमाणें दैदिप्यमान, प्रभा फांकलेलें, तेजःपुंज, असें डोळ्यानीं पहाणें अशक्य, अपरंपार भरलेलें व अमुक तऱ्हेचें तुमचें रूप आहे, असें नच अंदाज करतां येणारें (अप्रमेय) असें तुम्हीं सर्व ठिकाणीं जिकडे तिकडे मला दिसत आहांत. (१७) (ओव्या २९४–३०६)

अहो ! कांहीं नवीन नव्हे पण माझ्या ओळखीचा आहे, असा पूर्वी होता तोच हा मुकुट हे श्रीहरि ! तुम्हीं आपल्या शिरीं लेइले आहांत; पण आतांचें तेज व थोरपण ते बहु बहु असे नवलाचेंहि नवलच एक कीं अहो, तें सर्व बहुपण घेऊन आहे. (२९४) हें वरल्या हातीं चक्र तें (लांबी, विस्तार, परिणाम, ऐश्वर्य, प्रताप, उगवणें, क्रियाशक्ति, संयोग, मनोनिग्रह इत्यादीनीं) परजणें का फिरविण्याच्या डौलानें, विश्वमूर्ति ती तुम्हीं सांवरीत आहांत, आवरून आहांत. म्हणून ती खूण मोव्हतच मुळीं नाहीं. (२९५) तसेंच पूर्वीं जी गदा तुमच्या हातांत होती तीच गदा आतांही तुमच्या हातांत आहे. खालच्या दोन्ही भुजा त्या निरायुध पण संसारास आलेले जे त्यांना सांवरण्याकरितां–, संसारिलेल्यांना हे श्रीगोविंदा वागदोर वागारे– घोड्याच्या तोंडातील लगाम वागदोर खळ जनांचा तो सांवरण्याकरितां होत [शब्दास धीर नसणें, तेथें बुद्धि–स्थिर नाहीं तेथें खळाळाच्या पंक्तीस भोजनास बसणें जसें. संताची निंदा करणारा तो फक्त लोभासाठींच वंदन करणारा. शब्दा नाहीं धीर। ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥१॥ त्याचें न व्हावें दर्शन जळो पंगती भोजन ॥२॥ संतासी जो निंदी। अधम लोभासाठीं वंदी ॥३॥ तुका म्हणे पोटी। भाविक जया ओठीं ॥४॥

आतां येणें सहसा अतर्कित, अकल्पित, आकस्मिक सहजपणेंमुळीं त्याच वेगानें त्वरा, उकळी, प्रवाहानें, शक्तीनें माझ्या मनोरथांबरोबरचमुळीं हे विश्वाच्या ईशा, तुम्हीं आपण विश्वरूप जहालांत कीं अहो ! म्हणून तर अहो ! मी हें जाणत आहें, ओळखीत आहें, मानीत आहें हें मला उमजत आहे. (२९७) पण हें कौतुक, नवल का आवड का आश्चर्य तें कसचें पण असें अद्‌भुत रसाचें विस्मयाचें व्हावें ती योग्यता मला नाहीं; पण ह्या आश्चर्यामुळें चित्त थक्क 'चित्त' होऊन जात आहे. (२९८) कारण येथें हें सर्व कांहीं खरेंच खरें आहेच आहे असें म्हणावें कीं नाहीं हेंच कांहीं विश्वासास का विवरणास, स्पष्टतेस येईना. अहो विश्वरूपा ! आपल्या अंगाच्या प्रभेच्या कांतीची ती नवाई चमत्कार–आश्चर्यकारक गोष्टनवलाव नवी नवी अशी कांति दाटपणें सर्वत्र भरलेली, व्यापलेली, कोंदलेली आहे. (२९९) अहो येथें अग्निचीही दिठी–दृष्टी–शुभ्र पाण्डुर दुर्वर्ण, श्वेत, खजुर अशी करपत आहे, (आंत आंतच ओढिली जात आहे.) सूर्य हा तर काजव्या (खद्योत) प्रमाणें हारत आहे, दिसतो न दिसतोसा होऊन आहे. असें ह्या तेजाचें तीव्रपण दुःसह, तीक्ष्णपण तें अद्‌भुत असें आश्चर्यजनक (३००) जसें कां महान् अशा प्रखर तेजाच्या अर्णवा(समुद्रा) मध्यें ही अवघी सृष्टी बुडून गेली कीं काय ? का युगांतच जणुं होत आहे, अशा विद्युल्लतेच्या पदरांनीं हे माझे नयनच मुळीं झांकले जात आहेत (कीं काय असें होऊन आहे.) (३०१) किंवा एकी एक तेजच सर्व अशा प्रचंड तेजाच्या ज्वाळाचमुळीं काढून घेऊन त्यांचा ह्या अंतराळामध्यें एक माचच–, माळाच बांधला आहे कीं काय ? असा

तो अहो, आतां तर त्या दिव्य अशा ज्ञानाच्या डोळ्यांनींहीपण पाहावत नाहीं. (३०२) अधिक अधिक शृंगार, शुचि, उज्वल, उत्साहवर्धन, वीर उजाळा, बहुवस असा त्यामुळें अत्यंत दाहकपण येथें धडाडून येत आहे. अहो, दिव्य अशा लोकोत्तर चक्षूनाहीं पण येथें न्याहाळणें, पाहाणें करितां करितां त्रासच येऊन आहे, चक्षु ते दिपत आहेत, दिपले होत आहेत. (३०३) जसें का महाप्रळयसमयींच्या अग्नीचा भडाड जो का काळ–अग्निरूद्राच्या ठायीं गूढ, गुप्त तृतीय नेत्र जों गूढपणानें असलेला त्या तृतीय नेत्राची मढ, कलिका, कलाकृति, रचना फुटली आहे जशी. (३०४) तसा हा प्रकाश सर्वत्र पसरल्यामुळें तर पांचहि अग्नीच्या ज्वाळांचें पुष्कळसे वळसे धडाके पडत असल्यामुळें तर ब्रह्मांडास जणुं अग्नीच्याहि अग्नीचें प्रखरपण, कळेपण येत आहे· ब्रह्मांडांचे जणुं कोळसेच होत आहेत. (३०५)

## स्तुतिस्तव—धन्यवाद ! धन्य ! भाग्यवान ! कृतार्थ प्रशंसा.

अहो ! 'ह्या जन्माचें नवलच एक' असे जे आपण तेजोराशी त्या आपणास मी देखिलें. तुमच्या व्याप्तीचा तसेंच कांतीचा पारच मुळीं लागेना कीं अहो ! (३०६)

**श्लोक १८ वा :**—जाणण्यास योग्य असें श्रेष्ठ ब्रह्मतत्व अक्षर तुम्हीं आहांत; ह्या विश्वाचें परम आश्रयस्थान, आधार तुम्हींच आहांत. तुम्हीं अविनाशीं (अव्यय) शाश्वत असे ह्या धर्माचे रक्षक आहांत, तुम्हींच सनातन पुराण पुरुष आहांत असें मला वाटतें, असे मी मानतों. (१८) (ओव्या ३०७–३०९)

अहो, देवा ! असे तुम्हीं अविनाशी असे, साडेतीन मात्रांच्या पलीकडचे आहांत, ज्याचें घर श्रुति व वेदहीपण धुंडाळीत आहेत, शोधीत असतात. (३०७) जें आकृतीचें, चिन्हाचें, आकाराचें स्थान, का घरच आहे, जें अक्षर सर्व विश्व सांठविण्याचें कोठार निधि स्थान आधार आहे, गहनतेचें अविनाशी, अक्षय्य अक्षर तुम्हींच (विष्णुः लिंग, विभक्ति व वचन यामुळें ज्याला विकृति प्राप्त होत नाहीं असा शब्द) होत.(३०८) तुम्हींच अहो, धर्माचा ओलावा–जिव्हाळा तुम्हींच, नित्य नवे असे अनादिसिद्ध, तुम्हींच मुळीं तें सदतिसावें तत्त्व–अलौकिक पुरुष आहांत कीं अहो ! (३०९)

**श्लोक १९ वा :**—तुम्हीं अमर्याद असे आदिमध्यअंतरहित आहांत, अपरिमित शक्तिमान, अनंत भुजा, चंद्र, सूर्य हेच डोळे आहेत ज्याचे व मुख तें प्रज्वलित अग्नीप्रमाणें असे तुम्हीं, आपल्या तेजानें ह्या विश्वास तापवीत आहांत. (१९) (ओव्या ३१०–३१४)

तुम्हीं आदिमध्यअंतरहित असे अमर्याद आहांत, तुम्हीं आपल्या सामर्थ्यानें अनंत अपार अशा सामर्थ्याचे आहांत. तुम्हींच प्रमाण नाहीं, माप नाहीं, मर्यादा नाहीं असे अपरिमिततेनें विश्व बाहूच बहु बाहू असे आहांत, तसेंच विश्वचरणहीपण आपण अपरिमिततेनें जोडणें, सांधणें, मापणें अशी मर्यादा नाहीं जेथें अशा अमर्यादिततेनें आहांत. (३१०) अहो, आपण चंद्राच्या आल्हाददायक अशा कृपादृष्टीनें पाहातां अथवा सूर्यासारख्या प्रखर, तेजोमय नजरेनें अवलोकितां, जेव्हां का तेव्हांतर प्रसादानें कृपेची व कोपानें रागाची अशी आपल्या दृष्टीची जी लीला आपण दाखवितां. आपण एकावर संसारतमाच्या प्रकृतीच्या डोळ्यानें रुसतां, तर एकाचें कृपादृष्टीनें पाळण करितां. (३११)

## स्वरूपाची भयानकता–स्वरूपाचें अद्भुतपण— 'पश्यामि'=षड्गुणांपैकीं, वैराग्याचें वर्णन (४५० ओवीपर्यंत)

अहो जी, याप्रमाणें मी आपणांस देखत, पाहात आहें हें खरेंच होय. तुमचें वदन हें जसें का पेटलेल्या प्रळयाग्नीच्या लखलखाटाचें जसें का असें आहे. (३१२) वणव्यानें पेटलेले पर्वतच आवरून का कवळून घेतल्यामुळें ज्वाळांचे उमाळे उभडच उठत आहेत जे त्यांना ग्रास करीत आहे, अशी जीभ ती दाढादातांमध्यें लोळत आहे, लळलळत आहे. (३१३) वदनामधील उबाऱ्यानें तसेंच सर्व अंग कांतीच्या प्रभेमुळें विश्व हें तापलें होऊन अतिक्षोभाप्रत, व्यग्रतेप्रत, उद्वेगाप्रत जात आहे. (३१४)

**श्लोक २० वा**— हे महात्मन् ! (**रोदसी** म्हणजे) आकाश व पृथिवी ह्या मधील अंतर तें तुम्हीं एकठ्यानेंच व्यापिलें आहे. तसेंच सर्व दिशाही पण तुमचें हें अद्भुत असें उग्र (**कपर्दि** महादेवाचे रागीट भयंकर शिवाच्या जटेप्रमाणें) रूप पाहून तिन्ही लोक (पृथ्वी, आकाश, स्वर्लोक) अस्वस्थ, व्यथित, भयभीत होऊन राहिले आहेत. (२०) (ओव्या ३१५–३२६)

आतां स्वर्ग–, (द्यौर्लोक) आणि पाताळ, पृथिवी आणि अंतराळ–(अंतरीक्ष) अथवा दशदिशाच मुळीं अवघ्या धुंद झालेल्या असे क्षितिज दिशाचक्र, तेजचक्र हें. (३१५) अवघें तुम्हींच एकठ्यानें जसें का सहज व्यापलें आहे, असें मला एक कौतुकच वाटत आहे. पण गगनादि सहित भयानकें जीं कांहीं तीं तुम्हां-मध्येंच जशीं का बुडून आहेत, आप्लविली आहेत. (३१६) अद्भुत रस तो आश्चर्यकारक, विस्मयोत्पादक त्याच्या लाटांमुळें चौदाहि भुवनांची गठडीच वळली आहे, अशीं वेष्टिलीं जाऊन आहेत. त्याच्या माळाच झाल्या आहेत का जाळीच होऊन आहेत. असें आश्चर्यच एक व आतां येथें मी तें सर्व आकळणें ते का वर्णनास घेणें तें (होईचना) कसचें होणारें ! (३१७)

अशी आपली असाधारण, सर्वांजवळ असलेली, अलौकिक, का लोकोत्तर व्याप्ति, ही मजला आवरिली होईना. आपल्या रूपाचें तें उग्रपण भयंकर रागीट असें अद्भुतासही अद्भुत असें तें साहवेना, आराम, स्वस्थता, आनंद वाटेना. सुख दूर गेलें, पण माझे प्राण तेहीपण कदाचित् आहेत असें झालें आहे. प्राण अगदीं मोठ्या कष्टानेंच मी सांभाळून आहें. (स्वरूपाचें प्रगटपण पुरविण्यास खंतीच एक पण जळल्या सृष्टीवरही पण आयुष्यच पुरविलेलें जसें) (३१८) असें तुम्हांतें अहो देवा, पाहिल्यामुळें भयाचें भरतेंच एक, (हिरवेपणच एक) येऊन आहे. तें कांहीं समजत नाहीं; पण आतां सर्व त्रिभुवन म्हणजे तिन्हीं भुवनें तीं स्वर्ग–मृत्यु–पाताळ (भुः भुवः स्वः) हे तर दुःखाच्या कल्लोळामध्यें एकवटलेल्या अगाध लाटेंत झळंबत आहेत, बुडत आहेत, विरघळून जात आहेत. (३१९) देवा ! एरव्हीं तर तुम्हां महात्म्यांचें जें दर्शन अथवा महात्म्यांनीं आपण कृपादृष्टीनें पहाणें तेथें भयाचें का दुःखाचें तें मेळविणें होत आहे, पण त्याजमुळें असें जें कांहीं होत आहे तें सुख नव्हे व असा विपरीत प्रकार का घडतो ? तें मला समजत नाहीं. (३२०) तुमचें रूप पाहिलें नव्हतें, दृष्टीगोचर झालें नव्हतें तोपर्यंत संसारसुखांत, विषयसुखांत गोडी वाटे, पण आतां आपल्या दर्शनावर त्याचा वीट आला आहे. त्रासच येऊन आहे. (३२१) तुम्हांस देखिलें पाहिलें एवढ्याचसाठीं की तुम्हांला अकस्मिततेनें सहजपणेंच की प्रेमानें मिठी घालावीच, आलिंगन द्यावेंच असे होईल काय ? पण असे मनांत येतें पण त्या भयंकर रूपाचें भय वाटतें) प्रेमानें आलिंगलें नाहीं तर शोकरूपी उत्कंठितपण भीति पुढें करून आहे व अशा शोकसंकटांतच सर्वस्वी जगणें तें कसें बरें व्हावें ? (३२२) म्हणून आतां हा जन्ममरणरूपी संसार मागेंच पडो, हा संसार आम्हांस अनिवारपणानें दुर्धरतेनें आडवित आहे. तुमच्या ब्रह्मत्वाच्या अनावरपणामुळें तुम्हीं आंवरिले जाईनात, घेतले होईनात. (३२३) अशा तऱ्हेनें दोन संकटाच्या मधल्या कचाटींत सांपडल्यामुळें बापुडें हें त्रैलोक्य होरपळून निघत आहे, भाजणुकतेचें होत आहे. असा ह्या येथीलच्या टाकीचा सूचित अर्थ म्हणजे मुख्यार्थ मजमध्यें आला, मजला स्पष्ट झाला आहे. (३२४)

अशा त्या होरपळण्याच्या आगीनें पोळल्यामुळें, तो तर शांत होणे का निववण्यासाठीं समुद्रासच (ज्ञानसागर गंभीर असे श्रीगुरु) येतो. तेथें पाण्याच्या कल्लोळामधील, खळाच्या तरंगामुळेंच कां मध्येंच कीं अहो जास्तीच की भीतो, भिऊं लागतो. (३२५) तसें ह्या जगास–जनांस विश्वास होऊन आहे–तुम्हांस पाहून तर तळमळीत होऊन राहिलें आहे–तळमळत आहे. त्यामध्यें पलीकडील ते देवांचे, सुरांचे समुदाय ते भले असे श्रेष्ठ होत कीं. (३२६)

**श्लोक २१ वा :—**

हे समुदाय तुमचा आश्रय करून आहेत. कांहीं देव भय पावलेले, ते प्रांजळपणें तुमचें गुणगान करीत आहेत. महर्षी व सिद्धांचे समुदाय स्वस्ति क्षेम असो, म्हणून पुष्कळशा स्तुतींनीं तुम्हांस स्तवीत आहेत. (२१)

**'भयानक रस'** (ओव्या ३२७–३३१)

हे स्वतः तुमच्या आंगचे होऊन तुमच्या आंगच्या तेजानें सर्व कर्मांची बीजें जाळून तुम्हां आंत आपल्या स्वाभाविकतेवर सहज सद्भावानेंच मिळत आहेत. (विंशति) (३२७) त्यामध्यें कांहीं कोणी एक सहजच भयभीत, भयानें गंभीर होऊन ते तुमचाच सर्वस्वपणें सन्मुख मोहरा धरून, दोन्ही हात जोडून, तुम्हांस प्रार्थित आहेत, तुमचा धांवा करित आहेत. (३२८) अहो देवा ! आम्हीं अविद्यारूप, ईश्वरासंबंधीं अज्ञान समुद्रामध्यें पडलों आहोंत. विषयरूपी जाळ्यांत–वागुरामध्यें दुर्बोधतेमुळें, निष्ठुरतेमुळें अडकलों आहोंत. **एकीकडे स्वर्ग व एकीकडे संसार अशा दोन्हीं भार्गीं वांटलों गेल्यामुळें,** सर्व अडचणीचें झाल्यामुळें, पेचांत पडलों आहोंत. (३२९) अशी आमची अवस्था झाली आहे व आतां येथें तुम्हाशिवाय कोण बरें आम्हांस यांतून सोडविणारें !!! (३३०)

**महर्षि, सिद्ध, विद्याधर आपला आशिर्वाद मागत आहेत—**

तसेंच (सप्तऋषींपैकीं) महर्षि अथवा विशेष उपदेव जे सिद्ध ते, तसेच विद्याधरांचे नानाप्रकारचे समुदाय तुम्हांशीं कल्याणकारक पुण्य, कुशल, मंगल, अनुमोदन, चर्चा, भाषण, फिर्याद, वृत्रांत म्हणजे बोलणें बोलत आहेत, आशिर्वाद मागत आहेत, तुमचें स्तवन करीत आहेत : (मंगल कार्यारंभीं 'स्वस्ति' अशा शब्दांचें उच्चारण–पुण्याहवाचन इ०) करीत आहेत. (३३१)

**श्लोक २२ वा**—रुद्र, अकरा ही संख्या, बारा आदित्य, आठ वसु, (पावक इ.) साध्य देव, विश्वदेव (अग्नि देवता), अश्विनौ देव, मरुत (एकुण पन्नास वायुदेव) पितर, गंधर्व, यक्ष, असुर व सिद्धांचे संघ, समुदाय हे विस्मित होऊन तुम्हांस पहात आहेत. (२२)

(ओव्या ३३२–३३७)

**दैविकी महामूर्ति अवलोकन–, नमस्करण—**

हे अकरा रूद्र व बारा आदित्यांचे समुदाय, अष्टवसु, सूक्ष्म व मोठ्या योग्यतेचे (बारा) साध्यदेव, (अनेकत्व, विश्वचक्षु) अश्विनौदेव, (सभ्यस्य) विश्वेदेव, साठ विभव (प्रभुत्व, सामर्थ्य, माहात्म्य, ऐश्वर्य) देव, (दश देव, पंचप्राण, पंच उपप्राण) वायुदेव इत्यादि. (३३२) तसेंच पितर, गंधर्व, पलीकडील ते यक्ष-रक्षोगण सर्व, जेथें महेंद्र हाच मुख्य देव आहे, अथवा सिध्दादिक हे आहेत. (३३३) असे हे अवघे आपआपल्या लोकीं ही दैविकी महामूर्ति अवलोकण्यास आपलीं मस्तकें नम्र करून, विनीत म्हणजे (खालीं करून), अति उत्सुकतेनें उत्कंठित होत्साते पाहात आहेत. (३३४) असें पाहातां पाहातां, क्षणोक्षणीं विस्मित होऊन हे प्रभुजी ! तुम्हांस अंतःकरणामध्यें ओंवाळीत आहेत. (३३५) ते जयजय ! अशा योग–घोष नादानीं, मंजुळ शब्दांनीं सर्वेच्या सर्व एकवीस स्वर्ग गाजवीत आहेत, व गुण श्रेष्ठ असे बरवे गुणगान करीत करीत करसंपुट जोडलेले दोन्ही हात आपल्या ललाटावर ठेवून नमस्कार करीत आहेत. (३३६) त्या विनयद्रुमाच्या आडवषाडव अरण्यामध्यें सात्विकांचा वसंतकाळ–स्वाभाविक मानसिक गुण जो सत्व तो प्राप्त झाला, म्हणून करसंपुट पल्लवामध्यें तूं फळच एक होतास. (३३७)

**श्लोक २३ वा :—**

हे महत्‌रूपा ! हे महत्तत्वबुद्धि रूपा ! हे महाबाहो ! हे विश्वरूपा ! तुमचें रूप व्यापक असें, अनेक वदनें, अनेक नेत्र असलेलें असें तें, त्यास अनेक (बहु = अनेक, पुष्कळ, विपुलता, दाट) बाहु, अनेक (उरू, ऊरू) मांड्या व पाय आहेत; त्यास अनेक उदरें आहेत, त्यास अनेक कराल म्हणजे अक्काळविक्काळ दाढा आहेत. त्या पाहून लोक भयभीत झाले आहेत. त्यांच्याप्रमाणेंच मीहीपण भयभीत झालों आहें, अस्वस्थ झालों आहें. (येथें हात शब्दाचा अर्थ संख्यावाचक तसा बाकीचे जे वक्त्र, नेत्र, ऊरू, पाद, उदर, दंष्ट्र इत्यादि शब्दांचे अर्थ ते संख्यावाचक का कसें तें होतात ? ) (श्लोक २३ वा ओव्या ३३८–३५२)

**विश्वरूपांतर्गत** हे रुद्र जय जय ! हे आदित्य जय जय ! हे अष्टवसु जयजय ! साध्यदेवा जयजय ! आश्विनौदेव जय जय ! हे मरुतदेव जय जय ! हे उष्मप पितर जय जय ! गंधर्व यक्ष सुर सिद्धसंघाः जय जय !!

आज डोळयांना भाग्य, ऐश्वर्य, गुण येऊन आहे. मनास पुण्यपावन अशा सुखाचा सुकाळ झाला आहे. अहो, ते लोचन डोळेच मुळीं ( देवर्षि, साध्यदेव, अश्विनौदेव, सिद्धदेव ) वगैरे दैववान् ! त्यांना जय जय ! कारण त्यांनीं तुमचें अगाध व अद्वितीय असें विश्वरूप दर्शन दृष्टीचें केलें आहे, पाहिलें आहे. (३३८ ) तिन्हीं लोकीं व्यापक असें हें रूपडें पाहातांना तर सर्व देवांनांही धाक (वचक) बसतो. असें ह्या विश्वरूपाचें तें सन्मुखपण मोहरेपण भलत्यासही लाभणारें कसचें ! (३३९)

अहो हे विश्वरूपा अनंत भुजा ! आपणास नमस्कार असो जय जय असो ! हे विश्वरूप दर्शन !!! असें एकच रूप–रूपडे, पण चमत्कारिक व विचित्र अशीं (भयानक) भयंकर वक्त्रें ( तोंडें, वदनें) असलेले, बहु लोचनांचें लोचन = नयन = डोळा, मार्गास लावणें, नियम. नेत्र = डोळा, रथ अवलोकनशक्ति, बुद्धि, मत दर्पण.) पुष्कळ डोळे असलेलें असें ; अनंत बाहु, शस्त्रयुक्त असलेले असे अनंत हात. (मी पहात आहें. (३८०)

**हे विश्वरूप दर्शन ! जय जय !**—ह्या विश्वरूपास अनेक सुंदर–चारू मांड्या, बहु बाहु, बहु चरण, अनेक हातपाय, बहु दंष्ट्रा (दांत दाढा), बहु उदर व नाना प्रकारचे वर्ण (रंग, स्तुति). प्रत्येक वदनास आवेशाचें मातलेपण उन्मत्तपण तें येऊन आहे. (३४१) महाकल्पाच्या अंतीं रागावलेल्या यमानें जेथें तेथें, जिकडे तिकडे प्रळयाग्नीचे भडकेच–आगव्याच पसरल्या आहेत जशा, (उजिति आंबुखिली). (३४२) प्रत्येक मुख जणुं काय प्रळय रुद्राची, शंकराची यंत्रेंच म्हणजे साधनेंच अथवा प्रळय भैरवाचीं क्षेत्रें म्हणजे समुदाय (टोळया) का युगांचा अंत करणाऱ्या शक्तीचीं भांडींच–अग्निअस्त्रेंच प्राण्याच्या नाशाकरितां खिचडीकरितां येऊन आहेत, प्राप्त झालीं आहेत. (३४३) त्याप्रमाणें ज्यात्याकडे जिकडे तिकडे तुमचीं हीं प्रचंड वक्त्रें जसें का सिंहच दरीमध्यें उफाळत आहेत, असें तुमचें दर्शन म्हणजे दांत रागीट असें (३४४) अहो, काळरात्रीच्या अंधारामुळें जशीं घातक भूतें, संहार करणारे ग्रह, नाश करणारीं पिशाच्चें रात्रीं उल्हासत बाहेर निघतात, तशा तुमच्या वदनामध्यें प्रळय रुधिरानें किटलेल्या दाढा भयंकर दिसत आहेत. (३४५)

असें हें असो ! पण काळानें रणच आवंतिलें, आरंभिलें–बोलाविलें आहे. येथें तर सर्व संहारामुळें मरणच मातले आहे, तसें तुमच्या वदनामध्यें अति भयंकरपण आहे. (३४६ ) दीनवाणी ! बापुडी ! अशी ही लोकसृष्टि कदाचित किंचित नजर टाकून पाहिली तों ती तर अहो ! दुःखरूपी यमुना नदीच्या तीरावरील वृक्षाप्रमाणें करपलेली दिसत आहे कां झाडाप्रमाणें स्तब्ध होऊन राहिली आहे अशी भासत आहे. (३४७)

तुम्हीं म्हणजे प्रत्यक्ष महामृत्यूचे सागरासारखे अहांत व आतां ही त्रैलोक्य जीवित नौका—त्यामध्यें शोकरूपी वादळाच्या लाटांमुळें, (दुर्वाताच्या लहरीमुळें) हेलकावे खात आहे. (३४८) (अर्जुन म्हणतो, येथें आतां तुम्हीं देवांनीं कदाचित् रागानें म्हणणें केलें कीं, अरे! ह्या (लोकांशीं,) लोकांच्या भयाशीं (सुखदुःखाशीं) तुला काय कर्तव्य आहे? तुला काय करावयाचें आहे? तूं आपला एकाग्रतेनें–चिंतन आराधनेचें–ध्यानाचें [विश्वरूप दर्शनाचें (धन्य)] सुख हें भोगून ऐस. (३४९) [(पण अहो देवा, तसें नाहीं.) येथें तर तुमच्या रूपाची (लोकसृष्टीस) लोकांनांच फक्त भीति वाटते आहे– अस्वस्थता वाटते आहे, एवढेंच नसून मलाही आपलें भयंकर रूप पाहून भीति वाटते आहे. भीतीमुळें माझे प्राण थरथर कांपत आहेत. येथें लोकांचें निमित्त पुढें केलें आहे, (कीं त्यांनां लोकांना–भीति वाटतें) पण खरें पहावें तों माझेच प्राण भीतीनें थरथर कांपत आहेत.] लोकांचें सामान्यपणें मध्यम लोकींचें म्हणजे मृत्यु लोकींचें असणें तें सामान्यपरत्वें करून एक निमित्तच घेणें होत आहे (माझ्या व्यथितपणास,) आड लपावयास, पण अहो! येथें तर माझेच प्राण थरथर कांपत आहेत! (३५०)

अर्जुन म्हणतो आहे की ज्या मला (संहाररुद्र) प्रळयरुद्र म्हणजे विश्वाचा संहार करणारा शंकर भीतो (वासिपे) तसेंच माझ्या भीतीनें यमसुद्धां लपून बसतो, तो मी येथें अंतर्बाह्य थरथरां कांपत आहे, दुःख करीत आहें असें तुम्हीं विश्वरूपांनीं केलें. (३५१) पण अहो बापा, ही महा (मोह) मारी, विसूची नवलच अशी हिजला जरी का विश्वरूप हे नांव आहे, तरी ती आपल्या भयानकपणानें भीतीसही हार खावयास लावत आहे ते ती आपल्या भयानकपणानें भयासच पराजय देत आहे–भयास कमीपणा आणीत आहे. (३५२)

**श्लोक २४ वा**— हे विष्णो! हे विश्वरूपा! आकाशास भिडलेलें आहे असें दीप्त अनेक वर्णांचें अनेक रंगांनीं प्रकाशमान आपलें आनन तें किती मोठें आहे, तें गगनाच्या मोठेपणावर आकळत नाहीं. डोळे विशाल असे दीप्त धगधगीत, प्रखर तेज असलेले अशा तुम्हांस पाहून माझा अंतरात्मा भयभीत झाला आहे–मजला धैर्य येत नाहीं, येईना. मजला अंतःकरणाची स्थिरता का शांति येईना. (२४)

(ओव्या ३५३–३७४)

अहो, हटातटानें महाकाळाबरोबर भांडून, जिंकून आहेत, तशी (वक्त्रें) तीं कांहीं किती एक रागीट मुखें, त्यांनीं तर वाढून जाऊन आकाशही पण थोडेंच असे पायातळींचें केलें आहे. (३५३) ही तर गगनाच्या मोठेपणामुळें गगनास आकळेना–त्रिभुवनामधील वाऱ्यांनाही पण वेढून घेतां येईना, (आवरेना, वेष्टिली जाईना) ह्या मुखांच्या आपल्या वाफेनें तर आगीही कां अग्निही जळत आहे, पहा कसा तो धडाडित आहे कीं! (३५४)

## रौद्र रस (विश्वरूपाचें उग्रपण)

तसेंच मुख तें एकसारखें एक नाहीं, येथें रंगारूपांत भेद आहे, अहो! प्रळयामध्यें तर वन्हीही पण ह्यांचेंच की साह्य घेणारा होतो ना! (३५५) ज्याच्या आंगीचें तेज, दीप्ति, कांति, शोभा, (अग्नीचा) प्रकाश इतका प्रखर कीं त्रैलोक्याचीहीपण भिस्रीच का राखोंडीच होणारी; जशीं का (व्याघ्राननं) तीसहीपण तोंडें आहेतच, तसेंच त्या तोंडांमध्यें दांत व दाढाही. (३५६) अहो, कसा वाऱ्यासच धनुर्वात झाला, समुद्र की अहो! महापुरामध्येंच येऊन पडला. अहो, वडवानळ जरी अति अग्निवत् तरी त्यासही विष–अग्नि जो तो त्यासही (वडवानळासही) हारी देण्यास, मारण्यास प्रवृत्त झाला. (३५७) हळाहळ तें आगीच प्यायलें आहे जसें, मरण तें मारास, मरणासच, मारण्यास प्रवर्तलें, तसे येथें ह्या संहार–तेजास वदन की आलेलें पहा! पाहा तें नवलच एक. (३५८) पण कुठच्या त्या मानानें विशाळपण तें पहावें तों अंतराळ तुटल्यास जसा का (नभास) आकाशासच वेढा पडलाच, पडावा, नभ वेष्टिलें जावें, मिठी पडावी, आवरण

पडलें आहे. (३५९) अथवा असें झालें आहे की वसुंधरा बगलेंत मारून (काखेंत घालून) जेव्हां हिरण्याक्ष विवरांत (महाबिल=आकाश) रिघाला, निघाला, शिरला, तेव्हां पाताळांतील महादेवांनीं हाटकेश्वरांनीं त्यांनीं पाताळीचें कुहरच (गुहा, कंठ, छिद्र) उघडलें जसें. (३६०) तसा वदनांचा विकास (वाढ, उमलणें) व विकाश (प्रदर्शन, उल्हाम, प्रसिद्धि, विस्तार) यामध्यें जिव्हाचा आवेश अधिक तेथें विश्व पुरेना म्हणोन (पुरतें होणारें नव्हे म्हणून) सहज कोड कौतुकानें घांस घेतच नाहीं. (३६१) पाताळ व्याळाच्या फूत्कारांनीं विष (गरळ) ज्वाळा ह्या अंबरास आकाशास लागल्या आहेत तशी पसरलेल्या वदनदरीमध्यें तोंडरूपी गिरिकंदर का गुहेमध्यें ही जिव्हा दिसत आहे. (३६२) प्रळय विद्युल्लतेचे झुपके (जुंबाडे, समुदाय) काढून, आकाशांतील बुरुज, राशी, शृंगारल्या तसे आळुवावर ओठावर बाहेर धगधगीत असे दाढांचे आंकडे. (३६३) (ललाटरूपी पटाच्या, उत्तम वस्त्राच्या) खोळीमध्यें जसे का भयासच डोळे मेडसावित आहेत, ते जसे का महामृत्युचे उमाळेच, लोट, प्रवाह, कडवसे, टिपके, जसे होऊन राहिले आहेत. (२६४) असें भयाचें सोंग, महत्व दावून, महत्व स्वीकारून, वाहून, येथें कसलें तें काज निपजवूं पाहात आहेस, तें समजत नाहीं. पण मजला तर मरण भयच आले आहे. येथें मरणच एक असे भय येऊन आहे. (३६५) देवा! विश्वरूप (दर्शन) पाहावयाचें डोहळे केले, त्याचीं प्रतिफळें का फेड परिणामास आली. अहो बाप्पा! विश्वरूपा तुम्हांला पाहिले, देखिले व आतां डोळे निवावेत तसे निवाले आहेत. (३६६)

अहो बापा! दर्शन देखणें झालें, डोळे निवावे तसे निवाले आहेत : अहो पार्थिव, माती, पृथ्वी, अंश, तर जायचाच! या देहा–पार्थिवाची काकुळती कोणास बरें आहे? याबद्दल कोण बरें काकुळती करणारें? पण चैतन्यही माझें टिकतें कीं नाहीं अशी भीति वाटते. कदाचित् माझें चैतन्य, सजीवपण, जीव, ज्ञान, तेंहीपण वांचेल की न वांचेल असें होऊन आहे. (३६७) एरव्हीं भयामुळें आंग कांपत आहे, मन हें आगळें असें विलक्षणतेनें (क्षणभर का होईना) पण तप्त, दुःखी झालें आहे; बुद्धि ही भयभीत झाली आहे, भीति घेऊन आहे, बुद्धि ही भीते आहे, अभिमान विसरला आहे, अहंभाव गळाला आहे. (३६८) पण आनंद कळा असा, जो आनंदाचा कळा तो अंतरात्मा त्यासही कांपरें भरलें आहे; आनंद कोशास –माझ्या आनंदरूप अंतरात्म्यासही शहारे आले आहेत, कंप का शिसारी आली आहे. (३६९) साक्षात्काराचा छंद, नाद, ध्यास, प्रत्यक्ष ज्ञान, अनुभव, प्रगटतेचा असा प्रताप, त्यानें तर ज्ञान जागृत करणारा उपदेश का बोध देशधडी केला, गुरुशिष्य संबंध येथें कदाचितच वाखाणणारा, स्तुतीनें नांदणारा असा आहेसा होईल. तुमच्या ह्या दर्शनानें देवा, माझें जाणीवतेचें ज्ञान पार मावळलें. व्याकुळता ह्या पार्थिव [पार्थिव पुत्र=सूर्य : पार्थिव पुत्रापौत्र=युधिष्ठिर] मातीचे, पृथ्वीचे, कश्यप, राजा का पृथ्वीवासी शरीर, पृथ्वीचा विकार, नामकरण संस्कारांतील अग्नि देह मातीचा ती देशपार झाली, विकलता येऊन आहे, देहबुद्धिच पार लय पावली–, बोध देहातीत झाला. (३७०) देवा! तुमच्या ह्या दर्शनानें देहास विकलपण आलें आहे, येथें देह सांवरण्यासाठीं मी धैर्यच आपुलेसें करीत आहें. (३७१) माझें माझें म्हणणें जें तेथीलच्या धर्मानें हार खाल्ली आहे. मीपण तें, तेथें मी का माझें असें, नांवाचेंसुद्धां उरलें नाहीं. माझ्या व्यक्तिपणाच्या नांवानें माझें धैर्यच नाहींसें केलें. त्याहीवर विश्वरूप दर्शन झालें. अहो! भलें भलें कीं ह्या उपदेशांतच सर्वथैव मी गुंतविला गेलों आहें; उपदेशांतच मी गुरफटून आहें. (३७२) बापुडा हा जीव! फुरसत, एकांत विसांव्यासाठीं पुष्कळशी धांवाधांव करीत आहे. कवणीकडेही, कोठेंही, कोणतीही, कसलीही आनंदाची सोय म्हणून त्यास लाभेना. (३७३) देवा, तुमच्या ह्या विश्वरूपाच्या महामोहामुळें–महा–मारी मुळें महान् मोह–मारीमुळें जीवित चराचरीं गेलें आहे. अहो, जी नच बोलावें तरी काय करावें! हे श्रीमहाविष्णो! नच बोलूं तर काय करूं! कशानें बरें हा जीव जगणारा होईल! जीव हा उगा कसाही राहीचना. (३७४)

**श्लोक २५ वा :—**

तुमचीं मुखें, वदनें, दांत, दाढा, मुळें विक्राळ अशीं व प्रळय काळाच्या अग्निसारखीं दिसणारीं तीं पाहून मी दिङ्मूढ झालों आहें. सुख का शुद्धि का मनाचें स्वास्थ नाहींसें झालें. करितां हे देवदेवेश, देवाधिदेवा, जगन्निवास, घराचे मालक, जगाचे आधार, लोकाचें राहण्याचें ठिकाण=आपण आतां मजवर प्रसन्न व्हा! (स्वभाव सृष्टीचें दान मजला द्या.) (२५) (ओव्या ३७५–३९१)

अहो, महाभयाचें एक भांडेंच फुटलें आहे, त्यामधून अनेक भयेंच की पुढें झालीं जसें अशीं वितंडमुखें तीन काळ्यांची मोठीं कुळपी मुखें डोळयापुढें अखंड पसरलीं आहेत, (असें अर्जुन पाहात आहे.) (३७५) हें असो; पण दांतदाढांची दाटी दोन्हीं (दों दों) ओठांनींही कांहीं झांकवेना प्रळयकाळच्या शस्त्राचें दाट काळ्याचें कुंपणच एक जसें. (३७६) अहो! तक्षकासच कारागीर, सुतारासच, विश्वकर्म्यासच सर्पाच्या राजासच विष भरलें, प्रळयकाळाच्या रात्रीस भूत संचरलें, वज्राग्नि अस्त्र हेंच आग्नेय (ज्वालाग्राही) अस्त्र जसें का प्रेरिलें आहे, टाकिलें आहे. (३७७)

अशीं तुमचीं प्रचंड वदनें, मुखें वक्त्रें यांहीवर तेथील आवेश हा तर बाहेरच वाहात आहे, बाहेरच सांडत आहे. आतां जसे का मरण रसाचे लोंढेच आम्हांवर येत का येऊन आहेत. (३७८) सर्व कांहीं आटोपतें, आवरतें घेण्याच्या वेळचा, संहार-समयींचा उष्ण वायु–चंडानिळु, झंझावात प्रचंड वारा–तसेंच महाकल्पांतींचा प्रळय अग्नि या दोहोंचा मेळ, मिलाफ जेव्हां का होतो तेव्हां तर काय बरें नच जळणारें! तेथें जळत नाहीं–नव्हे असें कांहींच नाहीं! (३७९) तशीं तुमचीं संहार करणारीं वदनें पाहून तर आम्हांस धीर पारखा होत आहे, धैर्य खचत आहे, आमचा धीर नष्ट होत आहे व आतां मीतर दिशाच मुळीं भुललों, मला दिशा समजेनात. मी आपल्या स्वतःलाही कांहीं जाणेना, नेणेना, मी आपल्या सर्वस्वासहीपण जाणेना. (३८०) थोडें थोडकेसें विश्वरूप ह्या डोळयांनीं देखिलें, पाहिलें; त्यामुळें तर सुखाचें आवर्षणच पडलें, सुखाचा दुकाळ पडला, आतां अस्ताव्यस्त करणारें असें हें आपलें स्वरूप 'जापाणि' आवरतें घ्या, आटोपतें घ्या. (३८१) अहो, असें सुखास अस्ताव्यस्त का सुखाचें आवर्षणच करितसां आपल्या दर्शनावर तुम्हीं हें जर मला जाणवलें असतें पण ही गूढ गोष्ट तूं कां बरें बोलतोस? नीटसें जाणल्याशिवाय म्हणून आतां हे स्वामिन् एक वेळ ह्या स्वरूप प्रळयापासून माझे प्राण वांचवा! मला जीवेंप्राणें वांचवा. (३८२) अहो! अनंता, तुम्हीं आमचे स्वामी, गोसावी आहांत की? म्हणून आडोसा आडघाला व हा महामारीचा पसारा आवरा : अहो देवा! आतां आमच्यावर कृपा करून हें अनंत स्वरूप–विश्वरूप आवरावें, ही माया आटोपती घ्या, मला ह्या महामारीच्या प्राणसंकटांतून सोडवा. (३८३) अहो, सकळ देवांच्याहि (पेक्षां पर म्हणजे श्रेष्ठ) देवा! देवांच्याही पेक्षां श्रेष्ठ अशा परदेवते–ब्रह्मदेवते! तुम्हीं विश्वीं वसणारें चैतन्य आहांत, हें उलटें विसरलांत वाटतें! जें हें उपरतें विरक्तीचें असें जें तेंच की आपण मुळीं संहारण्याचें करीत आहांत. (३८४)

म्हणून हे देवराया! लवकर प्रसन्न व्हा! आपुली ही माया आवरा! मला महाभयापासून सोडवा! मजला महाभयांतून बाहेर काढा! असें हें (३८५) माझें म्हणणें परमसीमेचें असें व हेंच पुन्हः पुन्हः तुम्हांस काकुळती येऊन मी म्हणत आहें. अहो, हें विश्वमूर्ति मी असा कसा भेकड झालों आहे हेंच मला समजत नाहीं. (३८६) मागें जेव्हां का अमरावतीवर शत्रु चाल करून आला, तेव्हां मी एकट्यानें तो छापा का ती धाड परतविली. अहो! काळासही तोंड देण्यास (का काळाशीं दोन हात करण्यास) मी भीत नाहीं. (३८७) पण हें काम कांहीं तशा प्रकारचें दिसत नाहीं. येथें तर मृत्युवरही चढाई करून (कां मृत्युसही न करवे देवा) तुम्हीं आमचाच की सकळ विश्वासकट घोंट करीत आहांत. (३८८) पण ही वेळ

कांहीं प्रळयाची (नव्हती) नाहीं. अहो, प्रळयाची काळवेळ नसतांना मध्येंच (गोखा) अवचित तुम्हीं काळ भेटलांत, तुम्हीं काळाशीं मिळून गेलांत. म्हणूनच हा त्रिभुवन गोल दीनवाणा असा अल्पायु झाला. (३८९) काय विपरीत असें माझें भाग्य आहे कीं! अशा ह्या विपरीत दैवास शांत करतां करतांचमुळीं एक विघ्नच उठलें (शांति मिळावयाला गेलों तों हें विघ्नच) उभें राहिलें. अहो, काय ही कटकट कीं! हें विश्व आतां गेलें, गेलें!! तुम्हीं आतां ग्रासणेंच एक करूं लागलां आहांत कीं. (३९०) हें कांहीं असें नाहीं; पण अहो! रोकडे असेंच प्रत्यक्ष तुम्हीं पुष्कळ वदनें पसरून ही सैन्यें चहूंकडून कवळीत आहांत. (३९१)

**श्लोक २६ वाः—**

हे धृतराष्ट्राचे पुत्र, सर्व अवनिपाल संघासहित, तसेंच भीष्म, द्रोण तसेंच कर्णहीपण हा, आम्हांस सहाय्य असणाऱ्या कां आमच्या मधील सर्व मुख्य मुख्य योद्धयासहित की (तुमच्या मुखांत शिरत आहेत, गेले, मेले, पाहा!) (ओव्या ३९२ ते ४०९)

ते कौरवकुळींचें वीर, आंधळा धृतराष्ट्र, त्याचे कुमार हे नाहींसे होत आहेत. अहो! हे तर तुमच्या वदनामध्यें सहपरिवार गेले, गेले कीं! (३९२) तसेंच जे जे देशोदेशींचे राजे यांचे सोबतीनें आले आहेत, त्यांचें कांहीं एक सांगण्यास कोणीही मागें उरणार नाहीं कीं असें तुम्ही सरकटित सरसकट कवळीत आहांत. (३९३) मदमस्त हत्तींच्या समुदायाचे जीवन घटक तेथें घटकोघटकीं जीवित आटणें होत आहे, ते तर माहुताच्या टोळ्यांनाहीं मिठी देऊन आहे. (३९४) जंत्रावरील लोक पायदळाचे समुदाय, झुंडी भारच्या भार अनेकच्या अनेक असेच मुखामध्यें हारपत आहेत. (३९५) शस्त्रें हीं कृतांताचीं भावंडेच जशीं, अशीं तीं कोट्यावधि तुम्हीं आपल्या एकाच मुखानें गिळीत आहांत. जें मुख एकच पण सर्व विश्वासही गिळणारे असें. (३९६) चतुरंग सैन्य—हत्ती, घोडे, पायदळ, रथ तुम्हीं गिळीत आहांत. अहो! घोडे जुंपलेल्या रथांना तर तुम्हीं दांतही हलवानात. ते तर एकदम गिळीत आहांत. अहो हे! परमेश्वरा! कसें बरवें संतोषाचें तुष्टलेपण तुम्हांमध्यें येऊन आहे! (३९७) फार काय, पण सत्य—शौर्य—निपुण असे अद्वितीय भीष्म, तसेच ब्राह्मण द्रोणाचार्य असे हे दोन्हीं तुम्हीं कटकटा!! ग्रासिलेत कीं. (३९८) अहाहा! सूर्याचा मुलगा कर्ण तोहीपण तेथें गेला! गेला!! आमच्या सगळ्याचाहीपण आपण केरच काढून टाकिला. आम्हांस तर केरासारखें उडविलें—नष्ट केलें असें मी पहात आहें. (३९९) कटकटां घातया! अहाहा! हाय! हाय! हे ब्रह्मदेवा! मी तर ह्या कृपाप्रसादानें कां अनुग्रह उपदेशासाठीं प्रार्थना करून ह्या अवघ्या बापुड्या जगाला मरण कीं, अहो! आणिलें. जसें विश्वरूप दर्शनाची इच्छा करून कोण हा कठीण समय ह्या जगावर आणिला आहे! (४००) यापूर्वीं मी कांहीं विचारल्यावर तुम्हीं कांहीं थोड्याबहुत उपपत्ति, विभुति, ईश्वरमूर्ति सांगितल्या व आतां तर हा ईश्वर तेवढ्याच विभूतींनीं पूर्ण समजला नाहीं, या हेतूनें पुन्हां विभूति विचारण्याचा हट्ट धरिला. (४०१) म्हणून प्रारब्ध, भोक्तृत्व, भोग हे त्रिशुद्धि चुकत नाहीं, होणारा सारखी बुद्धि होते, लोकांनी माझ्याच कपाळीं दोष देण्याचें करावें, दोषाचें खापर फोडावें, पिटावें, तें टळेल कसें! (लोकांनीं मलाच दोष देऊन माझ्याच नशिबीं ओरडावें हें कसें बरें टळेल)? (४०२) पूर्वीं अमृतही हाता आलें—पण देव नसतीच तृप्त झाले, उगीचच उगे राहिले व देव नव्हत जे तेच मुळीं उगवले. वर मग श्रीहरीनीं कालकूटच जसें का उठविलें. (४०३) पण तेंचमुळीं एकपरीनें थोडेच असे एकपक्षी झाल्यानें तेथें प्रतिकाराचा उपाय केला तर होण्याजोगा होता. पण थोडे असे जे तेंच प्रतिकारास माजवण झालें—कुडीचमुळीं आत्म्याविषयीं शोक करूं लागली. तेथें मग अहो! श्रीशंभूनीं त्या विषाच्या संकटांतून, संकटामधून कसें तरी सोडविलें, संकट निवारिलें, निस्तरते झाले. (४०४) आतां हा तर जळता वाराच आहे. तो कसा बरें आवरेल की वेढिला जाईल, विषानें भरलेलें गगन तें कुणास बरें गिळवेल का बरोबरीचें करील? आंवरितां

कां झेंपतां येईल! महाकाळाबरोबर अंगबळानें खेळेल असा कोण आहे? असें सामर्थ्य कां आंगबळ कोणाला आहे जो का काळाबरोबरही खेळेल? (४०५) असा अर्जुन दुःखानें शिणला. त्याच्या जीवाचा जसा अंतच होत आहे, अशा शोकामध्यें तो पडला. त्यानें जीवाचा अंतच मांडला, तो शोकच करून आहे; पण प्रस्तुत देवाचा अभिप्राय हेतु (प्रीतिवर्धनाची गोष्ट ती कारण ते हेतु) तो त्यानें ओळखिला नाहीं–, त्यास जाणवला नाहीं. (४०६) तो तर मी मारता (का, मी मारीन का मी मारणारा) व हे कौरव (मरते, मरतील) मरणारे अशाच वृत्तींनीं गुरफटून होता. तो त्याचा मोह फेडण्याकरितां श्रीअनंतांनीं आपलें निज नित्याचें स्वरूप त्यास दाखविलें. (४०७) बारे अर्जुना! येथें कोणी कोणाला मारत नाहीं, येथें मीच हे सर्व आवरतों, संहारतों, हें विश्वरूपाच्या निमित्तानें देवदेवांनीं प्रगट केलें, स्पष्ट केलें. (४०८) हें न कळल्यामुळें देहबुद्धिमुळें तर, अर्जुनाचें कांपरें वाढतच होतें, तो व्यर्थच शिणत होता; पण तें त्याला समजेचना व त्यामुळें तो तर नव्हताच की असा भयकंप वाढवून आहे. (४०९)

**श्लोक २७ वा :**—तुमच्या मुखांत ते अतित्वरेचे होऊन जात आहेत, शिरत आहेत—कराल भयानक असे दांत असलेलीं ती तुमचीं मुखें–कांहीं तर दातांच्या सपाटींतून विलग्न झालेलीं, निसटलेलीं ती उत्तम अशा अंगासहितही चूर्णित चुरा पीठ होऊन आहेत. (२७) (ओव्या ४१०–४२२)

तो म्हणूं लागला कीं, पाहा पाहा आभाळेंच जशीं गगनीं लय पावावींत तशीं हीं सैन्यें (असि व कवचासहित) हतियार व रक्षणाचे साधनासहित मृत्युमुखीं जाऊन पडलीं, (४१०) जसा कां कृतांतचमुळीं ब्रह्मकल्पाच्या म्हणजे महाकल्पाच्या शेवटीं, ह्या सृष्टीमध्यें का सृष्टीवर रागावतो, तेव्हां तर पाताळासहित एकवीस स्वर्गासहि घट्ट मिठी देऊन असतो. (४११) अथवा दैव उदासीन झालें म्हणजे द्रव्यसंग्रह करणाराची–कृपणाचीं तीं वैभवें कां ठेवेंच मुळीं जेथच्या तेथेंच नाहींशीं होतात, लयास जातात. (४१२) अहो, कसें कर्म आहे पाहा कीं, येथें एकत्र झालेली सैन्यें उठाव घेऊन ह्या मुखामध्यें प्रवेश करणारी का झालेली, झाली, गुंतली, गेली, एकहीपण येथें त्या तोंडातून सुटत नाहीं. (४१३)

अशोक वृक्षाचे कोंभ, कोंभारे, अग्र भाग जसे उंटानें चघळावेत तसे लोक कीं मुखामध्यें वायांच गेले. (४१४) पण सिसाळें म्हणजे मस्तकें मुगुटांसहित ही दाढांच्या सांडसामध्यें, चिमट्यांत पीठच होऊन गेलीं, अशीं दिसत आहेत. (४१५) तीं मस्तकें रत्नेंच की दांतांच्या सांपटीत तुकडे झालेलीं तीं जिभेच्या बुडाशीं लागलेली, त्यांनीं दातांचीं अग्रेंच,–(टोकेंच भरलीं)–माखलीं गेली. (४१६)

येथें असेंही म्हणणें होत आहे कीं विश्वरूपकाळानें लोकांचीं बळें व शरीरें ग्रासून टाकिलीं, हरण केलीं. तरी जीवित्वरूपी देहींचीं तीं मस्तकें अवश्यमेव राखिलीं सांभाळीलीं. (आत्मा देहींच्या शरीरांतील जीवित्व, जीव, देहींचीं, सालें, सालपटें तर अवश्य रक्षण केलीं गेलीं, वांचविलीं गेलीं.) (४१७) शरीरामधील चोखडी उत्तम अशी खरेपणाचीं उत्तम आंगें, मस्तकें होतीं, म्हणूनच तर तीं त्या महाकाळाच्या तोंडांतूनही शेवटीं उरलीं, जगलीं, वांचलीं. (४१८) यावर अर्जुन म्हणतो, कीं, अहो! असें हें काय आपलें म्हणणें! पण जन्मलेल्या प्राण्यास दुसरा मार्गच–आनंदाचें ठिकाण नाहीं. जग हें तर आपोआपच आपल्या वदनरूपी डोहामध्येंच कीं संचरत आहे, जात आहे. [संगें ज्याच्या सूत न जळे; हिरा ठेवितां ऐरणी। वांचे मारितां जो घणी ॥ १ ॥ तोचि मोल पावे खरा। करणीचा होय चुरा ॥ २ ॥ मोहरा तोचि अंगे। सूत न जळे ज्याच्या संगे ॥ ३ ॥ तुका म्हणे तोचि संत। सोशी जगाचे आघात ॥ ४ ॥] (४१९)

जग तर आपसुकच वदन डोहामध्यें शिरत आहे. ह्या अवघ्या सृष्टि आपोआपच, कीं महाकाळाच्या वदनाच्या वाटेस का शेवटास लागल्या आहेत आणि हा अर्जुन तर जेथच्या तेथेंच स्वस्थ कां उगा राहून देवाच्या चरणीं मिठी देऊन (स्थिरपणें) आहे. (४२०) ब्रह्मा आदिकरून समस्त ते उंचा (भक्ति झाली

उंचा) मुखाकडे धांवत आहेत. दुसरे सामान्य मृत्युलोकींचे ते तर अलीकडेच ऐलीच्या थडिच वदनामध्यें भरत आहेत. वदनाचा आश्रय करीत आहेत. (४२१) आणीक भूतजात प्राणिमात्र ते जन्मल्या ठिकाणींच ग्रासले होत आहेत, पण यांच्या मुखांतून तर कांहींच सुटत नाहीं, हें निःसंशय. (४२२)

**श्लोक २८ वा :**—ज्याप्रमाणें नदीच्या पाण्याचे वेग अनेकसे ते समुद्राकडेसच आपलें मुख करून प्रवाही होऊन द्रवत असतात त्याप्रमाणें हे मनुष्य, मानव, नर लोकींचे वीर तुमच्या ह्या (अभिविजल) पेटलेल्या मुखामध्यें शिरत आहेत. (२८) (ओव्या ४१३–४२४)

(जळप्रळयीं महानदी ओळखतां येत नाहीं, तेथें सर्व पाणीच पाणी) महानदीचे ओघ जसे एकदम सत्वर समुद्राच्या आंगीं मिळून जातात, तसे सर्व बाजूंनीं हें जग तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहे. (४२३) आयुष्य मार्गामध्यें, मार्गानीं प्राणी गण म्हणजे प्राण्यांचे समुदाय अहोरात्रीच्या पायऱ्या करून (सोवाणी–गगनीं) अतिवेगानें मुखासच मिळणें कां मुखमिळणीच ती साधणें करीत आहेत. (४२४)

**श्लोक २९ वा :**—ज्याप्रमाणें प्रदीप्त अग्नि आंतच पतङ्ग वेगसमृद्धतेनें, अतिवेगानें आपल्या नाशाकरितां जातात त्याप्रमाणें लोक हे वेगसमृद्ध होऊन आपला नाश साधण्याकरितांच की तुमच्या मुखांमध्येंच शिरत आहेत. (२९) (ओव्या ४२५–४२६)

गिरीच्या जळत्या गवाक्षामध्यें पतंगाच्या झेपा, उड्या पडल्या होतात, तसे समग्र लोक ह्या वदनामध्येंच की पडत आहेत पहा. (४२५) जेवढे केवढे येथें शिरले ते तांतलिया म्हणजे तापलेल्या लोखंडानेंच की पाणी गिळिलें तसें तेथें वहीवाटीमध्येंही त्याचें नांव, रूप हेंही पुसिलें गेलें–व्यवहाराचीं येणीं जाणीं नामरूप वापरण्याची ती वहिवाटचमुळीं राहिली नाहीं. [तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त लोहावरी। तें भासे नलिनी-दलावरी पहा सन्मौक्तिकाचे परी। तें स्वातीस्तव अब्धि-शुक्ति-पुटकीं मोतीं घडे नेटकें। जाणा उत्तममध्यमाधम दशा सांसर्गयोगें टिके॥ १॥] (४२६)

**श्लोक ३० वा :**—

(१) हे विष्णो! जाज्वल्य अशा वदनांनीं समग्र (समंतात् भागांत) लोकांचा ग्रास करीत करीत–ग्रसमानः (खाण्याच्या, हरण करण्याच्या परिमाणाचें) असे आपण लीला करीत आहांत, परिपूर्ण तेजोमय होऊन तुमचें भास उग्र असे ते संपूर्ण विश्वाला तापच देत आहेत, समग्र जगास तापवीत आहेत.

(२) हे विष्णो! आपल्या पेटलेल्या मुखांनीं सर्व लोकांस गिळण्यास निघालेला तूं सगळीकडून जिभांनीं चाटीत आहांत. तुमच्या उग्र प्रभा, दीप्ति आपल्या प्रखर तेजानें जगाला व्यापून तळपत आहेत. ॥ ३० ॥

(ओव्या ४२७–४४३)

**'बीभत्सरस' :— (हास्यरस**—विकृत विकार पावलेला रस)

अहो, अग्नीमध्यें जें जें पडतें, तें तें भस्म होतें आणि इतुल्याहि माजणानें, भक्षण करण्यानें, इतकेंही खाण्यानें, [एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं (दुसरीकडे) लावणें जसें, वृक्षारोपण, तसें ह्या देहामध्यें होणारें जाणारें जें कांहीं, पूजा संभावनवृत्ति जपन तपन]. (४२७) इतुक्या माजणानेंहिपण कांहीं भूक मंदावली नाहीं, संपली कां कमी झाली म्हणावी असें नाहीं; पण येथें कसें तें भुकेसही तीव्रपण असाधारण असें उदयलें (प्रादुर्भाव समृद्धि प्रभाव वर येणें–मागून येणें) आहे. (४२८) ज्वरांतून उठलेला रोगी मनुष्य जसा का, अथवा दुष्काळ पाहिलेला भिकारी तसा जिभांचा प्रादुर्भाव–प्रभाव लळलळाट ओंठ चाटतांना पाहिला होत आहे, (४२९) तसें आहाराच्या नांवानें तर त्या तोंडापासून कांहींही सुटत नाहीं, कांहींही उरलें नाहीं, अशीं तीं मुसमुसलेलीं भुकेलेपणाची चमचमीत, समसमीत, नवेपणाची नवाई. (४३०) काय

अहो! सागराचा घोटच करावा का भरावा अथवा पर्वताचा घांसच एक घ्यावा, अवघें ब्रह्मांडही दाढेमध्यें घालावें जसें. (४३१) सगळ्या दिशाच गिळाव्यात, आकाशांतील चांदण्या चाटून घ्याव्यात, असें उत्कंठितपण–हांवरेपण का लोलुप्यच एक सर्वथा अहो! तुमच्याबरोबर वर्तत आहे. (४३२) जसा भोगानें काम वाढतो, इंधनानें अग्नीस हकाक चढते–भडकाच येऊन असतो, तशीं खात खातच, वाजतच वाजतचमुळीं तोंडेंही खा खातच आहेत–एकसारखीं खातच आहेत–वाजत आहेत. (४३३)

जसें का वडवानळामध्यें कवठच एक घातलें आहे; असें वदनाच्या जिव्हाग्रीं टेकलें आहे त्रिभुवन, असें एकच वदन, पण केवढें तरी तें पसरलेलें असें आहे. (हत्तीनें जर सबंध कवठ खाल्लें तर जसेंच्या तसेंच त्याचा गोल आकार न मोडतां बाहेर पडतो; पण त्यांत गीर का मगज मुळींसुद्धां नसतो) (४३४) अशीं अपार मुखें–वदनें पण इतकीं तीं जिव्हाग्रीं टेकलेलीं (स्वर्ग मृत्यु पाताळ हे तीन लोक–भुवनें) त्रिभुवनें कसचीं अथवा एवढा मोठा आहार, न मिळतां पुष्कळपणाचे असे परिमाणच भुवनांचे ते वाढविलेले होय; (४३५) अहो! सर्व जग तोंडातील दवाळांच्यामध्यें सांपडलें–बापुडा हा लोक ह्या वदनींच्या ज्वाळांनीं स्वाधीन केला गेला, जशी का मृगें तीं वणव्याच्या वेढलेपणानें पाशांत सांपडलेलीं. (४३६) ह्या विश्वास–जगतास आतां तसें झालें आहे. अहो देव! नव्हे! तर येथें कर्मच मुळीं पुढें झालें आहे. का तर ह्या जगरूपी जळचरांना पकडण्यासाठीं काळानें कर्मरूपी जाळेंच पसरलें आहे. (४३७)

आतां ह्या अंगप्रभेच्या जाळ्यामधून का पाशांतून (वागुर) चराचरानें कोणीकडून कसें निसटावें तें का बाहेर निघावें तें असें झालें आहे!! अहो! ही वदनें–वक्त्रें नव्हत. पण जशी का जळतीं लाक्षागृहेंच म्हणजे जोहारेच (लाक्षा, लिक्षाच, गंडूसा गृध्रसी चमसी मसी) जगास आवडणारी तीं झालीं आहेत. (४३७) आग ती आपल्या दाहकपणानें पोळणें तें कसें होतें का असतें तें कांहीं जाणत नाहीं; पण ज्यास ती लागते तो तर जीवाप्राणासही मुकतो. त्याच्या प्राणाची तर मुळीं सुटकाच होत नाहीं. (४३८) शस्त्र हें माझेनी म्हणजे आपल्या तिखटपणाचें तें, तेथें मरणें तें कसें होतें, दुसरा कसा मरतो तें कांहीं (शस्त्र) जाणत नाही. अथवा आपल्या विषपणानें मरणाच्या माऱ्यास विष कांहीं जाणत नाहीं. विषाचा (कडाका) मारा विष जाणत नाहीं. (४३९) तशी तुम्हांला आपल्या उग्रपणाची आठवणचमुळीं नाहीं, पण तुमच्या ऐलीकडीलच्या मुखामध्यें तर जग हे पेटलेल्या खंडकाप्रमाणेंच झालें आहे, पेटलेला चरच जसा असें जग होऊन आहे. (४४०) अहो! तुम्ही तर सकळ विश्वव्यापक एक 'आत्मा' असे आहांत, तरी आम्हांस कां बरें जसा का (अंतकच अंत करणारा) यमच (शौरी) एक असें होऊन का तसे प्रवृत्त झाले आहांत. (४४१) म्हणून मी तर माझ्या आपल्या ह्या जीविताची इच्छा–आशा सोडली; तुम्हीही हे विश्वरूपा, देवदेवा, पण मीड, संकोच धरू नये; तुमच्या मनीं जें कांहीं आहे तें खुशाल बोलावें. (४४२) अहो बाप्पा, ह्या उग्ररूपास किती वाढवीत का वाढविणार आहांत? अहो भगवंता, महाराजा! विश्वाचें पालन करण्याच्या कर्तव्याची ब्रीदाची थोडीशी तरी आठवण धरा, करा. आंगचें भगवंतपण, ईश्वरी ऐश्वर्य आठवा. जगाचें पालन करण्याचें ब्रीद सांभाळा, नाहींतर मजपुरती तरी कृपा करण्याचें करा! निदान मजवर तरी कृपा करा! (४३३)

**श्लोक ३१ वा—**

अहो, हे महान अशा उग्ररूपा, आपण कोण आहांत! आपलें नांव काय, तें सांगा! हे देवश्रेष्ठा, तुम्हांस नमो नमो, नमस्कार असो. हे देववर, प्रसन्न व्हा. (प्रसीद) हे (त्रिभुवनामधीलही) आद्य अशा तुम्हीं, आपण आपलें आद्यपण तें सांगा, ते ज्ञान खूण मी जाणूं इच्छितों. तुमची प्रवृत्ति लीला ती कांहीं समजेना! ॥ ३१ ॥

**विश्वरूपास केलेली अर्जुनानें ती प्रार्थना, विनंति, इच्छा, अर्जुनाची विश्वरूपास विनवणी : याचना—**

(ओव्या ४४४–४५०)

अहो, वेदांनीं जाणण्यास योग्य अशा वेदवेद्या! अहो! त्रिभुवनीं एकच असे आपण आद्य आहांत, आपण विश्ववंद्य आहांत, तरी आतां एक वेळ तरी आपण माझी विनवणी ऐकावी कीं अहो! (४४४) असें पार्थ वीरानें बोलून आपलें मस्तक त्यांच्या चरणावर ठेविलें : मस्तकांनें चरण नमस्कारिले व हात जोडून अर्जुन म्हणाला, कीं अहो, जी सर्वेश्वरा! (ऐकावें कीं). (४४५) मी माझें समाधान व्हावें म्हणून आपणांस विश्वरूप ध्यान विचारिलें. तों आपण तर मुळीं एकदम काळच होऊन विश्वच गिळीत सुटलां, हें काय! (४४६) तरी तुम्हीं कोण? एवढीं हीं भ्यासुर मुखें कां मेळवून आहांत व अवघ्याहि हातांमध्यें शस्त्रें कशाकरितां धारण केलीं आहेत? (४४७) वेगाच्याहि वेगावर जंव तंव, जेव्हां तेव्हां रागीटपणानें आपण वाढून, मोठे होऊन, गगनासहीपण लहानच करीत आहांत. तसेंच कां बरें तुम्हीं आपले डोळे ते भिंगुळवाणे करून (भयंकर लाल करून) भेडसावीत आहांत? (४४८) येथें देवा, तुम्हीं तर कृतांता-बरोबरच कीं तो हेवा कां बरें करीत आहांत? आपण तर कृतांतच जसा असें होत आहांत ते कां जे कांहीं तेथें आपला हेतु, मनांतील आशय, अभिप्राय तो आपण मला सांगावा. (४४९) ह्या अर्जुनाच्या बोलण्यावर श्रीअनंतांनीं म्हटलें कीं, मी कोण आहें व हें उग्रपण वर उग्रतेनें कशासाठीं वाढत आहें हें तूं पुसत, विचारीत आहेस; (तर तें आतां तूं ऐक.) (४५०)

**श्लोक ३२ वा :—**

**श्रीभगवानुवाच**—श्रीभगवान म्हणाले—मी काल आहें. लोकक्षय करण्यास, परत ठेवण्यास, एकत्र आणण्यास = इदं प्रवृत्त झालों आहें–कारण इंद्रियें प्रवृद्ध = फार वाढलेलीं का फार म्हातारीं झालीं आहेत–ती लोकक्षयकृत् अशीं झालीं आहेत–ह्या प्रत्येक अनीकेमध्यें जे योद्धे उभे आहेत (लढण्यासाठीं) ते एका तुजवांचून सर्व हे उरणार नाहींत. (३२)

(ओव्या ४५१–४६५)

# विश्वरूप दर्शन

## परमेश्वराचें एक 'काल' स्वरूप आहे तें

मैत्रेयमुनी व विदुर ह्यांच्या संवादामध्येंही एका कालरूपाचें वर्णन आलें आहे. विदुरानें विचारलें कीं, अहो! मैत्रेयमुने! परमेश्वराचें एक काल स्वरूप आहे म्हणून आपण पूर्वीं सांगितलें तें कसें असतें तें मला सांगा.

मैत्रेय मुनी म्हणाले :—विदुरा! कालाला मूळचें कोणतेंही स्वरूप नाहीं. त्याचप्रमाणें त्याला आदि व अंतही नाहींत. तो काल अमर्याद असा आहे. पण गुणामध्यें न्यूनाधिक्य झालें म्हणजे त्याच्या योगानें त्याचें स्वरूप लक्षांत येतें. ईश्वरानें त्या कालासच निमित्त करून आपल्या स्वरूपीं हें जग निर्माण केलें आहे. पूर्वीं हें जग विष्णूच्या मायेनें लय पावून ब्रह्मस्वरूप होऊन राहिलें होतें. नंतर तें लीन होऊन राहिलेलें जग ईश्वरानें कालाचें निमित्त करून निरनिराळें प्रकाशीत केलें. त्या कालाचें स्वरूप कोणालाहि समजत नाहीं. त्याचें अनुमान त्याच्या कार्यावरून मात्र होतें. (अग्नीची शक्ति, शक्ति दुर्ज्ञेया, कार्यावरूनि अनुमेया) ते त्याचें कार्य म्हणजे जग पूर्वीं जसें होतें तसें आतांही आहे आणि पुढेंही असेंच असणार. हें जगाचें स्वरूप जसें नेहमीं सारखेंच असतें. त्या कालाच्याच निमित्तानें प्रकृतीपासून सहा प्रकारची आणि विकृतीपासून तीन प्रकारची अशी नऊ प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली आहे, आणि प्राकृत व वैकृत या दोहींपासून आणखी एक दहावा प्रकार उत्पन्न झाला आहे. सनत्कुमाराची ह्या दहाव्या प्रकाराच्या सृष्टींत गणना आहे. तोच

भगवान कालसृष्टीच्या तिन्ही [ (१) नित्य, (२) नैमित्तिक, (३) प्राकृतिक.] प्रकारच्या प्रलयास निमित्त होय. ह्या तीन प्रकारच्या प्रलयापैकीं नित्य प्रलय तो केवळ कालाच्याच योगानें होतो. नैमित्तिक प्रलय शेषमुखांतील संकर्षण अग्नीच्या योगानें होतो किंवा प्रलय मेघाच्या योगानें होतो आणि प्राकृतिक प्रलय गुणाच्या योगानें होतो.

## पूर्वी सांगितलेले जे सृष्टीचे दहा प्रकार त्याचें सविस्तर वर्णन—

**पहिल्या प्रकारांत**—महत्तत्वाची उत्पत्ति कशी होते, हें महत्तत्व म्हणजे ईश्वरापासून सत्व, रज आणि तम या तीन गुणामध्यें झालेले न्युनाधिक्य होय.

**दुसऱ्या प्रकारांत**—अहंकाराची उत्पत्ति होते. ह्या अहंकारापासून पंचमहाभूतें ज्ञानेंद्रिय व कर्मेंद्रियें आणि देवता व मन (हे पुढले तीन सर्ग) हीं उत्पन्न होतात.

**तिसऱ्या प्रकारांत**—पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभुतें व पंचसूक्ष्मभूतें उत्पन्न होतात.

**चवथ्या प्रकारांत**—पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें हीं उत्पन्न होतात.

**पांचव्या प्रकारांत**—सात्विक अहंकारापासून इंद्रियांच्या अभिमानी देवता झाल्या व संकल्प विकल्पात्मक मन झालें.

**सहाव्या प्रकारांत**—तामिस्रादिक पांच प्रकारची अविद्या उत्पन्न झाली. जीवांना ह्या अविद्यमुळेंच मोह आणि स्वरूप भ्रंश होतो.

प्रकृतिपासून झालेली ही सहा प्रकारची सृष्टि हिला प्राकृतसृष्टि म्हणतात.

विकृतिपासून झालेली जी तीन प्रकारची सृष्टि त्या वैकृतिक प्रकारांपैकीं **पहिल्यांत सहा प्रकारची** स्थावर सृष्टि उत्पन्न झाली. ते सहा प्रकार असे:—

**वैकृतिक सृष्टीचा पहिला प्रकार :—**

(१) ज्यांना पुष्पावांचून फळें येतात ते : उंबर, वड, पिंपळ वगैरे वनस्पति.

(२) एकवार फळें येऊन ती पिकली कीं त्याचा नाश होतो. त्या : केळी, धान्यें वगैरे औषधी.

(३) ज्यांना वृक्षाचा किंवा इतर कशाचा तरी आधार लागतो त्या : लता, पान, वेली वगैरे.

(४) त्वक्सार–म्हणजे ज्यांची साल कठिण असते व त्या सालीचाच विशेषेंकरून उपयोग होतो त्या : वेळू वगैरे.

(५) विरूत म्हणजे वेलीच्याच जाती पण ज्यांना आधाराची गरज लागत नाहीं त्या : वेत वगैरे.

(६) द्रुम म्हणजे ज्यांना पहिल्यानें फुल येऊन नंतर फळें येतात ते : आम्रवृक्ष वगैरे.

ह्या सहाही प्रकारच्या सृष्टीची गति आणि आहार ऊर्ध्व असतात. त्याच्यातील चैतन्यशक्ति स्पष्ट नसते, सगळ्यांना अंतर्यामी स्पर्शज्ञान असतें व प्रत्येकाचे कांहींतरी विशेष धर्म असतात.

**वैकृतिक सृष्टीचा दुसरा प्रकार :**—तिर्यग् सृष्टि होय.

तिचे अठ्ठावीस प्रकार आहेत. त्यांचे का त्या सर्वांचें साधारण लक्षण म्हणजे त्यास उद्यां काय होणार याचें धोरण नसतें. यांना आहार, विश्रांती, भय, मैथुन वगैरे कांहीं नियमित गोष्टींचें मात्र ज्ञान असतें. यांना घ्राणेंद्रियाच्या योगानें वस्तूंचें ज्ञान होतें. सुखदुःखाचा परिणाम यांच्या मनावर फार वेळ टिकत नाहीं. असे ते अठ्ठावीस प्रकार म्हणजे दोन खूर असणाऱ्या नऊ जाती, एक खूरी पशूच्या सहा जाती, पांच नखी पशूंच्या बारा जाती, जलचर व कंकजाती.

(२८ प्रकार) बैल, बकल, रेडा, हरीण, सूकर, गवा, रूरू, मेंढा, उंट ह्या दोन खुर असणाऱ्या नऊ जाती.

(६ प्रकार) गाढव, घोडा, खेचर, गौर, शरभ, वनगाय ह्या एक खुरी पशूंच्या सहा जाती आहेत.

(पांच नखी पशूंच्या बारा जाती) कुत्रा, कोल्हा, लांडगा, वाघ, मांजर, ससा, साळ, सिंह, वानर, हत्ती, कांसव व घोरपड ह्या पांच नख्याच्या पशूंच्या बारा जाती.

(मगर वगैरे जलचर) एक जात—

(कंक गिधाड वगैरे पक्षी) ही एक जात—

अशा एकंदर अठ्ठाविस जाती तिर्यक्योनीच्या आहेत.

**वैकृतिक सृष्टीचा तिसरा प्रकार**—यांत मनुष्यजात येते. यांचे आहारविहार पृथ्वीवर असतात. त्याचे लक्षण असें असतें कीं, त्यांच्यामध्यें रजोगुणाचा अंश अधिक असतो. ते कर्मे करण्यांत गुंग असतात व दुःखरूपी संसारांतच सुख मानून रहातात.

याप्रमाणें हे वैकृतिक प्रकृतीचे तीन प्रकार सांगितले.

दहाव्या प्रकारांत सनत्कुमाराची उत्पत्ति आहे असें पूर्वीं सांगितलेंच आहे. ते प्राकृत व वैकृत या दोन्ही प्रकारच्या सृष्टीच्या मिश्रणापासून झाले आहेत, म्हणून त्यांची गति देवलोकींही आहे आणि मनुष्यलोकींही आहे.

(दहाव्या प्रकारांत) (१) देव (२) पितर (३) दैत्य (४) गंधर्व व अप्सरा (५) यक्ष राक्षस (६) भूत व पिशाच्च (७) सिद्ध चारण व विद्याधर आणि (८) किन्नर व किंपुरुष इतके भेद आहेत.

विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवानीं केलेली दहा प्रकारची सृष्टि तुला सांगितली.

ईश्वरच रजोगुणानें युक्त होऊन ब्रह्मदेवाचें रूप घेतो आणि कल्पाकल्पामध्यें सृष्टि उत्पन्न करतो. त्याचा संकल्प कधींहीं व्यर्थ होत नाहीं. तेथें वंश व मन्वंतरें ही होतात.

[श्रीमत् भागवत ३ (१०)]

तरी आतां विश्वरूप मी! काळ आहे हें खरें. हे लोक, (आवरण्यास, आटोपण्यास) संहारण्यास मी वाढत आहें; पुष्कळशीं वदनें–तोंडें पसरलीं आहेत, आतां हें अवघें सर्व कांहीं आटोपून घेईन, ग्रासून घेईन, ग्रासीन. (४५१) येथें आतां अर्जुन म्हणाला कीं, काय अहो ही कटकट! मी तर आतांच्या ह्या मागच्या संकटास कंटाळलों म्हणून आपल्यास आळविलें, प्रार्थिलें, तों विश्वरूप परमात्मा हा तर जास्तच भयंकरपणानें प्रगट झाला आहे (हा तर एक अग्निच खडतरपणानें उधवला जसा का महादेव का रुद्रच उठावा, उठला जसा तसें झालें आहे किं). (४५२) विश्वरूपानें विचारास घेतलें कीं आतां येथें कठीण असें (ह्या अर्जुनाची निराशा करण्यासारखें (आसतुटी)) बोलावें तर अर्जुन हा हिंपुटी–हिरमुष्टी, खिन्न, कष्टी होईल, हें जाणून लगेच त्यांनीं, विश्वरूपांनीं म्हणू केलें कीं, हे किरीटी, पण तेथें कांहीं एक दुसरें गम्य आहे. (४५३) तें म्हणजे आतांच मुळीं तुम्हीं हे पांडवच काय ते एक ह्या संहाररूपी संकटांतून, बाधेंतून तर बाहेर असेच आहांत हो! असें हें धीर देणारें वाक्य कानीं पडतांच अर्जुनानें आपले प्राण जे गलित होत होते (प्राण जात होत होते) ते सांवरिले; प्राण (जात जातच) चाललेच होत असतां असतांच मुळीं ते सांवरिले. तो धीराचा झाला, जाणारा का गेलेला त्याचा प्राणच मुळीं परत आला. (४५४) मरणरूपी महत् नाशास गेलेला तो त्याचा प्राण आतां पुन्हां परत सावध झाला, सांवरिला झालाः [महत् वधाचा होणारा तो आतां परत पुन्हां सावध (महामारी–महत्–मोह–मारी गेला होता तो परत पुन्हां सावध) झाला आणि

त्या विश्वरूपाच्या बोलण्याकडे चित्त देऊं लागला. (४५५) देव म्हणत आहेत कीं हे अर्जुना! तुम्ही पांडव माझे असे जाणावेत–पांडव माझेच आहेत; बाकी दुसरे सर्व कांहीं अवघे मी ग्रासूं सरलों जाण ग्रासिलें आहेच आहे, आंवरून घेण्यास प्रवर्तलों आहें. (४५६) प्रचंड वज्रानळामध्यें–इंद्राचें आयुध का हिरा रूप अग्नीमध्यें लोण्याची हुंडी जशी सांपडते तसे तुवां पाहिलेलें जग तें माझ्या तोंडामध्येंच पडलें आहे. (४५७) जग जें माझ्या मुखामध्येंच पडलें आहे तेथें लोकांची वल्गना, काळाशीं स्पर्धा, शूरवृत्तीनें गर्वावर चढणें होत आहे. तरी त्या ग्रासण्यामध्यें कांहींही उणिवेचें होणारें नाहीं, हें भरंवशानें जाण! हीं सैन्यें व्यर्थच मिरवत आहेत, बडबडत आहेत, कुंथत आहेत! (४५८) अहो, चतुरंग (हत्ती, घोडे, पायदळ रथ) संपदेच्या बळावर हे श्लोक महाकाळाबरोबर स्पर्धा करीत आहेत; वाटिवेच्या म्हणजे पराक्रमाच्या (अंगबळाच्या) मदास, गर्वासच ते चढले आहेत, अभिमानास वश झाले आहेत, मानानें वेधले आहेत. (४५९) हे मेळे–मिळवून मेळाव्याचें करून शूरवृत्तीच्या बळानें कुंथत आहेत. ज्या बळावर यमापेक्षांही ज्यास्त अशा गजदळाची वाखाणणी करीत आहेत. (४६०) ते म्हणत आहेत कीं आम्हीं तर सृष्टीवरही सृष्टी करूं–शपथ घालून मृत्यूसही मारूं, ह्या जगाचा घोटच एक भरूं. (४६१) सगळीच ही पृथ्वी गिळूं–आकाश तर वरच्यावर जाळूं, वाऱ्यास तर बाणावरच मुळीं खिळवूं–थांबवून धरूं–थांबवून टाकूं. (४६२) बोल जे शस्त्राहूनही तिखट ते तर अग्निपेक्षांही जास्त दाहक तसेंच मारकपणें कालकूट जसें असे ते बोल मधुर का गोड आहेत, असें ते म्हणत आहेत. (४६३)

पण हे आकाशामध्यें अभ्र आलें असतां तेथें जे कल्पित आकार–ते गंधर्व नगरींचें उमाळे, उल्हास लोट जाण. पोकळीचे अभावानें, ओसपणाचें नुसत्या आकाशाचे, भेंडोळे–पेंडवळे गुंताडें जाण; चित्रींची फळें चित्रांतील फळें असे हे वीर आहेत. (४६४) रंगाच्या लेपानें पुतळाच एक केला अशा त्या लेपाचें रूपच एक केलें व त्या हातीं शस्त्र दिलें हें जसें एक कल्पिततेचें पुतळेपण, तेथें त्या पुतळ्यांत जरी चैतन्यच मुळीं नाहीं अशा त्या बिन चैतन्याच्या रूपांनां उग्रपणानें रागीटपणानें, भयंकर प्रतिभयंः शिवाची जटा जशी जसें पुढें केले–, ते म्हणजे (चुकीवर पुन्हां चूक) लेपरूपच एक, वीर वृत्ति मनः स्थिति अस्तित्व रूपाचें म्हटलेलें. (४६५) अथवा मृगजळाचा पूर आलेला तें कांहीं दळ म्हणजे सैन्य नव्हे; तर कापडाचा केलेला साप, खेळणीं, खालाच त्वचाच कीं ह्या शृंगारून मांडिल्या अशा होत. (४६६)

**श्लोक ३३ वा**:—हे अर्जुना! सव्यसाची! यांजसाठीं तूं जागा हो ऊठ! यश मिळीव, शत्रूंना जिंक व धनधान्यानें समृद्ध अशा राज्याचा उपभोग घे. हे सर्व मी पूर्वींच निहता म्हणजे नायनाट केले आहेत, मारून ठेविले आहेत–तूं (हे पार्था,) निमित्तमात्र पुढे होः नुसता निमित्ताचा धनी हो. (३३)
(ओव्या ४६७–४७२)

बळ दुसरें जें चेष्टवीत आहे, हालचाल करीत आहे, व्यापारतें आहे, तें सकळ म्यां मागेंच म्हणजे पूर्वींच कीं ग्रासिलें आहे. त्यांचें दुसरें असें जें कार्य, यत्न, हावभाव, शरीर व्यापार, वर्तणुक करणारें बळ मोडलें आहे; व आतां हे तर कुंभाराच्या घरचे मातीचे पुतळे जसे निर्जीव, तसे निर्जीव होत. (४६७) (हालविणाऱ्या) आधाराची ती हालविती दोरी तुटली तर खांबावरील बाहुली तर भलत्यानेंही ढकलली, लोटिली कीं उलथून पडते; तसा सैन्याचा ह्या बगा, डौल, थाट, मांडणी म्हणजे आकार मोडतांना मुळींच वेळ लागणार नाहीं. म्हणून त्वरित जागा हो–उठी गा वेगानें, लौकर शहाणा होई. (४६९) हे अर्जुना! तुवां गोग्रहणाचे वेळेस येकसरें मोहनास्त्र घातलेंस, मग विराटाच्या महाभेकड अशा उत्तरानें तर वस्त्र हिसकावून घेतलें गेल्यानें हरविलें, नागविलें. (४७०) आतां हे तर त्याहूनही हीन म्हणजे निकृष्ट–, निंद्य झाले आहेत; म्हणून आवरीं, आटोपीं, निवटीं, संहारीं आयतेंच रण पडलें आहे! एकव्या अर्जुनानेंच कीं अहो! रिपु जिंतले असें आहे म्हणून यश घेई. (४७१) नुसतेंच कोरडें यश नव्हे तर, वर समग्र राज्यही

म्हणजे अलंकृत का भूषित अशा समृद्धीचें–ऐश्वर्य, वैभव, भरभराटीचें वैपुल्य, प्राधान्यतेचें, धनधान्य समृद्धतेचें असें आलें आहे. सव्यसाची ! तूं निमित्तमात्र होईं. (४७२)

**श्लोक ३४ वा** :—हें सव्यसाची ! मनोव्यथेचा होऊं नको ! युद्ध कर ! तूं ह्या रणामध्यें सपत्नान् म्हणजे शत्रूनां जिंकलें आहेस. तूं जेता आहेस, द्रोण, भिष्म, जयद्रथ, कर्ण तसेंच दुसऱ्या अनेक युद्ध करणाऱ्या वीरांना (योधवीरांना) मी जेरीस आणलें आहे, हाणून पाडलें आहे, निवारिलें आहे, मागें हटविलें आहे व आतां तूं जहि म्हणजे जिंक. (३४) (ओवी ४७३–४८२)

आपलें सर्व पाणी देऊन टाकून त्यासच मुळीं महत्व पोहोंचवितोस, तर तसें आतां करूं नकोस. द्रोणाचा उपमा–तोल नटविला–(वर आणिला उगवला उपमा मुरली व द्रोण गुरूच नटला–) तसें करूं नको, भीष्माचें भय धरूं नको. कर्णावर कसें शस्त्र धरूं, असें कांहींसुद्धां म्हणूं, विचारूं नको. (४७३) जयद्रथासंबंधीं काय उपाय करावा असें कांहीं चित्तानें चिंतूं नको, तसेंच आणि जे जे कांहीं नामांकित का प्रख्यात नांवाजलेले (नावाणिगे) वीर (४७४) तेही सर्व एक एक (निरनिराळे) अघवे चित्रींचे सिंहाडे, पटावरील चित्रेंच होत असें मानावेत व ओल्या हातानें पुसून घ्यावेत. (४७५) याप्रमाणें हे पांडवा! कायसा तो तरी युद्धाचा मेळावा, जमाव ! युद्धाची ती गर्दी (प्रसंगी भिडणें)! हा अवघा आभास (म्हणजे प्रतिच्छाया) मिथ्याभास होय : दुसरें सर्व तें मी ग्रासिलें, आवरिलें आहेच. (४७६) जेव्हां का तुवां हे माझ्या वदनीं पडलेले देखिले, पाहिलेस, तेव्हांच मुळीं त्याचें आयुष्य सरलें. आतां वहिवाटीच्या प्रकाराचे रीतसर जे कांहीं एक होणें तें सोपें असें झालें आहे. (४७७) म्हणून लवकर जाग; एकदम कामास लाग; मियां आवरिले, ते तूं शेवटास लाव. मियां मारिले तूं निवटीं–(मारिले ते उपटणें जसें झाडाचें) लटक्या म्हणजे मिथ्या शोक संकटांत शिरूं नको; शोक संकटाचा होऊं नको. फसूं नको. स्वतःस फसवूं नको. (४७८) एकावर एक दगड रचून आपणच लगोरीचा, खेळ मांडून तेथ नेम, खूण करतात. मग नेम धरून पाडतात तसें पाहा हे ! बा रे ! अर्जुना ! तुझें निमित्तच एक आहे. तूं फक्त निमित्तमात्रच आहेस. (४७९) अगा बाप्पा ! बा रे अर्जुना ! जें जें म्हणून विरुद्ध म्हणजे अमित्र झाले ते ते उपजतांच मुळीं (त्यागानें) व्याघ्रानें नेले–त्याग केले गेले, त्यागाचे झाले आतां राज्यच एक राज्यासहित सांठविले संचलेले आहे यश येथें ते यश तूं घे, यश भोग, यश उपभोगण्याचे कर. (४८०) दायाद भाऊबंद, उतूं मातूं नये असे सांगितले तरी ते उतले मातले होते, ह्या ज्ञानावरच मुळीं माजले [ तैसें विषय सुख रंजे। जो ज्ञानेसीच माजे। तो संशयें अंगिकारिजे। येथ भ्रांति नाहीं ॥ १९८ ॥ मग संशयीं जरी पडिला। तरी निभ्रांत जाणे नासला। तो ऐहिकपरत्रा मुकला। सुखासी गा ॥ १९९ ॥ अध्याय ४ था] उन्मत्त झाले होते तेथें विशदपणाचा (जो विशेष गंध गुण ह्या पृथ्वीचा–तसेंच विशेष गुण स्पर्श जो वायूचा नच मानिल्यामुळें ज्ञान) दुर्मदतेमुळे ते उघडेच पडले व कांहीं सायास प्रयास न लागतांच मुळी तें जसें वधिलें झालें, वधिलें गेलें.

[तैसे माणुसपण सहज। तनुवरी देवाचा वारा स्वाधिनु। तैसा बापरखुमादेवीवरू। न विसंबावा एक क्षणु ॥ (चातकाचे जीवनधनु) (अभंग) ॥ ] (स्वजन भाऊबंद उन्मत्त झाले होते, माजले होते–जगी बळिये असें दुर्मदतेचे ते, तेथें विशेष **गंध**, विशेष **स्पर्श** असे जे गुण तेच मुळीं कांहीं सायास न लागतांच वधिले झाले होते. (दायायं = वडिलोपार्जित मिळकतीचा वारसा. दाय+आदः=दायजी, वारस, मुलगा, नातलग, वंशज, हक्क सांगणारा.) ] (४८१) असें हे विश्वाच्या हिताचें कल्याणकारक बोलणें–हितगुजाच्या अशा त्या गोष्टी विश्वाच्या वाणिरूप पटावर हे किरीटी ! लिहून घाल विजयी हो ! [जग=ब्रह्मांड, सगळा. वाक्यस्थ=आज्ञाधारक. वाक्यविशारद=वक्ता. वाक्य भेद=परस्परविरोधी भाषण भिन्नवाक्य. वाक्:=वाणी, भाषण; मंत्रात्मक वेदभाग (संहिता) वाक्+च्=शब्द, भाषण, सरस्वती, वचन, करार.] (४८२)

### श्लोक ३५ वा.

**संजय उवाच :**—संजय म्हणाले कीं असें हें केशव श्रीकृष्णाचें बोलणें ऐकिल्यावर, सर्वांगी कंपीत होऊन असलेला व हात जोडलेला, अशा अर्जुनानें श्रीकृष्णांना वारंवार नमस्कार करून भीत भीतच पुढील सगद्गदतेचें बोलणें केलें. (३५) (ओव्या ४८३–४९१)

ज्ञानदेव म्हणतात कीं अशी सकळ कथा, ज्याचा मनोरथचमुळीं कधींहीं तृप्त होणार नाहीं, अशा धृतराष्ट्रास, कुरुनाथास संजय सांगत आहे. ब्रह्मदेवाचें प्रजापतीचें जें स्थान–सत्य लोक त्या सत्यलोकींहून सुटलेलीं तीं वाक्यें जशीं देवनदी गंगा तिच्या खळाळानें वाजत असणारी, कुरुनाथाशीं बोलतांना संजयास वाचा निर्मळ अशी. (४८३) कीं ब्रह्मदेव सत्यलोक, देवनदी–गंगाजळ खळाळानें वाजत चांगावे सरस्वतीच ह्या भूमीवरील, वाचा निर्मळ समृद्ध, प्रशस्त, मन महत्. (४८४) बोल ते जसें महातेजाचे उमाळे एकाच वेळीं धडधडत यावेत क्षीरार्णवच मंदराचळानें दणाणला घुमघुमिला जसा. (४८५) अशी वाक्यें, त्या गंभीरानीं महानाद जे त्याचीं विश्ववंद्य त्यांनीं, श्री अनंतांनीं बोलिली ( युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ) (४८६) ते अल्पसे ( अल्प = मोटके, थोडेसे ) अर्जुनानें ऐकिलें त्यानें त्यास भय वाटलें, कां सुख झालें, हें कांहीं माहित नाहीं; पण त्याचें सर्व अंग कांपत होतें, कंपित झालें होतें, थरारलें होतें. (४८७) सखोलपणें शरीराची मोटच वळली जशीं तसेंच करसंपुटही जोडलेले असा कृतांजलि–( नमस्कृत्वा) वेळोवेळीं तों आपलें ललाट (कपाळ–मस्तक) देवाचे चरणीं ठेवित आहे. ( ४८८ ) सगद्गद कांहीं बोलू जावें तर का बोलू जाय तर गळा कंठ हा भरून आलेला त्यायोगें बुजला; तेथें हें सुख होत होतें का भय वाटत होतें हें तुमचें तुम्हीच विचारास घ्या का पुसणें विचारण्याचें करा. (४८९) पण तेव्हां तर देवांच्या बोलांनीं (बोलानें) अर्जुनास हें असें सुख भय झालें, हें मी श्लोकांच्या (पदांच्या–) चरणावरून देखिलो समजलो. (४९०) मग तसाच भेणं भेणं, भीत-भीतच पुन्हां देवांचें चरण नमस्कारिले, वंदिले, नमिले, सन्मानिले, जोहारिले व म्हणूं लागला कीं अहो देवा ! आपण असें बोलिलात कीं—, (४९१)

### श्लोक ३६ वा—

**अर्जुन उवाच**—(देवा ! आपण असें बोलिलांत कीं–) अहो हे हृषीकेशा, हे केव्हांहि योग्यच आहे की आपल्या कीर्तीच्या उत्कर्षानें तर जग हें आनंदित होऊन आपल्यावर अनुरक्त झालें आहे, प्रीतीचें झालें आहे – रक्षोगण ते भीऊन जाऊन सर्व दिशांस पळत आहेत (द्रवंति) सर्वसिद्ध संघ हे तुम्हांस नमस्कार करीत आहेत. (३६) (ओव्या ४९२–५०७)

### अर्जुनाचे ते विचारसरणीचे प्रश्न करणें— देवांचा अभिप्राय = हेतू

देवा ! आपण म्हणतां कीं, हे अर्जुना, विश्वरूप म्हणजे मी काळ आहे : ग्रासणें हा त्याचा–काळाचा खेळच; असा हा देवा ! तुमचा अढळ बोल आम्ही मानतों. (४९२) पण तुम्हीं जे काळ (विश्वरूप) त्यांनीं आज स्वास्थ्याचे वेळेस, म्हणजे पालन रक्षणाचे वेळेस, प्रलयाची वेळ नसतांही, वेळ अवेळ न पाहातांहि मुळीं ग्रासिजे, ह्या विश्वास ग्रासावे हें कांहीं विचारास जुळत नाहीं. (४९३) अहो, कशाचे कसचे कां कशानें ते आंगचें तारुण्य वय वयसा, वयोमान मोडून काढावें; नव्हे जें वार्धक्य तें (कुठून), कुठचें आणावें–म्हणून 'करूं' असें जें कांहीं म्हणतोस तें बहुतकरून हातून होतच नाहीं, (असें होतें.) (४९४) काय अहो, दिवसाचे चार प्रहर भरले नसतां (केव्हांही कोणत्याही वेळेस कसाही) तरीपण तो सविता मावळता व्हावा काय ? मावळत असतो काय ? (४९५) पण तुम्हीं अखंड असे काळ, त्या काळास (विश्वरूपास) 'प्रातर्मध्यान्ह सायं' तीन वेळा आहेतच. त्या तिन्हीं आपआपल्या समयीं–(ठरलेल्या वेळीं, आपआपल्या परीनीं समर्थ, समर्थतेनें वेगास येणाऱ्या) बलयुक्त सबळ अशाच होत. (४९६) ज्यावेळेस उत्पत्ति होऊं

लागते तेव्हां स्थिति व प्रलय दोन्हीं नाहींशी असतात व स्थिति काळीं, उत्पत्ति व प्रळय दोन्ही नसतात, मिरविणारी होत नाहींत. (४९७) नंतर प्रळयाचे वेळेस, उत्पत्ति स्थिति मावळतात, असें होणें हें अनादि असल्यानें केव्हांहि ढळत नाहीं. (४९८) अहो! सध्यां तर अतिशयच भोग झाल्यानें जग हे भोग स्थितिवरच, स्थिरतेवरच फिरविलें जात आहे, वर्तत आहे, चालत आहे. जग हे अवस्था, मर्यादा, स्थिरता स्थितीवरच वर्तत आहे; येथें आतां तुम्हीं ग्रासतां हें माझ्या जीवीं उतरेना, समजुतीस येईना. (४९९) तेव्हां देव संकेतानेंच बोलिले कीं, शेरच मुळीं दोन्ही सैन्याचा उठला आहे– (तो पुरेसा होऊन आहे) येथें मरणचमुळीं पुरतें होऊन आहे, पुरून आहे; तें प्रत्यक्ष तुला दाखविलें, आतां बाकीचें जे कांहीं होणें जाणें तें यथाकाळीं होय असें जाण. (५००)

## लोक पूर्ववत् यथास्थिति पाहिला :—

असें हें बोलणें झालें न झालें (इतक्यांत–बोलणें होतें न होतें) तोंच येथें ह्या बोलण्यासच मुळी वेळ लागला, इतक्या त्वरिततेनें, लगेचच्या लगेच, अर्जुनानें तर लोक हा जसा पूर्ववत् यथास्थिति होता तसाच पाहिला. (५०१)

## स्तुति—देवदेव सूत्रधार ह्या विश्वाचे! कीर्ति आठवून हर्षानंदामध्यें पोहत आहे.

**अर्जुन म्हणतो** की–अहो देवा! तुम्हींच ह्या विश्वनाटकाचे सूत्रधार! तेथें आतां हा जगरूपी देवच जसा! त्याचें तें विश्वलाघवीपणाचें सूत्र तोंच, म्हणून आतां देव आपल्या जगरूपास आला आहे! (५०२)

जगाचें मायारूप की लाघवीपण हें दुःख सागरांतच पडल्यासारखें करतें (आहे). तुम्हीं ज्या कांहीं अनेक उपायांनीं ह्या दुःख सागरांतून काढाल किंवा काढता अशी ती तुमची कीर्ति अहो देवा! मी आठवीत आहें. (५०३) वेळोवेळी तुमची कीर्ति यश, लौकिक मी आठवीत आहे व त्यावरच कीं एक महासुखाचा महाआनंदाचा एक सोहळा–कौतुक–(मिरवण मी भोगून आहें. तेथें हर्षरूपी अमृतसागराच्या कल्लोळामध्येंच, कीं मी पोहत आहे, लोळत आहे.) (५०४) जियालेपणानें जग हे तुमच्यावर प्रेम करून आहे; दुष्ट जे त्यांना तर हे जग म्हणजे अधिकाधिक वांकडेपणच एक, पंचप्राण, पंचबाण, भंग विरहानल–प्रीति भंग–अमित्रपणाचें करून आहे जसें; (५०५) त्रिभुवनामधील आकाशांत फिरणाऱ्या खेचरांना तर तुम्हीं हे हृषीकेशा! मोठें भयच एक आलें, असें आहांत–म्हणून तर ते पैलीकडे दाही दिशांस पळत आहेत, अभ्र तसें विरकळित होत होत वितळत आहेत, नाहींसे होत आहेत. (अहो हे रक्षक म्हणवितात. पण त्यांना आपल्या अपराधाची आठवण होत असल्यानें तुमच्यापुढें उभें राहाण्याचें धैर्यच होत नाहीं. तुमच्यापदीं लागण्यास त्यांना तोंडच मुळीं नाहीं. असे ते आंतमध्येंच विरमून आहेत, ओशाळले होऊन आहेत. (५०६) सुर देव नर मनुष्यें किन्नर (अश्वमुख देवयोनी; अहो मनुष्य कीं काय!!!) बहुत काय पण हे सर्व चराचर, स्थावर जंगमात्मक सर्व हे जगत् तुम्हांस, देखते झाल्यानें हर्षनिर्भर होऊन नमस्कारीत आहे. (५०७)

**श्लोक ३७ वा** :—अहो श्री हृषीकेशा! महात्मन् हे श्रीअनंता हे देवदेवा, हे जगन्निवासा ते आपणांस का बरें नमणार नाहींत, नमून वांकून नमस्कार करणार नाहींत? ते अहो आपण तर ब्रह्मदेवा-पेक्षांहि आदि कर्ते असे आहांत (कां ब्रह्मदेवाम्ही आपणच की घडणारे असे आहांत) तुम्ही अक्षर असे सत् व असत्च्याहि पेक्षां पर म्हणजे श्रेष्ठ असे आहांत. (३७) (ओव्या ५०८–५१४)

कारण ते काय! कसचें! कोण जाणें! पण येथें राक्षस जे, ते कोणत्या कारणास्तव कीं अहो! हे नारायणा! तुमच्या चरणीं नम्रच मुळीं होत नाहींत. तुमच्या पायास लागत नाहींत. तुम्हांस नमन न करितां, तुमच्या पायास न लागता, पळतच सुटले आहेत; (५०८) पण असें हे तुम्हांस पुसणें करूंच नये. ते

बरें कारण कीं, एवढे आम्हांसही जाणवतें कीं, सूर्य उदय झाल्यावर अंधारानें कसचें राहाण्याचें तें (ज्ञानसूर्या- पुढें अज्ञान तें टिकतच नाहीं.) (५०९)

**देव प्रभु श्रीरामचंद्र स्तुति—प्रशस्ति-महिमा, सामर्थ्य, वैभव, गंभीर ध्वनि, गहनत्व-**

अहो श्रीरामा! आपण प्रकाशाचे आगर आहांत, हे इतके दिवस आम्हाला नेणवेची कांहीं, पण आतां तुमचा महिमा गंभीर असा, आम्ही देखत आहोंत, तुम्हीं अहो हे श्रीरामा! आपण प्रकाशाचे सागर असूनही आम्हांस गोचर झाले आहांत, आटोक्यांतले दृश्य पहाणें दिसणें सुलभ झालां आहांत आणि म्हणूनच तर निशि म्हणजे अज्ञान रात्रि [कर्म आचरणाऱ्याचें रात्री-अज्ञानानें] चालणें जे ते त्याचें येथें सहजच नाहींसें होणें झालें. (५१०) अहो! श्रीरामा! आजपावेतों तुमचें माहात्म्य हें कांहीं पुढें होऊन समजेसच मुळीं येणारें होईना! दिवसांचे दिवस गेले तरी ठावाचा कां खोलीचा असा हा तुमचा महिमा- गंभीर अर्थपूर्ण गहन—तुमच्या महागंभीरपणामुळें, मुळींच कांहीं समजेचना; (आम्हांस समजतच नव्हता,) पण आतां अहो! तुमचा हा महिमा—(उत्कर्ष—महात्म्य-विभूतिरूप मेघध्वनि गंभीर जसा खोल बुद्धीचा) गहन गंभीर असा आम्ही पहात आहोंत, देखत आहोंत. (५११)

जेथून अनेक सृष्टीच्या रांगा, ओळी ह्या भूतग्रामरूपी वेलीमध्यें पसरून असतात त्या महावृक्षास दैविकी इच्छा व्यायली आहे. (५१२) देव! निष्पाप! शुद्ध! अपरिमित तत्व! देव! नेहमीं जागते! असें स्पष्ट उदित! स्वयंप्रकाश—तत्व देव! परमसीमेचे-, सीमांततेचे गुण! अनंत तत्व! देव! शर्थीच एक! ठावच लागत नाहीं ज्याचा असें! साम्य सतत-तत्व! मनुष्यांमधील श्रेष्ठ म्हणावा तो देवाचा होय! बोलास न येणारा, बोलणारा श्रेष्ठपणा होय! (५१३) ते तुम्हीं जसे कां 'त्रि जगति ये'-पृथ्वी, जमीन, लोक, गाय जोगविणारे असें तिन्ही लोकांना तोषविणारे असा छंदच घेऊन आहांत, तुम्हीच क्षर व अक्षरच अविनाशी असें तत्त्व आहांत, अक्षराच्याहि पार गेलेले असे मुक्त अमर्याद तत्त्व! आहांत. (५१४)

**श्लोक ३८ वा**:—अहो हे अनंतरूपा! तुम्हीं देवांचेहि आदि असे पुराण पुरुष आहांत. तुम्हींच ह्या विश्वाचे आधार, निधान, ठिकाण आहांत. विश्वाला जाणणारे व जाणण्यास योग्य परंधाम म्हणजे श्रेष्ठस्थान आहांत. तुम्हींच हें सर्व विश्व व्यापिलें आहे-विस्तारलें आहे. हें सर्व पसरलेलें विश्व तुम्हींच आहांत. (३८) (ओव्या ५१५-५१९)

तुम्हीं प्रकृति पुरुषाची आदि, शिवशक्तीच्याहि अगोदरचे, महत्तत्व बुद्धीस महत्तत्वास गुणसाम्य मायेस तुम्हींच अवधि सीमा आहांत. स्वयें आपलेपणानें तुम्हीं अनादि असें पुरातन आहांत. (५१५) तुम्हीं सकळ विश्वाची जीवन कळा; सकळ विश्व, जीवन—संजीवनास आणणारे, विश्व—विश्वास आहांत; जीवपणास, जीवाभावास तुम्हींच निधान (तेथें, साठवण, द्रव्य, विश्रांति, अव्यक्त) आहांत, भूत व भविष्याचें ज्ञान हें तुमच्याच हातीं आहे. (५१६) अहो जी, श्रुतींच्या, वेदांच्या डोळयांनीं, स्वरूप सुखाचेंच सर्व असें तुम्हीं सुखास अभिन्न असें आहांत; सर्व देखणेपण, आयत लोचन तेथें ह्या तिन्हीं भुवनांच्या पृथ्वी, आकाश, स्वर्ग, परलोक आश्रयांना व्यापकपणास तुम्हींच मुळीं ते आयतन—आश्रय व्यापक होत. (५१७) म्हणून जी अहो! तत्पर, अशा तुम्हांस महत् स्थान—महाधाम—महत् स्थान म्हणावें कीं, अहो! ब्रह्मकल्पाच्या अंतीं महत्—ब्रह्म हें तुम्हां मध्येंच रिगावा करून असतें तुमच्या अंकीं लीन होतें, सामावतें. (५१८) देव सर्व व्यापी आहे, देव जग व्यापून आहे. देवांनीं तर अवघें विश्व व्यापलें (विस्तारलें, अंथरलें, मांडलें) आहे. तेथें आतां अहो! जी श्रीअनंता! तुमच्या स्वरूपास वानणें तें कुणास बरें आकळेल! कुणीं बरें तें वानण्यानें, आळविण्यानें—(वर्णन करण्यानें—वाखाणणी करून सांगण्यानें) प्रशंसावें? सारांश, कुणासही हें तुमचें रूप वर्णिता येणारें नव्हे, कुणासही तेथीलचें वर्णन आकळणारें नव्हे. (५१९)

**श्लोक ३९ वा—**

हे अनंतरूपा! तुम्हीं वायुदेव, त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्ही यमोदेव, त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्हीं अग्निदेव, त्या तुम्हांस नमस्कार असो. तुम्हीं वरुण देव, त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्हीं शशांक देव, त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्हीं प्रजापती, त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्हीं प्रजापतीचेही पिता म्हणजे प्रपितामह–ब्रह्मदेव, त्या तुम्हांस नमस्कार असो–तुम्हांस नमो नमस्ते सहस्र वेळां नमस्कार असो! पुन्हः पुन्हः नमो, नमो नमस्ते नमस्ते–नमस्कार असो! नमस्कार असो!

**श्लोक ४० वा :—**

तुम्हीं हे सर्वात्मका! त्या तुम्हांस नमस्कार असो! तुम्हांस समोरून नमस्कार असो! तुम्हांस पाठीमागून नमस्कार असो! तुम्हांस सर्व बाजूंनीं नमस्कार असो! तुम्हीं सर्व व्यापून आहांत, म्हणून सर्वरूप आहांत–तुमचा पराक्रम अमित असा, तुमची शक्ति अपार अशी, तुम्हीं सर्वव्यापी आहांत म्हणून सर्वरूप आहांत. (४०)

(श्लोक ३९ व ४० : ओव्या ५२०–५३७)

**हे श्रीअनंतरूपा तुम्हांस नमस्कार असो—**

जी अहो! तुम्हीं काय कांहीं एक नव्हत? अहो, तुम्हीं सर्व कांहीं आहांत! तुम्हीं सर्वांठायीं आहांत; तुम्हीं कुठें नाहींत, असें ठिकाणच नाहीं. तुम्हीं कुठच्या एकाद्या ठिकाणीं नाहींत असें नाहीं म्हणून तुम्हीं अगाध अशा ठावाचे होत! हें असो; पण जसे तुम्हीं आहांत, तशा तुम्हांस मी नमस्कार करतों. (यादृशोसि महादेव तादृशाय नमो नमः) (५२०) अहो! हे श्रीअनंता! ज्यास अंतपार नाहीं असा वायु (यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्, चरण, श्लोक ६ अ. ९) तो तुम्हीं आहांत; प्रमाण शुद्धतेनें मन हें तपलेलें, शासन, शास्ता, अस्त यम (अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, परिग्रहाः यमाः=५) तो तुम्हीं आहांत; प्राणीगण (समुदायामध्यें, भूतमात्रगण समुदायामध्यें) वसणारा जो अग्नि तो तुम्हीं आहांत. असा तुम्हांस नमस्कार असो. (५२१) तुम्हीं वरुण, जलचरांचा राजा, देवविशेष, जलाचा अधिपति, उदक परमेष्ठि, सूर्य, स्वर्लोक, तुम्हीं सोम [सोमलता, सोमरस, अमृत, चंद्र, इडानाडी, पाणी, अष्टवसुपैकीं तिसरा (समासांती–, श्रेष्ठ) वायु, कापूर, यम, कुबेर, वानर, किरण, कांजी] आहांत, अशा तुम्हांस नमस्कार असो. (५२२) **अहो श्रीजगन्नाथा! तुम्हांस नमस्कार असो.** — आणीकही जें जें कांहीं आहे, त्यास डोळसपण (रूप खरेपणानें असणें योग्यता) असो वा नसो, पण योग्यता ही आणावीच अशा थाटाचें तें आहेनाहींपण : अशा त्या तशानाहीं तुम्हांस नमस्कार असो. जें जें रूप आहे किंवा नाहीं, त्या तुम्हां सर्वा श्रीजगन्नाथा, नमो नमो. (५२३) प्रेमानें सप्रेम अशा अनुराग चित्ताचे अनुरक्ततेनें, अर्जुनानें नमन केलें, व पुन्हां पुन्हां हे प्रभो, नमस्ते नमस्ते म्हणत हात जोडून आहे, नमन करीत आहे! (५२४)

**श्रीमूर्ति स्तुति–स्तवन–नमन :—**

नंतर त्या साद्यंत श्रीमूर्तीस त्यानें साद्यंतपणानें न्याहाळले व पुन्हां हे प्रभो! नमस्ते नमस्ते! म्हणत आहे. (५२५) देहाच्या निरनिराळया अवयवांना, देह प्रांतांना बाजूनें पाहातां पाहातां पुनः पुनः पाहिल्यानें त्याच्या चित्तास समाधान झालें, चित्त समाधान पावत आहे, व पुनः पुनः हे प्रभो नमस्ते नमस्ते म्हणत आहे! (५२६) ह्या सचराचर जगतांत जें कांहीं म्हणून उपजलें, जन्मलें आहे, जी भूतें आहेत तेथेंच सर्वाठायीं, सर्वरूप विश्वरूपास तो सर्वत्र देखत आहे, आणि पुन्हः पुन्हः हे प्रभो, नमस्ते नमस्ते म्हणत आहे! (५२७) अशी ही अद्‌भुत रूपें! अनंत अशीं आश्चर्येंच! तीं पाहून नमस्ते नमस्ते म्हणत

आहे. (५२८) दुसरी आणीक कसलीही स्तुति त्यास आठवेचना! स्मृतीचें आवडणें, प्रसन्नपण झालें, पण नमस्ते! नमस्ते! या शब्दांपलीकडे कांहीं शब्द येईनात. त्यांस कांहींहीं दुसरे शब्दच मुळीं सुचेचनात व निवांतहीपण बैसवेना; वारंवार प्रेमभावास येऊन कसा तो नमस्ते! नमस्ते! गर्जत आहे, पाहा! (५२९) अहो! जास्त काय लिहूं, पण अर्जुनानें याप्रमाणें सहस्र वेळां नमन केलें व तो पुन्हः म्हणतो कीं हे श्रीहरी तुम्हां सन्मुखास नमस्कार असो! (५३०) पाठ का पोट असा विचार तो कशास? तुम्हीं देवा पाठीमोरे असे त्यांनांही नमस्कार असो. (५३१) माझ्या पाठीशीं उभे आहांत म्हणून तुम्हांस पाठीमोरे म्हणावें तर तुमचें जगाशीं सन्मुख–विमुखपण असें केव्हांही नाहींच. जग हे सन्मुख, विन्मुख, विमुख असें म्हणणें तें कसचें! (५३२) आतां अवयवांमुळें वेगळालेपण तेथें देवास रूपाचें करणें कसें तें ते कांहीं जाणवेना; म्हणून तुम्हां सर्वा सर्वात्मकास नमो! नमस्कार असो! (५३३) जी अहो अनंता! (बळाच्या समृद्धतेचें) तुम्हीं बळसंभ्रमास तसेंच अमित विक्रमास (अमर्याद साहसाचें जे त्यांस) त्याचप्रमाणें सर्व काळीं समा (वर्षे) असे, सर्व प्रांतांते, देशाचे केलेले तुम्हीं, त्या तुम्हां सर्वरूपास नमस्कार असो! (५३४) अवघ्या सर्व आकाशामध्यें पोकळी–अवकाश होऊन आकाश असतें. तसें तुम्हीं सर्वपणें सर्व कांहींपणाप्रत आले आहांत (पातलासि)! (५३५) क्षीरसमुद्रामध्यें पयाचे कल्लोळ जसे, तसे उपमेचे, पुन्हः पुन्हः निखिल–सर्व, (अखिल) तुम्हींच केवळ सर्व आहांत. (५३६) म्हणून अहो देवा, त्या सर्वा तुम्हीं कांहीं वेगळे नव्हत, असें हें मजला पूर्णपणें पटलें, ते माझ्या सद्भावा आलें आहे. म्हणून आतां तुम्हींच सर्व कांही आहांत! (५३७)

**श्लोक ४१ वा** :—हे अच्युता! तुमचा असा महिमा न जाणतां बरोबरीचा मित्र समजून जे कांहीं प्रेमानें का प्रमादानें, हे कृष्णा! हे यादवा! हे सख्या! असें जें कांहीं मी अमर्याद–तुमची मर्यादा न ठेवितां बोलिलों असेन (त्या सर्वाबद्दल मी तुम्हां अचिंत्य प्रभाव अशांची मी क्षमा मागतों). (४१)

(ओव्या ५३८–५४४)

पण अशा सर्वात्मका! सर्वेशा! तुम्हांस हे स्वामिन्! हे देवा! कांही! कोण! काय! कसें! हें कांहीं आम्हीं नेणून होतों–आहोंत. अजाणतेपणें आजपर्यंत तुमच्याशीं सोयरे संबंधी सोयरेपणाच्या नात्यानें वागत आलों, सोयरेधायरे संबंध लावून तुम्हांशीं वागत आलों. (ही चूक झाली.) (५३८) आहाहा! आश्चर्य, खेद, आनंद, संबोधनार्थी, मोठ्या खेदाची गोष्ट कीं अहो, फारच वाईट झालें. आम्हीं तर अमृत म्हणजे सुधा जी ती तर सडासंमार्जनाच्या का झाड सारवणाच्या उपयोगाची केली कीं अहो! कामधेनु देऊन सामान्य कोंकरूंच एक कीं बदली घेतलें. (५३९) परिसाचा खडक खडवा पर्वत सांपडला, तो फोडून आम्हीं तर घराची पायाभरणी केली. (गडगाच एक पाया भरण्यासाठीं योजिला.) कल्पतरू तोडून त्याचा अथवा कल्पवृक्षाचा उपयोग शेतास काटेरी कुंपण करण्याकडे केला. (५४०) रत्नांची (चिंतामणीची) खाण लागली पण ओळख पटेना. मी तर तो ओळखेचि ना म्हणून ती खाण त्यागिली. त्या रत्नांचा उपयोग ओढाळे ती हटविण्याकडे केला (ओढाळे ती उलटविली गेली तशी तुमची जवळीक जोडली, साधली, ती सहजचा सोबती अशा सांगातीपणें व्यर्थ घालविली, गमविली. [जेथें तेथें हातीं धरून चालविणारा देव, सोबती, गडी, अर्ध भार्या मनुष्यस्य **'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती'**] (५४१) अहो! हे आजचे रोकडे असें जें कांहीं, तेंच पाहाना का! काय आजचाच प्रसंग कीं, अहो! झुंज ती कवण! रूप हें केवढें! येथें तुम्हीं उघडें परब्रह्म! पण अशा तुम्हां सारख्यांना तर मी सारथी केलें कीं अहो! (५४२) अहो दातारा! कौरवांच्या घरास तर क्षुद्र व्यवहाराच्या शिष्टाईसाठीं तुम्हीं धाडिले गेलांत. जागते असे जे तुम्हीं–जागेश्वर लोकनाथ, लोकेश–लोकेश्वर–जगेश–जगन्नाथ ते आम्हां वाणिज्यार्थ–व्यवहारार्थ विकिला होता कीं (५४३) अहो, तुम्हीं योग्याचें समाधिसुख तें मी मूर्ख कसा का कां बरें तें जाणेचना! सन्मुखास तुम्हांस तर विरोध उपमर्द, हट्टच (औपरोधिक, थट्टा मस्करीच) कीं अहो, करून होतो. (५४४)

**श्लोक ४२ वा—**

**हे अच्युता !** मी जो कांहीं विनोदानें तुमचा अपमान केला असेल—आसन, शयन, भोजनप्रसंगीं, आहारविहारांत म्हणा का निजण्याबसण्यांत म्हणा किंवा चारचौघांत तो—त्या सर्व अपराधांबद्दल मी अचिंत्य-प्रभाव जे आपण त्यांची क्षमा मागतों. (४२)

(ओव्या ५४५–५६१)

तुम्हीं ह्या विश्वाची अनादि अशी आदि (मूळपीठिका) आहांत; 'सभासद' अशा प्रणामाचा तेथें आदरविलेले जें स्थान—(देवसभ) तेथें सोयरिकीच्या (लग्न सोयरीक, सुलग्न, ताराबल) संबंधानें चेष्टा विनोदानें रळीच (द्वैत, कलह, हमरीतुमरी, भांडण) एक बोलत आहोंत, बोलत होतों. (५४५) कदाचित रावपणाचें राऊळ अनेक जेथें देवा, तुमच्या स्वतःच्या हातून मानमरातब दिला जाणारा व कदाचित तो मान, आदर, सन्मान, गौरव देवाच्या अंगाकडूनच नच दिला गेला. व आम्हांस आपलेंसें केलें; नाहींतर स्नेहाच्या नात्यानें आम्हीं रुसून फुगून असतों, रुसून जाऊन असतो. (५४६) आम्हीं तुमच्या पायां लागून, तुमच्याच ठायीं समजूत पाहावी ! अहो शार्ङ्गपाणी ! तुम्हींच समजुतीचें मनधरणी व्हावें अशी बहुतकरणी (कामें—कर्म—व्यवहार धंदे) आम्हीं केली की जी अहो ! (५४७) स्वजनपणाच्या नात्यानें, हिश्यानें म्हणजे स्नेहपणाच्या कां स्नेहजनाच्या नात्यानें तुम्हांपुढें उफराटें (पाठीमोरें) बसावें अशी योग्यता आमचेठायीं कसची ! पण अहो, हे वैकुंठपति श्रीकृष्ण भगवान ! आम्हीं येथें चुकलों. (५४८) देवाबरोबर दांडपट्टा खेळूं, देवास दांडपट्ट्यावर आडवून धरूं, आखाड्यामध्यें झोंबी लोंबी कुस्ती करूं (जवळ येऊन बोलणें, विनंति करणें जें) (सोंगट्या) सारीपट खेळतांना घर चोरूं, वर निकराने [आद्याक्षरासंबंधीं आडवी अरण्य घेणें (बरगडी) कुबेराचा द्रव्यनिधि, समूह] भांडूही. (५४९) चांग ते ताबडतोब मागूं, सर्वज्ञ आपण जे त्यांना तर एक बुद्धिवादच सांगूं—(त्यांना बुद्धिवादाचें करूं) वर लगेच आम्हीं कांहीं तुमचें देणें लागत नाहीं म्हणूं ! (५५०) असा हा अपराध (अन्याय—चूक—पाप—गुन्हा) त्रिभुवनामध्येंही नच सामावणारा—, पण (नेणते असेच आम्हीं, तुमचे चरणीचें सर्वथा असेंच कीं जी. तुमच्या चरणापासूनच हे आमचें आचरण होत असल्यानें तेथें नेणतेपणच एक परिणमून आहे. (५५१) (बोनयाच्या अवसरीं) देवा! भोजनाच्या वेळेस—लोभामुळें आम्हीं आठवण करतों, पण माझा (निमुग) रिकामा गर्व (डौल, निर्लज्यपणाची ऐट,) तेथें अहो ! जी मी तर रुसून फुगून बसतों—अडून असतो (व कसलेही कांहींहीं संभावन भाव्य वगैरेचें होणें करीत नाहीं. (५५२) देवाच्या आराम गृहांत, (विलास गृहांत, भोगायतनांत, शरीरांत) खेळतांना मुळीच की मनामध्यें संकोचित होत नाहीं. जी अहो, शयनामध्यें बिछान्यांत रिघून तुम्हां शेजारीच झोंपतों. (५५३) "कृष्णा" म्हणून हांकारितो [मोलकरी—कुणबी म्हणून तुच्छ लेखतो—हांक मारितो (उत्तरीयतेचें जसें)] यादवपणानेंच तुम्हांस (मोजतों) समजतों, लेखतों, व चालतां बोलतां, जातां येतां, आचरतांना, वागतांना वर्ततांना तर तुम्हांस आपली आण शपथच कीं जी वाहातों, घालतो. (५४४) मज तुज एकासनीं बैसणे—वर तुमचें सांगणें—बोलणें नच मानणें, तें परिचयामुळें, वहिवाटीच्या, ओळखीच्या दाटपणामुळें, असें फार वेळां झालें. (५५५) असे काय किती अपराध ते निवेदूं ? अहो ! श्रीअनंता, मी तर समस्त अपराधाची राशीच एक आहें कीं जी. (५५६) याजसाठीं तुम्हांसमोर (देखत, सामने, प्रत्यक्ष,) तोंडावर अथवा तुमच्या अप्रत्यक्ष (का पाठीमागें गैरहजिरींत) जी जी कांहीं कामाची खोटी करणारी तीं वोखटी आचरणें, वर्तनें मजकडून झालीं असतील, तीं आईप्रमाणें, अहो हे प्रभु ! (स्वभाव, भाव, अध्यात्मकच एक तेथें प्रभुपणानें असलेलें अशा हे प्रभु !) पोटीं घाला : त्याचा राग मानूं नका : ती विसरून जा : सहन करून असा कीं जी.

शिवापराध क्षमापन स्तोत्रांमध्यें अपराध क्षमा करावेत अशी विनंति केली आहे. तेथें 'क्षंतव्यो मेऽपराधः शिव शिव शिव भोः श्रीमहादेव शंभो'. तसेंच **श्रीदेवी अपराध क्षमापन** स्तोत्रामध्यें

'तदेतत्क्षंतव्यं जननि सकलोद्धारिणी शिवे। कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति' अशा स्तुतीने अपराध क्षमा करण्याबद्दल विनंति केली आहे.

[प्रभु=स्वभाव (न कर्तृत्वं न च कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः। न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते।। ५ (१४) ।। विभु=आदिदेव (परब्रह्म परंधाम पवित्रं परमं भवान्। पुरुषं शाश्वतं दिव्यं आदि देवं अजं विभूम्] ।। १० (१२) ।। (५५७)

अहो! जी स्वामिन्! राया! देवा! जेव्हां का नदी एकादे वेळेस जे कांहीं खडुळ पाणी बरोबर घेऊन वाहाती होते, तेथें सिंधुजळानें तर (ती खडुळे) ते गढूळ पाणी आपल्या प्रवाहांत, पाण्यांत सामावून घेऊन असावे (सामावून असणें करावें, सामावण्याचें व्हावें, आपल्यांत खपवून घ्यावे, समरसून—सहन करून-सामोपचारानें सांभाळून—सामावून असणें,) हाच एक उपाय, तेथें दुसरा एकादा उपाय नाहीं. (५५८) सहन करणें, खपवून घेणें, सांभाळणेंच एक तेथें व्हावें जसें त्याप्रमाणें अहो, प्रीति हो अथवा प्रमाद हो (प्रमदा पश्चिम) तेथें विरुद्धपणच एक (बिरूदाचे दाहुले हिंवो लागती) द्वंद्वच जसें परिणाम करणारे ते माझे व देवाचे (शब्द देव तो कसा विरुद्धपणानें निर्गुणावर चालणारा) जें कांहीं एक बोलणें तेथें मनाशीं मन जुळणारें नच झाल्यानें येणारी जी मनाची खिन्नता तीवरच श्रीमुकुंदांनीं जशीं कांहीं बोलणीं बोलविली गेलेली ती सहन करून असावीच (उपसाहाणें—जवळ जवळ आंत घेणें—घ्यावीत साफ—स्वच्छ करणें, आधार देणें, समर्थ करणें. गुंडाळून स्वतःत मिळवून घेणें) तीं देवपणानेंच नटवावींत शोभवावींत तरच बरें कीं अहो. त्याप्रमाणें प्रीतीनें का प्रमादानें म्हणजे दुर्लक्षानें का गाफिलपणानें जी कांहीं देवाबरोबर मजला विरुद्धतेनें बोलणीं बोलविलीं गेलेलीं तीं श्रीमुकुंदानीं सहन करावींत. देव योग्यतेवरच देव भेटणारा, देवा आंगीच क्षमा गुण तेथें समर्थपण नटलेलें, तुम्हांस वारंवार आळवावें जेवढें तेवढें थोडेंच. (५५९)

देवाच्या योग्यतेवरच देव योग्यता येणारी; देवाच्या सहनशीलतेवर शांतपण भेटणारें; देवाच्या अंगीं असणारा जो पृथ्वीच्या पोटीं असलेला क्षमा गुण, तेथें समर्थतेचा तो प्रभावच मुळीं तेथें समर्थपणच एक नटलेलें. अनेक उपाय योजून तें नीटशा योग्यतेचें केलें जाणारें, होणारें होतें, क्षमा पृथ्वी हीच मुळीं ह्या भूतसंघास—(भूतग्रामास, भूत योनीग्रामास जीवदशा पिंडास) आधार अशी. जवळ जवळ पुरुष श्रद्धा उपेता म्हणजे युक्त झाली असल्यानें, अहो, हे पुरुषोत्तमा! तुम्हांस जेवढें कांहीं म्हणून विनवावें तेवढें थोडेंच होय, तुम्हांस जितकें करुणापर आळवावें तितकें थोडेंच होतें—तेथें विनवणीच एक परिणाम करून असते म्हणून विनवावें का विनवणेंच एक सर्व महत्व पाहाणारें होय. (५६०) तरी आतां अहो जी देवा! अपरिमित अतिशयतेचे असे तुम्हीं, आपण अहो! दुर्ज्ञेय—, जाणण्यास अति कठीण असे आहांत, अगाध महिम्याचे आहांत, तरी मजला आपल्या शरणागताला (आपलाच एक आसरा, आश्रय आहे ज्यास अशा आपलाच आश्रय करून आहे त्यास) मला सर्व अपराधांना आपण (क्षमाशील होऊन—सोशीकपणा अंगिकारून—समर्थ होऊन) पोटीं घालावें, (माझे अपराध सहन करावे) माझ्या अपराधाची क्षमा करावी, आपला राग शांत करून मजला माफी द्यावी, क्षमा करावी व दुरितें निवारण करावींत. (५६१)

## श्लोक ४३ वा —

तुम्ही लोकांचे पूज्य पिता आहांत; चराचर जगाचे उत्पादक गुरु आहांत—श्रेष्ठ असे गुरुंचेही गुरु आहांत. तिन्ही लोकांत तुमच्या सारखा अप्रतिम प्रभावाचा वैभवशाली असा कोणी नाहीं, मग तुम्हांहून अधिक तो कुठचा का कोण असणार?

(ओव्या ५६२–५६७)

**अर्जुनानें केलेली विश्वरूपाची विनवणी–विश्वरूपाच्या अंगभूत असलेल्या देवदेवतांसह विश्वरूपास नमन–स्तुति–अपराध क्षमापन–लोकांचे–चराचराचे पूज्य पिता–गुरू श्रेष्ठ पढियंते–तिन्ही लोकीं आपला प्रभाव–अप्रतीम अशा तुम्हांस साष्टांग नमस्कार; मजवर कृपाप्रसाद करा; पूर्वी कधींही न पाहिलेलें आपलें दर्शन पाहून मला हर्ष झाला, भीति वाटली, मनही पण व्यथीत झालें, म्हणून मला आपलें मूळ रूप दाखवा. देवेशा–देवश्रेष्ठा–मजवर प्रसन्न व्हाः—**

**देव देव स्तुति :—**

देवाचें महिमान, (सामर्थ्य, प्रभाव, वैभव) मी साचें म्हणजे खरेपणानें जाणितलें कीं, देवचमुळीं चराचराचें जन्मस्थान होत. देवांच्या पोटींच ह्या चराचरानें जन्म घेतला आहे; ह्या चराचर सृष्टीला देवानींच जन्म दिलेला आहे; देवच ह्या सृष्टीचे पिता होत–जनक होत–जनक आहेत. (५६२) काय हरि, काय हर, ह्या समस्तांनां सर्वांना तुम्हीं देवचमुळीं श्रेष्ठ, अशी परम देवता आहांत–अहो वेदांनांही पढविणारे, (शिकविणारे असे) आदिगुरू, गुरूचेही आदि असे तुम्हीं आहांत. (५६३) **अहो हे श्रीरामा–अहो हे श्रीरामचंद्र प्रभु–आपण अर्थपूर्ण गंभीर, खोल असे आहांत. अपराध सहन करणारे आहांत.** आपण आपलें गंभीरपण यत्किंचितही सोडीत नाहीं. कमला तेथें नांदत–वागत असलेली जशी का भूतें अनेक तीं आंत सामावून घेऊन लोकाभिरामपणास आलीं, रामच झालीं, रम्यपणें एकत्वास आलीं, आपण अनेकविध भूतांना आपल्याठायींच एकत्रित करून आपणांत सामावून आहांत. (अनेक प्राणिमात्र तरी स्वतःत सामावून घेऊन व्यापकतेनें आपण एकच असे आहांत.) आपण सकळ गुणांनीं अप्रतीम असें आहांत, अद्वितीय असें आहांत. तुम्हांसारखी चित्र मूर्ति नाहीं. आपण आपणासारखेंच आहा! तुम्हांसारखे तुम्हींच! असें निरूपम आहांत! तेथें सदृश्यता ही आपणांसच दिली होते! सदैवतेचे एक असे दैववान्! सदैवतेचे रहस्य सकळ गुणांना घेऊन असलेले असें आपण सर्वश्रेष्ठ अप्रतिम बिनजोडीचे आहांत! तुम्हांसारखी अप्रतिम मूर्ति नाहीं! (५६४) तुम्हींच प्रेमयुक्त, मोहक, रसाळ, मधुयुक्त फूल नेहमीं ताजेपणाचें असें: तुमच्या तोलाचे दुसरें कांहींच नाहीं. पण असें हें प्रतिपादन करणें बोलणें हेंहीपण काय कसचें ते !!! तेथीलचे वर्णन काय रूपास येणारे? तेथें प्रतिपादन हेंचमुळीं नच होणारें असें आहे. तुम्हींच सर्व अवकाश (पोकळी) सामावण्याचें स्थान–आकाश! तेथें सर्व जगच मुळीं तुम्हांमध्यें सामावून आहे! (५६५) तुमच्या बरोबरीचें दुसरें कांहींही नाहीं! पण दुजें का दुसरें म्हटलें कीं दुजाभावच एक दुजेपणानें दुजा असा येतो! दुजें म्हटलें कीं लाजच एक सर्व मुळीं पदरांत येणारी होत आहे! व येथें आतां अधिक असें बोलणें का अधिक असें तुमच्यापेक्षां थोर असें नाहींच! अधिक की उणें ते कसचे. (५६६) म्हणून तिन्हीं भुवनामध्यें तुम्हींच एक; तुम्हांसारखा दुसरा एकादा कोणी नाहीं! तर मग तुम्हांहून अधिक तो कुठचा आणावा, तुमचा महिमा अलौकिक लोकोत्तर असा वर्णनासचमुळीं येणारा नव्हे. (५६७)

**श्लोक ४४ वा** :—म्हणून तुम्हां परम पूज्य ईश्वराला मी आपली काया अर्पण करून साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना करित आहे कीं हे देवा, प्रेमळ पिता, पुत्राच्या कल्याणासाठीं त्याचे अपराध सहन करतों तसेंच पति हा पत्नीचे अपराध सहन करतो व मित्र मित्राचे अपराध सहन करतो तसे देवा! तुम्हीं माझे अपराध सहन करावेत हे योग्य होय ॥ ४४ ॥ (ओव्या ५६८–५७९)

(असें अर्जुनानें म्हटलें व पुढें दंडवत घातलें तेव्हां तर **अर्जुनास सात्विकाचें भरतें येऊन आहे.**)—असें अर्जुनानें म्हटलें, स्तविलें व दंडवत घातलें, त्याचा सात्विक भाव उभरून आला, त्यास सात्विक भावाचें भरतें आलें. (५६८) तो म्हणूं लागला कीं देवा! आपण प्रसन्न व्हा, कृपेचे व्हा, कृपा

करा, कंठ दाटून येत आहे, सगद्गदित होत आहे; मजला ह्या अपराध समुद्रांतून काढावें. (५६९) तुम्हीं जगमित्र, विश्वाचे सुहृद, निर्हेतुकतेचे मित्र आहांत. तुम्हीं आमच्या सोयरेपणाचे आहांत असें महत्व आम्हीं मानणें तें कसचें! अहो! तुम्हां विश्व-ईश्वराच्या ठिकाणीं अद्भुत गोष्टी ऐश्वर्यें! आश्चर्यच एक! नित्य उगवण्याचें प्रगटण्याचें झालें आहे! होत आहे! (५७०) तुम्हीं स्तविले जावेत, स्तुतिस्तोत्राचे व्हावेत; पण मजलाच कीं अहो! सभेमध्यें वर्णित आहांत! अहो! सत्कार, स्वागत, भाषण, वंदन, सेवा, पूजन करीत आहांत! व जसजसें हें अधिक होत आहे, तसतसें! क्षोभास येऊन, चंचल होऊन बढाई मारावी, बडबड करावी, वल्गना करावी, तेंच मधुर, सुंदर, मौल्यवान् म्हटलें जाणारें असें वरचेवर होत आहे. (तेथीलचें गायन हें कसें अश्वगति विशेष अशा दुडकी चालीचे का उडी, का वल्गिजत वल्गु–बडबड, वाचाळ.) (५७१)

म्हणून, अहो, अशा ह्या अपराधांना मर्यादा नाहीं. अहो श्रीमुकुंदा! अहो श्रीकृष्णा! अहो श्रीविष्णु! आपण रत्नच कीं अहो, आहांत, म्हणून प्रमादापासून, बेसावधपणापासून, अविचारीपणापासून रक्ष रक्ष माझें रक्षण करा, संरक्षण करा, (५७२) अशी विनवणी आपणास करावी अशी माझी योग्यता कसची? पण माझें बोलणें कसें तर बोबडें मूल बापाशीं लडिवाळपणानें सलगी करून बोलत आहे, असें होय. (५७३) पुत्राचे अपरिमित (अगाध) अपराध पिता तो, निर्द्वंद्व तो दुजाभाव सोडून एकत्वामुळें तें सहन करून असतो. त्याप्रमाणें आपण माझे अपराध सहन करावेत. (५७४) सख्याचें दांडगेपण (उद्धत) सखा निवांतपणें सहन करतो; तसें तुम्हीं माझें समस्त कांहीं सहन करावें, साहावें. (५७५) प्रिया जी तिजपासून प्रियकर तो कांहीं सन्मान व्हावा असे इच्छित नाहीं, मानीत नाहीं. तसें आपण उच्छिष्ट काढलें तें क्षमा करावें [गात्रें पालटोनी झरों लागती यालागी उच्छिष्ट पंचक म्हटलें–आयुष्य शंभर वर्षें; त्यांपैकीं चौथी पंचदशी शेवटचीं पंचवीस वर्षें ७५ ते १०० वर्षे वातश्लेष्मादि शश (ससा) चंद्रावरील डाग होती। गात्रें पालटोनी झरों लागती या लागीं उच्छिष्ट पंचक) शिष्टाचाराबाबत बुद्धिवाद करणें, बहुसाल नीति सांगणें, पांडित्याच्या पोकळ गोष्टी करणें, तेथें आपण तीं खरकटीं काढून टाकलीं. (५७६) प्राणाचे सोयरे भेटले तेथें; अनुभविलेलीं भोगिलेलीं संकटें ती आपणांस निवेदन करतांना संकोच वाटत नाही. (५७७) जिनें ज्याला आपलें सर्वस्व अर्पण केलें तो कांत तिला भेटला असतां तिच्यानें मनांतील गोष्ट गुप्त ठेववत नाहीं. गोष्ट ती तशीच असून असो, असें होत नाहीं. इच्छा मनीचें तें (जाणणें) बोलणें होतेंच. (५७८) त्याप्रमाणें हे स्वामिन्, आपणांस मी विनविलें आहे असें म्हणतांना कांहीं आणीक एक कारण आहे. (५७९)

**श्लोक ४५ वा**:—हे देव! हे देव श्रेष्ठा! जगन्निवासा! पूर्वीं कधींही नच पाहिलेलें व अकल्पित आलेलें ते विश्वरूप दर्शन पाहून मी हर्षित (आनंदित) झालों; पण भयामुळें माझें मन (दुखित झालें, पीडा पावलें) व्यथित झालें; म्हणून आतां तेंच आपलें देवरूप मला दाखवा, प्रसन्न व्हा. (४५)

(ओव्या ५८०–६००)

ते म्हणजे देवाशीं लाडी गोडी सलगी करून विश्वरूप दर्शनाची इच्छा केली-दर्शनाचा छंद घेतला. तो छंद माझ्या प्रेमळ स्नेहाळांनीं–मायबापांनीं आपण पुरविला कीं जी. (५८०) देव वृक्ष कल्पतरु (आदित्याचीं झाडें अंगणीं कौतुकानें लावावींत. कामधेनु तुल्यतेचे ते आपलें वात्सल्य खेळण्यासाठीं म्हणून मागावें व तें आपण द्यावेंच, (५८१) नक्षत्रें खेळण्यास मागावींत, चंद्र चेंडूच्या ऐवजी आणावा. असा अवघा छंद माउलींनीं पुरविला. (५८२) एक लेशभर अमृत मिळविण्यासाठीं केवढें तरी सायास–कष्ट पडतात पण त्याचा तर आपण चारमास–महिने–पाऊसच पाडला, पाऊसच केला, (पाऊस चालणारा केला. ह्या मांस विकारास जीवदशा–धर्मास–जीवदशेस प्रबोध) पृथ्वी नांगरून वाफ्यावाफ्यांत चिंतामणी पेरले. (५८३) असें अहो, जी स्वामी मला आपण कृतकृत्य केलें आहे. आपणाकडून मी कृतकृत्य–कृतज्ञ केलेला

आहें. आपण बहुत लळा पाळला, हरि हर ब्रह्मादिकांनाहि जें ऐकण्यास मिळणें (शक्य) नाहीं, असें दुर्लभ तें आपण मजला दर्शविलें, दाखविलें, देखणें दाविलें. (५८४) अहो, असें तें देखणें देखण्याची गोष्ट ती कुणीकडे (दुर्मिळ अशी) बरें? जें देखणें देखण्याची उपनिषदानांहिपण भेटत नाहीं—गांठभेट नाहीं अशी ही आपल्या हृदयाच्या आंतील जी गांठ ती आपण मजकरितां सोडिली आहे. (५८५) अहो जी! अहो हे स्वामिन्! कल्पाच्या आरंभापासून तों आजची घडी धरून माझीं जितकीं कांहीं जन्में (जितके माझे जन्म झाले असतील) होऊन गेलीं, (५८६) त्या अवघ्यामध्यें प्रत्येक जन्माचा—घराचा झाडा घेऊन पाहात (घर धांडोळी) आहे, तों अशी एकादी मात—गोष्ट देखिली का ऐकिली आहे, असें मुळींच सांपडेना. (५८७) बुद्धीचा जाणण्याचा गुण त्यास ह्या विश्वरूपाचे आंगणी, आंगवणें जाणवलें नाहीं,—रूप हें अंतःकरणानें केव्हांही साध्य करवेना अथवा तेथीलचा शब्द का हांक ही आपलीशी होईना. (५८८) तेथें डोळ्यांनीं पाहण्या देखण्यास दिलेलें व्हावें—डोळ्यांच्या देखीचें पाहण्याचें गोचरीचें ते पाहाण्याची ती योग्यता असावी, (व्हावी.) पाहाणें पाहातां यावें, अशी गोष्टचमुळीं ती कुठची कशास का कसची होणारी! बहुत काय, पण (डोळ्यांना गोचर तें रूप व्हावें) असें कांहीं पूर्वीं पाहिलेंहि नाहीं व ऐकिलेंपण नाहीं. (५८९) तें हें आपलें विश्वरूप तुम्हीं आपण मजला प्रत्यक्ष ह्या डोळ्यांनीं पाहाविलें, देखविलें व आतां येथें माझें मन अहो, हे देवा! आनंदित झालें आहे, हृष्ट झालें आहे. (५९०) यावर आतां ह्या जीवभावी अशी कांहीं एक इच्छा-चाड आहे कीं तुमच्याबरोबर हितगुज बोलावें, गोष्ट करावी व तुम्हांत आलिंगावयासाठीं तुमची जवळीक भोगावी (असें वाटतें.) (५९१)

तें ह्या विश्वरूपीं करूं म्हणावें, तर कोणत्या बरें अशा मुखाबरोबर मी चावळावें, बोलावें आणि कोणास का कोणत्या त्या रूपास भी क्षेम आलिंगन द्यावें ते? कारण, तुमच्या रूपास तर लेखच नाहीं. तें रूप अगणिततेचें असल्यानें तुम्हांस तर मुळींच गणना नाहीं. (५९२) अहो! वाऱ्याबरोबर धांवणें टिकत नाहीं, गगनास खेंव—आलिंगन देणें घडत नाहीं. समुद्रामध्यें जलक्रीडा करणें कसचें ते होणारें! (५९३) असें आहे म्हणून अहो देवा! इथचें भयच एक ह्या जीवदशेमध्यें उगवून आहे (उपजतच भय येऊन आहे) करितां आतां एवढा एक माझा लळा पाळावाच कीं. आतां आपलें हें अगाधतेचें होणें ह्या विश्वरूपाचें तें पुरे. (५९४) चराचर सृष्टि ही विनोदानेंच, हौसेनें, सुखानें खेळत खेळतच पाहावी व पाहिल्यावर सुखानेंच, आनंदानेंच, पुण्याई करून, मुळीं आपल्या घरीं रहावें जसें, तसें तुमचें चतुर्भुज रूप तें आम्हांस विसावा आहे. (५९५) आम्हीं यमनियमादि सर्व योग अभ्यासावेत, – तेहीपण ह्याच चतुर्भुजरूपाच्या अनुभवास येण्याकरितां. शास्त्रें शिकावींत, त्यांत पारंगत व्हावें, त्यांचें अध्ययन करावें–, तेंही येथें पण हाच एक सिद्धांत कीं चतुर्भुज रूपाच्या अनुभवानें असावें. (५९६) आम्हीं सकळ यजनें (यज्ञ करणें, पूजा करणें, दान देणें, अर्चन अर्पणें, ऋत्विजे होणें, यज्ञ करविणें) पूजनें जीं करावींत तींहीपण ह्या चतुर्भुज रूपफळानें फलित व्हावींत म्हणून की तीर्थें, तींहीपण ह्याचकरितां करावींत की. (५९७) आणीकही कांहीं एक जें जें म्हणून दान पुण्य आम्हीं करतों, करावें त्याचें फलित होणें जें तेथेंही हेंच चतुर्भुज रूप (५९८) अशी त्या चतुर्भुज रूपाची ह्या जीवदशेस आवड, इच्छा, म्हणून तीच रूपाची देखणी लगबगीनें देखण्यासाठीं उत्कंठिततेमुळें ज्या कांहीं अडचणींत मी फसून आहें, ती अडचण दूर करावी जी, निरसन करावी की. (५९९) अहो, आपण जग विसवणारे असे ह्या जीवीचे जाणते आहांत; म्हणून अहो, देवांचियाहि देवा! आपण आपलें पूजन करणाऱ्यावर, मजवर प्रसन्न व्हा, कृपा करा. (६००)

**श्लोक ४६ वा** :—अहो! हे सहस्रबाहो! हे विश्वमूर्ते! तुम्हांला तसे, मुगुट धारण केलेले, हातांत गदाचक्र असलेले असे मी पाहूं इच्छितों; म्हणून त्याच आपल्या चतुर्भुज रूपाचें आपण व्हावें! की जी अहो, जग का ब्रह्मांड शरीर प्रतिमेचे आपण ते! (४६) (ओव्या ६०१–६०९)

**वीररसः दिव्यरसः अलौकिक सुंदर तेजस्वी असें स्वर्गीय देव कोटींतील रसदर्शनः**

अहो! नीळ कमळांना रंगवून राबवून–निलिमा अंबरीची, तेथीलचा तो नमुना, मासला, तऱ्हा, रीत, प्रकार दाखवून आकाशासही पण रंग लाविला, तेव्हां तेजाची प्रभा, झांक ती नीलमणी—इंद्रनील मण्याप्रमाणेंच देखणें दाखविणें केलें, अशी. (६०१) जसा का पांचू रत्नाला (मस्तक मणी, पांच) सुवास येऊं लागला–सुवासच पांचमणी झाला–का आनंदासचमुळीं भुजा निघाल्या–ज्याच्या जानूवर जानुधरि म्हणजे उत्पत्तिवरच–आयुष्यानें, जन्मानें (गुडघ्यापर्यंतच्या) असण्यानें मकरध्वज जो मदन त्यासहीपण गरुवा असें बरवेपण आलें आहे. शोभा आली आहे. (६०२) मस्तकामध्यें, मुकुटामध्यें, मुकुटास ठेविले–मुकुटा मुकुट मस्तक झाले का मुकुटासच एक ते मस्तक मुकुट झाले, मुकुटच केला. त्या मस्तकानें मुकुटास, अहो! ज्याच्या अंगानें तर (अंग तेच मुळीं शृंगार सर्व असें अशा त्या) शृंगारासच अंगासन्न मुळी अंगरूपी श्रृंगार दागिना, अलंकार (सांपडला, मिळाला) भेटला, केला. (६०३) जसें आकाशांतील मेघास इंद्रधनुष्य आवरतें, तसें (वैजयंतीनें वैजयंति श्रीशार्ङ्गपाणीच्या गळयातील माळ ती, पांच तत्वांची दर्शकः तेथें पांच रत्नें—हिरा–आकाश; माणिक–अग्नि; पुष्कराज–वायू; मोती–जल; नील–पृथ्वी; अशी तीं पांच तत्वांची दर्शक वैजयंती तिनें) कृष्णाला शोभविलें (आवरिलें वेष्टिलें) होतें, गायन रंगणामध्यें मेघ हेच मुळीं त्या इंद्रधनुष्याची बैठक होत. (रंगिन्=रंगविणारा, नटणारा, प्रीतियुक्त) तसें श्रीशार्ङ्गपाणीचें रूप गहनत्व वैजयंतीनें रूपास आणिलें, आवरिलें आहे, गगन हें मेघानें शोभविलें तेथें इंद्रधनुष्यानें तें शोभणें झेपलें. तसें रूप गहनत्व शार्ङ्गपाणीचें तें (रासरचना, चिद्‌गगन, चतुर्थ, शून्य, मनुष्यदर्शन) वैजयंतीनें शोभविलें. (६०४) आतां कोण ती (कोणती ती भाषण, वक्तृत्वपूर्ण वाणी प्रभुततेच्या–) प्रभुत्वाची वाणी, उदार गदा जी, का हेवा करणाऱ्यांना (देव–अमित्रानाहीं वैरागर म्हणजे आपल्या स्पर्शानें खड्याचे रत्न करणारा मणी.) संसारलियांना–तेथें आसुरानांहि मोक्ष–कैवल्यपद देणारी अशी अहो! कसें ते चक्र अहो! संसारलिया गोविंदा सौम्य तेजानें मिरवत आहे, शोभत आहे! (६०५) फार काय, पण अहो! स्वामी! हे विश्वमूर्ते! ते मस्तकीं मुकुट धारण केलेले, हातांत गदा व चक्र शोभणारे, मिरवणारे, चतुर्भुजरूप देखण्यास मी उत्कंठित झालों आहें. म्हणून आतां ते चतुर्भुजरूपाचे आपण व्हावें, अशी विनंति आहे. (६०६) विश्वरूपाचे सोहळे भोगून (अनुभवाचे करून) डोळयांना आनंदोत्सवाचें होणें झालें. माझे डोळे निवाले; व आतां ते साकार ठाण–'चतुर्भुज' पाहाण्यासाठीं हांवरे (हपापलेले, आंधळे, भुकेले) होऊन आहेत. पूर्वींची ती मूर्ति–सांवळया कृष्णाची मूर्ति दिसत नाहीं, म्हणून डोळे चांचपडत आहेत. (६०७) अहो! माझे हे डोळे तर इतके कांहीं उत्कंठित झालें आहेत कीं त्या साकार रूपड्याशिवाय दुसरे कांहींही ते पाहाण्याचें इच्छित नाहींत–(आवडून घेणारें नव्हत,) असे झाले आहेत. ते चतुर्भुज जर का नच पाहिलें तर हें सर्व कांहीं विश्वरूप जरी, तरीपण तें थोडेंच अल्पच असें; कारण विश्वरूपदर्शनानें तर माझे प्राणच उत्कंठित केले, फर्मविले जात आहेत. जीव थोडथोडा होऊन आहे. चतुर्भुज हें नाहीं तर विश्वरूप हें तर अल्पच (मोटकें–थोडेंच) असें. कारण ते त्या जीवदशेस आवरून आहे. (६०८) आम्हांस भोग, संसार मोक्षाच्या जागीं सगुण रूपावांचून, (श्रीमूर्तीशिवाय,) दुसरें कांहींही सुखाचें नाहीं. म्हणून त्या श्रीमूर्तीच्या साकारतेचें व्हावें व हें आपलें विश्वरूप–विराटस्वरूप सांवरून घ्यावें, आटोपूत घ्यावें. (६०९)

**श्लोक ४७ वा :—**

**श्रीभगवान उवाच :**—मी प्रसन्न होऊन हें विश्वरूप तुजला आत्मयोगानें दाखविलें–तें तेजोमय, अनंत व आद्यविश्वच असे ते तुजशिवाय दुसरे कोणीही यापूर्वी पाहिलेलें नाही. (ओव्या ६१०–६१७)

अर्जुनाचें तसें तें म्हणणें ऐकून तर विश्वरूपास अतिशय आश्चर्य वाटलें, त्यास विस्मय जाहला, व

त्यांनीं म्हणूं केलें की अहो ! ह्या अर्जुनासारखा तर अरसिक असा कोणीही नसेल, अविचारी असा (अडाणी एककली) कोणीही पाहिला नाहीं. (६१०)

**शांतरसः—**

श्रीभगवान म्हणाले, केवढ्या तरी कींमतीची वस्तु तूं पावून आहेस ! (तुला मिळून आहे!) अशा ह्या वस्तुलाभाचा संतोष तर तूं मुळींच मानीत नाहींस. (अंग तृप्त झालें असा) संतोष आंगचा करीत नाहींस. वर मिळून जाऊन हें असें काय हट्टाचें (हेंकड, एककली) बोलणें करीत आहेस बरें ! (६११) आमच्या प्रसन्नपणाचें त्वरितपण म्हणजेच स्थूल शरीराचें सर्व कांहीं (पर्यंत–परिअंत पण) देणेचें, तेथें सर्व जीव उपयोगास आणिला, (वेंचला), तेंच अनन्यपण म्हटलें. तसा नच वेंचला तर तो कुणासाठीं म्हणून उरवावयाचा ? तो (सर्वच्या सर्व जीव वेंचला तेंच आमच्या प्रसन्नतेचें खरें लक्षण, नाहीं तर अनन्यतेचें तें कसचें ! तें कुणासाठीं ठेवायचें ! का उरवायचें, वेंचण्याचें का खर्चण्याचें ते !) (६१२) तुझ्या आवडीमुळें ह्या जीवसृष्टीचें सारसर्वस्व (दळवाडे) स्वरूप–(गीर–मगज) कमविलें–कामविले ते श्रमपूर्वक तयार करून एवढें हें ध्यान रचिलें, (बांधलें, दर्शनास आणलें) रूप नटविलें. (६१३) आवडलेपणामुळें (तूं आवडता म्हणून) आमची प्रसन्नता–उत्कंठितता कशी वेडी झाली, तें कांहीं समजत नाहीं ! पण तेथें तर, ह्या जगीं जें कांहीं गौप्य म्हणून आहे, त्याची एक गुढीच उभारली–, ध्वजाच लाविली आहे, असें म्हणावें लागत आहे. (६१४) माझें स्वरूप अपार खरें, पण हें तर परात्पर, सर्वोत्तम ईश्वर, परमेष्ठी, गुरूंचाही गुरु असें, त्या अपारासहीपण उत्कंठितपण परिणाम करणारें असें अपारपणाचें खरें. काळाच्या अनवच्छेदतेनें पूर्वीं जे कोणी गुरु होऊन गेलेले, त्यांचेहीपण हे गुरुश्रेष्ठ असें हें रूप जेथूनच मुळीं ते रामकृष्णादि अवतार झालेले. (६१५) तें ज्ञानतेजच ! केवळ तेजच ! सर्व विश्वचमुळीं आत्मस्वरूप नटलेलें ! ते तर अंतपार नाहीं असें, भाग्यच एक–! अढळ अशा सौभाग्याचे ते ! सकळांना आद्य असें ! प्रथमचें ! मूळचें ! पहिलें ! असें आहे ! (६१६)

असें हे तुजवांचून दुसऱ्या कोणीही पाहिलें (पढलें, ऐकलें) नाहींच. तें दुसऱ्या कुणालाहिपण पढविणें, दाखविणें, ऐकविणें झाले नाहीं; म्हणून तें कांहीं 'जोगे' असें ह्या देहसाधनास आहे असें नव्हे– देहासचमुळीं ते चिकटून जावे असें नाहीं. त्यानें साधनावरच योग्य होणारे देहच आपल्या आवडीचे करावे असें नाहींच. येथें तर देहच सिद्ध करावा लागणारा ! म्हणून ते जोगेपण हें कांहीं प्रसिद्धपणें सहजा-सहजीं प्रसिद्ध असें केव्हांही नव्हे. जेवढें म्हणून दृष्टीस महत्व आहे, तेवढें ह्या ऐकण्यासाठीं महत्व आहेच ! दृष्टीनें चित्रित होणें होतें; श्रुत जें तेथें विचित्रता हीं ह्या शब्दरूपी आकाशाची [श्रुताधीत न होतुका] असें रहस्यच एक पदरीं भाग्यचबांधून आहे असें ते परात्पर श्रीगुरूंचें ज्ञानलक्षण, औदार्य सर्व महत्व पाहून आहे ! (६१७)

**श्लोक ४८ वा**:—वेद अध्ययनानें हे पाहाणें शक्य नाहीं, यज्ञ करण्यानें हें रूप पाहणें शक्य नाहीं. वेद, यज्ञ, अध्ययनानें हे विश्वरूप पाहाणें देखणें शक्य नाहीं. क्रिया योगांनीही (करणें प्रायश्चित अभ्यास आणि समाप्ति आचार व्यवहार प्रायश्चितादीनी हें रूप पाहाणे शक्य नाहीं. उग्र म्हणजे कठिणतर अशा तपाचरणानेंही हें विश्वरूपदर्शन होणारें नव्हे ह्या नरलोकीं मी तुजशिवाय दुसऱ्या कोणालाही देखणा, पाहाणारा, होणारा नव्हे. (४८) (ओव्या ६१८–६२३)

विश्वरूपाची सोय पाहिली, मार्ग हे ठावठिकाणाच्या विश्वासास आले. तेथें वेदांनीं मौन (पत्करलें). यज्ञ तर खरोखरीच स्वर्गाहूनही परत पुनरपि माघारी आले. (६१८) साधकांनीं श्रमच पाहिले; म्हणून योगाभ्यास सोडून दिलाः त्यांनीं तर अहो ! येथें कसची ती ! सुलभ अशी अभ्यासाची गोष्टीच नाहीं ! असें

म्हणू केलें. (६१९) सीमेचीं सत्कर्मे उत्तम अशीं तीं पूर्णत्वास आलेलीं अत्युत्तम पूर्ण अशीं तीं सत्कर्मे, आपआपल्या मोठेपणानें धांव घेऊन असलेलीं, तीं धांवेचीं झालीं. आपल्या स्वधर्माची धांव-मजल दिली गेल्यानें बहुतेक सत्कर्मांनीं तर सत्यलोकच प्राप्त करून घेतला. (६२०) तापी नदी, सूर्यपत्नि तपश्चर्या करणारांनीं येथें महातेजाचें इंद्राचें ऐश्वर्य पाहिलें आणि उभ्याउभ्याच, (उभयतांनीं दोघांनीही पतिपत्नी, दंपतींनीं) उग्रपण सोडलें, रागीटपण टाकून दिलें. मनोवृत्तींत बदल झाला. उभय ते रागीटपणा-क्रूरपणा, (जोर, शक्ति) विरहित असे झाले; याप्रमाणें ते तपसाधनाच्या दूर राहिले. अपार अंतरावरचे झाले. (रे अपारांत रे). (६२१) ते हें विश्वरूप तुवांच अनायासें (जेथें सर्व दान उजविलेलें जसें का.) देखिलें असें हे विश्वरूप ह्या मनुष्य लोकीं कोणीही देखिलें नाहीं, कोणासही दिसलें नाहीं. (६२२) आज ती ध्यानरूप संपत्ति, संपदा, ब्रह्म भोगण्यासाठीं तूंच एक ह्या जगीं थोर अशा ऐश्वर्यानें युक्त आहेस, असें हें परमश्रेष्ठ भाग्य विरंची जो ब्रह्मदेव त्यासहीपण नाहीं. (६२३)

**श्लोक ४९ वा :—**

माझें असलें हें घोर रूप पाहून तुवां व्यथा मनाची ती घेऊं नयेस. विमूढ असा भाव (डोळस बुद्धीचें तें रूपानें असणें तें टाकूं नकोस) घेऊं नको : भीति सोडून दे : प्रीतियुक्त अशा मनाचा हो : निर्भय होऊन पुन्हां तेंच माझें विश्वरूप हें पहा. (४९)

(ओव्या ६२४–६०२)

ह्या सगुण स्वरूपाच्या दर्शनानें जसें कां विश्वरूपच देखिलें, करिता सगुणश्रीच्या–विश्वरूपाच्या लाभानें आनंद मानून ऐस ; येथीचे भय मानू नको. धन्यता मान, येथीचें तपभय घेऊं नको. ह्या (सगुणाशिवाय कां) विश्वरूप लाभाशिवाय दुसरें कांहींही बरें का चांगलें असें मनानें घेऊं नको. (६२४) अमृताचा समुद्र भरून, उभरून आहे, तो अकस्मात अंगावर आला, (स्वाधीन झाला, प्राप्त झाला) तर मग काय कोणी तो (अमरपदाचें होणें, तेथें योग्य जें कांहीं एक करणें ते न करितां) त्यांत बुडून जाऊं, प्राणास मुकूं म्हणून कोणी तो टाकून देऊन–सोडून चालतां होईल काय ? (६२५) सोन्याचा डोंगर (अद्रि गोत्रगिरिग्राव अचल शैल शिलोच्चयाः (व्यसन-येसणा) एवढा हा थोरला मोठा, कांहीं उचलतां येणार नाहीं म्हणून अव्हेर करणें होतें–पण तू आज येथें गजबजून–गडबडून जाऊं नकोस. (६२६) दैवयोगामुळें दैववान् म्हणून चिंतामणी अंगावर धारण करावा, पण त्याचें एक ओझेंच (वाटावें) का वाटलें म्हणून तो काढून टाकावा हरवावा. अहो ! कामधेनु घरीं आली, ती पोसवत नाहीं, म्हणून दवडावी. (६२७) प्रत्यक्ष चंद्रमा घरीं आला तो (तर उष्मा-तलखी,) उबारा करतो–(जीव कोंडला जात आहे.) म्हणून त्यास बाहेर घालवावें का "निघ" म्हणावें दूर करावें, त्यास "दूर हो" म्हणावें, जसें का दिनकरनाथ सूर्य त्यास शोभा, कांति, छाया, सांवली पडछाया करतोस म्हणून बाजूस हो, परता सर म्हणणें जसें. (६२८) तसें ऐश्वर्य हे प्राधान्यपणें, (अमानुष शक्ति, समृद्धि तर) महातेजच एक सहजच आज हातीं आले, आतां येथें तुझ्या जीवदशेनें गडबडून जाणें ते कां? तुझ्या जीवाची ती गजबज कां व्हावी बरें ! (तेज = अग्नि, सौंदर्य, उत्साह, शौर्य, तत्त्व, सत्व, अर्क, बळ, वीर्य, सूर्य, सोनें, कीर्ति, परब्रह्म) (६२९)

पण हे खेडवळा, (अडाणी, गांवढळा, गांवढिया,) तूं कांहींच जाणत नाहींस, असेंच म्हणणें भाग आहे: कारण तूं जाणणें तें नेणतच आहेस; येथें आतां दुसरें तिसरें कांहीं बोलणें उरतच नाहीं, म्हणून आतां हे धनंजया ! अर्जुना !! काय तुजवर कोपावें, रागवावें ? कारण काय तर तूं देह, वपु, कलेवर, शरीर, प्रतीक, गात्र, काय, अंग सोडून देऊन, अंगच कां आंगचा धीर टाकून देऊन, एक तेथीलची ती छाया का सांवली (पडलेली जी) तीच्यमुळीं आलिंगण्याचें करीत आहेस की. (आंग-अहाच बोलाची वालिफ फेडिजे। आणि ब्रह्माचांचि आंगा घडिजे। मग सुखेसि सुरवाडिजे। सुखान्चि माजी ॥ ६२५ ॥) (६३०)

छाया का सांवली जी (पडलेली) ती कांहीं मी जो साचेपणानें आहें, तो कांहीं ती (सांवली) नव्हे. माझ्या खऱ्या स्वरूपाबद्दल–सगुण स्वरूपाबाबत तूं आपलें मन अधीर, भ्याड का कच्चें म्हणजे थोडथोडें करीत आहेस, व सोंगाचें, जे का मिथ्या वस्तूंचें, म्हणजे (अंगवणया) अवगणियेचे–सावलीचें (साकार जे चतुर्भुज शक्ति का नवस मानणें जें अवगणी आंगवण) तिचेंच मुळीं प्रेम धरीत आहेस. (६३१) करितां हे बाप्पा ! अर्जुना !! अजुन तरी तूं ह्या [साकार चतुर्भुज, चतुर्भुज रूपाबद्दलची आस्था (काळजी, आधार, आशा) सोड] (साकार चतुर्भुज रूपाचे ठायींच ती निश्चितपणाची व्यवस्था ती सांड–विश्वरूपी अथवा विश्वरूपा-विषयीं अनास्था, अविश्वास, अनादर, औदासीन्य, अपमान बाळगूं नको. (६३२) हे विश्वरूप जरी घोर, भय उपजविणारें भयंकर, तसेंच विकृत–विकाळ असे थोर रूपांतर का बदल करणारे (जी यदृच्छेनें होणारी गोष्ट) आणि थोर तरीसुद्धां येथेंच ह्या विश्वरूपांतच कृतनिश्चयाचा हो. (६३३) कृपण, चित्तवृत्ति ठेव्यापाशीं ठेवून मग आपण केवळ देहानेंच जसा कृपण तो असतो; (६३४) अथवा पंख फुटले नाहींत अशा पिलाजवळ घरट्यांत जीव ठेवून पक्षिणी जशी अंतराळीं–आकाशांत जाते. (६३५) गाय डोंगरीं चरत असते; पण तिचें चित्त घरीं वत्साजवळ बांधलेलें असतें; तसें येथचें प्रेम हे [पदवी (समर्थ वेळ प्रभुत्वाचें) स्थितीच्या पुरुषाचें असें] स्थानपति–स्थिति उपपत्ति, तारुण्यप्रिय, शाश्वती धव, पद्मजाधवः कर. (६३६) दुसरे ते असे की त्या वरवरच्या चित्तानें, (बाह्य) सख्यापुरतें, बाह्य सुखाच्या (पालनापुरतें) चतुर्भुज श्रीमूर्ति ती भोगावी. (६३७) वारंवार सांगितलेलें हें आणीक पुन्हः सांगतो की हा एक बोल कधींही विसरूं नयेस; जे का ह्या विश्वरूपापासून आपला सद्भाव, भलेपणा, प्राप्ति निघूं देऊं नये. (६३८) कधीं नव्हतें तेंच देखिलें, पाहिलें म्हणून जें भय तुला वाटलें (तुजमध्यें उत्पन्न झालें) ते सोड व येथेंच विश्वरूपांतच हें प्रेम संचलेलें असों दे. (६३९) आतां तूं म्हणतोस त्याप्रमाणेंच करूं या; करितां तें पूर्वीचें रूप तें सहज का सुखानेंच न्याहाळून पहा; असें विश्वतोमुख–ब्रह्मच जे श्रीकृष्ण त्यांनीं म्हटलें. (६४०)

## श्लोक ५० वा :— संजय उवाच—

संजय म्हणाला—याप्रमाणें श्रीवासुदेवांनीं, श्रीकृष्णांनीं अर्जुनाला म्हटलें व स्वकं म्हणजे आपलें रूप त्यास पुन्हः दाखविलें. भ्यायलेल्या त्यास धीर दिला, रक्षणाचें आश्वासन दिलें व देव पुन्हः सौम्य रूप धारण करते झाले.

(ओव्या ६४१–६७३)

संजय म्हणाला :—असें वाक्य म्हणतांक्षणींच देव पुन्हां मनुष्य झाले. प्रत्यक्ष बापरखुमादेवीवर देव आतां तें कसचें देव म्हणणें ? ते तर मनुष्य झाले, हें कांहीं ना नवेपण नव्हे. तेथें प्रेमाच्या आवडीचें, गोडीचें आश्चर्यच, प्रेमाचा नवलावच एक ! (६४१) उघडें कैवल्य परब्रह्मच–श्रीकृष्ण, त्याहीवर विश्वरूपा-एवढें सर्वस्व आपलेपण अर्जुनाच्या हातीं दिलें ; पण तें कांहीं अर्जुनास आवडेना· (६४२) वस्तु घेऊन ती टाकून यावी तिजवर बहिष्कार घालावा, ती वाळींत टाकावी, रत्नास दोष ठेवावा, का त्यांतच अवगुण ठेवावेत, रत्नास दूषण ठेवणें, ते अथवा कन्या पाहून मना न ये ती–कांहीं मनास येत नाहीं ; मनास मन मिळवून घेईना, म्हणून आवडेना. मनोजन्य, जें मनापासून उत्पन्न होणारी, मनोजन्य–मनोज्ञ–व्यथा ती होत नाहीं, म्हणून ती कन्या मनास येईना, म्हणजे जसें. (६४३)

विश्वरूपाएवढी दशा बालवय, अवस्था केली असतां तेथें प्रीतीचा बाहू (पराक्रम?) तो कसा एक शेलका–उपदेश परिश्रमाचा–का मेहनतीचा निवडक भाग का (उपदेशाचा) उत्तम वांटा देवांनीं किरीटीस दिला. (६४४) सोन्याचा, (सुवर्णाचा, भांगाराचा) रवा (रव= आवाज, स्वर,) मोडून आपल्या हौसेनें अलंकार लेणें घडलें, पण ह्या जीवदशेस ते आवडेनात, म्हणून पुन्हः ते अलंकार आटणें केलें. (६४५) तसें शिष्याच्या प्रीति झाले–(प्रीतींकरितां केलें, प्रीतीचें उगवलें, प्रीतीमुळें घडलें) कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें.

विश्वरूप झालें तें मनास येईचना, म्हणून तर पुन्हः त्यास कृष्णपणास (प्रकृतीस-संसारास-मनुष्यपणास) आणलें. (६४६) अहो ! शिष्याच्या किरकिरीचा, जिकिरीचा ठावच पाहाणारे (साहाणारे) गुरु कोणत्या देशामध्यें का बोलीमध्यें आहेत ! पण संजय म्हणतो, कीं अहो ! पाहा की, केवढी व कशी ती प्रीति संबंधींची आवड ती कांहीं जाणतां येत नाहीं. (६४७)

**आतां यावर भगवंताचें जें दिव्य तेज विश्व व्यापूनही सभोंवार पसरलें होतें, तेंच पुन्हः त्या कृष्णरूपामध्यें सामावले मिळविलें.** (६४८) जसें त्वंपदा जीवदशा का जगद्रूम हें तत्पदामध्यें म्हणजे ब्रह्मरूपामध्यें असिपदानें सामावतें, मुरून असतें, मिळून असतें, का वृक्षाकारपण (द्रुमाकारपण) ते बीज कणिकेमध्यें सांठवितें जसें. (६४९) स्वप्नभ्रांति (स्वप्नाचा विस्तार, स्वप्नाचा घोटाळा, जागृत झालेली जीवदशा गिळते) जागृतीनें संपतें. स्वप्नविस्तार नाहींसा होतो. तसा हा आत्मयोग श्रीकृष्णांनीं आटोपता केला—आवरिला, (संहारिला, एकत्र गोळा केला, शोषून घेतला). (६५०) बिंबामध्येंच प्रभा लोपली, हारपली; जलद संपत्ति म्हणजे मेघ वैभव—नभींची नभींच आटली, आकाशींच हारपली; भरते का भरती ती सिंधूच्या गर्भींच—परिधामध्येंच रिगाली, मिळून गेली, शिरली, एक झाली. (६५१) कृष्ण आकृतीस—आकारास आणली होती—आकाराची वळली होती, जी विश्वरूप चित्र काढण्याकरितां तयार केलेलें वस्त्र—वस्त्राची घडी, ती अर्जुनासाठीं उकलून दाविली, (विश्वरूप वस्त्राची कृष्ण आकृतींत, आकारात वळलेली (वळली) होती, ती अर्जुनासाठीं उकलून दाखविली.) (६५२) तेथें तंतु प्रमाण, रंग, लांबी, रुंदी, व पोत, इत्यादि त्यानें त्यावेळेस चांगल्या तऱ्हेनें (देखिला) पाहिले. तेथें ग्राहिकीचा लाग सांपडेचना—माग समजेना—गिऱ्हाइकीचा तो होईचना. म्हणून, पुन्हः त्या विश्वरूप वस्त्राची घडी केली, घातली. (६५३) **तेथें अतिशयपणानेंच वाढलेलें जें रूप त्यानें** तर सर्व विश्वच जिंकलें व तें सौम्य गोजिरवाणें सुंदर असें साकार झालें. (६५४) बहुत काय, पण श्रीअनंतांनीं पुन्हः धाकुटपणच स्वीकारलें ( जें होइजे जगा धाकुटें। तें जवळिक माझी ) पण येथें भ्यायलेल्या त्या अर्जुनास मात्र त्यांनीं रक्षणासंबंधीं आश्वासन, धीर, वचन, समाधान दिलें. (६५५) जो स्वप्नांत स्वर्गास गेला तो (अवसांत) अकस्मात जागा झाला; तसा अर्जुनास अति विस्मय जाहला अद्भुत असें त्यास नवल वाटलें. (६५६) गुरुकृपा झाल्याबरोबर अवघें प्रपंचज्ञान ओसरतें, लय पावतें व तत्त्वच एक स्फुरूं लागसें तसें ब्रह्मसंपत्तिची लक्ष्मी श्रीमूर्तीच (सगुणश्रीची) सर्वथैव एक ती पांडवानें पाहिली. (६५७) याप्रमाणें अर्जुनाच्या चित्ताआड जो विश्वरूपाचा पडदा होता तो फिटून (निघून) जाऊन बाजूस झाला. असें हें एक बरेंच का भलेंच झालें म्हणावें की. (६५८)

तो जसा का (त्याचा तो काय) काळासही जिंकून आला, का महावातासही त्यानें मागें टाकिलें का तो आपल्या भुज बाहूंनीच मुळीं (क्षार—क्षीर, इक्षुरस, स्वादु जल, मद्य, दधि, घृत इत्यादि) सातही समुद्र तरला. (६५९) विश्वरूपदर्शनंतर श्रीकृष्णास पाहून तर त्याचें चित्त संतोषरूप झाले. तृप्ति घेत होतें, आनंद मानीत होतें, अर्जुनानें बहुपणाच्या अशा चित्तानें श्रीकृष्ण पाहून अतिसंतोषच एक मानिला, तो खुषीस आला. (६६०) व आतां सूर्याच्या अस्तमानानंतर आकाशामध्यें जशा तारा उगवाव्यात त्यांप्रमाणें तो ह्या जग जन अवलोकन लोकांसहितही (अवनि) ही पृथ्वी पाहूं लागला; पृथ्वी ही लोकांसहित त्यास दिसूं लागली. (६६१) व पाहातो तों तेंच कुरुक्षेत्र—तीच रणभूमी, पूर्वीं होते तसेच दोन्हीं बाजूंस गोत्रज आहेत, तेथें वीर समुदाय अनेक शस्त्रास्त्रांचा वर्षाव वीर समुदायावर करीत आहेत, वर्षत आहेत. (६६२) त्या बाणांच्या मांडवा आंत तसाच तो रथ निवांत असा तो पाहात आहे. पुढें रथाच्या अंगच्या अग्रभागावर—धुरेवर श्रीलक्ष्मीकांत बसले आहेत व आपण खालीं (तळीं) आहे. (६६३)

**श्लोक ५१ वा—**

**अर्जुन म्हणाला :**—हे जनार्दना! आपलें हे सौम्य असें (मानुष) मनुष्य रूप पाहिलें, व आतां मी संवृत्त असा झालेला का झांकलेला वृत्तीवर आलों आहें; मन ज्ञान सजीवतेनें सचेत झालों आहें व प्रकृतीप्रधानतेचा होऊन आहें–मी आपल्या मूळस्वभाव प्रकृति योनि लिंगाप्रत आलों आहें.

(ओव्या ६६४–६७३)

याप्रमाणें जसें मागितलें होतें तसें त्या वीरविलाससुखोपभोगानें–अर्जुनानें पाहिलें, देखिलें. व म्हणूं लागला कीं, अहो, आतां मात्र मी खराच की जगलों वांचलों असें मला होऊन आहे, असें मजला समजत आहे. (६६४) बुद्धिनें ज्ञान म्हणजे जाणतेपण सोडून भीतीमुळें रानच घेतलें होतें. जाणतेपण रानांतच शिरलें होतें. मन हें अहंकारासहित देशधडी झालें होतें–मनानें अहंकाराचा आश्रय करून तें मन अहंकारासहित देशधडी झाले होते. (६६५) इंद्रियें प्रवृत्तीस का प्रपंचास भुलली, वाचा वाचकपणास चुकली वाचा (बोलाच्या) बोलण्यास चुकली; अशी ह्या शरीररूपी गावांमध्यें–ग्रामामध्यें (अपांपरी म्हणजे) अनवस्था (दुर्दशा अव्यवस्था) झाली होती–(मनोवृत्तींत बदल झाला होता, मनोवृत्ति टाकून दिली गेलेली, अशी अव्यवस्था झाली होती, विरहितपणच एक ह्या मनोवृत्तीचें झालें होतें.) (६६६) आतां पुन्हां ती सर्व प्रकृति ह्या जीवदशेस भेटली–मिळून गेली व आतां मीच की ह्या श्रीमूर्तीस जीवन झालों आहें, जीवन होऊन आहे. (६६७) असे सुख त्या जीवदशेनें मानले, सुख पाहिलें व मग त्यानें श्रीकृष्णास म्हटलें कीं, अहो, आतां म्यां हें तुमचें देवा! मनुष्यरूप पाहिलें. (६६८) अहो, देवराया हें मनुष्यरूप दाखविणें तें जसें कां चुकलेलें तें अपत्य समजावून मायाच लावणें जसें का ह्या जीवदशेंत तसें मजला आपण स्तनपान दिलें होय. (६६९) अहो, जी विश्वरूपा, जे सागरच एक त्या सागरामध्यें तेथीलचे तरंगच वांवानें भोजित होतों, तो आतां ह्या मनुष्यरूपी आपल्या स्वाभाविक म्हणजे निजमूर्तीच्या तीरींच लागलों–निघालों–रिघालों कीं. (६७०) अगा हे द्वारका नगरीच्या मित्रा–सुहृदा, आपण ऐका कीं, मज सुकत चाललेल्या झाडास ही आपली नुसती भेटीच नव्हे, तर अहो, मेघांचा म्हणजे आपल्या कृपादृष्टीचा वर्षावच केला जसा. (६७१) अहो, जी तहानेनें व्याकुळ होऊन माझा जीव तृषार्ततेनें फुटलाच जसा का त्या मजला तुम्हीं अमृतसिंधूच भेटलांत, आतां आयुष्य जीवित भरंवशाचें झालें आहे. आतां मजला जीविताचा भरंवसा येऊन आहे. (६७२) माझ्या (हृदयरंगणी) अंतःकरणांत हर्षलतांची लावणी होऊन आहे. आनंदाच्या वेली उगवल्या आहेत; (देहबुद्धीसच दिवे लावणी आली आहे) आनंदातिरेकानें आतां मी सहज सुखानेंच कीं समजुतीस आलों आहें. (६७३)

**श्लोक ५२ वा :—**

**श्रीभगवान म्हणाले :**—हें माझें रूप पाहाण्यास मिळणें सहज पण कठीण असें जें कांहीं तूं पाहिलेंस, त्या रूपाबद्दल देव ही पण नेहमी दर्शन अपेक्षेनें असतात. (५२)

(ओव्या ६७४–६८२)

मनुष्यरूपानें देव दिसले तेथें पार्थाच्या हृदयीं हर्षलतांची लावणीच होत आहे–जीवित भरंवशाचें होत आहे (अशी त्याची समजूत समजुतीस आली आहे) असें त्याच्या बोलण्यावर श्रीभगवान म्हणाले की, असें हें तुझें बोलणें कसेंसेंच होत आहे–ते तर प्रकृतिमंततेचें जसें. अरे! पार्था! तुवां तर विश्वरूप दर्शनावर प्रेम ठेवून यावेंस, प्रेमानें असावेंस ना!!! (६७४) देहाच्या ऐश्वर्य, प्रताप, मनोनिग्रह, आयातीनें असावेंस व मगच ह्या श्रीमूर्तीस सगुणश्रीस फक्त शरीरानें भेटावें, अशी ती शिकवण हे सुभद्रापति, तूं विसरलास कीं! (६७५) अगा, हे (आर्तभूत, उत्कंठित) हपापलेल्या, (चोचपडत असलेल्या, उच्छृंखळ

झालेल्या) अर्जुना! परिश्रमाशिवाय (कष्ट न करितां सहजपणेंच) मेरूही हातीं आला तर तो (मेरूही जरी तरीपण कांहीं किंमतीचा होत नाहीं. महत्व पावत नाहीं.) तुच्छच वाटतो. (मेरू सर्वांत उंच; तरीपण लहानच वाटतो, भासतो, होतो) असा या मनाचा एक चुकीचा भाव, दुःस्वभाव भाव, महत्व घेऊन, महत्व पावून असतो तो जाण की. (६७६) अगा, विश्वात्मक देव रूपडें जें आम्हीं तुजपुढें दाखविलें तें श्रीशंभूसही नुसती तपेंच्या तपें करूनही तपःक्लेश सहतुल्य होऊनही–कंटकपणाच्या इंद्रियनिग्रहानेंही मिळत नाहीं असें तें आहे, (तें जोडत नाहीं, सांपडत नाहीं, आपलेंसें केलें होत नाहीं असें आहे.) (६७७) हे किरीटी अष्टांग योगाच्या संकटामध्यें योगी शिणतात, पण विश्वरूपाची भेट ती आपल्या वेळेस का समयास येत नाहीं–विश्वरूपाचें दर्शन होणें तें तर मुळीं अवसरासच नाहीं तेथें भेटीचा योगच [जुळणी, प्रसंग, अवसर, (यथा) काळ, प्राप्त वेळेनें भेटीचे होण्याचा असा प्रसंगच] येत नाहीं. (६७८) तें विश्वरूप एकादे वेळेस, थोडेंसें तरी कसेंबसें तें पाहाण्याचें होईल असें (कसेंही करून तें पहावेंच) असें स्मरतां स्मरतांचमुळीं देवांचे तर दिवसच्या दिवस जात आहेत, देवांचा तर काळच्या काळ जात आहे. (६७९) हृदयरूप (निडळावर) कपाळावर आशारूपी ओंजळी ठेऊन आहेत असे ते चातक तर आकाशाकडे पहात बसतात. (आशेच्या ओंजळीनें आहेत, आशेचे हात जोडून चातक (चिदाकाश) निराळे मार्गी लागले, तरीपण तेथीलचा ठाव सांपडला नाहीं. निराळें आकाश आक्रमण तरीपण भेटी झाली नाहीं. चातक चंद्रातें चिंतितु तो तयाचे मनोरथ पुरवितु–आशेचें पालन करून स्वतःला शेंकडोंशा आशापाशांनीं बद्ध करून आहेत, दैववाद पुढें घेऊन आहेत; पालनपोषणादि हृदयाची देवता जी विष्णु भगवान तेथेंच भजणें होत आहे, असें वाट पाहातां पाहातां तर, निराळ (निराश्रय) नांवाचें जें आकाश तेंहीपण क्रमणें, आक्रमणें संपत आलें; तरीसुद्धां त्या रूपाची भेटी झाली नाहीं. (६८०)

अहो, ज्या विश्वरूपाची भेटी व्हावी, त्याचें दर्शन होण्यास कांहीं उपाय नाहीं म्हणून सुरवर, देवश्रेष्ठ ते तर त्या आनंदाच्या भेटीसाठीं का भेटीची आशापाशयुक्त उत्कंठाच एक, घोकणें करीत आहेत. (६८१) पण विश्वरूपासारखें दर्शन स्वप्नींहीपण कोणीही पहात नाहीं, देखत नाहीं व येथें तें हें तर तुवां प्रत्यक्षपणें सहज पुण्यवान होऊन, सहज आनंदानेंच की देखिलेस, पाहिलेंस ना! (६८२)

**श्लोक ५३ वा :—**

हे अर्जुना तूं मी पाहिलास तसा एवंविध पाहाणें, वेदानें, श्रुतिज्ञानानें, तपानें, तपश्चर्या करण्यानें, ज्ञानानें, औदार्यानें, का ईज्या–वारंवार यज्ञ करण्यानेंही शक्य नाहीं. (५३)

(ओव्या ६८३–६८६)

उपायाच्या वाटा, मार्ग, प्रवाह कांहीं येथें (वाहात म्हणजे उद्योग का यत्न करीत नाहीं) वाहात नाहींत. चारी वेदांनीं, सहा शास्त्रांनीं तेथें तर माघारच घेतली. त्यानीं ओहटीच एक उचलिली कां उंचविलेली आहे. (६८३) तपाचें सामर्थ्य विश्वरूपच एक पुढे करील असे नाहीं–विश्वरूपाच्या मोहरा (धुरे) चालण्यास धनुर्धरा, तपस्व्यांनीं तपांचीं तपें (तपेंच्या तपें) संग्रह संपत्ति ओतली तरी, तपाची पराकाष्ठा केली तरी, त्या स्वरूपाचा लाग त्यांना सांपडत नाहीं. (६८४) दानास का दान आदि जें जीं व्रतें त्यानां तर विश्वरूप हे सांपडण्यास कठीण का दुर्बोध असें वर यज्ञानेंही, यज्ञ, पूजा करणें, पूजा देणें, पूजा अर्पणें का ऋत्विज होण्यानें ही तसा जसा का तुवां पाहिलास सुकाळपणानें का सुखानें तसा सुदुर्दर्श अशा रूपाचा मी नच सांपडणारा कीं. (६८५) पण एका प्रकारें मी सांपडतों. जर का भक्तीच पुढें होऊन चित्तास वरील मागणी घालील कां माळ घालील तर एका भक्तीनेंच मी सांपडला होतों. (६८६)

**श्लोक ५४ वा :—**

हे अर्जुना! परंतपा! मी एवंविध प्रकार, स्वीकार, वेध, समृद्धीचा जाणणें, पाहाणें, तत्वदृष्ट्या

त्याचेंच होणें, का तेच होणें ते फक्त एकट्या अनन्यभक्तीनेंच शक्य आहे. (५४)

(ओव्या ६८७–६९६)

पर्जन्याची धार पृथ्वीशिवाय (धरा वांचून) अन्य गती (सुटका) जाणत नाहीं; तशी भक्ति असावी. (६८७) आपला सर्वच्या सर्व प्रवाह घेऊन गंगा समुद्रास हुडकीत समुद्रांतच बसते तशी गती ती अनन्यतेची परम ठावाच्या अशा गतीनें गर्तीतच भिनलीच मिळून असावी. (६८८) सर्व सृष्टि भावसंपत्तीमुळें प्रेम सरोवर कांठोकांठ भरून जाऊन बाहेर वाहूं लागलेलें; तें प्रेम न सांवरतां मीच होऊन तूं मजमध्यें संचरून ऐस, संचरून रहा. (६८९) कांठावरील का आंतमधील प्रेम हें दोन्हींठायीं सरिसेपणानें–उत्तमत्वानें एकसारखेंच : दुधाचा अब्धि निखळ, दुधाचाच केलेला होय. (६९०) त्याप्रमाणें मज विश्वरूपा–ईश्वरापासून तों तहत म्हणजे थेट मुंगीपर्यंत बहुततेची पण सर्व चराचर–स्थावर जंगम सृष्टीमध्यें परोपरीची रचना पाहावी, तों तेथें दुसरी एकादी तऱ्हा मुळींच नाहीं-भजनास कसेंही केलें तरी दुसरी उपमाच (अंतःकरणाची उत्सुकता रचना) नाहीं. (६९१) मीच भजन एक तें माझ्याच वस्तीचें झालें जेव्हां का त्या क्षणापासूनचमुळीं मी (एवंविध) अशा प्रकारचा आहें हें जाण व तें मला जाणल्यावर मग सहज स्वभावेंच की मी दृष्ट म्हणजे देखणें देखिला, अनुभविला, पाहिला होतोच. (६९२) इंधनामुळेंच अग्नि प्रदीप्त होतो. तेथें इंधन म्हणणें हें शब्दासच मुळीं येत नाहीं. तेथें मूर्त अग्नीचें तें आरोपणें इंधनाचें तें आतां मिथ्यात्व, ते पण मूर्त अग्निच एक. (६९३) सूर्य उदय करीत नाहीं, तोपर्यंत सर्व गगनभर अंधारें भरून असलेले, अंधारें गगनभर पसरून असलेले, पण जेव्हां का तेजाकार सूर्य उगवला की तेथें मग सर्वच्या सर्व एकसारखा प्रकाशच तो तेथें तो अंधारच मुळीं प्रकाशाचा होतोच होतो. (६९४) त्याप्रमाणें माझ्या साक्षात् प्रगटण्यानें–, साक्षात् परमात्माच सर्व तेजोमयाचा ज्ञान बोधच तो, उदय घेऊन आल्यानें विश्वात्मक आत्मरूपच तें उदयास आलें, व आतां अहंकाराची (भूतादीम्)ची वारी-फेरी संपली–अहंकाराचा लोप झाल्यानें द्वैत बुद्धीची भाष ती मुळींच पाहूं येईना; दुजेपण तें संपलें. (६९५) मग तेथें मी हा एक व तो दुसरा कोणी एक असे अवघे एकपणासच म्हणजे मीच स्वभावें करूनच की सर्वच्या सर्व असा तेथें तो तर समरस होऊन अद्वैतांतच सामावून असतो, समरसून जातो. (६९६) मन हें आपला स्वभाव टाकून देऊन तन्मय झालें होतें. तेथें आपलेपणच एक सर्व–आपलेंच घराचें ते नटणें, रमणें, आकारास येणें, तेथें दुजेपणाचा असा दुजाभाव नाहींच. (६९५) आतां यावर 'मी' का 'तो,' मी एक व तो एक असें हे अवघे मीच एक सहज स्वभावाचें महत्व, अहो, स्वभावेंकरूनच मुळीं मीच एक, आत्मरूपच आपल्या आत्मपणानें आत्म्यास पाहूं झाल्यानें तेथें विश्वात्मकतेचे सर्व आत्मपण–आपलेपण, हे एकत्वचमुळीं, एकतेचें होय, एकच एक आत्मरूपच अहो येथें तर एकरसतेनें–समरसतेनें ब्रह्मानंदानें तो अवघा सर्व मुळीं आंत सामावून आहे–समसमासमावला, गाईलें–स्तविलें–प्रशंसिलें, नटलें तेथें उपमा ही भरून उरला आहे. समरसून जाऊन एका त्या मूळरूपासच आली, जसें का मेघ हे गगन झाले, भ्रमर हें फुलेंच झाले. (६९६)[२]

श्लोक ५५ वा :—

**भरतवाक्य :**—हे पांडवा! यः मत्कर्मकृत। यः मत्परमः। यः मद्भक्तः। यः संगवर्जितः। यः सर्वभूतेषु निर्वैरः। स माम एति!!! बा पांडवा! मज धर्माकरितां सर्वकर्में कर! मज करितांच कर्म करणारा हो! प्रेमरूपी परमात्मा त्याचा भक्त होऊन ऐस! देहबुद्धीचा संग न पाळणारा हो! भूतमात्राच्या ठायीं निर्वैर हो! असा जो तो मजप्रत येतो तो मीच होतो, तो मजला पोहोंचतो!!! (५५)

(ओव्या ६९७ ते ७०९)

**भरत वाक्य :**—अहो! जो एका आंतमभावनेस आपल्या सर्वच्या सर्व अंगांनीं, [**अंगे ४**; अंग, प्रत्यंग, उपांग, सांगांग—(१) **अंग**=शिरकमल, उरस्थळ, भुजद्वय, चरण कमल. (२) **प्रत्यंग**=वदन,

नासिक, कर्ण, अधर, अंगुलि, नयन, (३) उपांग=वस्त्रें, नानाविध सुरंग, अलंकार, गंधलेप, उपभोग. (४) सांगांग=ज्ञप्तृ, मन, बुद्धि, चित्त, अहंकार। करणें, भोग, वृत्ति व्यापार। तो समूळ, विस्तार। सांगांग पै ॥] आत्मरूपाशिवाय—, विश्वात्मक देवाशिवाय ज्यास दुसरें कोणीही एकादें कांहीं गोमटें, चांगलें वाटत नाहीं, जो येथेंच मज आत्मस्वरूपांतच सर्व महत्व देऊन आहे, असा तो भूतांचें अनेकत्व विसरला, त्याच्या सृष्टींत मीच एक भरला (भरून आहें). म्हणून निर्वैर असा जो सर्वत्र मीच पूजन, नमस्कारीत, भजत आहें. (६९७) अहो ! काय इहलोक, का काय परलोक, तेथें ज्या ज्या लोकींचे ते मीच एक केवळ, मोक्ष कैवल्याचे ते व्हावें, करावें; ज्यानें, जिणें, जीवितसाफल्य जीवन सर्वस्वाचें–, तें आपलें सर्वस्वचमुळीं आहे, असें मजलाच नांव दिलें, मजला उद्देशून तें बोलणें, नाम करणें, केलें होत आहे. ज्यानें जीवित साफल्य, माझ्याच प्राप्तीवर ठेविलें आहे. (६९८) तेथें मग अहो, भूतें बोलणें नाम करणें अशी भाष, भास भासाची ती म्हटलेली, ती आतां मीच एक दृष्टीमध्यें भरला (भरून) आहे; म्हणून एकात्मकच असे एकच महद्‌भूततेचें तें होणें झालें; म्हणून आतां सर्वत्र भजत श्वसत–विश्वासास येऊन आहे, तेथें निर्वैर असाच तो केव्हांही. (६९९ )

असा जो भक्त भजत, श्वसत, विश्वसत, विश्वीं वसत, नमस्कारित, नमत त्याचें ते धातूंचें त्रिधातुकतेचें तें कफवातपित्तात्म तिन्हीं दोषांचें केलेलें, बनलेलें हें जड शरीर जेव्हां का जातें, (शरीरभाव नाहींसा होतो. देहबुद्धि रहात नाहीं.) तेव्हां हे पांडवा ! त्याचें तें असणें तें मीच एका आपल्या ठायाचें–ठावाचें होऊन असतें, होऊन ठाकतें. (७००)

**संजय म्हणालाः—**

विशाल जगत् ! हेंच ज्याचें दोंदिल म्हणजे भरलेलें असें मोठें उदर (पोट) असो ते कारुण्यरसच एक सर्व अति चवदारपणानें–रसात्मकतेनें शृंगारविलेला आहे, असें देव श्रीकृष्ण बोलिले. (७०१) आतां तो पंडुकुमर आनंद–संपदेनें थोर झाला, त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला, मनुष्य जन्म हाच मुळीं आनंदाचा, तो आतां देवत्वासच आल्याकारणानें तेथें थोरपणा असें देवमाहात्म्यच त्यास येऊन असल्यानें, त्यांस ह्या जन्माची कृतकृत्यता भेटल्यानें, तो तर मूर्तिमंत आनंदच एक थोर-श्रेष्ठ असा!!! तसेंच अहो ! 'कृष्णचरण चतुर' हा देह सर्व प्रेमाचा कसा तो व्हावा, प्रेमाचा सर्वथैव असा देह हा कसा करावा, तेथें देह अभिमान हाच लय पावून चरणीं लीन (व्हावा) होईल ज्यायोगे, असें ते चतुरतेचें धिटाईपण ज्याच्या ठायीं आलें आहे–असा तो अर्जुन एकला एकच जी अहो ! ह्या सर्व जगतामध्यें–(७०२) त्यानें देवाच्या दोन्हीं मूर्ति–एक मी विश्वरूपाची व दुसरी ती चतुर्भुज सगुणतेची अशा ह्या दोन्हींही, आपल्या चित्तामध्यें न्याहाळिल्या. अतीसूक्ष्मतेचें तें त्याचें पाहाणें, तेथें आतां तर विश्वरूपाहून कृष्ण आकृतींतच–देव मनुष्य–कृष्ण आकारांतच मुळीं त्यांस अधिकच लाभ दिसूं लागला, त्यानें देखणें देखिलें, लाभाचें असें त्या कृष्ण आकारांतच, देवमनुष्य आकारांतच पाहिलें. (७०३)

पण अशा त्याच्या त्या जाणिवेस देवांनीं महत्व दिलें नाहीं; कारण जे देव, मनुष्य, चतुर्भुज ते एकदेशी असल्यामुळें सर्वोत्कंठा एकत्रित ते व्यापकाहून कांहीं मानाचें का महत्वाचें असें नव्हे; म्हणून कारण का (व्यापक विश्वरूपापेक्षां, एकदेशी स्वरूप श्रेष्ठ नाहीं.) (७०४) हेंच, 'समर्थ भूमि' सिद्ध म्हणजे दृढ करण्यास त्यांनीं एक दोन चांगल्या अशा (सरस्वति होऊन वागत असलेली ती स्वर्ग-गंगा-चांगी म्हटलेली) उपपत्ति मूळ कारण संगति (सयुक्तिक, सिद्धांत, उद्‌भव, संबंध) लावून हे धनुर्धारी, विष्णु, शार्ङ्गी त्यास दाखविते झाले. (शृंग=एक वाद्य, उत्कर्ष, शिंग, तीर, अग्रभाग, पर्वताचें शिखर). (७०५) अर्जुनानें तें ऐकून घेऊन चित्तीं म्हणूं लागला कीं, होय वर ते एकदेशी ते व्यापकाहून महत्वाचें नव्हे–तसें जरी असलें तरी पण दोही (विश्वरूप व एकदेशी) या दोन्हींमध्यें बरवें तें कोणतें तें पुन्हः विचारण्याचें

करीन. (७०६) असा आपल्या जीवीं-म्हणजे मनामध्यें विचार करून असल्यानें तेथें आतां ती प्रश्न विचारण्याची पद्धत चांगली अशी ती तीचमुळीं अतिआदर देऊन पार्थ तो विचारण्याचें करील, अशी ती पुढे ऐकावी, तें पुढें ऐकावें. (७०७)

अहो, प्रांजळ म्हणजे स्पष्ट, सुलभ अशा सरळ ओवी प्रबंध रचनेनें, पूर्वापार संगतीनें, सहज विनोदा विनोदानें, बुद्धीस मातच दिली ह्या हितगुजाच्या बोलण्यानें, असें ते बोल-गृहगोष्टी (गृहपाठ-गृहासंबंधींच्या गोष्टी सांगितल्याप्रमाणें) मीही सांगण्याचें करीत आहे-करीन. असें श्रीज्ञानदेव म्हणतात, (तें श्रोत्यांनीं) आनंदानें हर्षयुक्त होऊन ऐक्याचें करावें. (७०८) अशी ही संतभाव (भलेपणा, प्राप्ति, वस्तुस्थिति-अस्तित्व) रूपी उभय हस्तांच्या ओंजळीनें ओवीरूपी सुमनसाची, उदार प्रशस्त अशी, मोकळी फुलें विश्वरूपाच्या अंघ्रियुगुलिं-पदचरण युग्मरूपी कमलावर, मी अर्पिलीं, वाहिलीं. (७०९)

असा हा श्रीकृष्णार्जुन संवादरूपी श्रीमत् भगवद्गीता योगशास्त्रामधील विश्वरूपदर्शनयोगाचा हा अकरावा अध्याय होऊन आहे, संपला :

— ॐ तत्सत् —



"विश्वरूप दर्शनयोग, अध्याय ११वरील मुखपृष्ठ"

(लेखकाजवळ असलेल्या हस्तलिखीत प्रतींतील)

# श्रीज्ञानेश्वरी

## (सुबोधिनी)

## अध्याय ११ वा

— विश्वरूपदर्शनयोग —

— देवताकांड —

॥ श्रीगणेशाय नमः ॥    ॥ श्रीकृष्ण विश्वरूपाय नमः ॥

---

आतां ययावरि येकादशि । कथा आहे दोहि रसि ।
जेथ पार्था विश्वरूपेसि । होयील भेटी ॥ १ ॥
तेथ शांताचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा ।
आणि येराहि रसा पांथिकरा । जाला मान ॥ २ ॥
आहो वधुवरांचे मिळणि । जैसि वऱ्हाडिया लुगडि लेणि ।
तैसे देशिचिया सुखासनि । मिरवले रस ॥ ३ ॥
परि शांताद्‌भुत बरवे । जे डोळयांच्या अंजुळि घ्यावे ।
जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेंवा ॥ ४ ॥
नातरि अमावास्येचां दिवसि । भेटलीं दोन्हीं बिंबें सरसि ।
तेवि येकवेळा रसि । केला येथ ॥ ५ ॥
मिनले गंगा यमुनेचे ओघ । तैसे रसा आले प्रयाग ।
म्हणौनि सुस्नात जालें जग । अघवें येथें ॥ ६ ॥
माजि गीता सरस्वती हे गुप्त । आणि दोन्ही रस ते वोघ मूर्त ।
यालागिं त्रिवेणि हे उचित । फावली बापा ॥ ७ ॥
येथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थी रिगतां सोपारें ।
ज्ञानदेव म्हणे दातारें । माझेनि केलें ॥ ८ ॥
तीरे संस्कृताचि गहने । तोडुनि मऱ्हाटि शब्द सोपाने ।
रचिली धर्म निधाने । श्रीनिवृत्तिदेवे ॥ ९ ॥
म्हणौनि भलतेणे येथे सद्‌भावे न्हावे । प्रयाग माधव विश्वरूप पाहावे ।
येतुलेनि संसारासि द्यावे । तिलोदक ॥ १० ॥
हे असो ऐसे सावेव । जेथ सासिनले अहाति रसभाव ।
जे श्रवण सुखाचि राणिव । जोडिली जगा ॥ ११ ॥
जेथे शांताद्‌भुत रोकडे । आणि येरां रसा पडप जोडे ।
हे आल्पचि परि उघडे । कैवल्य जेथ ॥ १२ ॥

तो हा अकरावा अध्याय। देवाचा आपणपे विसांवता ठाय।
परि अर्जुन सदैवाचा राय। जे येथहि पावला ॥ १३ ॥
येथ अर्जुनचि काय म्हणो पातला। आजि हा आवडतयाहि सुकाळ जाला।
जे गीतार्थु हा आला। मऱ्हाटिये ॥ १४ ॥
ययाचि लागी माझे। विनविले ते ऐकिजे।
तरि अवधान दिजे। सज्जनि तुम्हि ॥ १५ ॥
तेविचि तुम्हां संताचिये सभे। ऐसि सलगि किर करूं न लभे।
परि मानावे जी तुम्ही लोभे। अपल्या मज ॥ १६ ॥
आहो पुंसा आपणचि पढविजे। मग पढे तरि माथा तुकिजे।
कां बोलवलेनि चोजे न रिझे। बाळका माये ॥ १७ ॥
तेवि मिं जे जे बोले। ते प्रभु तुमचेचि शिकविले।
म्हणौनि अवधारिजो आपुले। आपण देवा ॥ १८ ॥
हे सारस्वताचे गोड। तुम्हिचि जी लाविलें झाड।
तरि आतां अवधानामृतें वाड। सिंपोनि किजे ॥ १९ ॥
मग हे रसभाव फुलि फुलैल। नानार्थ फळ फां-भारे फळा येईल।
तुमचेनि धर्मे होईल। उपयोग जगा ॥ २० ॥
यया बोला संत रिझले। म्हणति तोषलो गा भले केले।
आतां सांगै जे बोलिले। अर्जुने येथ ॥ २१ ॥
तंव निवृत्तीदासु म्हणे। जे अर्जुना श्रीकृष्णाचे बोलणे।
मि प्राकृत काई सांगो जाणे। परि सांगवा तुम्हि ॥ २२ ॥
आहो रानिच्चिया पालेखाईरा। हाते निर्वाण करवि जे लंकेश्वरा।
येकला अर्जुन परि क्षोणि अठरा। न जाणेचि काई ॥ २३ ॥
म्हणउनि समर्थ जे जे करि। तेचि होय चराचरि।
तुम्हि संत तियापरि। बोलवा मातें ॥ २४ ॥
आतां बोलिजतसे आईका। हा गीता भाव निका।
जो श्रीवैकुंठनायेका। मुखिहुनि निघाला ॥ २५ ॥
बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदि प्रतिपाद्य देवता।
तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथि ॥ २६ ॥
तेथिचे गौरव कैसे वाणावे। जे श्रीशंभुचिये मति नागवे।
ते आतां नमस्कारिजे जीवें भावे। हेंचि भले ॥ २७ ॥
(स्पष्ट गद्य) मग आईका तो किरीटी। घालुनि विश्वरूपि मिठि।
पहिली कैसी गोष्टि। करिता जाला ॥ २८ ॥
हे सर्वहि सर्वेश्वरु। ऐसा प्रतितिगत जो पतिकरु।
तो बाहेरी होआवा गोचरु। लोचनासी ॥ २९ ॥
हे जीवा आंतुली चाड। परि देवासि सांगता सांकड।
कां जे विश्वरूप गूढ। कैसेनि पुसावे ॥ ३० ॥
म्हणे मागा कवणि कंहि। जे पढियंतेनि पुसिले नाहि।
ते सहसा कैसे कायी। सांगा म्हणो ॥ ३१ ॥

मि जन्हि सलगीचा चांगु । तरि काई आयिसाहुनि अंतरंगु ।
परि तेहि हा प्रसंगु । बिहाली पुसो ॥ ३२ ॥
माझि आवडे तैसि सेवा जालि । तरि काय होईल गरुडाचिया येतुली ।
परि तोहि हे बोलि । करीचिना ॥ ३३ ॥
मि काय सनकादिकाहुनि जवळा । परि तयाहि नागवेचि हा चाळा ।
मि आवडे कायि प्रेमळा । गोकुळिचेया ऐसा ॥ ३४ ॥
तयातेहि लेकुरपणें झकविले । येकाचे गर्भवासहि सोसिले ।
परि विश्वरूप राहविले । न दाखविन्चि कवणा ॥ ३५ ॥
हा ठावो वरि गुज । याचिये आंतरिचे निज ।
कैंवि उठाउठि मज । पुसो ये पां ॥ ३६ ॥
आणि न पुसेन्चि जरि म्हणे । तरि विश्वरूप देखिलियाविणे ।
सुख नव्हे परि जिणे । तेहि विपाये ॥ ३७ ॥
म्हणोनि आतां पुसो अळुमाळसे । मग करूं देवा ठाके तैसे ।
येणे प्रवर्तला उद्देशे । पार्थ बोलो ॥ ३८ ॥
परि तेचि ऐसेनि भावे । जैसा येका दो उत्तरासवे ।
दावि विश्वरूप आघवे । झाडा देउनि ॥ ३९ ॥
वासरू देखिलियाचि सांटि । धेनु खडबडोनि मोहे उठी ।
मग स्तना मुखाचिया भेटि । कायि पान्हा धरे? ॥ ४० ॥
पाहा पां तया पांडवाचेनि नांवे । श्रीकृष्ण रानि प्रतिपाळु धांवे ।
तयाते अर्जुने जंव पुसावे । तंव साहिल कायी ॥ ४१ ॥
तो सहजेचि स्नेहाचे अवतरण । आणि येरु स्नेहा घातले आहे माजवण ।
ऐसिये मिळणि वेगळेपण । उरे हेचि बहु ॥ ४२ ॥
म्हणोनि अर्जुनाचिया बोला सरिसा । देव विश्वरूप होईल आपैसा ।
तोचि पहिला प्रसंगु ऐसा । अैकिजे तरी ॥ ४३ ॥

ययावरि–यावरि–एयावरी. येकादशि–एकादसि. दोहि रसि–दोहो रसी = शांत व अद्‌भुत या दोन रसांत. होयील–होईल. (१) शांताचेया–शांतान्चिया = शांत रसाच्या. पंथिकारा–पांतिकरा = पंक्तीस बसलेल्या पाहुण्यांना. जाला–जाहला. तेथ–जेथ. मान–मानु. पाहुणेरा = पाहुणचारास (सन्मान मिळाला) (२) वधुवराचे–वधुवरान्चिये. मिळणी = लग्न समारंभांत. वऱ्हाडिया–वऱ्हाडियाही. देशिन्चिया–देशियेच्या. लेणी = अलंकार. देशिन्चिया सुखासनी = मराठी भाषेच्या पालखीत, जन्म जोडीत, मिरवले शोभलें. (३) अंजुळि–अंजली = ओंजळीने. खेंव = क्षेम आलिंगनास भेटीस. (४) अमावास्येचा–आंवसेच्या. दोन्हि बिंबे –बिंबे दोन्हि = सूर्यचंद्र बिंबे. सरसी–जैसी. येकवळा–एकवळा = एकोपा. येथ–एथ (५) वोघ–ओघ. जाले–जहाले. सुस्नात जाले (होत) = पवित्र होत आहे. मिनले = मिळाले एकत्र. येथे–एथ (६) फावली = प्राप्त झाली, सांपडली. (७) श्रवणाचेनि = श्रवणाच्या, कर्णेंद्रियाच्या. रिगता–रिघता. दातारे = उदार श्रीगुरूनी–श्रीनिवृत्तीनाथांनी (८) गहने = कठिण. मऱ्हाटि–मऱ्हाटिया. सोपान = घाट (९) भलतेणे = कोणाही. न्हावे–नाहावे. द्यावे तिलोदक = संसारास तिलांजली द्यावी (१०) सावेव–सावयव = मूर्तिमंत. जेथ–एथ. आहाती–आथि–सासिनले = भरास आले आहेत. राणीव = शोभा राज्य. (११) पडप = महत्व शोभा. कैवल्य = मोक्ष, मोक्षसुख (१२) देवाचा–जो देवाचा विसंवता ठाय (ठाव) = विश्रांती स्थान. सदैवाचा

राय=भाग्यवानाचा राव. पातला–पावला (१३) आवडतयाहि=भलत्याला, आवडेल त्याला, वाटेल त्याला (१४) ययाचि लागी–याचि लागी. (१५) न लमे करूं=करणें योग्य नाहीं (१६) पुंसा=पांखरास, पोपटास (पोपट, पक्षी). पढेतरी–पुढेतरी. माथा तुकिजे=मान डोलवावी. बोलविलेन (नि)–करविलेनि चोजे न रिझे=कौतुकानें संतोषत नाहीं काय. माय–माये (१७) मि–मी. अवधारिजो=ऐकावे, श्रवण करावे (१८) सारस्वताचे–विद्येचे–अवधानामृते वाड=एकाग्रता कां लक्ष्यरूपी अमृताने–(पाण्यानें) शिंपून मोठे करावे, विस्ताराने (१९) नानार्थ फळ कां भारें=अनेक प्रकारच्या अर्थरूपी फां बहार फळभारानें. धर्मे सुरवाड=योगे सुख, सुकाळ, उपयोग, (२०) रिझले=प्रसन्न झाले. येथ–तेथे (२१) अर्जुना श्रीकृष्णाचे –जी कृष्णार्जुनाचे. मि–मी (२२) पानेखाइरा हाते निर्वाण–पाने खाइरा, नेवाणे (निर्वाण)=पाला खाणाऱ्या वानरा कडून नाश, पराभव, तिरस्काराचे पात्र, अस्तंगतता, समाप्ति. करविजे–करविले. क्षोणि–अक्षौहिणी. न जिणेचि काई=जिंकले नाहीं काय (२३) तेचि होय–ते न हो न ये–नच होय=समजणार नाहीं कां होणार नाहीं, असें नाहीं तियापरी–तयापरी (२४) श्रीवैकुंठनायेकां मुखिहुनि=भगवान श्रीकृष्णाच्या मुखांतून (२५) वानावे=वाखाणावे, वर्णावे मति नागवे=बुद्धिला आकळत नाहीं (२७) दिठी=नजर, दृष्टि. गोठी=गोष्ट, बोलणें (२८) पतिकर=प्रतिकर अनुभव. लोचनासी गोचर होआवा=डोळ्यांना स्पष्ट दिसावा. (२९) चाड=आवड इच्छा. सांकड=संकट, अवघड, जड. गुढ=गुह्य (३०) पढियंतेनि–पढियंतेने =आवडत्या भक्तानें (३१) आयिसाहुनि–आईसीहुनि=देवकीहुनी, देवी लक्ष्मीपेक्षां. चांगु सलगीचा= स्नेहातला चांगला. अंतरंग=जिवलग. पुसो बिहाली=विचारण्यास भ्यायली. (३२) आवडे तैसी=पाहिजे त्या, वाटेल त्या प्रकारची (३३) आवडे–आवडेन. गोकुळिचेया–गोकुळिचिया (प्रेमळा)=गोकुळातील प्रेमळ जनासारखा (३४) झकविले=फसविले, चुकविले. सोसिले–साहिले. एकाचे=अंबरीषाचे. राहाविले =राखून ठेविले. दाखवीचि–दावीच (३५) हा ठावो वरि गुज–ठाय वरि=असा हा ठाव असूनसुद्धां अजूनपर्यंत, आजपर्यंत, गुह्यच ठेविले. उठाउठि–उराउरी=एकदम, झडकर (३६) जिणे तेही विपाये= जीवित जगणें, वांचणे कदाचितच. नव्हे–नोहेचि (३७) अलुमाळसे=थोडकेसे, थोडे, थोडेबहुत. करू देवा ठाके तैसे=देवाच्या मर्जीस (इच्छेस) येईल तसे होवो. उद्देशे साध्वसे=भीत भीत, साहसानें (३८) जैसा एका–जे एका (३९) कायि–काय पान्हा धरें ? = तिच्यानें पान्हां चोरवेल काय ? रानि–रानीही (माया रान वन), (राहणी, राणिव): साहिल काई=गप्प बसेल काय? सांगितल्या वांचून राहील काय ? (४१) अवतरण=मूर्ति. येरू माजवण=अर्जुन तर अधिकताच एक, स्नेहाचे मादकपण अथवा कैफच जसा का. बहु=विशेष होय, आश्चर्य होय (४२) अर्जुनाचिया–अर्जुनाचेया. आपैसा=सहज, आपोआप (४३)

'ग्रंथारंभी विघ्नविनाशक श्रीगणपतीस मी नमस्कार करतो व विनवितो की ह्या अध्यायाचे काम निर्विघ्नपणे पार पडो: तसेच ह्या विश्वरूपदर्शन अध्ययाची विशिष्ट देवता जे "श्रीकृष्ण विश्वरूप"–त्यांना मी वंदन करतो. त्याचे चरणीं नमस्कार करतो. आतां यावर अकराव्या अध्यायामध्यें शांत व अद्भुत असे दोनच रस येणारे आहेत–तेथें अर्जुनाची विश्वरूपाशीं भेटी होईल. आता इथून पुढें जो कांहीं ह्या एकादशामध्यें रंग येणारा तो एक महाबोधच असा आहे, महत् ज्ञानदर्शन असा आहे. दुसऱ्या अनेक रसांना सन्मान्य असे नाविन्य होऊन येणारें आहे. तेथें स्नेहरस हा, 'शांत स्नेह असा जो अद्भुत' त्या अद्भुततेच्या अशा साजणतेसच पाहूं करणारा आहे. तेथें 'अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या प्रियतमः सखा' असे एक लाघव जे येथें उगवणारे आहे ते म्हणजे ह्या शांत स्नेहानें अद्भुत रसाला पाहुणचार करण्याचे–, पाहूणेर करून त्यास जसें अनेक रसांचें आहेर केले (दिले) त्यामुळे येथें ह्या दोन रसांद्वारे अनेक रसांचें येणे होऊन आहे. तेथें विश्वरूपाचें दर्शन भेटणारे होईल. विशेषत्वे सांगण्याचें ते–येथें शांतस्नेहानें अद्भूत रस पांघरणें आहे.–महद् अद्भूत असे ते प्रियपण येऊन आहे: दोन्ही रस एकमेकांना परस्पर अलंकृत करून अंगावर पेहनणे करून **नेसणेंच जसे शोभेच्या अलंकाराचें** असें होणारे होईल: दोन्ही रस !

तेथें प्रिय कथन केले जाणारे, बोलाविले जाणारे–भेटणारे! प्रेम हेंच परमदिव्य त्यांनीं पांघरलेः स्नेहदिवा परम आल्हादतेचा असा सर्व समारंभाच्या अद्‌भुततेचा विलास! विश्वरूपच उगवले! इतक्या आदराचा तो रस झाला! तेथील प्रेम हे अद्‌भुत झाले! व त्यायोगे महदद्‌भुत जे विश्वरूप! तेच दिसूं लागले, दिसण्याचें झाले! (१)

येथें शांतरसाच्या घरीं भावदेवरूपी पाहुणेर अलंकार ह्या अद्‌भुत रसास आला आहे. अद्‌भुत रस (हा भाव पहावा, देव देखावा, पाहुणेर) ह्या जीवदशेस, (जीव गोडीस) येऊन (जीवित अलंकृत व्हावे अशा) अद्‌भुत प्रसंगास आला आहे, व आता याचेबरोबर जे अनेक रस ह्याच्या पंक्तीस बसलेले त्यांनाही-पण सरसकट रसाचें उत्तमत्व पाहूं करीत आहे त्याचे रसपण मान्य होऊन ते येत आहे.

[ह्या शांत व अद्‌भुत रसांपैकी जो शांतरस त्याचें ठिकाणीं असा कांहीं थाट आलेला आहे की विचारूं नका! तेथें होणारा जो पाहुणेर त्यामध्यें अद्‌भुत रस जो त्यास तर जणूं एक मेजवानीच होऊन आहे–अद्‌भुत तो शांताच्या घरी (होणाऱ्या) मेजवानीस आला आहे व आतां पहावे तो काय तेथें इतरही रस जे पंक्तीस बसलेले–(आलेले) त्यांनाहीपण अवधानाचा असा एक सन्मान्यतेचा बहुमान दिला जात आहेः बहुमानामुळें तर योगीच जसें पंक्तीस आलेले आहेत असें म्हटले (जात) होत आहे–(पंथ का मार्ग आक्रमण करावा लागणारा 'हरिपंथी चालो' सारखे सत्‌वचनच होय ह्या वजनाचा आदर केला असा बहुमोल इशाराच.)] (२)

वधुवराच्या लग्न प्रसंगी आलेले जे वऱ्हाडी त्यांनाहीपण **आहेर होतोच–त्यांना** जशी अलंकार भूषणें ही आहेर केली जातात–त्याप्रमाणें ह्या मराठी देशीच्या सुखाच्या अशा आसनांनीं, तर रसांना एका सौंदर्याचें असेंच कीं एका सोहळ्याचें ते होणे होत आहे.

[येथें शांत व अद्‌भूत अशा ह्या वधुवरांच्या लग्नप्रसंगी भेटच होणारी अशी जी मिळणी तेथें आपआपले उत्तमत्व हेंच परस्परांत एकमेकांत ओतीत गेले. जी कांहीं पाहुणे मंडळी वऱ्हाडास आलेली तसेच ज्या कुरवल्या वगैरे त्यांनाही लुगडी नेसविली गेली; अलंकार पेहनविले गेले; आहेर पाहुणचारानीं गौरवास आणलेः व लेणी ही पण त्यांना अनुस्थितीचे जे रम्यवन तेंच आचरण्यास, स्थिर होण्यास दिली गेलीः लेणी म्हणजे अनेक अलंकार लेवविले गेले तीः रस स्नेह हा अद्‌भुत रसाचे पाणिग्रहण करीत असतांना तेथें जो कांहीं प्रिया व कांत संगमास बहु उत्तम असा श्रृंगार ह्या रसांनीं केला. तेथें ह्या प्रसंगी आलेली जी मंडळी त्यांचेकडूनही पण त्या समयास साजेसे असेंच बोलणें चालणें–बोलविणे–वागविणे होत गेलेः त्यांनीं प्रसन्नपण, हेंच त्या वधुवरांना आशिर्वादाचे करून, स्नेहधारा व्यवहारानें, गोडशा प्रेमळ विनोदाच्या अशा भाषणांनीं दिले तेथें त्या दोन्ही शांत व अद्‌भूत रसांची मिळणीं ही त्यांनीं करून बहु सुजाणत्व असें त्या प्रसंगाचें अमृतत्त्वास पाहू दिल्यानें आतां ही देशी भाषा जी मराठी (भाषा) हिनेंच आपले स्थान–स्थळ हे परम सुखाचें असें केल्यानें महत् पालखी–प्रस्थ (अनायासेच एका बसण्याच्या प्रकारांस पद्मासन इत्यादी झाल्यानें सांग गडे) असे सहजपण–सुखासन सोपेच असें झाल्यानें आतां इतर रसांना काय बहरच आला–त्यांनीं सजाणतेचे असे जे मिरविणें एक तेच करून ते मिरविले–स्थिर झाले. आपलेपणास आलेः अलंकृत झालेः त्यांनीं ते रस हे प्रत्यक्षत्वास आणिले; व आतां तेथीलचा तो बहर इतका उत्तम असा आला कीं त्यांनीं ते मराठीचें स्थान–सुखासन, सोपे, अगदीं सोपे असें करून ठेविलेः त्यांनीं ह्या मराठीस आपल्या तिच्या सुखासनावरच आरूढविलेः त्यांनीं तिला आपले स्थान हे दिले; व आपण जे कांहीं मिरविणें–वागणे–रमणे व्यवस्थिततेचें असें स्थिर सुस्थित असें परम समाधानाचें आपले दिव्य तेच तिजमध्यें घडोघडी ओतणें केले; देऊ करून तिचे जे सुखसर्वस्वात रिझून असणें झाले, त्यानें ह्या इतर रसांना बहु आनंद हा उत्कर्षाचा झाला, मूळ जी प्रिया हीच मुळीं आपल्या योग्यतेस दिव्यतेच्या अशा श्रृंगारास पोहचविल्याचा इतर रसांना

त्या प्रियेस पाहून बहु आदर, बहु गौरव, बहु सत्कार, बहु प्रेम असें (जणूं एक पायाचें अथवा) चरणाचें वंदन (तेथें) त्यांनीं केले व आपणही पण तेथे त्यांतच मिरवून राहिले.] (३)

पण ते शांत व अद्‌भुत असे रस जे की अहो डोळयाच्या ओंजळीनेच की घ्यावेत असे असलेले जसें का हरी व हर हे आपआपल्या प्रेम भावानेच की अहो, आलिंगनास–आलिंगास आले आहेत: (आतां येथें जी नित्यानंदा अथवा शांता ही अद्‌भुतरसानें प्रेमानें वरिली गेली; अथवा जो शांत स्नेह हा प्रेमाचे अद्‌भूत असें जे संगोपन तेंच झाल्यानें तेथें ह्या डोळयांनीं तो स्नेह पाहावाच पाहावा असेंच घेतले व त्यांनीं आपल्या डोळयाची एक जणूं ओंजळच करून त्यात तेथील बरवेपण हे घेऊ केलेले, हे कसें म्हणावे? तो तेथें जसा प्रिया व कांत–सिद्ध ह्यांचीं मिळणीच झालीं किंवा वल्लभा हिनें आपल्या कांतासच पाहाण्याचें केलें तेथे तो मिळणीचा जो कांहीं बहर आलेला तो कांहीं विचारूं नका तें जसें प्रेमभाव हे ते 'हरि' जे ते प्रेम सर्वस्व व 'हर' जे ते म्हणजे भावाचे सर्वथैव असे तेथील जे भेटणें आलिंगणें होणारे ते डोळयांच्या ओंजळीत बसणारें असेंच होऊन आलेले.) (४)

ते कसें तर आवसेच्या दर्श का पूर्ण इंदूस गुणाच्या दिवशीं सूयचंद्राची दोन्ही बिंबे सरसपणाने का एकदमच गांठीभेटीची झालीं. त्याप्रमाणें येथें ह्या दोन रसांनीं–रसामध्यें एकोपा–परस्पर एकमेक दोन्हीं मिळून एकाचेच ते वसणें येणे होऊन आहे—केला आहे.

[किंवा जसें कांहीं ते चंद्रसूर्यच आवसेच्या दिवशीं एकमेकांस भेटलेले होत तेथें मुळीं एक कलाचे असें होणेच नाहीं. तेथें पूर्ण बिंबे ही दोन्हीं जी तीच एकमेकांत मिळून गेलेले– तेथें ऐक्यच सर्वथा इतकें कीं, 'एकवळा' च (एक वळणें आलिंगणें–भेटणें–आक्रमणें सुग्रास असें) तो सर्व रसांनीं मिळून केलेले तेथें काय परिपूर्ण असेंच ते पूर्ण बिंबाचें जे सरसत्व झाल्यानें तेथें परम ऐक्य हे सर्व रसांनीं मिळून केले–येथें सर्व रसांचें ऐक्यच होऊन आले व आतां दोन जीं ती एकच संपूर्ण बिंब ऐक्यतेचे असें झाले.] (५)

गंगा व यमुनाचे ओघ–प्रवाह एकत्र मिळाले तसें रसाना हे प्रयाग क्षेत्र झाले आहे. म्हणून तर अवघें सर्व जग पवित्र झालें आहे.

(तेथें गंगाही जशी का ब्रह्मपुत्रीच एक ते त्या जेथें अंतच ह्या कृतकर्माचा होणारा व जेथें ती यमुना हीच ओघानें त्या गंगेच्या ओघास पावनत्व पाहाणारी असें ते दोन्हीं पुण्यच ते पावन असे झाल्यानें तेथें प्रयाग हेंच महत् क्षेत्र असें एक सर्व भक्तीच जशी ओघ घेऊन ओघास मिळाली व आतां तेथें सर्व पुण्यच पदरी पडल्यानें तेथें पायधुणी ही झाली व कृतकर्म हे राहिलेच नाहीं तेथें निवृत्त ते असेंच एक आंघोळीने अथवा सुस्नाततेनें जगच मुळीं पाहिले गेल्यामुळें तेथें 'स्नात' पवित्र असेंच ते महत् भाराचे झाले.) (६)

ह्या प्रयाग क्षेत्रांत सर्व जग पावन झालेले तेथें–त्यामध्यें–ह्या क्षेत्री गीतारूपी सरस्वती गुप्त अशीं व दोन्हीं रस ते शांत व अद्‌भुत हे मूर्त म्हणजे मूर्तिमंत–प्रत्यक्ष ओघाचे व्यवहाराचे असें आणि म्हणून वेणी भक्ति ही त्रिगुणित होऊन आहे. ह्या जगास सांपडली–पावली–प्राप्त झाली.

[येथें दोन्ही जे रस शांत व अद्‌भुत ते मूर्त होऊन असलेले असें ओघच होऊन आहेत, व ही जी गीता सरस्वती ती जमिनीत गुप्त झाली व पुढें निघाली. अशी ती गुप्तत्वानेच असूनही वाढाणारी ओघानें असणारी अशी असल्यानें तेथें हे तिन्ही ओघ एकत्र मिळाल्यानें येथें त्रिवेणी संगम झाला आहे जणु (भक्ति ग वेणी माझी। गुंफा गे साजणी॥) हे जसें तसें परंतु येथें एक गोष्ट मात्र लक्षांत घेण्यासारखी आहे ती म्हणजे अवधानाने असा. आपले येथें लक्ष द्या–तेथें अनेकशः तीर्थाचे भ्रमणच हे होणारे म्हणून त्या नाम ओघाकडे लक्ष असूं द्या. तेथें नाम हे अवधानानें पाहात जा. तरच बरें! अहो बाप्पा हा त्रिवेणी संगमच येथें सहज फावलेला आहे. त्याचा उपयोग करून घ्या. तेथें लक्ष द्या.] (७)

अशा ह्या त्रिगुणिततेच्या भक्तीमध्यें एका कर्णेंद्रियाद्वारे एका श्रवणाच्या योगेकरूनच कीं अहो! ह्या त्रिवेणी संगमामध्यें प्रयाग तीर्थामध्यें (शब्दरूपाचा झाला होतो तेथें) आपला रिगावा करून सहजपणें सोपान पद्धतीतच बसणें होईल असें अहो माझ्या स्वामींनी-श्रीनिवृत्तीदेवांनी श्रीनिवृत्तीनाथांनीं केले आहे.

(येथें श्रवण करणें हाच राजमार्ग आहे. ह्या मार्गानेंच ह्या तीर्थाच्या ठिकाणीं जाऊन स्नान करा. ते सहज सोपे असें होऊन आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात माझे दातार जे श्रीगुरू श्रीनिवृत्तीनाथ त्यांनी आतां सोपे करून ठेविले आहे. त्या दातृत्वाची जी एक सीमाच केलेली अशा श्रीनिवृत्तीनाथांस मी नमस्कार करतों. (८)

संस्कृताची कठिण अशी तीरें तोडून मराठीची शब्दघाटरूपी धर्म निधानें श्रीनिवृत्ति देवांनी रचिलीं आहेत.

(गहन असणारी अशी संस्कृताची तीरे-कडा तसेंच पार अपार होणे जें त्या संस्कृत भाषेचे तेथें परतीरच गांठणें जे त्या भाषेचे ते निवृत्ती देवांनी तेथीलची ती अपार तीरे तोडून टाकिली. व मराठी शब्दासच शिड्या लावून सोपान जिना साधून पद्धति प्रस्थापित करून. ती संस्कृताची आंच, देव दिव्य निधान धनं जे देवलोकचे तेंच मराठी शब्द रचनेनें साधून घेतले आहे. ही रचना म्हणजे एक धर्मनिधान कीं उभारले गेलें असें आहे. तेथें धर्म जो आहे, तोच आपल्या प्रसन्नपणानेंच संपन्न असा होऊन आला आहे. ही रचलेली जी मराठी शब्द सोपानें पद्धति हा धर्माचा एक द्रव्यनिधीच होय तेथें धर्म हाच आपले-पणानें स्थित झालेला, असलेला. तेथें त्याचे आपले असें जे महत्व प्रसन्नपणच एक, जें सांठाच एक दिव्य-तेचा. अशी ती निधाने आहेत-धर्माचें आपलें प्रत्यक्षत्व जेथें प्रस्थापित आहे असें ते श्रीनिवृत्तीनाथ देवांचें ते त्यांनीं मराठी भाषेचे घाट रचले करून-बांधून धर्माची भांडारें उघडिली आहेत.) (९)

करितां भलत्यानेही येथें सद्‌भावाने न्हावे. स्नान करावे व प्रयाग माधव विश्वरूप पहावे. व तशा दर्शनानें एवढ्यानेंच कीं संसारास तिलांजली द्यावी. संसाराचा धाक वहाण्याचा सोडावे.

[असें आहे म्हणून भलत्यानेही भाव समर्थनेच्या जोरावर येथें न्हाण्याचे करावे, स्नान करावे भावा-तच मुळीं आपले अंग बुडवून असावे. येथें योगयागाची जी भावना वृत्ति अथवा प्राचूर्यतेचे असें सिद्धिच एक लाभली. सांपडली असें आहे, व सिद्धि जी तेथेंच श्रीगोपालकृष्ण हे नाथ असेंच होऊन आहेत. अहो! तेथें कांतच एक श्रीगिरिजेचा आपल्या स्पष्टतेस येणारा-दर्शनास येणारा असून तेच कीं विश्वरूप दर्शन होय. व असें हें दर्शन झाल्यावर तेथें मग ह्या संसाराची आंच लागणारी होत नाहीं. तेथें संसारावर पाणीच सोडलें-संसाराला पाणीच दिलें, तो देवासच जसा अर्पण केला असें होणारें होय.] (१०)

असें हें असोच असो. असें होण्यानें तर मूर्तिमंत रसभाव ते भरास आलेले आहेत. असें ते तर अहो! श्रवणसुखाची ती दिवाळीच-सुखशृंगार शोभाच उजळली अशी, जगास जोडीची झाली. जोडिली होत आहे.

[येथें सावयव असेंच एक ज्ञानदेहाचें येणें हे आपले अवयव रसभावच मूर्तिमंत प्रगट झाले आहेत. श्रवणसुखाची महतीच येथें ह्या विश्वास जोडलेली आहे. असें ते भाव जे अवयवच ह्या अनेक रसांचें अहो! येथें परम सौख्य हेंच आतां आपलें अनेक रसांचें दैवच एक येथें ती ती मूर्ति, अथवा हें विश्व जसें एक देवच दृश्यमान होऊन असल्यानें तेथें ह्या रसांना भावच आला आहे. अहो! रस हे नुसते रसच नव्हत, तर येथें दैवच एक देवपण पाहात आहे. असें ह्या अवयवांना दिव्यपणच आलें. अवयव हे स्वच्छ सुंदर असे जणुं सर्व देहच तेथें आपलें महत्व घेऊन असलेला असल्यानें, तेथें हें जें श्रवण करणें ते परम सुखाचें असें होऊन आहे. महती हीच तेथे सहज जोडली गेली. जोडून घेतलेली मिरवणारी, सांथ देणारी एक मैत्रीच जमली अशी आहे. तेथें अहो, आकाशच जसें लहान झालें. मग काय तेथें सर्व सुख हें केवळ असें ज्ञानाचें

प्रसन्नपणच–गोडीच तेथें ह्या जीवदशेस दिसूं लागली. अगदीं जवळच असलेलें असें तें 'उप' म्हणजे अगदीं निकटचे असें (प्रांत देश,) असें ते श्रव हे महासुखाचे असें निधानच एक !!! जेथें रसांना भाव आला किंवा भावाना रस आला असें तें दैविकी इच्छेचें एक देव लक्षण सर्वावयवांनीं परिपूर्ण असेंच तें आलेलें आतां होऊन आहे. श्रवणसुखाचें राज्यच जगास आलें–विश्वास जागवूं लागलें.] (११)

जेथें अहो, शांतरस हा अद्भुत रस नगदतेचे असें वागत आहेत व दुसऱ्या इतर रसांनाहीं शोभा महत्व जडले होऊन येत आहे. असें झाल्यानें अहो! अल्प लहान तरीपण येथें उघडें स्पष्ट असें मोक्ष कैवल्यच कीं साक्षाततेनें दर्शनास येत आहे.

(नित्यतेचें जें शांतपण तेंच आनंदानें नांदण्यास आलेलें. तेथें आनंदणें हेंच नित्यत्वानें नित्यपण उचलून आपल्या नित्यब्रह्मासच आनंदवीत असून, तें म्हणजे आतां असेंच म्हटलें गेलें कीं जें नित्य अशा आनंदाचें आहे, तेंच शांत रसाचें शांतपण हे विश्रांतीच एक स्वभावानें पाहिली. रम्यता ही स्वभावास आली. तेथें उत्तमत्व जें तेंच ह्या मनुष्य प्राण्यानें आपल्या महतीस आणिलें; तें महतीचें झालें. तेथें जें बोलणें बोलिलें तें जणुं ह्या चिदाकाशावरच वाजणारें असल्यानें त्यानें स्वभावास महति दिली–तेथें भाव हाच भव म्हणजे संसारच आपल्या अक्षरपणानें आपलें उत्तमत्व पाहात असलेला. असा तो जो भाव पाहूं आल्यानें तेथें भव हाच काय आतां येथें जणुं श्रीशिवशंकरच जसा, आपलें व्यापकत्व पाहविणारा होय. तेथें भव हाच भावाचा झाला. त्यास भाव आला, रसाचें अद्भुतपण आलें, सौंदर्य आलें. तारुण्यास येऊं आणलेलें असे तें महतीचें सौम्य जसें ह्या देहानेंच उचलिलेलें पाहिलेलें असें ते अद्भुत अशाच भावाचें उत्तमत्व म्हणून येथें काय असें न म्हणावें कीं ह्या भावानें मानले गेलेले, जे तेंच जसें ह्या शांतपणाच्या, विजयाच्या, आनंदाच्या प्रकृतीवर प्रकृति हीच नांदत असलेली अशी आनंदच साक्षात आनंददायीनी! आनंद हाच उचलिला गेला. व आतां तें स्वभावाचें रम्य असें जे उभें अथवा उभा असा आपला भाऊच प्रत्यक्ष त्या आनंददायीनीस ह्या भव प्रेमाचें रहस्यच रसत्व बोलून दाखवित आहे. असें तें उभविलें जाणारें –उभारलें जाणारें, उगवणारें जें तेंच उत्तमत्व हें उत् त् म् असें एक ओंकाराचे उठणेंच असून स्वागतच असून त्यानें स्वतःस कसें शेवटाकडून अक्षर जेथें उच्चारानें आपल्या शेवटास आलें, आणलें, तेंच जसें उलटेंच वाजलें व आपल्या उत्तमत्वास पाहूं लागलें.

येथें 'ओम् ओम्' असें ते जणुं 'म्' हेंच अक्षर पुन्हां ओम् च्या उच्चारासच पाहाणारे म्हणून तेथें अक्षर हेंच जणुं उगवले व आतां भव भावाचें पाहाणें करूं लागले. विनय, शांत संपत्ति हीच ह्या ब्रह्मांडावर उभें राहाणारें भूत महत्व जें अद्भुततेचें असें तेंच जणुं येथें विष्णु उच्चारणा म्हणजे अक्षर झाल्यानें तेथें परम अशा आनंदाचें तें भावाचें होणें, हेंच सगुणत्व तेंच येथें स्वतःच्या विनयाचा, विजयाचा एक दागीनाच कीं, अलंकारच कीं, स्वरूपास आला. येथें संसारच पाहिला. व तो म्हणजे अगदीं नगदतेनेंच--रोखीच्या व्यवहारानें रोकडाच असा तेथें ह्या स्वभावाचा सर्व संसार अक्षरास आला. अक्षर हें संसरले. ते जन्मास आलें असें अद्भुत तेथें एक भाव महतीचें स्वभाव लक्षण हेंच ह्या मनुष्य जन्माचें स्वभाव लक्षण असून तेथें रस्ता चालतांना आयुष्याचें जें चालणें होत असलेलें, तेथें आतां असें तें अद्भुततेचें विष्णुलक्षण भाव सौभाग्य भवच दिसूं लागला असें मानलें आम्हीं, असें ह्या देहास नटविणारें मनुष्यलक्षण तेंच प्रसन्न होऊन त्यानें हा मनुष्य जन्म म्हणजे उत्तम असें पाहूं केलें. तेथील विशेषत्व जें तें म्हणजे ह्या महद्भुततेनें असणारें जें भावाचें मानलें जाणारें असें उभेंच अक्षर झालेलें ते जणुं ह्या ब्रह्मांडास शोभा देत असणारा जो अनु-भगवन्! शेष आकाश तेंच चित् चिदाकाशामध्यें येऊन तेथें नांदण्यास आलें–आपला भार देहभार उचलण्यास समर्थ झाले. असे ते ज्या ह्या मनुष्य जन्मानें उचलिले जाणारे–सततत्तेच्या अभ्यासानें अभ्यासच झाले; अभ्यासासच आले असल्यानें तेथें एक उगवणें ह्या भावानें तें ज्या मनुष्य देहाच्या आधारानें असलेलें

त्या देहामध्यें जणुं तिन्हीं देव हे आपल्या देव महत्ताचे होऊन त्यांनीं ते उभविले–उजविले जाणारे ते स्वभाव उत्तमत्व तेंच जणुं जेथून येत असलेले, होत असलेले तेंच मनुष्यपणाचें असें परमरूप हे ललाट भुजाच एक उघडिली गेली. तेथील लोचन हेंच पाहाणारे झाले. तेथें दर्शनच एक परमदेवतेचें असें हेंच ब्राह्मण्याचें आंग पाहात असल्यानें तेथें ब्रह्म असेंच एक कर्म त्या ब्रह्मपणाच्या स्वभावानें भावास आलें, महत्व घेऊन आलें. तें मननीय नव्हे, तर सन्मानतेचें झालें. तेथें भव हा तर आहेच, पण ते जसें कांहीं भव पिनाक जो श्रीशंकर त्याचेंच एक दाखविणेंच का दर्शनच ह्या जगताचें–संसाराचें–भावाचें असलेलें. येथें जन जसे ते आपला प्रभाव अथवा वळसा घेत असलेले. अथवा अनेकत्वानें वळमाच श्वासभारानें अनेक रसांना महत्व जोडलें एक पुष्टि देत असलेले. तेथें पुष्टि हीच रसांना आली. पुस्तीच जोडली गेली. अक्षराचें नवीन नवीन आतां हें इतकें स्पष्ट झालें कीं, यापेक्षां आणखी एकादा मोक्ष ह्या जगांमध्यें असेल अशी कल्पनाच मुळीं वर येऊं दिली जात नाहीं. हें इतकेंसें थोडेंच परंतु तेथें कैवल्य स्वरूप हेंच डोळयास दिसूं लागलें असें तें अवर्णनीयतेच्या आनंदाचें सांचणें एक होय; अगदी नगद रक्कम हातास आली असें रोकड्या हिशोबाचें एक जतन अथवा ठेवाच लाभणारा). (१२)

असा हा मोक्षदानी अकरावा अध्याय जो का देवाच्या सर्वस्वानें, देव सर्वस्वांतच विसांवा ठावाचा झाला. देवाचा झाला. अहो, येथेही पण अर्जुन भाग्यवंताचा रावच एक तो येथेंही पण पोहोंचला–पातला–पावला कीं.

(असा तो हा अकरावा अध्याय म्हणजे देवाचा आपल्या विश्रांतीस येणारा ठावच–जेथें परम विश्रांतीच तेथें कामांत असा, काजांत असा, कसेंही असा, तरी तेंही विश्रांतीच एक असें त्या विश्रांतीचें लेणेंच हे परम सुंदर असें नामाचें लेइलेलें ब्रह्मच होऊन असणें होय. येथें देवपणच देवपणांत मुरलें, विसांवलें, स्थिर झालें, विश्रांतीस आलें असें ते वस्तु वाचकाचें नव्हे तर एक वस्तूच स्थूल होऊन असल्यानें तें परम दिव्यच विलसत असलेलें होय. असा तो ठाव ठिकाणा अथवा राहाण्याची जागा, त्या अर्जुनासही पण सांपडली. तो सदैव असाच होऊन आल्यानें तेथें दैवच एक सततचे 'शोभायमान असें' असा तो अर्जुन येथल्या विश्रांतीच्या जागीं पोहोंचलाच). (१३)

गीता अर्थ हा मराठीस आल्यानें येथें एकटा अर्जुन पोहोचला असें म्हणणें तरी काय पण अहो आज तर आवडे तयालाही, वाटेल त्यालाही आबादानीची अशीचही वेळा होऊन आहे.

(अहो येथें नुसता अर्जुनच पावता झाला असें नव्हे तर जे देवाचे आवडते असे अथवा आवडल्यांची आवड जी देवच एक होऊन असणारी अशी तेथें ती आवडच आवडीवर प्रसन्न होऊन देवपणाची झाली व आतां येथें त्या आवडीनें सुकाळाचे असेंच एक काय लेणें–काय थाट–काय सौजन्य–काय व्यवहार–काय गर्दीच एक अशी ती एक जशी का लगीन घरची गडबड ही येथें गडबडीची न होतां तेथें आदर हाच मुळीं सहजतेनें समूढतेचा पाया घेऊन चालत असल्यानें तेथें मजलसीची मजाच मजा गर्दी एक येणाऱ्या जाणाऱ्यांची अथवा हा जो देह आहे त्याची निगा तेथें एक निरोगतेचें पुष्टपणच शह देतच असलेलें असें तें सुकाळाचें असें देवपण झालें. अहो! येथें देवपणानें इतकें कांहीं स्वतःची खातरजमाच–स्वागततेची मजलच एक करून घेतलेली कीं तेथें प्रकाराप्रकारांनीं ती देवपणाची सीमाच सुकाळाची होऊन आली. तेथें एक जशी का त्या प्रकृतीसचमुळीं रंजन रागानें अनेक तऱ्हांचीं खाद्येंच उपहारानें औपचारिकतेनें पाहावयास दिली गेलेली अशीं पाहाण्यास आलीं (मराठीचा अर्थ येथें एक जी ह्या यमलोकींची ठेवण ती भावांनीं पाहविली अशीच भाव्याची परंतु याचे दुसरे बाजूस असलेले ते जरी इथलचे तरी ती जाणीव हीचमुळीं वाटसरांनीं आपलीशी केली असल्यानें तेथें दीर्घ असेंच ते नीतिमत्तेचे होऊन आहे. म्हणून ते नुसते आडवलेले असेंच) येथें ते जे घाटच बांधलेले असें मराठीचे जसें होऊन आलेली–त्या संस्कृतामधून तें आतां कसकसें ह्या मराठीचें

आपल्याच अंगाचें केल्यामुळें तेथें ज्या अनेकशः तिच्या बाजू ह्यांनीं आपले सौंदर्य हीसच जोडण्याचें केल्यामुळें आतां जो कांहीं रंग ह्या मराठीस चढला तो कांहीं विचारूं नका. तेथें भक्त महिमा हा महिम्यास आला. आवडतयाचें देवपण तें आवडलेलें असें झालें. व आतां तेथें कमलीही म्हणून कमतरताच नाहीं. जे हा श्रीगीतेचा अर्थ हा प्रभावास आला. मऱ्हाटीच्या प्रभावास आला. मऱ्हाटीनें महान् असा वैभव प्रभावाचा केला. मऱ्हाटीमुळें प्रभावाचा झाला. तेथें जो कांहीं हा सांख्य प्रकार ह्यानें तर आपलें ठाणें हें अपूर्वतेच्या अशा आपल्या सर्व भारास आणून तेथें तो सांख्यच जणुं विलसूं लागला असें पाहाण्यास मिळाल्यानें तेथें तो जो लक्ष भार हा परम दिव्यच पुढें करून चालत आहे असाच दिसूं लागला. असाच विलसूं लागला. आवडतयाही म्हणजे भलत्यासही–वाटेल त्याला आतां ते आवडणारे असें सुकाळाचें दिव्य कलेचें एक खाणेंपिणें लेणें (लेइलें) असें एक परम सुंदरतेचें अंग हें वाटेल त्यालाही पाहूं लागलें, असा तो जणुं काय ह्या मराठीचा एक प्रभावच असें दिसत असून ते आपल्या योग्यतेनें योग्यतेचे झाले. ते प्रत्यक्षत्वानें वागुं लागल्यानें–पाहाण्यास मिळाल्यानें नुसतें नव्हे तर येथें स्वतःच तेथीलची अवर्णनीय अशी उत्तम लक्षणें हींच वागण्यास आलीं, ती वागणारीं झालीं. असें तें ह्या मराठीचें भाग्यच एक विलसणारें झालें. तेथें जो तो त्या वैभवानें आनंदाचें रंजणेंच घेऊन अ हे असें झालें.) (१४)

याचकरितां माझें विनविणें तें ऐकूं यावेंच यावें मनांत ठसावें म्हणून कीं सज्जनांनीं इकडे लक्ष द्यावे जी.

(आणि एवढ्याच करितां मी जी कांहीं विनंति करून आहे, ती तुम्हीं सज्जनांनीं ऐकण्याची करावी. मी जी कांहीं तुम्हांस विनंति केली आहे, ती तुम्हीं मनावर घ्यावी–मानावी–ऐकावी–तरी ती विनंति म्हणजे तुमचें अवधान येथें असावें. तुम्हीं इकडे लक्ष द्यावेंच, तरी विनवणीचें जें तुम्हां सज्जनांना, ते ऐकण्याचें करणें तेच मुळीं तुम्हीं अवधान देण्यानें–लक्ष देण्यानें होईल ; करितां तुम्हां सज्जनांचें इकडे लक्ष असावें (कृपारूपी अवधान असावें.) मजवर तुम्हां सज्जनाची कृपा असावी, लक्ष असावें.) (१५)

तुम्हां संतांच्या सभेमध्यें अशी इतकी सलगी तुम्हांशीं करणें योग्य नाहीं; पण मज अपत्यावर लोभ करून मजला मानण्याचे करावेंच करावें अशी विनवणी आहे.

(असें तुम्हा संतांच्या सभेमध्यें मी आपणाशीं सलगीचें बोलणें करावें हें केव्हांही होणेंच नाहीं. परंतु मी जो कांहीं एक आपल्या अपत्याप्रमाणेंच एक जें भावाचें बोलणें करीत आहें, तेथें लोभच जसा कांहीं माझा व आपला आहे, असा एक तऱ्हेचा भावच ह्या माझ्या सलगीच्या बोलण्यास आला असल्यानें, तेथें तुम्हीं संत जे देवत्वच एक सभेस आल्यानें तेथें सहज जी माझी आपले चरणीं होणारी नम्रता अथवा ह्या माझ्या हातानें जशी कांहीं आपली पूजाच करण्याचें मनानें घेतलें, सन्मान्यतेचे आपणांस करून असणें असे तें सहज नम्रतेचें माझें अपत्यपण ते तुम्हीं मानालच, मनावर घ्यालच अशी माझी विनवणीची सलगीची जी वाणी ती हा जो अपत्य–बालकच आपला तेथें मी आपणास एक तऱ्हेनें आसनस्थच करून आहें. मी आपल्यापुढें तिष्ठणेंच एक–बोलणेंच एक–उभें राहाणेंच एक, तें हात जोडून असणेंच ते करीत असून तें जसें का आपलेंच केलेलें असें असल्यानें तेथें तुम्हीं संत हे केव्हांही ह्या माझ्या सलगीस मानून असाल हें केव्हांही ह्या माझ्या सलगीस पाहून मंद किंवा मधुर हास्यच आपलें जसें आनंदास येणें होय.) (१६)

अहो पाखरांस आपणच की पढवावें व मग त्यानें पढलेले उच्चार करून आपणांस ऐकवावें तेथें तर तुम्ही मानच कीं डोलवितां. अहो बाळकाचे कौतुक करविल्यानें आई माय संतोषत नाहीं काय ?

(अहो, शुक जो आहे, त्यास आपण शिकवावें; तसा तो शिकला व बोलूं लागला म्हणजे आपणच आनंद मानून डोलावें; अथवा जें कांहीं कौतुक म्हणून आहे, तेथ ते अपत्याचे कौतुकाचें चोज करणारी ती माय काय रिझली होत नाही ? बाळाचें कौतुक करविल्यानें काय तिचें पोट भरत नाहीं ! किंवा बालकाचें बोबडें

असें बोलणें ऐकल्यानें त्या मातेच्या ठिकाणीं पोटच माझें भरलें. अत्यंत समाधानच मी मानून आहें. असें तिचें, ते हृदयातील धालेपण त्यानें काय ती माय माथाच डोलविणारी नव्हे कशी! अहो माय ती माय, तेथें तर तिचें प्रेमच त्या बालकावरीलचें तें दुणावलेंच जसें ती मनानें रिझूनच आहे अशी बालकास पढविण्याचें करण्यानें होणारी–त्याचें चोज करण्यानें बालकाचे चोज कौतुक आवड जसें का मातेचें पाहाणेंच एक त्या प्रेमास पाहाविणेंच करविलें, प्रेमानंदास चोजच तेथे मायेचें पोटच भरलें, सानंदतेनें ब्रह्मांडही पण थोडेंच असें आनंदणें तें तिचें!!!) (१७)

त्याप्रमाणें मी जें जें कांहीं बोलणें बोलतों आहें, तें हे प्रभो! स्वामी! आपलेंच शिकविलेलें असें आहे. तेथें मदन हा शेजारीच होऊन आलेला आहे. चित्त हें त्या मदनाचें झालेलें तेथें आपणच ते होऊन असल्यानें आपलेंच केलेलें असें हे बोलणें आपलें आपण ऐकत आहांत! आपणच बोलणें बोललेलें तें आपण ऐकावें जी अहो! देवराया, असें हे आहे. (१८)

हें विद्येचें गोड झाड तुम्हीं लाविलें आहे त्यावर अमृतरूपी लक्ष शिंपून तें मोठें करावें.

(येथें हें तर बहु गोड असें सारस्वतच उगवलें, वृक्षास, झाडास आलें तें सारस्वताचें झाडच जसें एकादें लावावें असें होऊन आहे. तेथें हे देहधारण, तें बोलणें व गोड असें सारस्वताचें हें झाड काय, कशा उपमा कौशल्याचें एक सर्व कांहीं ह्या देहानेंच जसें ह्या विद्याविविधतेचा रंग उचलून घेऊन तेथें झाड ही उपमा पुरती केली. हें देहधारणच इतक्या कांहीं सुविद्यतेच्या विद्यमानास आलेलें की तेथें सारस्वत हें व्यवहारतत्पर असें गोडच झालें. तेथें ह्या देहवंताचा जो कांहीं एक समारंभ तो काय, कसा ह्या प्राणास झेपीत आहे, तेथें तें सारस्वत असेंच म्हणूं केलें. सारवंत अशी ती वाणी होऊन तिनें तर ह्या संभावनेस इतकें जोडणें केलें कीं, तेथें प्राण हा सर्वच्या सर्व देह ओढून नेत आहे, असें तें सरस्वतीचें मधुर बाल्यच नटलेलें तें ह्या चित्तास आकर्षण करून आहे, असें आतां आपण अवधानरूपी अमृताचें यावर सिंचन करावें, जी अहो देवा! तें वाढीचें असें सुसंलग्न आवडीचें असें होऊन यावे, तसें शिंपणें रंगाचें ते करून लक्षरूपी अवधान हेंच अमृताचें शिंपणें व्हावेंच, तसें आपण ते लक्षरूपी शिंपणें करावेंच. तेथें रंगरस अमृत शिंपणें हे सर्व अवधान असें बहु प्रिय होऊन येईल.) (१९)

ज्यायोगें ह्या रसभावरूपी फुलांनीं, फुलाच्या भरास येईल. अनेक प्रकारच्या अर्थरूपी फळांच्या बहरानें सुफल असें होईल व मग तुमच्याच धर्मांनीं कीं तुमच्याच योगेंकरून जगास सुख होईल, सुकाळ होईल.

(मग ह्या झाडाला फुलें येतील. तीं फुलें म्हणजे ह्या भावाचें फुलणें झालेलें, भावांना आलेलें असें, तेथें रस हाच देव जसा रसिक होऊन त्यानें भावरूपी फुलौरा फुलविला असें होईल. अनेक अर्थ जे आहेत, ते शब्दरूपी फळभारानें समाधान देणारे होतील. तेथें फळभार हाच फावला, अनेक अर्थ हे नानात्व घेऊन असलेले तरी ते दर्शनास येणारे होतील. बुद्धीस प्रकाश देऊन संभारच एक तेथें पावला असें होईल. हे प्रभु! तुमच्या कृपेनेंच, तुमच्या त्या समधात अशा धर्मानें येथें शांतस्नेह हाच उगवला होईल; सम असें जें धर्मधारण तेथें ब्रह्मच जसें आपलें आपण ब्रह्मधर्माचें झालें सुमुहूर्त असें धर्माचें झाल्यानें जगास तर खरोखरीच पाहातां तें उपयोगाचें होणारें असेंच होऊन येईल—सुरपदवी हीच एक आवडीची अशी होऊन येईल व योगच मग आपल्या उपयुक्ततेस आला–उपयोगाचा झाला. असें एक वागविणेंच जेथें, तेथें एका नवलासच पहा म्हणणारें होऊन असेल). (२०)

ह्या बोलण्यानें श्रीसंत हे प्रसन्नतेस आले व त्यांनीं 'तोषलों गा' ज्ञानदेवा! आम्हांस फार समाधान झालें. हें जें तुवां बोलणें केलेंस त्यानें येथें तुजला, तुवां बाप्पा हें भलें केलेंस, असेंच आम्हीं म्हणत आहोत;

करितां आतां तेंच सांगणें करावें, कीं जें येथें ह्या अर्जुनानें बोलिलें–बोलूं आदरिलें–अर्जुनाचें म्हणणें तें काय झालें, कसें झालें तें सांगावें. (२१)

यावर श्रीनिवृत्तिदास जे ज्ञानेश्वर महाराज ह्यांनीं असें विनविण्याचें केलें कीं, अहो, येथें मी जो कांहीं ह्या प्रकृतिधर्माचा झालेला किंवा असलेला असा तो काय कसें बरें सांगू शकेल ? तें कसें सांगावें हें कांहीं मी जाणत नाहीं. तेथें मजला तें जाणणें हें कांहीं सांगण्याइतकें होणारें असेल असे वाटत नाहीं. कारण कीं मी ह्या प्रकृतीचा–प्राकृतिक प्राकृत होऊन आहें, तंत्रतयेंचा होऊन आहें. येथें आपण पात्र तें सांगणें तें सांगण्याचें करावें, मनावर घ्यावें व तें मजकडून सांगवावें तरच बरें.

प्रकृतीचें प्रकृतिमंत असें आपलें महत्व येथें त्या तत्वांना आपलें असें करून तेथें ही अद्‌भुतता ही सर्वैथैव त्या त्रिगुणाची जरी तरी ह्या प्रकृतीनेंच तें सर्व आपले शिरावर घेऊन, आपण ती तेथें त्या आपल्या प्राकृतिधर्मास पुरती होऊन असल्यानें तेथें प्राकृतिक असेंच तें बोलणें होईल. येथें आत्मबल किंवा जें कांहीं या आत्म्याच्या प्रकाशाचें परावर्तन ह्या बुद्धीवर पडणारें तें प्रकाशणें हेच मुळीं प्रकृतीनें आपले कार्यास प्रकृतिमंततेस लाविल्यानें मी कांहीं तेथें तें सांगणें, जाणणें हें मुळीं जाणतच नाहीं. परंतु आपण जे त्या मुळीं आत्मबलावरच उभे असलेले, त्या तुम्हीं मात्र हें मजकडून सांगवावें परी तें तुम्हीं सांगवा असें आहे (२२)

अहो, रानांतील झाडांचीं फळें खाऊन जे आपला निर्वाह करीत असलेले, त्याजकडून तें लंकेश्वराचें नेवाण करविलें–लंकेश्वराचें पात्र तिरस्काराचें करून अस्तंगत केलें; तसें येथें जरी अकरा अक्षौहिणी व एकला अर्जुन तरी काय तो त्या अकरांनां जिणणार नाहीं ? जिंकणारच. (२३)

म्हणून समर्थ जो आहे, त्यानें केलेलें तें जसें चराचरामध्यें व्यापून असतें, जसें कांहीं तें करणें चराचरीं केलें गेलें असें–चराचरीं तेंच एक करूं आदरिलें असें असल्यानें, तसें तेथें तुम्हीं संत जे त्या तुम्हीं मजला बोलवा. तें तुमचें करणें मग जसें चराचराकडूनच कीं नवेंच असें होऊन आलें असें होईल. (२४)

हा आतां बोलणें बोलत आहे तें ऐका, कीं हा जो कांहीं हितकारक असा भाव ह्या गीतेस आला आहे, तो प्रत्यक्ष त्या श्रीवैकुंठनायकाच्या मुखींहून निघाला असा आहे. येथें तो भाव आतां कसा तो हितकारक कल्याणच एक पाठीवर वाहून आहे असा. तें सांगतों, बोलतों तें ऐका, ते ऐकण्याचें करावें (२५)

वेदांमध्यें भगवति देवी हीच प्रतिपादनास घेतलेली देवता असून, तीच येथें ह्या श्रीगीतारूपानें वाखाणीलेली अदभुत अशी एक निरर्थकतेच्या अर्थवादाचे तोंडच बंद करणारी अशी देवता असून, ती बाप बाप असें एक महदद्‌भुततेचें निश्चित ! चकिततेचें होऊन असणें होय. असें तें ह्या ग्रंथाचें झालेलें तें एक तेथे प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण हेच वक्ते आहेत. (२६)

तेथील गौरव, ज्ञानसौष्ठव कांहीं वानण्याचें का वाखाणण्याचें असें होणारें नव्हेच; कारण तें श्रीशंभू जो योग्यांचाही योगी त्याचेही पण मति बुद्धीमध्यें उतरणारें नव्हेच; कदाचित् होणारें असें असल्यानें आतां हेंच बरें कीं तें म्यां जीवेंभावेंकरून नमस्कारावें, यांतच भलेपण आहे. (२७)

आतां ह्यापुढें जो कांहीं एक संवाद–बोलणें तें म्हणजे अर्जुनानें तर त्या विश्वरूपास मिठीच दिली. विश्वरूपास तर तो मुळींच सोडीनासा झाला. येथे आतां एक मजेचा प्रश्न तो म्हणजे ह्या अर्जुनानें पहिली जी कांहीं गोष्ट करणें ती कशी केली ? पहिल्या मित्रभावाचीं–प्रीतीचीं जीं कांहीं बोलणीं तीं गोष्ट बोलण्यानें कशीं केली असेल ? तें पहिलें बोलणें तें कसें बोलिलें गोष्ट बोलण्यानें तें ? (२८)

मी जो कांहीं एक परकर घेऊन आहें, कीं त्या विश्वरूपाचें मी व्हावें–तें रूप मला दिसावें, हें सर्वही जे कांहीं आहे, तें श्रीसर्वेश्वरच एक जसें तेथे मजला बाहेरचीच मुळीं दृष्टि असल्यानें मी तें आतां आंत पाहा-

ण्याचें तें कसें करूं! किंवा हे सर्व श्रीसर्वेश्वराचें रूप काय आंत, काय बाहेर अशी प्रतीतीच एक मी घेऊन आहे. तरीपण तो रूपसोहळा मजला स्थूल दृष्टीनें दिसावा, माझ्या चर्मचक्षूंना –ह्या डोळ्यांना तो सहज दिसावा, आंतमधीलचें जें जें कांहीं तें रूपाचें आपल्या दर्शनानें असणें–आपल्या सर्वेश्वरपणानें असणें, तें मजला सहजपणेंच माझ्या स्थूल दृष्टीनें सहज बाहेरचें असें होऊन यावें. तें बाहेर येऊन होऊन मजला दिसावें व असें झालें तरच बरें! (२९)

अशी अगदीं मनापासून असलेली आकांक्षा जरी तरीपण श्रीदेवांना तें पुरतें म्हणजे एक तर लाजेचें सांकडें पुढें झालेलें तेथें संकटच ह्या जीवबुद्धीनें घेतलेलें; लाजच जशी वाहावी असें ते त्यांना मोठ्यानें विचारणें हें काय कांहीं जमेल असें त्याला मुळीच वाटेना. आणि म्हणून तो मनांत म्हणू लागला कीं, हें जें विश्वरूपाचें विश्वाएवढेपणानें देवाचें असणें, तें एक गूढच जसें; तें कसें मी पुसूं बरें? पुसूं किंवा नको, बरें पुसावें जर तर तें कसें पुसावें? हें एक ह्या जीवबुद्धीस सांकडेंच पडलेलें, असा तो अर्जुन होऊन असलेला. अशी ह्या माझ्या जीवभावगोडीची आवड, पण तिजबद्दल (विचारणें) सांगणें ते देवांना एक संकटच वाटलें. कारण अहो परम गूढ असें देवाचें तें त्यांना कसें बरें विचारावें! (३०)

तो म्हणू लागला कीं, यापूर्वीं कोणी कांहीं तसें तें रूप पुसण्याचें, विचारण्याचें केलेलेंच मुळीं नाहीं. तें शेजारधर्मामुळेंच म्हणा–येथे शेजारधर्म हा जसा, चित्तच एक धर्म त्या त्या पढविणाऱ्याचा झालेला जेथे तो पढविणारा हा क्रिया करून त्या पढविल्या जाणाऱ्याकडून बोलवून घेणारा असा असल्यानें तेथे मी त्यांना एकदम असें तें रूप दाखवा–तें रूप सांगा म्हणण्याचें साहस तरी कसें करूं? [पार्थ मनांत म्हणतो कीं, पूर्वीं कोणत्याही देवाच्या आवडत्या भक्तानें असें विचारलेलें नाहीं. असे ते (रूप दाखवा म्हणून) कसें बरें एकदम सांगा म्हणावें?] (३१)

मी जरी पुष्कळशा सलगीचा जवळचा असा, जरी सलगीपणानें एका चांगुलपणास आलेला असा, जरी तरी काय मी त्या आईसीहूनहि–निळिमाहूनहि प्राण हा तें अंतरंग जाणणारा नव्हेच, मग आथि आथिहि, मग 'साशे' (सहाशें) आथि आथि, 'सा' असे आई ही पाहा तिजपेक्षांहीं आईसीचें अंतरंग हें सर्व अंतरंगाचें असें जरी तरीसुद्धां ती ह्या प्रसंगाबाबत विचारूं शकली नाहीं. व मी म्हणजे तुमच्या सलगीचाच एक जो तो येथें त्या आईसीपेक्षांही महत्व घेऊन असणारा असा नव्हेच असें केव्हांही मला वाटतें. (जरी सोबतीच्या चांगल्या स्नेहांतला असा मी अगदीं भला, तरी काय आईसीपेक्षां देवी लक्ष्मीपेक्षां अंतरंगाच्या जिवलगपणाचा नव्हे! पण तीही (आईसी) ह्या प्रसंगासंबंधीं–विश्वरूपासंबंधीं विचारण्यास भ्यायलीच ना! (३२)

मी सेवा केली ती त्या देवांना आवडलीही; पण मोठ्या आवडीनें, प्रेमानें केलेली ती सेवा जरी आवडीची, प्रेमाची अशी, तरी त्या सेवेचा त्या गरूडाच्या सेवेपुढें कांहीं पाडच मुळीं लागणारा नाहीं. व अशी ती सेवा माझ्या केलेल्या सेवेपेक्षांही अतीशय अशी, त्यांची–त्यानें केलेली ती सेवा जरी, तरी त्यानेंही पण ह्या गोष्टीबद्दल विचारण्याचें धाडस केलें नाहीं! त्यानें त्या विश्वरूपासंबंधीची गोष्टच मुळीं विचारली नाहीं. (माझी जरी वरीलप्रमाणें देवसेवा झाली, मी देवाची आवडती अशी सर्व सेवा जरी केली तरी ती काय गरूडानें केलेल्या सेवेइतकी कशी बरें होणार! तेथें गरूडही पण त्या रूपासंबंधीची गोष्ट करण्यास धजला नाहीं. मग मी ती गोष्ट देवाजवळ कशी काढूं!) (३३)

अहो! काय मी सनकसनंदनादि मुनिजनापेक्षांहि जवळचा असा, ह्या भगवंतास होऊन आहे? ते तर मजपेक्षांहि अगदी निकटचे असे होऊन असलेले. परंतु त्यांनींसुद्धां एक चकारशब्दही ह्या गोष्टीबाबत काढलेला नाहीं. त्यांनींसुद्धां ही विचारण्याची गोष्ट केलेली नाहीं, किंवा ह्या वैखरीचा चाळा केला नाहीं. त्यांनीं ह्या प्रभूस त्या पहिल्या गोष्टीबद्दल स्पष्टपणें–उघडपणें विचारलें नाहीं. चाळाच एक जणुं जें

वाचेच्या आटोक्यांत येणारें नव्हे, तें नागवलेलें असें, नच सांपडणारें असें असल्यानें, त्याबाबत त्यांनीं विचारण्यापुसण्याचें केलेंच नाहीं. अहो! काय ह्या गोकुळींच्या गौळीयाचें, गोपिकांचें ह्या प्रभूबद्दल प्रेम अहो! ते तर अति प्रेमळ असेच असलेले. व त्यांनीं तर आपल्या प्रेमानें त्या देवास आवडून घेतलेलें, देवाचे आवडते असे ते गोकुळींचे जन; आवडेन काय त्या गोकुळींच्या जनासारखा? अशी अर्जुन देवास–श्रीकृष्णास आपल्या जीवाभावाच्या आंतली गोष्ट सांगावी म्हणून एक त्यांनां सांकडें घालीत आहे, व तो आपली ह्या प्रेमाबाबत देवाच्या इतर प्रेमळ भक्तांशीं तुलना करीत आहे. (काय सनकादिकाहूनही देवाच्या हृदयींचा जवळचा–पण त्यांनाही हा लळा रूपासंबंधीं सांपडला नाहीं! अहो, काय गोकुळींच्या प्रेमळ जनांची देवरूपासंबंधीं प्रेमळपणाची ख्याति तसा मी काय देवांना प्रिय का आवडणारा असा कसा आवडेन हो?) (३४)

तेथें त्या गोकुळामध्यें तर नंदनंदन गोपाल बाळ हा एक बालक जसा त्यांना दिसत असलेला –बालरूपाचा असा त्यांना दिसत असलेला; तेथें जणुं एक स्वतःचें महत्व हेंच ज्यानें त्यानें पुढें घेऊन असणें असल्यानें तेथें त्या बालकरूपी श्रीकृष्णास ह्या पहिल्या गोष्टीबद्दल आम्हींच जणुं तेथीलचे सर्व जाणतेपण घेऊन असलेले. ते आतां ह्या बालरूपी श्रीकृष्णास तें काय विचारावयाचें! तें बालक त्याबाबत काय जाणत असणार? कां काय सांगणार तें? असें एक त्या भगवंतांनीं त्यांना ह्या वरीलच्या उक्तींत पाहूं दिल्यानें, झकविणेंच केले त्यांना, जशी एक लेकुरवाळी माता तिनें आपल्या पोटींच पाहिलेलें असें तें प्रेमच एक कुरवाळलेलें असें झाल्यानें तेथें त्याच्या जवळच राहात असलेलें जें प्रेम तेथें एक लेकुरवाळी जशी माता सर्वथैव स्नेहाची अशी असलेली व तिचें तें प्रेमदर्शनानें असणें–प्रेमच केव्हांहीं वागविलें जाणारें असें असल्यानें तेथें प्रेमास उणेपण केव्हांही झालें नाहीं; व एक निरतिशय आनंदाचें असें तें एक लेकरूपणाचें तें देवपण हें केव्हांही तेथें महत्वास येऊं नच दिल्यानें त्यांनाही पण ह्या पहिल्या गोष्टीबद्दल मुळीं बोलणेंच केलें नाहीं. त्यांनीं तें विचारून घ्यावें की नाहीं? कीं तें विश्वरूप ते कसें किंवा केवढें ते. अहो, त्या अंबऋषीचे गर्भवासही ह्या प्रभुनें सोसले–कीं तुम्ही एक परम दैवत असें आहांत ते तरी कसें बरें आम्हां प्राकृत जनांच्या नजरेंत उतरेल, की ती जी भूलक्ष्मी ही जणूं कांहीं एक सांभाळ देणारी अशी–तेथें तुम्हीच देवा जर हे गर्भवासाचें सोसणें तरच तेथें ती जी माता हीच आपलेपणास आली, असें आम्हांस दिसूं लागून काय तेथें मग संपन्नता ही जशी प्रकृतीनेंच आपलें वैभव घेऊन येणें केलेलें होईल; हें सुद्धां हे भगवन्, तुम्हीं केलें. परंतु त्या विश्वरूपाबाबत मुळीं बोलणेंच केले नाहीं–होऊं दिलें नाहीं. तेथें तें रूप कुणासही दाखविलें नाहीं तें तसेंच राहून गेलें. (अहो लेंकरूंच एक ते काय त्या रूपास येईल असें वाटल्यामुळें तेथें गोकुळींचें प्रेमळ तेंही पण झकविलें गेलेच. अंबऋषीचे गर्भवासही सोसले पण विश्वरूप दर्शन देण्याचें तें राखून ठेविले कीं; ते कुणासही तो भगवान दाखवीच ना कीं!) (३५)

असें त्या अर्जुनाचें विचारणें हें एक जणुं कांहीं त्या विश्वरूपाबद्दलचें गूजच एक व तेथीलचा रहस्य-ठावच जणुं त्यानें पाहिला व्हावा, व हेंच तर त्या श्रीगोपालकृष्णाच्या अंतरीचें एक निजांगाचें असें असणें ते काय कसें बरें एकदम सहजच एकाएकींच कीं पुसावें तें? काय तें सहजच असें मजकडून त्या देवास विचारण्यानें होईल तरी कसें? अहो! लगबगतेनेंच जसें का मी तें पुसण्याचें करीत आहें: असें माझ्या मनास वाटत असल्यानें तेथें मजला तर तें कसें पुसावें? त्याबद्दल गोष्ट तरी कशी करावी, असें होऊन गेलें आहे: अद्यापपर्यंत, आजपर्यंत हें एक गूजच ह्याचें स्वतःचें असें, ह्याच्या अंतराचें, आत्मबीजाच्या नव्हाळीचा गूढपणानें असलेला असा देवच, परमात्माच–माउलीच!! येथें मजला अति निकडच लागली आहे कीं त्याच्या अंतरीचें मी व्हावें, त्याच्या हृदयींचें मी असावें. मी जर अहंभावानें तें विचारीन तर देवाला ते केव्हांही आवडणार नाहीं. कारण तो मूर्तिमंत प्रेमच असल्यानें तेथें (लगबगीनें उराउरी पुसणें म्हणजे नडणें होय. तें देवास आवडणार नाहीं.

अर्जुन म्हणतो ह्या प्रसंगापर्यंत भगवंतांच्या निज--आत्म-मनींचें अंतरीचें गुज तें गूढ लौकर उकलून दाखवा, म्हणून मी कसें बरें म्हणूं? (३६)

अहो! जसें कांहीं उपायच नाहीं ह्या जीविताचें होण्यास, तेथें उभें राहाण्यास उपाय पाय घेतील असे उपाय कांहीं सापडतच नाहीं. असें तें जीवित-जिणें-जगणें त्या स्वरूपदर्शनाशिवाय हें जगणें तें कसलें? तें 'जगणें' ह्या सदराखालीं येतच नाहीं.

म्हणून आतां विश्वरूपाबाबत त्यांनां मी असें म्हणणें करीन कीं, तें मी विचारलें नाहीं तर भगवंताचें पुसोनि पुसावें देखावें ह्या भगवंताचें रूप तें तेथें तें रूप देखिल्याशिवाय-विश्वरूप पाहिल्याशिवाय मला तर चैन म्हणून पडणार नाहीं सुख वाटणार नाहीं.

मी तें स्वरूप दाखवा म्हणून विचारूं पुसूं नये असें व्हावें तर अहो! विश्वरूप दर्शनाशिवाय सर्वपणें, स्थूल देहाभिमानी जीव, जग, देह, तेथच्या विष्णुरूपाशिवाय-का अनेक रूपांचेंही जें एक रूप त्या दर्शनाशिवाय मला आराम, स्वस्थता का सुख स्वास्थ्य आनंद भेटणार नाहीं. व असें जर तर मग अहो, मग जगून तरी काय करावयाचें? जगून तरी काय उपयोग? अहो, तेथें तर हा पार्थ कदाचितच जिवंत राहील!!! (३७)

कांहीं एकादें मोडकेंसें वचन बोलावेंच त्या स्वरूपदर्शनासंबंधीं म्हणून आतां लहान असें होऊन मी तें विचारावें-मी तें दर्शन मागावें. व मग त्यावर देवाच्या इच्छेला येईल तें ते करोत असें त्यांच्या मनानें साहस करून धैर्य धरून पार्थ बोलण्यास प्रवृत्त झाला. अहो देवा! मजला ह्या तुमच्या रूपाबाबत कांहीं तरी सांगावे! ते रूप मजला दाखवावें, कारण त्यायोगें माझें हितच होणारें असल्यानें तेथें माझें असें अगदींच की अल्पसें. असें तें मागणें काय महत्वाचें असे नव्हेच व यावरच देव ते पावणारे होतीलच असें आहेः परंतु त्याच्या बुद्धीनें असें न घेतां उगवावें हितच एक असें घेतलें. त्यानें त्याबद्दल थोडेंसें का होईना, तरी पण बोलणें करावेंच करावें असें उद्देशून तो पार्थ सहजपणेंच आतां बोलणें करूं लागला. तेथें अहो, माझें लहानपणच पुढें येऊन असावें असेंच त्याचे मनानें घेतलें व मग तें देवांना जसें रुचेल तसें देवपणच एक तें देवाप्रत येऊन तेथें तें देवपण स्थिर झालें, असें करावें व मगच त्यांचें तें दर्शन देणें तें ते देव आपल्या मर्जीवर ठेवोत की! असा एक हिताचा उद्देश त्यानें पुढें केला. व भीतभीत पार्थ बोलणें करूं लागला, आदरानें बोलूं लागला कीं,-तर खरें व करावें. पार्थाने जीवीं धैर्य धरून आपली कंबर बांधली व विचारणेस सुरवात केली की. (३८)

पार्थाचें तें प्रवर्तणें भाव भक्ति, प्रीति व आदरानें-हात जोडून जसें विनंति करणें, तेथें एखाद्या दुसऱ्या प्रश्नास उत्तरें देतांदेताच मुळीं सर्वच्या सर्व विश्वरूप हें जसें कांहीं झाडा देऊन वर आलें. दाखविण्याचें केलें, मजकडून पाहविलें असें व्हावें. ह्या विश्वरूपाचें महिमान पदोपदीं-प्रश्न व त्याचे उत्तर-येथे जणुं त्या रूपाचे सर्वच्यासर्व होणें हें आपला झाडाच देत आहे. स्वरूपसंबंधींचा-सर्वच्या सर्व रूप हें अर्जुनाच्या आंतच येऊन तेथें आतां भाव हाच आपल्या मार्मिकतेच्या रहस्याचा झाला. तेथें देवांनीं माझें संचित क्रियमाण प्रारब्ध हेंच मुळीं देहधारणेवर उभें राहाणारें तेथें तें कारणच ह्या जन्माचें जें, त्यांनीं नाहींसे करून ह्या संचितावरही शून्य घालून मजला कांहीं एक देवलक्षणच येऊं दिल्यानें तेथें आतां ती प्रकृति हीच जशी का लय पावली व आतां सर्व देवपणच उरलें तेथें पुरुषरूप सर्व विश्वरूपच एक विश्वरूपावर उभें झालें असे कां न व्हावें?

पण विचारणें तें असें व्हावें कीं एखादा दुसऱ्या प्रश्नावरचमुळीं त्यांनीं सर्वच्या सर्व, इत्थंभूत असें तें विश्वरूप दाखविण्याचें करावें असेंच तें प्रश्नाचें अद्‌भुतपण असावें; असा भाव मनीं धरून तो म्हणू लागला की,

अहो कृपावंता देवा! वत्सास पाहून धेनु खडबडून उठली, तेथें वत्साच्या मुखीं लागलेले स्तन तेथीलचा पान्हा तिजला चोरवेल काय?

अहो! वासरूं पाहिल्याबरोबर गाय ही खडबडून उभी होते. तेथें मग स्तनास मुख हें भेटलें की, आयता पान्हा हा ठेविलाच आहे! तिला का तेथें पान्हा यावा म्हणून अगोदर विचार करावा लागतो काय? अहो! तेथें या कायेमधील अणुरेणूही प्रेम पान्ह्यानें पान्हावले असें असावयाचेच! तेथें पान्हा हा फुटणारच केव्हांहि! तो पान्हा तिच्यानें चोरवणार नाहींच की! (४०)

पहा! पहा!! अहो! काय ह्या श्रीकृष्णाची कृपा म्हणावी कीं! अहो! कृपाळुपणच तें, ते तर ह्या पांडवाकरितां रानावनामध्यें जाऊनही त्यांच्या राहाणीचा प्रतिपाळ करूं जाणणारे असे! अहो! पांडव हे रानांत आहेत असें समजल्याबरोबर भक्त करुणाकर ते अथवा जसें कांहीं पांडवांनीं त्याला सहृदयतेनें आळविणेंच केलेलें: ते एका भक्तीनेंच आकळिलेले, असे ते श्रीकृष्ण त्यांनीं काय ते पांडव रानांत होते म्हणून त्यांचा अव्हेर केला? नाहीं, तेथें तर त्यांनी पांडवांचें तें करुणार्द्र चित्तानें हांक मारणें हें ऐकिलेंच व तेथें त्यांच्या जवळ ते पोहोंचलेच! धांवलेच! संकट निवारणार्थ ते धावत आलेच! इतका ह्या पांडवाबद्दलचा त्या श्रीभगवंताला लळा. तसा तो लळा! व येथें आतां अर्जुनानें ह्या प्रथमच्या गोष्टीबद्दल त्यांना प्रश्न विचारला तर काय अहो! श्रीकृष्ण त्या गोष्टींतील मर्म सांगितल्यावांचून राहातील? अहो! भक्ति ही कांहीं वैखरीच्या मापानें पाहाविली जाणारी नव्हे!

तेथें जसे का देवानें एक मधुरसें हास्यच करणें होऊन असेल! कारण स्वरूप प्रेम हे तर अनिर्वचनीयतेनें उगवणारें असेच असून तेथें बोलणें, साहाणें, होतच नाहीं. अहो तेथें बोलण्याचें तर कारणच नाही. कारण प्रम तें न बोलून बोलणारें असें व आतां येथें जर ईश्वरस्वरूपी प्रेमच मुळीं पुढें झाले तर मग कसच्या न् काय हें माझें बोलणें साहाण्या का न साहाण्याबद्दलच्या गोष्टी त्या!!! जेथें विकारच नाहीं तेथे साहाणें ते कशाचें? जेथें प्रेमच एक तेथें पहिली गोष्ट प्रेमाचीच असणार केव्हांही! तेथें दोघांचें मिळून एका प्रेमाचें होणें झालेले तेथे सहज सगुण हे काय विकाराचे असे? मग साहाणें का न सहाणें ही गोष्टच ती कसची ती मुळीं नाहीं.

पांडवाच्या सांभाळण्यासाठीं श्रीकृष्ण हे कळवळून जाऊन रानावनामध्येंही धांवून येऊन त्याना सांभाळतात त्यास अर्जुनानें विचारलें असतां काय भावाचा भुकेला भगवान तो गप्प राहिल? तो भगवान त्याचें विचारणें पुसणें हे केव्हांही पुरतें करणारच! (४१)

तो भगवान कसा आहे म्हणाल तर, स्नेहच एक, प्रमाचा ओलावा असा ह्या पृथ्वीतलावर निर्माण झालेला एक मूर्तिमंत स्नेहच! प्रेमच! जसें कांहीं ह्या जीवदशेची जीवदशेशीं मैत्रीच. आत्म्यानें आत्म्यासच भूषित केलें असें एक लाघवच असून मैत्रीनें परम सीमा पाहिली, सर्व मैत्रीच एक ह्या दिव्यरूपानें ह्या भूतलावर अवतीर्ण झाली असा ज्यायोगें ती मैत्री ही आपली सर्व कुशलता उपयोगास आणील असेंच एक प्रकारचें माजवण केलेलें तेथें देवतांनीं देवतेचें आपलें अंग उजविलें गेलें. नाविन्यास आलें. तेथें सृष्टीच सर्व ह्या स्नेहाखातर दिली असें एक मैत्रीमध्यें दिवाळसणच का दिवाळीच जशी सर्व उत्सवाची अशी ती अवर्णनीय आतां असें लोकोत्तरतेचें एक मिळणीचें तें रूप सर्व भगवान हाच. तेथें दिव्य नेत्राचा व आतां त्या अर्जुनास वेगळेपणच मुळीं नाहीं असें असूनही पण तो वेगळेपणानें उरत आहे, हेंच एक नवलाचें बहुपण अथवा थोरपणच–विशेषत्व तें येथेंच महत्वाचें असें आश्चर्यकारक होऊन आहे. बहु म्हणजे एक श्रीमान् असाच त्या दैवी संपत्तीनें दिलेला, त्या अर्जुनास आशिर्वादच होय!!!

तो भगवान कसा आहे म्हणाल, तर सहज प्रेमाची मूर्तीच होय व अर्जुन तर त्या प्रेमस्नेहाचें अतिशयपणाच एक असा होऊन आहे. अर्जुनासंबंधींच्या त्या मिळणीवर स्नेहाचा देवास कैफच चढला. येथें कृष्णार्जुनाचे ऐक्यावरही वेगळेपण उरतें हेंच की एक आश्चर्यच अहो! (४२)

आणि म्हणूनच तर अर्जुनानें विचारण्याचा अवकाश कीं, देव त्याच्या म्हणण्याप्रमाणें स्वरूप घेतील–प्रकटीभाव—असा एक सहज योगच हा देव श्रीकृष्ण अर्जुनास विश्वरूप असाच दिसूं लागणारा होईल. तरी आतां तोच येथें पहिला प्रसंग तोच येथें तो कसा? न् काय? ते आतां सांगण्याचें करतों. ऐकावें लक्ष देऊन असावें!!! [(भोंवरि सांडोनि पाय ठेवी रे गोपाळा! अभंग. ज्ञा. गा.)

आणि म्हणून अर्जुनानें विचारण्याचा अवकाश कीं लगेच देव आपोआपच विश्वरूप दाखविणारे होतील–तो प्रसंग कसा आहे तें ऐकावें कीं, अहो!! (४३)

**श्लोक १ ला:—**

अर्जुन उवाच :—

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

मत् अनुग्रहाय=मजवर अनुग्रह करण्यासाठीं अध्यात्म संज्ञितम् परमं गुह्यम्=स्वभाव संमतीचें संज्ञ असें श्रेष्ठ गुज. यत् वचः त्वया उक्तम्=जें तुम्हीं बोलिलें–भाषण, आज्ञा उपदेशपर ते. (अयं वचः उक्तं अयं मोहः विगतः हा बोल येथें तो मोह विगत झाला.) तेन अयं मम मोहः विगतः=त्यायोगें माझा प्रमाद, मोह, अज्ञान निस्तेज होऊन आहे, नष्ट होऊन आहे. निघून जाण्याच्या तयारींत आहे, निघून जात आहे.

अन्वय—अर्जुन उवाच—(यत् वचः त्वया उक्तम् । वचः वाणी वाच्यीकृता । सएष अनुग्रहः ।) यत् त्वया मत् अनुग्रहाय अध्यात्म संज्ञितम् परमं गुह्यं वचः उक्तम् तेन अयं मम मोहः विगतः ।

अर्थ :—अर्जुन म्हणाला, हे भगवन्! जे आपण मजवर अनुग्रह कृपा करण्यासाठीं स्वभावरूपी अध्यात्म नांवाचें जें परम गुज श्रेष्ठ बोलिलांत, त्यायोगेंकरून मजमधील (प्रमाद, अज्ञान) मोह नाहींसा झाला आहे; मोह मजमधून वेगळा केला जात आहे, निघून गेला. नष्ट होत आहे. (मोह तो अंधुक होऊन आहे, निस्तेज होऊन आहे. वियोगाचा होत आहे. (श्लोक १ ला ओव्या ४४–६८)

(अर्जुन उवाच)—

**मग पार्थ देवातें म्हणे । जे तुम्हि मजकारणे ।**
**(मज) वाच्य केले ते बोलणे । कृपानिधि ॥ ४४ ॥**
**(परमं)–जै महाभूते ब्रह्मि आथि । जीव महदादीचे ठाय फिटती ।**
**तै जे होऊनि देव ठाकती । ते विसंबणे शेषिचे ॥ ४५ ॥**
**(गुह्यम)–हाते हृदयाच्या परि वरि । सेविले कृपणाचिये परि ।**
**शब्द–ब्रह्मासिहि चोरी । जयाची केली ॥ ४६ ॥**
**(अध्यात्म संज्ञित)–ते तुम्हि आजि आपुले । मग पुढाहिये फेडिले ।**
**जे अध्यात्म चोखाळिले । ऐश्वर्य हरे ॥ ४७ ॥**
**(यत्वयोऽक्तंवचस्तेन)–ते वस्तु मज स्वामी । येकिहेळा दिधली तुम्हि ।**
**हे बोलो तरि आम्हि । तुजपासौनि भिन्न कैचे? ॥ ४८ ॥**

(मोहोऽयं विगतो मम)-परि सांकचि महामोहाच्या पुरि। बुडालिया देखोनि शिसवरि।
तुवां आपणपे घालूनि श्रीहरि। मग काढिले माते॥ ४९॥
एक तूं घांचुनि कहि। विश्वि दुजयाची भाष नाहीं।
कि आमुचे कर्म पाहि। जे आम्हि आथि म्हणो॥ ५०॥
मि जगि येकु अर्जुनु। ऐसा देहि राहे अभिमानु।
आणि कौरवाते या स्वजनु। आपुले म्हणे॥ ५१॥
याहि वरि मि ययाते मारिन। म्हणे तेणे पापे के रिघेन।
ऐसे देखत होतो दुःस्वप्न। तो चेववला प्रभु॥ ५२॥
देवा गंधर्व नगरीची वस्ती। सांडुनि निघालो लक्ष्मीपति।
होतो उदकाचिये आति। रोहिणी पीतु॥ ५३॥
जी करडु तरि कापसाचे। परि लहरिया चेत होती सांचे।
ऐसे वाया मरतया जीविताचे। श्रेय तुवा घेतले॥ ५४॥
आपुले प्रतिबिंब नेणता। सिंह कुहा घालिल देखोनि आतां।
ऐसा धरिजे तेवि श्रीअनंता। राखिले माते॥ ५५॥
येऱ्हवि माझा तरि येतुला वरि। जे निश्चय होता अवधारि।
जे आताचि साताहि सागरि। येकत्र मिळिजे॥ ५६॥
हे युगचि आघवे बुडावे। वरि आकाशहि तुटोनि पडावे।
परि जुंझणे न घडावे। गोत्रजेसी मज॥ ५७॥
ऐसिया अहंकाराचिया वाढि: म्या आग्रह जळि दिधलि होती बुडी।
चांग तुं जवळा येऱ्हवि काढी। कवण मातें॥ ५८॥
नाथिले आपणपे येक मानिले। आजि नव्हतया नाम गोत्र ठेविले।
थोर पिसे होते लागले। परि राखिले तुम्हि॥ ५९॥
मागा जळत काढिले जोहरी। तै ते देहासिच भय अवधारि।
आतां हे जोहर बाहर दुसरि। चैतन्या सकट॥ ६०॥
दुराग्रहें हिरण्याक्षे। माझी बुध्दि वसुंधरा सुदलि काखे।
मग मोहार्णवि गवाक्षे। रिघोनि ठेला॥ ६१॥
तेथ तुझेनि गोसावीपणें। येकवेळ बुध्दिचे या ठाया येणे।
हे दुसरे वाराह होणें। पडिले तुज॥ ६२॥
ऐसे अपार तुझे केले। एकी वाचा मी काय बोले।
परि पांचै पालव मोकलिले। मजप्रति॥ ६३॥
हे कांहीं न वचेचि वाया। भले येश फावले देवराया।
जे साद्यंत माया। निरसिली माझी॥ ६४॥
आजि आनंद सरोवरीची कमळे। तैसे जी हे तुझे डोळे।
आपुलिया प्रसादाची राउळे। जया अंगिकारिती॥ ६५॥
हा हो तयासीही आणि मोहाची भेटी। हे कायसी पाबाळि गोष्टि।
केउती मृगजळाची वृष्टि। वडवानळेसी॥ ६६॥
आणि मी तंव दातारा। ये कृपेचिये रिघोनि गाभारा।
घेत आहे चारा। ब्रह्म रसाचा॥ ६७॥

**तेणे माझा मोहो जाये । येथ विस्मय काहि काय आहे ।**
**परि उद्धरलो कीं तुझे पाये । शिवंतले आहाती ॥ ६८ ॥**

जे–जी. वाच्य केले=न बोलणें बोललांत. ते–ते जे न बोलणें, तें बोलणेंः कृपानिधि–कृपानिधे. (४४). आथि–आटती. (आथि सा–आटणी सा–सांठवणी). जीव महदादिचे ठाय फिटती=जीव आणि माया लय पावतात. ठाय–ठाया ठाव, खोली. फिटती–स्पष्टतेस येतात. उघडपणें दिसूं लागतात. विसंबणें=वासनाचमुळीं अमरपणानें आहेत असे ते संस्कार. (४५) हाते–होते. रोविले–ठेविले. शब्द ब्रह्म=वेद. (४६). मग (मज) पुढा हिये फेडिले=मज पुढें तुम्हीं आपले हृदय उकललें. हृदयीचें गुज उकलून दाखविले. गुह्य स्पष्ट केलें. जे–जया. अध्यातम–अध्यात्मा. चोखाळिले–ओवाळिले. ऐश्वर्य हरे=अध्यात्माचें ऐश्वर्य श्रीहरांनीं वरचेवर अनुभव घेऊन चोखाळिलें, शुद्ध केलें आहे. शेवटिलें आहे. योग्य केलें आहे. ज्यासाठी शंकरांनीं ऐश्वर्याचा त्याग करून वैराग्य घेतलें–स्मशानीं वास केला. (४७). येकिहेळा=एकदम. (४८) मोहाचा–मोहाचिया. शिसवरि–सीसवरी=मस्तकापर्यंत. (४९). तु–तुम्हां. आम्हि आथि म्हणो= महत् ब्रह्म व भूतें यांची सांठवण. आथि=सांठवणी (५०). मि–मी. राहे–वाहे. या–इया. म्हणे–म्हणो ? (५१). मि–मी. रिघेन–रिगेन. (५२). सांडुनि–सोडुनि. रोहिणी पीतु होतो=पाण्याच्या इच्छेनें मृगजळ पीत होतों. (५३). करडु–किरडुं (साप किंवा सर्प) किरडूं. चेत्–चेतः चेतस्=सजीवता मन ज्ञान. होती–हेही तया. जीविताचे–जीवाचे. (५४). कुहा–कुवा=विहीरींत. (५५). माझा तरि येतुला वरि–येतुले माझारि वरि. (५६). युगचि–जगचि. (५७). म्या–मिया. चांग–चांगचि. (५८). आपणपे–आपणपां. येक–एक तूं ? (५९). गवाक्षे=बीळ. (६१). वाराह–वराह. (६२). पांचें–पांचहि. (६३). येश–यश. (६४). जी–जे. जया अंगिकारिती–जयालागीं करिती. (६५). तयासिही–तयाही (६६). विस्मय–विस्मयो–विस्मो. काय–काई. परी–तरि. माझा जी मोहो जाये=महाराज माझी भ्रांती जाईल. (६८).

मग पार्थ देव श्रीकृष्णाना म्हणूं लागला कीं अहो ! हे कृपावंता, जे न बोलावें असें बोलणें तें तुम्हीं आज मजकरितां बोलिलांत. हे कृपानिधे ! जें वाच्य असें नच होणारें ! तेथें चित्तच एक ते प्रेम होऊन तुम्हीं आलांत व मजकरितां प्रेमानें आपण होऊन बोलणें बोलिलांत ही आपली परम कृपा होय. हा बोल हा अनुग्रह, ही वाणी वाच्यीकृत अशी केली. त्यामुळें आतां मोह (अज्ञान प्रमाद) तो नाहींसा झाला. थबकला, थांबला, थक्क झाला आहे. परिणाम करिनासा झाला. (४४)

ह्या महत्तत्वाचे जे देह ह्या मायेनें सर्वस्वी आपलेच असे केलेले तेथें महत् ब्रह्म हेंच जे जगज्जननीचें रूप जेथें गुणमयी का माया ही ईश्वराची अविद्या वागत असलेली. तेथें आतां ह्या प्रकृतीनेंही पण ठावच पाहिला. आपला अनेक तऱ्हांचा भार घेऊन ह्या ब्रह्मामध्यें ती गुणमयी भूतांसहित लीन झाली. तेव्हां आतां येथें ह्या देहाचा निभाव तो कोठें कसा लागणार ? तेथें एक सर्व नक्षत्रभार हा लय पावला. व सर्व मुक्ति म्हणून ज्या आहेत, त्यांनाही पण येथें आपआपल्या जागेंत स्थिर होतां आलें. असें ते ह्या गोजऱ्या स्वरूपाचें जें गुणनिधान म्हटलेलें तें काय ? परंतु पुराणें हीच महत्व घेऊन असलेलीं दिसतात, होतात. हीं महाभूतें जेव्हां ब्रह्मामध्यें लय पावतात–आटतात –आथि आथि असें त्यांचें एक असतेपणच घेऊन चालत असलेले तेथें जीव जीव म्हणून म्हटलेला जो, तो म्हणजे ह्या माता सरस्वतीनें अगर मूळ मायेनें म्हणा, परंतु ही माझी माया असें ईश्वर सत्तेचें सूत्र तें गुण-मयीनें आपलेसें करून तेथें एकच एक मुळीं सर्व शक्तीच वागत असलेली. तेथें जीवदशेची धांव पुरलेली महत्तत्वामध्यें असणारें जें किंवा महत् मायारूपी जे त्रिगुण साम्य तेथें ह्या भूतांनाच आपलेंसें करून वागविणारी ही परा प्रकृति तिचे सर्व सोस पुरविले गेले. परंतु येथें त्या देवानें जें असणें तें अव्यक्तामध्येंच

असतें. तेथें ह्या गुणमयीच्याहि पलिकडे जे अव्यक्त विष्णुतत्व तेथेंच ते देव तेंच होऊन असतात. येथें ह्या जीवदशेची कहाणी म्हणजे काय कथा म्हणावी? का पोथी म्हणावी? जेथें ह्या भगवानानें आपली आणच वाहून सायंततेचें बोलणें केलें, जेव्हां का पंचमहाभूतें-भूतमात्र ब्रह्मीं लय पावतात, जीव व महत्तत्व आदि जी गुणमयी त्याचें महत्व (खोली, सीमा) ही एकत्र मिळून गेली होतात, त्या वेळेस देव म्हणून जे आहेत ते सर्व कांहीं होऊन असतात-राहातात, शेवटचें विसांव्याचे असे ते. (४५)

ते हृदयाच्या-अंतःकरणाच्या मंदिरामध्यें-मनाच्या गृहात रोविलेले-ठेविलेले एकाद्या कृपणाप्रमाणें व शब्द ब्रह्म जे वेद त्यांनाही पण समजलें नाहीं. असें तें गुज-गूढ आपल्या हृदयमंदिरांत आपण कृपणाप्रमाणें लपवून ठेविल्यामुळें समजलें नाहीं.

येथें शब्द ब्रह्माला देवपण तें चोरून म्हणजे नकळत दिलें गेलें; व तेथें कृपणपण का कृपापण हेंच मुळीं तें कसें वागविलें जाईल? हें नच पदरांत पडणारें असल्यानें ह्या अंतःकरणाची जी विष्णुदेवता तिच्याच आधारानें सुद्धां तेथील महत्व न सांपडणारें असें असल्यानें ते उगीच इकडे तिकडे टाकण्यानें आपला जो अंतःकरणीचा भाव त्याचा हातच मुळीं सवडी सवडी प्रमाणें किंवा प्रमाणा प्रमाणेंच वागविला जात असल्यानें, तेथें कृपण असेंच म्हटलें गेलें; कारण तेथें धर्म धारणा ही आपल्या परिवारास येणारी किंवा कशी येणारी किंवा कधी कधीं तशी ती आणली जाणारी अशी असल्यानें तें अव्यक्त विष्णु अक्षर तत्व हें जपूनच जसें चालत असल्यानें वेदांनासुद्धां तें नीटसें समजावून दिले नाहीं. त्यांना तरी यथाधर्म वर्म व अव्यक्त हे वेदांनाही पण सांपडलें नाहीं. तें तत्व त्यांच्यापासून दूर राहिलें. जें तत्व हृदयींचा परिवार त्याच्याचमध्यें रोंवून असलेलें होतें ते वेदांच्या पदरांत बेताबेतानेंच पडणारें झालें. (४६)

तें हे प्रभु! तुम्हीं आजच्या प्रसंगीं मजपुढें उकलून दाखविलें. अहो! काय ह्या अध्यात्माची महति वर्णावी! जेथें भगवान श्रीशंकर त्यांनीं तर, आपलें सर्वच्या सर्व ऐश्वर्यच ह्याजवरून ओवाळून टाकिलें. अहो! श्रीशंकर-महादेवाजवळ जे मूर्तिमंत योगच तेथें योग का योगसाधन कमी नाहींच, परंतु त्यानांही पण आपलें ऐश्वर्य चोखाळ-उजळ असें व्हावें म्हणून तेथीलची जी कांहीं कीर-कीड ती वरचेवर ह्या तपामध्येंच परतविणारी अशी, तीं आतां त्यांनीं स्वप्नावस्थेमध्यें वास्तव्य करून वैराग्यावरच भिस्त ठेविली, तेथेंच सर्व भार ओतला. ह्या जीवदशेनें जें जगणें का का श्वसणें हें फोडफोडून स्पष्टतेप्रत आणून, त्यांतील विरक्तीवरच-वैराग्यावरच मुळीं भिस्त टाकणारी अशी ही दशा. ह्या तापामुळें फुटणेंच एक ते फुटफुटून गेलेलें-ह्या अध्यात्मानें आपल्या ठावाचें होण्यासाठीं व येथेंच ह्या अध्यात्माची परम सीमा पाहिली गेली. असें तें काय सहजतेनें प्राप्त होणारें? अहो, ही काया तर पार करपून गेली-ह्या कायेला पोषणच येईना. उलट जें कांहीं प्रमाण,-पाण्याचें म्हणा का उन्हाचें म्हणा, तें न सांपडल्यामुळें ह्या जमिनीनें जें कांहीं आंत आंतच पाय घेणें तें केल्यानें तेथें पोषण जें उत्तमतेनें होणारें, तें तर अगदीं वाळलेलें असेंच होऊन गेलें. तेथें वाढच येईना. असें ते करणारे झाल्यानें ह्या जीवदशेनें प्रार्थना केली कीं, हे भगवन्! हें करपो पण ह्या जीवदशेचें फुटणें मात्र होऊं देऊं नये. कारण तेथें दुःखाचा अनिवार मारा हा प्राण्यास केव्हांही सहन होणार नाहीं. व अशा करुणेच्या विनवणीमुळेंच कीं, त्या श्रीहरीनें ते जसें कांहीं आवरून धरिलें. ह्या वैराग्यानें का स्मशानामध्यें वास्तव्य केल्यानें, तें चोखाळलें गेलें-तापविलें गेलें, असें अध्यात्माचें महत्व हे परमदिव्यतेचें असेंच केव्हांहि! हें अध्यात्माचें ऐश्वर्य श्रीहरांनीं वरचेवर पुन्हः पुन्हः चोखाळलें आहे, शुद्ध केलें आहे. योग्य केले आहे. शेवटिलें आहे. (४७)

महदादि, महतत्व, जीव देह वागविणारी जगज्जननी जी गुणमयी माता जेथें अव्यक्तामध्येंच-अक्षरामध्येंच-राहाण्यानें त्या देवांना आपला ठावच सांपडला असें, त्या एका हातानेंच जसा सर्व कांहीं परिवार ह्या अंतःकरणाचा-हृदयींचा-माझे आपलेपणाचा-असा तो वेदांसही कळूं दिला नाहीं. तेथें अध्यात्मावरून

ह्या भगवान शंकरांनीं आपलें सर्वेच्या सर्व ऐश्वर्य ओवाळूनच टाकिलेले अशी ती वस्तु! काय अहो! तिज-विषयीं हा शब्द मुळींच पुरता न होणारा असा, परम प्रेमोल्लासाचा अद्वितीयतेचा असा, प्रेमाचा धडाच एक मजला तुम्हीं हे स्वामिन्! हे भगवन्!! एकदमच दिला आहे. जसें कां "अयं वचः उक्तः अत्र अयं मोहः विगतः" येथें हें बोलणें किंवा हे बोल हा मोह, हा बोल, इत्यादींनीं प्रत्यक्षपणें ह्या देहासच पुढें घेऊन तें दाखविलेलें तेथें हा मोह नाहींसा होण्यास वेळ लागतो काय? मुळींच लागत नाहीं. असें ते जणुं आपण ह्या देवाच्या अंगचें आहोतच अशी त्यांस खूण (गांठ-भेट) पटूनच त्यानें म्हणू केलें कीं, अहो देवा! ह्या वस्तूंमुळें आम्हीं तुमचेच केलेले आहोत, असें स्पष्ट दिसत आहे. तुमच्या आमच्यामध्यें भिन्नपणाच मुळीं नाहीं. ह्या वस्तूंचें ऐश्वर्य जें, तें कांहीं एकपणानें पाहाणें असून तेथें स्वामीच जसा एक प्रकाशमान होणारा. तेथें भिन्नपणच मुळीं नाहीं. स्वामीच्या हृदयामध्यें जो कांहीं आशय तो जर वागविला गेला तर तेथें निरा-ळेपण मुळींच नाहीं. स्वामीच्या अंतरांतील मनोभावास जाणून त्याप्रमाणें करणे हीच एक परम श्रेष्ठ अशी सेवाच होय. (४८)

अहो! देवांचिया देवा! हा जो मी ह्या मोहाच्या पुरामध्यें अगदीं गळ्या-मस्तकापर्यंत बुडालों, फसलेलों, त्या मला आपण बाहेर काढलें! अहो, ह्या मोहाची परम अशी महा कष्टाची एक भोगावस्था ती अति दुःखाची अशी तेथें मुळींच तें दैव नच सांपडणारें असें. तेथें मनुष्य हा आपल्या सर्वेच्या सर्व भारासहित बुडून गेल्यानें त्यानें हे श्रीदेवा, आपणांस आठवणें हें अहो, कसचें तें! तेथील माराच मुळीं ह्या महामोहाचा इतका दुस्तर कीं, तेथें चित्तच न उगवल्यानें हें मनच कीं इकडे तिकडे फसलेलें होणारें! तेव्हां अशा तरून जाण्यास कठीण अशा ह्या सागरामधून तुम्हीं स्वतः आंत बुडी देऊन मजला बाहेर काढिलें. आपण तो दुःखाचा भार बाजूस करून मजला त्यांतून बाहेर काढून वांचविलें कीं अहो जी! (४९)

परि देखतसे आघवें। विश्व तुवां भरलें॥-१२९/१० ह्या चराचरामध्यें देवा, तुम्हींच भरलेले आहांत. तुमच्याशिवाय दुसरी मुळीं गोष्टच येथें नाहीं. परंतु काय कर्म पाहा, जे आम्हीच की आम्ही-पणानें 'आहे' म्हणतो. (पंच पांडव-, पंचतत्व शिवात्मक) एक आपण देहाभिमानाचे होऊन आहोंत. ह्या जीवप्रेमाची आवड तीच मुळीं सर्वस्वी वाहावी अशीच गोष्ट होते. तेथें आपली आण वाहूनच सांगण्याचें करीत आहोंत कीं ह्या नरतनुचें वैभव हें प्रेमानें आश्रावें असें आहे. प्राणधारण हें एका आवडीचें जीवनच शपथेवर चालविणेचे केलेलें असें तें काय तितक्या खरेपणाच्या मजलीस कां येऊं नये असें आहे. ह्या तनुस प्रेमाचा धडा देण्यानें तेथें हा देहच मुळीं विसरला जातो. तेथें ह्या देहाचा सर्वथैव विसरच मुळीं पडतो. त्याची मुळींच आठवण होत नाहीं. असें तें प्रेमाचें सूत्र का अधिकाराचें पात्र अथवा फलाकांक्षा-इच्छा ती मुळींच नसलेली, तेथील 'भू' ही जशी कर्मफलाची नव्हे अशी व कर्म हें अकर्म म्हणजे मोकळें असें नकोचः येथें कर्म हें तर पाहिजेच पण ते (एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः कुरु कर्मैव तस्मात्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्॥ अ. ४ : १५ :) पूर्वतरैः जसें केलेलें तसें कृतम् असें कृत ह्या आज्ञेनें पाहविलेलें असावें. तें तापाचें नच करितां प्रेम हेतूचें असेंच असावें. आम्ही पंच पांडव-पंचतत्व शिवात्मक महत्वानें आहोंत. तेथें प्रियात्मक तत्वच मुळीं पाहावेंच पाहावें; म्हणून आथी म्हणों-आहे म्हणतों. (५०)

ह्या सर्व जगामध्यें एकटा मी अर्जुनच काय तो! असा देही तो देहधारीपणानें अभिमान वाहून आहे. वर कौरवांनाही ह्याच कीं अहो! ते स्वजनच की आपुलें आमचे-माणसेंच की आपली असें म्हणत आहे. येथें कर्मदेव 'आत्मया नाथा' तो कसेंही केलें तरी निस्तरण्याचें होईचना! कसेंही जरी चाललों तरी आथी-आहोंत आम्हीं असेंच आहे. याचें कारण काय, तर हा जो देही म्हणजे आत्मा आहे, तो असाच अभिमान घेऊन चालणें चालत आहे कीं ह्या जगामध्यें एक अर्जुनच काय तो अप्रतिम असा

अद्वितीय आहे. त्याच्या तोडीला उतरणारा दुसरा कोणीही नाहींच. त्याप्रमाणें ह्या अर्जुनाचें कौरवांना आपलें म्हणणें स्वजनच जसें प्राकृतिक जग-आपुलेपणानें वागविलें जाणारे असें, त्यांना कौरवांना तर तो आपले जन 'स्व-जन' (भाऊबंद=ज्ञाति), स्वाभाविक, स्व (स्वभाव) जातीय, असेंच तो म्हणत आहे. (५१)

आणि म्हणून तेथें आपुलेपण असल्यानें ह्याचे जें कांहीं ह्या कौरवांना मारीन म्हणणें व लगेचच्या लगेच आपलेपणाचा गंध हा जेव्हां पुढें होतो, तेव्हां पापच एक पुढें होऊन तें आपला प्रायश्चित्ताचा महिमा उद्गार करीत गेल्यानें अहो! असल्या ह्या पापानें काय कसली बरें मजला गति प्राप्त होईल? असें दुःखांतच रिझणें ह्या मनानें केल्यानें तेथें कांहीं का रिघणेंच मुळीं ह्या आत्म्याच्या आत्मतत्वाच्या तळाशीं होईना. म्हणजे एक तूं असें जें म्हटलेलें तेंच मुळीं आपलें सत्य किंवा सत्व हें माझें समाधान करणारें होईना. अशा अडचणींत सांपडलों आहे. असा मी व तें 'दुः' चें जें स्वभावासच एक उलटपलट देणारें-पापांतच मजला फसविणारें जें ह्या मनानें पाहाणें तेंच तुम्हीं तो मनाचा स्वभाव हा तेथें श्रमभार-परिश्रमभार-हा प्रयत्नावरच टेकविलेला असल्यानें तेथें ती जी कळकळ, कळवळा-अहो एक मरणेंच जेथें त्यास भिऊन प्रयत्नास जर ढिलेपणानें पाहिलें-पाहविलें तर तितकी आंच ही पोहोंचतच नाहीं. आणि म्हणून तर तो श्रम आंच, साहस, धैर्य-धडाडी ह्यानींच तें झांकलें गेलेलें. तें आतां आपणच आपल्या मनावर घेऊन ह्यास जागें केलें, तें हे प्रभु! आपले कृपाळूपण होय, आपली कृपादृष्टि होय. आपल्या कृपादृष्टीनें मजला तें जें दुःख (मानणें) होणारें त्यापासून सोडविलें. हे प्रभु! आपल्या दिव्य अशा कृपादृष्टीचें नवल-नवेपण जणुं काय ही सृष्टीच एक प्रेमाची करून आपलें जें एक 'तूं' वांचुनि दुजे नाहींच (त्वंपद) त्वें जें तत्व तेंच आपलें ऐश्वर्यच, ईश्वरत्वाचें तें चेवणें पाहूं लागले. व त्यायोगें तें ईश्वरभाराचें झालें. हे प्रभो! आपला प्रभाव हा लोकोत्तर असाच येथें दिसून आला व मजमध्यें दिव्यता हेंच ती दिव्यच एक असें होऊन आहे. (५२)

अहो देवा! गगनाला सुमन-फूल हें नसणारच! त्याचप्रमाणें, ह्या अभ्रावर उभविली जाणारी जी गंधर्वनगराप्रमाणें अभ्राकारें, हीं तर मी सोडून दिलीं, मागेंच टाकिली व पुढें झालों. अहो लक्ष्मीपति! मी तर तहानेनें व्याकुळ झालेला; तेथें माझें आर्त होणें, व्याकुळ होणें, उत्कंठित होणें, केव्हां एकदां पाणी पिण्यास मिळतें असें, माझें आर्त लक्षण व त्यामुळें मी तर आजपावेतों उदकाच्या इच्छेनें, उदक पिण्यास मिळेल असें समजून मी माळरानावरचें भ्रांतिरूप मृगजळच पिण्याचा प्रयत्न करीत होतो, पीत राहिलों. ह्या माझ्या चूकभुलीचें मजला एक नवलच वाटतें. देवा! गंधर्वनगरींच वस्ती करून होतो, तो आतां ती वस्ती सोडून आहे; पाणी पिण्याची तहान मजला लागलेली ती. पण तेथें तर मृगजळच मी पिऊन होतों की!!! (५३)

अहो! किरडूंच एक! पण ते कापडाचें जरी तरीपण खरोखरीच की खरोखरीचा साप चावल्याप्रमाणें लहरी येत होत्या कीं! व आतां तर, याप्रमाणें आपण वायांवीणच कीं मरल्या, का फुकटच की पापाच्या जीवास तुम्ही वांचविण्यानें श्रेयच की अहो घेतले आहे! अहो! आपल्या कृपेने तर एक श्रेयच पाहिलें. कृपा ही मूर्त झाली. अमृत दृष्टीचें पांघरुणच मजवर आपण घातलें. अहो देवराया, मी वायां जात होतों, फुकट मरत होतों तें कां कशासाठीं? कोण जाणें! असें ह्या जीविताचें मरण तेंच आपण जगविण्याचें श्रेय पदरीं बांधून घेतलें आहे. त्याचा कांहीं अंदाजच मुळीं लागत नाहीं. अहो जे थोर पुण्यपुरुष त्यांचे म्हणणेंच कीं 'वांयां (फुकट) मरतया (मरणाऱ्याच्या) जीवितास हात हा द्यावाच द्यावा.' तेथें तसल्यावेळीं हें का दुसऱ्याचें असें पाहूं नये. देवन्याय सृष्टीवर उभें केलेलें जें तत्व तेंच येथें पुढें झालें व त्यानें तर बुडल्यास हात, घाबरलेल्यास धीर, (किंवा गीताला ताल) द्यावा. अशा ऐनप्रसंगीं जो पुढें होतो त्याचे पदरीं श्रेय हें महत् महिम्याचें होऊन येतें, असतें.' येथें आपले लक्ष्मीपति आपले भाग्यावर आरुढले, दैवीचे झाले

–देवीचे झाले. नाहींतर अहो देवराया ! काय जसें कापडाचें किरडूंच एकादें तें तर खरें असें समजून ह्या जीवदशेवर ज्या लहरीवर लहरी–चेवच जसा स्थूल दृष्टीस आला. त्यानें त्या लहरी खऱ्याखुऱ्या सजीवतेच्या मन ज्ञान अशा केल्या होत्या. त्या स्थूल दृष्टीला चेववून, चिडवून, डिंवचून स्थूल हा जो जीवभाव त्यास आपली खोलीच मोजण्यास लाविली. अहो, ह्या जीवदशेची खोली किती महान् ! रज्जुसर्प न्यायानें सर्व सृष्टीचें त्या न्यायावर उभें राहाणें, त्यानें तर आपला मोठ्यांत मोठा असा परमभार घालून जीवदशेचें वांयां मरतेपण तें काय कसें सांगू? तें समजतच नाहीं. परंतु अशा ह्या वेळेस हे भगवन्! आपण परम श्रेय घेतलें. तें आपणास दिव्यतेचें झालें. तेथें आपलें दिव्य देवत्वच जागें उभें झालें. प्रकाशानेंच प्रकाशलें. (५४)

आपली पडछाया का प्रतिबिंब नच जाणून तें प्रतिबिंब पाहूनच कीं अहो, तोच सिंह--सिंह तो कुव्यामध्यें का विहिरींत उडी घालील. अगदीं अशा स्थितींत मी होतों, तों आपण मजला आवरून धरिलें व माझें रक्षण केलें.

येथें मायाभास हाच पुढे झाला. त्यानें तर मजला आपलेसें करण्याचा एक डावच योजला जसा! तेथें त्या मायाभासानें तो विहिरींत स्वतःचें प्रतिबिंब पाहून सिंहच जसा स्वतःस मुकणार तो इतक्यांतच (मायाभासामुळें हें जें जीवदशेचें मायामय झालेलें हें जीवदशेचें एक लोढणेंच जणु स्वजीवितास मुकणेंच जसें; तेथें आपलें आपणासच जसें आपलें दान–मान–महिमान हें स्वतःवरून स्वतःस ओंवाळून टाकणें. हें मायावैचित्र्याचें चित्र अति दीर्घतेच्या कठिणपणासच पाहाणारें. तेथें आतां मात्र कठिण आहे, असें त्या मायेनें कसचें अहो! तेथें दैव हेंच देवाचें झालें. त्या मायेनेंच ईशत्व पांघुरलें व तीच मुळीं भगवंताच्या यशाची सीमा पाहाणारी झाल्यानें) तेथें श्री अनंत जे दिव्य देव तेच आपण पुढें झालांत व त्या तुम्हीं हे भगवान् ! माझें रक्षण केलेंत. त्या मायेस आतां दूर करून मजला तारिलेंत. असें आपल्या यशाचें गुणगान कितीही जरी केलें, तरी ह्या प्रसंगास तें पुरतें होणार नाहीं. हा जो प्रसंग तो आपणच (मात देवून,) स्वतःवर घेऊन माझें रक्षण केलें. (५५)

येऱ्हवी पाहिलें असतां माझा तर येथपर्यंत निश्चय होता कीं, (गोत्रजांशीं युद्ध करण्यापेक्षां) आतांच जरी सातही सागर एकत्र होऊन आले तरी हरकत नाहीं. तरी मी भीत नाहीं. एरव्हीं पाहिलें तर एथवर मी जो आलों तो म्हणजे निश्चयच जसा का आपल्या निश्चयतेस आश्रयास आला. येथें काय त्याचें ब्रह्म ब्रह्म असें जें महत्व महिमान त्यानें तर अहो ! सर्वच महत्व नव्हे तर महत्तत्वच जे ह्या ब्रह्मासही पुरून उरणारें असें तें त्वरिततेच्या भावास आलें. तुरंत त्वरित् असेंच झाल्यानें येथें आतां जीं सातही ब्रह्में (कर्म, अध्यात्म, ब्रह्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ व युक्तचेतस मजला प्रयाण कालींहीं जाणतात तें जीं तींच मुळीं ह्या महत्तत्वांनीं लुटविलीं गेलीं कीं लुंचविलीं जातात कीं, काय असा एक धाकच–प्रसंगच पुढें झाला व त्यानें तुम्हांसच हे भगवन् , आपलेपणास आणिलें. तेथें तुम्हींच स्वतःवर तें घेऊन त्या सागराएवढ्या (क्षार, क्षीर, दधि, घृत, इक्षुरस, मद्य व स्वादुजल) महोदधीसच पाहणें केलें तेथें सातही ब्रह्में ती तुम्हीं आकळून धरिली. आपणच तेथिलचे होऊन, त्या प्रसंगास उभें राहिल्यानें माझें रक्षण झालें, मजला आपण वांचविलें. ही एक पुण्याची राशीच आपण उभी केली. त्या पुण्यावरच तुम्हीं यश उभारलें असें झालें. (५६)

एवढेंच काय; पण अवघें सर्व जगही जरी बुडावें झालें, वर आकाशही तुटून पडलें, असें झालें तरी पण गोत्रजांबरोबर माझें लढणें, भांडणें तें होऊं नये. नाहींतर हें युगच बुडतें कीं काय? अशी धास्ती वाटत होती. वांयांच मुळींच तें एक मरणें होणारें, युगच एक आपले चरण घेऊन असणारें जें, तें तर अगदीं बुडण्याचे बेतांत होतें. याहीवर एवढेंच नव्हे तर आकाश–अंतराळ जें तेंही पण तुटून पडतें कीं काय? असें जरी वाटलें, तरी पण आकाशाचे–अंतःकरणांतील जीं कांहीं औत्सुक्यें ती महत्तत्वेंच ह्या

अव्यक्तामधून उगवलेली तीं जणुं मी स्वतः आपल्या व्यक्तीनें पाहूं लागल्यानें, तेथें जें आपलें अव्यक्त असें महत् भाराचे असें श्रीविष्णुरूपच जसें आपलेपण घेऊन त्या सर्वांच्या सर्व चिदाकाशास उचलून धरून मजला–मी जो ह्या गोत्रजांशीं झुंजणें करावें लागूं नये म्हणून धरणेंच धरून बसलेला असा त्यास–आपण पूर्णचंद्राचें जसें तें भाराचें असें ज्ञानदिव्यच होऊन मला ते अति आनंदाचें असें दिव्य देवच होऊन राखिलेंत. (५७)

अशा अतिशयतेच्या अहंकारानें आकर्षणादिमुळें मी तर एक आग्रह का हट्टच घेऊन होतो–आग्रहरूपी देहपाण्यामध्येंच बुडी देऊन होतो; पण अहो चांगलें की भलें असें झालें जें फार तुम्हीं जवळ होतां नाहींतर मजला कोणी बरें तें तेथून बाहेर काढलें असतें–तें!!! अशा तऱ्हेने त्या अहंममतेच्या तळींच बुडी देऊन असलेला जो मी तेथें अंह हाच पुढाकार घेऊन चालत असलेला काय सर्व आश्रितपणच त्या अहंभावाचें 'अहं' काराचें जसें. जेव्हां पहावे तेव्हां वाढीसच लागलेलें तें अहंभावनें किंवा अहंकार त्यानें तर ह्या आग्रहासच मुळीं 'दु:' असें करून ठेविल्यानें तेथें ह्या मनाची जी दुःस्वभावाची अशी धग ती अति स्पष्ट पाहाणारी असून तेथें बुद्धि हीच स्वतःस मुळींच न जाणणारी अशी नेणतीच. येथें आग्रहच मुळीं दुराग्रहाचा असा झाल्यानें काय मग तेथें रक्षण हें कुठूनही आंत डोकावणारें नव्हेच ! अशा ह्या बिकट प्रसंगास मी आलेला. तेथें काय पाणी म्हणजे एक आग्रहास बुडविणारें असें निश्चयानें असणार ! अहो, तेथें काय कुणी ह्यास वांचविण्याकरितां हातभार लावणारा होणारा नव्हेच नव्हे. बरें झालें की अहो श्री अनंता, तुम्हीं मजजवळ होतात ते. नाहींतर कोण बरें मजला ह्या अहंपणाच्या दुराग्रहापासून वांचविण्यास पुढें झाला असता ? (दुसरा कोण बरें असा समर्थ आहे ?) तुम्हीं मजजवळच होतां म्हणून बरें (भलें) झालें येथें स्वर्नदी गंगाच आपले पावनत्व पुढें घेऊन ह्या भूतलावर उतरली व तिनें ह्या स्वरासच पाहूं केल्यानें तुम्हांसच आकळिलें–तुम्हांस आपल्या स्वरूपास येण्यास लाविलें व आतां ती जशी कांहीं सरस्वतीच आपले उमटणें पुढें घेऊन आल्यानें तेथें चांग म्हणजे भलें केलें भलें जालें देवराया–तेथें समयच उत्तमतेचा झाला. (५८)

नसतेंच कीं आपणा स्वतःस एक (मुख्य, तोच, असामान्य,) मानिलें, लटिकेंच कीं स्वतःस 'एक' अन्य, अढळ, खरें मानलें जो नव्हताच का त्या नसणाऱ्यालाच मुळीं नांव तें गोत्र असें ठेविलें. अहो, मोठें थोरलें वेडच की लागलें होतें! पण आपण (तुम्हीं) संरक्षिलें, रक्षिलें, राखिलें!

अहो! ह्या अव्यक्तामधूनच कीं जी ही प्रकृति गुणाचा अवलंब करून गुणाची होते, त्रिगुणाची होते. मूळ जें अव्यक्त–देह, ब्रह्मदेवसंबंधीं, मूळस्वभाव, प्रजापत्य विवाह झाडाचा बुंधा काय तेथें नाम का रूप तें काहींच नव्हे व आतां हेंच येथें नाथिलें म्हणजे खोटेंच असें त्यासच मी आपलें आहे, असें म्हणत होतो. मी व तें नांवरूप एकच आहे, असें देहबुद्धीचें होणें त्याचाच झालेला जो मी, त्या मजला जेथें कांहींच मुळीं नाहीं, जेथें अव्यक्तच अज्ञान, (सां०) प्रधान, जगाची सूक्ष्मावस्था, मदन, हितच एक नामाचें अक्षराचें–विष्णु-रूपाचें त्यास काय नांव गोत्र, हे कसचें! परंतु येथेंच मी (तरी) कीं बुडी देऊन होतों. कांहीं केलें तरी ते मुळीं माझ्या जाणिवेसच येईना. ते मजला समजेचना, इतका कांहीं तेथें आकर्षिलों गेलों कीं ह्या देहबुद्धीनें व्यक्तिवाचकांस पिसेंच लावियलें असें, तो मी, त्या मजला, तुम्हीं राखिलें हो! माझें रक्षण केलें कीं हो! कीं अहो!

ह्या त्रिगुणात्मक मायेनें तर–ह्या प्रकृतीनें तर, ह्या गुणांचा सर्व मी असें केल्यानें तेथें देहबुद्धीची कासच सुटेना. आरोग्यच तें गुणास मिळालें व मी तर देहबुद्धीच नुसती! तबीयत पुरती होईना, व तें –जें आत्म्याचें विलसणें तें समजेसच मुळीं न आल्यानें तेथें काय पिसेंच तें एक नव्हे! असें कोण म्हणेल? व आशा ह्या अति अवघड प्रसंगीं तुम्हींच माझें रक्षण केलें–मजला रक्षिलें. ह्या वेडामधून; तुम्हीच!

अहो! श्रीअनंता मजला रक्षिलें. हें काय कोठवर तरी बोलावें अहो! जी! श्री! कीं तुम्हीं हे कीर्ति महत्व! हें श्रेय! घेऊन आहांत! पुण्याईच एक जोडून घेतली (आहे) व आपल्या यशास सोज्वळ केलें असें होऊन आहे. (५९)

अहो, ऐकावें कीं! पूर्वीं लाक्षागृहांतून जळतच कीं बाहेर काढिलें तेव्हां तर अहो! देहासच की भय तें होतें. पण आतां तर ही अग्निपीडा (जोहर वाहर) तर अशी दुसरी–चैतन्यासकटही कीं अशी!

यापूर्वीं आपण तर ह्या देहाचें जें जवानपण अथवा ज्वानी जी ह्या जीवदशेनें अंगिकारिलेली (अंगीभाव –परस्पर गौण व प्रधान यांचा संबंध) तेथें ती ज्वानीच जशी ह्या–पुन्हः पुन्हः जन्मणें मरणेंचें–जें ह्या ब्रह्मानेंच आपल्या कसास येणें, ब्रह्मच तें कसें जठराग्नि व जननि जठर जोहर–यांमधील जें नित्यब्रह्माचें, जें नित्यत्व तेंच कस लावून पाहिलेलें!–ब्रह्मास आलेलें, आणिलेलें तें ह्या देहासच भयाचें असें (होऊन) झालें होतें. हा देहच मुळीं भीति घेऊन होता. तेथें ब्रह्म जें तेंच आपलेपणानें होतेंच; परंतु आतां पहावें तों येथें तर त्या चैतन्यासहितही–जें चैतन्य ह्या देहास वाहून होतें, त्यासकटही पण आतां भयच वाहिलें जात आहे; म्हणून ब्रह्म जें तेंच जसें आतां ब्रह्मत्वाचें कसासच येऊं पाहात आहे. कशानें म्हणाल तर ह्या देहानें घेतलेलें जें भय तेथें तर आपणच मला निभावून घेतलें, व आतां ह्या देहासही पुन्हः एक तावच जसा चैतन्यासकट बसूं पाहात आहे! त्या जौहरास वाहाणारें जें तारुण्य व त्याचें निभावणें हेंच कसें चैतन्यासहित पुढें घेतलें जात आहे पाहा! व आतां आपण जें ब्रह्म तेंच नित्यत्वच एक त्यांतच स्थिर होऊन आहांत! येथें तर जसें त्या जोहरांस वाहाणारें तेंच आतां चैतन्यासकट उलथून जाऊं पाहात आहे. (६०)

दुराग्रहच एक ह्या बुद्धीवर आपला पगडा बसवून आहे. माझी बुद्धि जी वसुंधरा तीच त्यानें महा-कारणाचा (हिरण्यगर्भाचा) जो नेत्र तो त्यानें बगलेंत मारून मोहरूपी अर्णवाच्या गवाक्षांतच–झरोक्यांतच आपलें ठाणें केलें. त्या गवाक्षांतून पार होणेंच नाहीं. असें संकटांत येणें झालें नाहीं तोंच––की (६१)

अहो आपण आपलें गोसावीपणानें ह्या बुद्धीचा अति ठावच पाहाणें करून त्या बुद्धीस हिरण्याक्षापासून सोडवून घेतलें. येथें तुम्हांला तर आणिक एक दुसरेंच वराह अवताराचें जसें अवतरण होणें (करावें) व्हावें लागत असून तेथें तुम्हीं आपलेपणानेंच सर्वथैव तें आपलें गोसावीपण हेंच स्वामी होऊन वागविलें, गेलें वागले. (६२)

असें अपरंपार आपलें पुरेसें योग्य करणें झालें आहे! मी ह्या एकाच वाचेनें तें कसें अथवा काय बोलणार की!!! येथें मजला तर पंचतत्वाचें पांचही पदर मोकळेपणानें मजपाशींच जसें असून तेथें माझें जें एक त्या जीवब्रह्मदशेवरच उभें केलें जाणें तें ह्या पंचप्राण–पंचतत्वांनीं घडलेलें जें आत्मतत्त्व तेच मजला ज्ञानाचें करून असल्यानें तेथें प्रेमच एक पंचप्राण जसे ते तुमचें यश बोलणारे व्हावेत असें आहे. असें अमर्याद तुमचें देवाचें करणें तें या एकाच वाचेनें तें मी काय बोलूं शकेन!! पण अंतःकरण पंचकही मजकडेच योजिले आहेत, पंचप्राणही मजला अर्पण केले आहेत. (६३)

हें जें बोलणें तें सर्व प्राणाचें असें होत असल्यानें तेथें कांहींच वांया जात नाहीं; व यशच एक हे देवराया! तुम्हांस फावून आहे. तेथें ह्या प्रकृतिमंताचें जें एक ह्या गुणसाम्याचें होणें तेंच अतीत झाल्यानें येथें तर पुरुष हाच जसा आपला प्रकाशच बुद्धीस करून आहे–ह्या बुद्धीवर जो प्रकाश परावर्त झालेला तोच मुळीं तें आत्मबल ज्ञानाचें सर्वथैव असेंच करून असल्यानें ह्या मायेस तर मीं तरून गेलों, याचें कारण म्हणजे ते प्रपद्यन्ततेचें हें माझें लक्षण तुमचे चरणीं सर्वथैव विनटून आहे. आतां येथें जीव–प्राणाचें जसें तें आपलें यशच एक गाणें होत आहे. तेथें पुरुषभार ह्या भाराचा असाच. तें कांहीं वांया जाणार नाहीं, अहो देवराया, भलें यश जोडलें आहेत. जे का तुम्ही माझी माया तीच की सार्थतपणें नाहींशी केली आहे. (६४)

हे तुमचे जे डोळे ते म्हणजे आनंदसरोवरामधील कमळेंच जशीं. त्यांनीं तर सर्व दुःखाची हानी केल्यानें आनंद प्रेम सरोवरामधील कमळें असे तुमचे डोळे ते आपल्या प्रसादाची–प्रसन्नतेचीं देउळेंच (काया पंढरी आत्मा विठ्ठल : देहोदेवालय ऐक देही देवो निरंजनः) ज्या मजसाठीं करीत आहेत!!! देवच एक ह्या देहाच्या राउळास वोवरीस प्रसादनेची अशीं राउळेंच करून आहे. देवरायाचें (जें राउळ) असें ह्या देहासच ते आपल्या डोळ्यांनीं आपले डोळे आवरून धरून आहेत, व त्यामुळें आपलीच (एका देवरावांची) जशीं राउळेंच–स्थळें–आवारें–जागाच–प्रसादाचीं सर्वथा करून ठेविल्यानें तेथें अंगिकारच जसा केला आहे. (ह्या देवरावांनीं) कीं अर्जुनाचें ह्याचें जें असणें तें माझ्याच डोळ्यांनीं व्यापिलेलें व्हावें व तेथें प्रसादच सर्व असा अंगिकारच एक तो देवरायाचा असा अर्जुन ! (६५)

अशा ह्या मजला अहो ! मोहाची भेटी !! ही काय अहो, वेडीच एक गोष्ट ! भोळीच एक बोली. काय अहो मृगजळानें वडवानळास विझवावें असें ! अहो अलिकडच्या तीरावरच राहून जसें परतीरचे सांगणें करणें तें कसें तोललें जाइल ? वडवानळास मृगजळानें विझवणें ह्या उपमेनें बरें हो ? तसें मोहरूपी मृगजळानें आपण जे एक वडवानळासारखे तेजस्वी त्या आपणांस कधींही त्या मोहानें पाहाणें हें नाहींच आपल्या प्रसादास पात्र झालेला ! आणि त्यास मोहाची भेट ! असें हें कायसें तरी तुच्छतेच्या कोटींतील बोलणें ते ! अहो वडवानळ कुठें व तें मृगजळानें तो विझविण्यासाठीं त्यावर वृष्टि करणें तें कोणीकडे !!! (६६)

आणि मी तर हे दातारा ! आपल्या कृपेच्या आंतील गाभाऱ्यांत–आपण कृपेनें पोसलेल्या ह्या देह पाण्यामध्यें देहजळामध्यें विस्तीर्णताच एक तेथें त्यांत शिरून ब्रह्मरसच एक वरून (घेऊन) आहे. जसें त्या पक्षिणीनें आपल्या पिलांकरितां चाराच त्यांच्या तोंडीं घालून त्यांस सांभाळीत असावें. तेथें ती पक्षिणी केवळ्या बरें प्रेमानें ते ती काम करून आहे! तें कांहीं एका ब्रह्मरसास व 'चारयास' जणुं तोलण्याचा भाव घेऊन आहे. तसा मी आपल्या कृपेखालीं वसत असून ब्रह्मरस हाच एक ज्यास अद्याप दांत उगवले नाहींत अशा पिलाच्या पोषणार्थ (पोषणासाठीं) चारा घेऊन आहे. जसें काय मी एक पांखरूंच त्रिभुवनांतही फेरी करणारें असें होऊन आहे! तेथें ब्रह्मरस हाच एक चारा मी घेऊन आहे! माझेपणाचें असें एक खाद्य ब्रह्मरसाचें तें खाद्य मी आपल्या कृपेच्या व्यापकत्वावरच की घेऊन आहें! अहो! दातारा! स्वामी मी तर आपल्या कृपेच्या गाभाऱ्यांत फिरून ब्रह्मरसाचा चारा घेत आहें!!! (६७)

ह्यायोगें माझा मोह जाइलच जाइल असें हें कांहीं विस्मयाचें बोलणें नव्हे ! कारण की अहो मी तर तुमचे पाय शिवंतल्यानें (आपल्या चरणाचा आश्रय केल्यानें–तुमचे पायीं विनटल्यानें मी) उद्धरलों ! कीं जी ! त्या योगेंकरून माझा मोह जाइलच ! येथें आश्चर्य तें कसचें ! पण तुमचे पाय देखिले स्पर्शले आहेत म्हणून मी उद्धरलों. (६८)

**श्लोक २ रा**

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यपि चाव्ययम् ॥ २ ॥**

भव+अप्ययः=भवाप्ययौ संसार व लय श्रुतौ–[भवतरि वेंचलेपणेंचि संचकु. भव=(भवो भावो भयंचाभयमेवच–१०) अस्तित्व, उत्पत्ति, संसार, उदयकाळ, कल्याण, महादेव, लाभ, प्राप्ति, शरीर, उत्कर्ष, मूळकारण, जन्म, उत्पन्न झालेला, उत्पन्न होणारा, मोक्ष. भवद्दश=भवाप्रमाणें, भवासारखे. भवाद्दश्य श्रोते=अद्दश्य भव, ब्रह्म, शिव जसें कां अ० ९ भवाद्दश्, भवाद्दश=तुमच्यासारखा. भवदीय=तुमचें, तुझें. भवत्=तूं, तुम्हीं, होणारे भवत=होणारेः भवन=शेत, घर, स्थान, देऊळ, उत्पत्ति, अस्तित्व. आययः=जवळ जाणें, संयोग, निघून जाणें, लय, नाश, इत्यादि. अपि अयः–अप्ययः=तरीसुद्धां अय म्हणजे मिळकतीचें असें.]–भूतानाम् (ज्ञानविज्ञानतत्व–पुनर्जन्म, संसिद्धीच, भव–भाव्य, परा–अपरा, भक्ति

–ज्ञानोत्तर भक्ति. भव्–भाव, भाव–अभाव, त्वत्तः हे कमलपत्राक्ष–) तुम्हांपासूनच मी ह्या भूतांच्या उत्पत्ति व प्रलयासंबंधीं ऐकलें. ययौ भवाप्ययौ = ह्या दोन्हीहीं (भव म्हणजे–हे दोन्ही उत्पत्ति प्रळय.) = भवः व अप्ययः म्हणजे नाशा अभवः संबंधीं: विस्तरशः = विस्तारपूर्वक. त्वत्तः = तुम्हांपासून. कमलपत्राक्ष = कमलपत्राप्रमाणें डोळे आहेत ज्याचे अशा हे भगवन्! अव्ययम् = अविनाशित्व.

अन्वय—हे कमलपत्राक्ष! त्वत्तः भूतानाम्। ययौ भव अप्ययः (भवाप्ययौ)। मया। विस्तरशः श्रुतौ। हि। अव्ययम्। माहात्म्यम् अपि। च (मया। श्रुतौ।)

अर्थ—कमलपत्राप्रमाणें विस्तीर्ण डोळे आहेत ज्याचे अशा हे भगवन्! तुम्हांपासूनच मी भूतांच्या (भव व अप्यय–अभाव म्हणजे) उत्पत्ति व लया संबंधीं विस्तारपूर्वक ऐकिलें. तसेंच तेथिलचें ते भूतांच्या अविनाशीपणाचें महात्म्य जे कीं ब्रह्म शाश्वत सुरक्षित अविनाशि असें आहे तें ही ऐकिलें ॥ २ ॥ श्लोक २ रा ओव्या ६९ ते ८०.

**(त्वत्तः कमलपत्राक्ष)—पैं कमलायत डोळसा। सूर्य कोटि तेजसा।**
**म्यां तुज पासौनि महेशा। परिसिले आजि ॥ ६९ ॥**
**(भवाप्ययौ०)—इये भूते जयापरि होति। अथवा लया हन जैसेनि जाति।**
**ते मज पुढां प्रकृति। विवंचिली देवे ॥ ७० ॥**
**(महात्म्यम् अपिचाव्ययम्)—**
**आणि प्रकृति कीर उगाणा दिधला। पर पुरुषाचाहि ठाव देखिला।**
**जयाचा महिमा पांघुरौनि जाला। घडौता वेद ॥ ७१ ॥**
**निःशब्द रासि वाढे जिये। का धर्मा ऐसेया रत्नाते विये।**
**ते येथिचे प्रमेचे पाये। वोळगे म्हणोनि ॥ ७२ ॥**
**ऐसे अगाध महात्म्य। जे सकळ मार्गैकगम्य।**
**जे स्वात्मानुभव रम्य। ते इयापरि दाविले ॥ ७३ ॥**
**जैसा केरू फिटलिया आभाळि। दृष्टि रिघे सूर्य मंडळि।**
**का हाते सारूनि बाबुळि। जळ देखिजे ॥ ७४ ॥**
**नातरि उकलुनिया सापाचे वेढे। जैसे चंदना खेंव देणे घडे।**
**अथवा विवशि पळे मग चढे। निधान हाता ॥ ७५ ॥**
**तैसी प्रकृति आड होती। ते देवेचि सारिली परौती।**
**मग परतत्वा माजिये मति। सेजार केला ॥ ७६ ॥**
**म्हणौनि ईये विषयींचा मज देवा। भर्वसा जाला कीर जीवा।**
**(स्पष्ट गद्य) परि आणीक एक हेवा। उपजला असें ॥ ७७ ॥**
**तो भिडा जरि म्हणे राहो। तरि आना कवणा पुसो जावो।**
**काये तुजवांचुनि जाण ठावो। आहो आम्हि ॥ ७८ ॥**
**जळचर जळाचा आभार धरि। बाळक स्तनपानि उपरोध करि।**
**तरि तया जिणेयासि श्रीहरि। आन उपाय असें ॥ ७९ ॥**
**म्हणौनि भीड सांकडि न धरवे। जीवी आवडे तेही तुजपुढें बोलावे।**
**तव राहे म्हणितले देवे। चाड सांगै ॥ ८० ॥**

म्या–मिया. कमलायत = कमलपत्राप्रमाणें विस्तीर्ण. (६९) विवंचिली = विचारपूर्वक सांगितली. (७०) प्रकृति उगाणा = मायेचा झाडा. पर पुरुषाचाहि–वरि पुरुषाचाहि–पर आत्म्याचाहि. देखिला–दाविला.

जाला–जाहला. घडौता=घडुत पांघरुणाचा, वस्त्रयुक्ततेचा. (७१) निःशब्द राशि–जी शब्दराशि. ऐसेया–ऐसिया. येथिचे–तेथिचे. प्रभेचे–प्रभेचेनि. वोळगे=यावेत, वळणें. (वोळग=सेवा, आश्रय. वोळगे वोळगे कृष्णद्वारावतीये रावो ! ). (७२). सकळ मार्गैकगम्य=एकच वस्तु जी सर्व मार्गांनीं (अपराधांनीं) जाणण्यास योग्य अशी. (एकच एक वस्तुरूप जी सर्व मनुष्यांनीं जाणण्यास योग्य अशी, असा तूं आहेस–महिम्न=वेदांचें महात्म्यः) स्वात्मा=धन, स्वभाव (ग.) घनसंख्या. अनुभव–रम्य. (न्या.) प्रत्यक्ष इंद्रियद्वारा ज्ञान, प्रिय, सुंदर, सुखकर, उपभोग, परीणाम. (७३) केरु=ढग, अभ्र, बाबुळि =शेवाळें. (७४) नातरि उकलुनिया–तरि उकलतया. हाता–हाती. निधान हाता चढे=ठेवा हाती येतो. विवसी=जखीण. (७५) आड–हे आड. सारिली–सारोनि. परतत्वामाजिये-परत्वा–परतत्व, माझिये= माझी मति, बुद्धिपर तत्वनिष्ठ–ब्रह्मनिष्ठ केली. (७६) भर्वसा–भरवंसा=विश्वास. हेवा उपजला (उपनला) =इच्छा, (लोभ, मत्सर, हांव, इत्यादि उत्पन्न) झाली आहे (७७) मिडा=भीडमुर्वतीनें. म्हणे–म्हणो =म्हणतो, म्हणों केलें, म्हटले, म्हणावे. जाण–जाणत. (७८) आभार धरी=ओझें मानील, उपकार, धन्यवाद, सर्वभार मानील. उपरोध=भीड, शंका, अडथळा; संयमन, उपकार, रक्षण, पीडा, नाकेबंदी करणें. जिणेयासि–जिणया=जीवित जगणें वांचणें मग जगणें–जगावें असा उपाय तो कुठचा ? (७९). भीड सांकडी (सांकड) न धरवे (धरावे)=संकोच मानूं नये. मिडेच्या धाकानें संकटच एक पदोपदीं आडवणारे, म्हणून संकोच धरूं नको, भीड धरूं नये !! जीवी–जीवां. तुजपुढें–तुजपुढां (८०)

कमल उमलूं लागलें म्हणजे प्रत्येक पाकळी आयत (मोकळी) होऊन सर्व प्रफुल्लितपणाचें सौंदर्य येतें जसें तसे आपले हे नेत्र आहेत. अहो महेशा ! आपल्या कोटिसूर्यापेक्षांही जास्त तेजाचे (असे तेजस्वी) प्रकाशानें–प्रकाशण्यानें दिव्यतेची दीप्ति ही आपणासहित सर्व विश्व आपणच आहांत हें मजला तुम्हीं ऐकविलें. अशा त्या कोटिसूर्यांहुनहि अधिक तेजाच्या–अशा आपल्या महेशाकडून म्हणजे आपणापासून हें आज मी ऐकलें कीं, (उमललेल्या कमळाप्रमाणें डोळे आहेत ज्याचे, कोटिसूर्यांच्या प्रकाशाप्रमाणें तेज आहे ज्याचें अशा तुम्हां महेशापासून हें मी आज ऐकिलें की.) (६९)

महत् आदिकरून जीं भूतें आहेत तीं कशीं होतात तें व ज्या कारणानें लयास जातात, हारपतात तें सर्व कांहीं ह्या प्रकृतीविषयींचें आज देवांनीं मजला समजावून दिलें. मजपुढें असलेल्या प्रकृतीस्तवच मुळीं विचारांत घेऊन–विचारपूर्वक मांडिलें, सांगितलें. (ज्या प्रकारांनीं ही भूतें होतात अथवा जशीं लयास जातात अशी ती प्रकृति देवांनीं मजपुढें का मजला विस्तारपूर्वक सांगितली.) (७०)

येथें आतां पहावें तों अहो ! देवा ! ह्या प्रकृतीनेंच कीं आपला सर्व झाडा दिला. पर आत्म्याचेंही, पर पुरुषाचेंही–का वरि पुरुषाचेंही–परमात्म्याचेंही मूळ स्थान दाविलें, देखणें केलें, व तेथीलचा महिमा (सामर्थ्य, प्रभाव, रुप्याचें पात्र, विभूति, मोठेपणा, वैभव, हवें तितकें मोठें होतां येतें ही महिमा सिद्धि) पांघरून कीं अहो ! वेद हा सुशोभित असा वस्त्रयुक्त असा झाला आहे. (त्यायोगें प्रकृतीचा झाडाच सर्व दिला, परमात्म्याचें मूळ स्थान जेथचा महिमा पांघरून वेड सुशोभित झाला तें दाखविलें.) (७१)

(निःशब्द, निर्गुण अशी सर्व वेदराशी हीच तेथें मोठेपण घेऊन–उफाड्याची वाढी घेऊन असते. ह्यावरच जी कांहीं ह्या धर्मास प्रतिष्ठा आलेली होते, तेथें धर्म हा जसा का रत्नाची दीप्ति प्रकाशच सर्व-रत्नच एक उगवलें, दिसूं लागलें, झळकलें, प्रकाशमय झालें असें तें तर ह्या वेदांनींच उपजविणें दिलें. ह्या धर्मरूपी रत्नास, प्रकाशभार झळकूं लागल्यामुळें रत्नपणच ह्या धर्मास आलें, त्यांस तें पोहोंचतें झालें. असें तें तेथीलच्या श्रीकृष्णाच्या पायांची प्रभा का (प्रभेचे पाय मुळीं पाउलाप्रत आले, पाउलेंच उमटलेलीं. त्या पाउलांचा आश्रय केला.) ते चरण ह्या प्रभेमुळें दिसूं लागले.

वेद जे शब्दराशी वाढते अस्तित्वांत राहाते जगते, अथवा धर्मासारख्या रत्नांस वीते-प्रसवते तें कशामुळें म्हणावें तर तेथीलचे म्हणा का येथीलचें म्हणा, हे ह्याच श्रीकृष्ण परमात्म्याचे प्रमेचे-कांतीचे, प्रकाशाचे पाय मी आपल्या आश्रयास घेतले आहेत; पायाचा आश्रय केला आहे; म्हणून कीं, तेथीलच्या प्रमेसच रत्नपण येत आहे. (जो वेद शब्दराशी वाढतो, अस्तित्वांत रहातो व धर्मासारख्या रत्नास वीतो तें ह्या श्रीकृष्ण परमात्म्याच्या पायांचा आश्रय झाला म्हणून होय.) (७२)

असें तें अगाधतेचें, गम्यतेचें महात्म्य जें सर्व मार्गांनीं एकाच ठायीं मिळतें तेव्हांच गम्य होणारें (समजणारें होतें.) सर्व मार्गांनीं जाणण्याला योग्य अशी एकच वस्तु, ब्रह्म तेथें अनुभव हा स्वात्मतेचा रम्य असा आत्माच आतां अनुभवास येऊं लागला. परम रम्य अशी ती त्याची शोभा दिसूं लागली. आतां अशा ह्या महात्म्यावरच जे उभें झालेलें महात्म्य त्यावर अनुभव दिसूं दिला-अनुभव अनुभवास येऊं लागला.

श्रीकृष्णाच्या रत्नप्रकाशाचा-पायाच्या-प्रमेचा आश्रय केला म्हणूनच कीं धर्मासारखें रत्न ध्यायलें आहे. वेद शब्दराशी वाढते, अस्तित्वात राहाते असें जें जें कांहीं महात्म्य का देवादींचा प्रताप महिमा-वैभव जें सर्व मार्गांनीं जाणण्यास योग्य मार्ग अनेक ते सर्व एकपणास येऊन एकच मार्ग तिथें उगवल्याने-असें एकच जें धनच कीं एक स्वभावरूपी तें प्रत्यक्ष इंद्रियद्वारां ज्ञानानें प्रिय असें, सुंदर असें, सुखकर उपभोग परिणामाचे स्वआत्मानुभव रम्य असें तें, असें असें आहे. याप्रमाणें दाखविलें आहे. (असें अगाध महात्म्य जें सर्व मार्गांनीं एकच ब्रह्म जाणण्यास योग्य असें जें आपल्या आत्म्याच्या अनुभवावरच रम्यतेस येणारें तें याप्रमाणें दाखविलें.) (७३)

हें कसें आहे म्हणावें तर आभाळीं आलेलीं अभ्रें जेव्हां आकाशांतच मिळून (फिटून) जातात, ओसरतात, तेव्हांच मुळीं दृष्टि ही सूर्यमंडळ पाहूं शकते; दृष्टि ही सूर्य मंडळांत शिरकाव-रिगावा करूं शकतें. अथवा हातानें शेवाळें तें बाजूस केल्यानें (देहरूपी) जळ ते पाहावें (देखणें देखावें.) होतें की (ज्याप्रमाणें आभाळा मधील अभ्र हारपल्यावर दृष्टि ती भूमंडळी शिरकाव करणारी होते का पृथ्वी तळ पाहू लागते अथवा हातांनीं पाण्यावरील शेवाळे बाजूस केल्यानेंच की जळ पहाणे होते.) (७४)

अहो, चंदनाच्या झाडाला विळखा घालणारा, चंदनासच आंवळून असणारा सर्प जो त्याचे सर्व वेढे उकलावेत तेव्हांच मुळीं चंदनास आलिंगन देतां येतें. एरव्हीं सर्पाच्या वेढ्यांमुळें चंदनास आलिंगणें हें ओळखीचें होणार नाहीं, असेंच म्हणावें लागतें. द्रव्याच्या ठेव्यावर बसलेली विवशी ती पळून जाईल, तेव्हांच तो द्रव्य ठेवा हातीं लागणारा असा होतो ना! हातोहात मिळणारा असा होतो ना! (चंदनाच्या झाडा भोंवतीं असणारे सापाचे वेढे उकलले झाल्यानें चंदनास आलिंगन देणें घडतें: का विवशी पळून जाईल तरच ठेवा हातीं येतो.) (७५)

त्याप्रमाणें ही माया किंवा प्रकृति जी आड पडली होती-आड आली होती, ती देवांनीं परतीं सारून बाजूस केली. मगच त्या पर-परम पुरुष तत्वास आपल्या शेजारचें असें करणें झालें जसें परतत्वासच मनांतील शेजघर केलें-बुद्धीला भेटले व मगच ती मति बुद्धि तत्वनिष्ठ केली असें होय-परतत्वामध्यें माझ्या मतीनें सोबतीचें असें ब्रह्म तें केलें. शेजबाज सर्व संसार थाटविला, मती शेजघराची केली, ब्रह्मच सोबत करूं लागलें. (तशी प्रकृति ही आड होती ती देवानीं बाजूस सारीली व मगच परत्व का परतत्व माझ्या मतीला शेजारचें केलें-माझ्या बुद्धिला ब्रम्हत्व भेटलें.) (७६)

म्हणून तेथीलचा विषय गोष्टीबद्दलचा हे देवा! मजला पक्का भरंवसाच आला आहे; पण आतां एक गोष्ट मात्र जी हेव्याची आहे, उत्कट इच्छा हांव घेऊन आहे, तें सांगण्याचें करतों. म्हणून मजला

ह्या परत्वासंबंधीं एक भरंवसाच वाटत आहे; पण येथें एक हेवा उपजला आहे–हेतु उत्पन्न झाला आहे. तो हा कीं, (म्हणून ह्या प्रकृति व परतत्वा (ब्रह्म) संबंधीं अहो देवा! मजला–माझ्या जीवाला भरंवसा झाला आहे, पण तेथें आणीक एक इच्छा उत्पन्न झाली आहे, ती ही की—) (७७)

सहज भीड धरली, संकोच केला, मन मोठें का प्रशस्त केलें नाहीं व त्यावर (जसें तें) हेवा हेतु तसाच राहून असो असें घेतलें तर मग दुसऱ्या कुणास बरें तें पुसण्याचें करावें? अहो! तुम्हींच आमचा ठाव आहांत [तुम्हांवांचून आमच्या अडीअडचणी दूर करणारा दुसरा कोणीच नाहीं व असा एखादा कोणी आहे, हें आम्हीं जाणत नाहीं.] (ती इच्छा तुमची भीड धरून तशीच राहूं दिली तर मग दुसऱ्या कुणाला तें पुसण्याचें करावें बरें! अहो! तुम्हांवांचून काय कांहीं तरि आम्हीं जाणत आहोंत काय बरें) तुम्हीच आमच्या ठावठिकाणाचे असें आमचे आहांत. अहो तुम्हीच आमच्या ठावाचे बरें. (७८)

जलचर प्राणी जलासंबंधीं भार का ओझें मानीत आहे! धन्यवाद गात आहे (गाईल; जळा-पाण्याचे उपकार–आभार मानीत आहे.) तेथें जगणेंच संपलें असें म्हणावें लागेल. अशी दृष्टच एक लावणें का आश्चर्यच एक सर्वथैव थक्क होणेचें तें. तेथें जगणें तें कसचें पदरांत पडणार? बाळक जर स्तनपाना-संबंधीं शंका घेईल, (अडथळा करील) स्तनपान न करण्याचा हट्टच घेईल का आग्रह धरील तर मग त्याच्या जगण्यावाचण्याला कांहीं एकाद दुसरा उपाय आहे काय बरें? (जलचर जलाचा आधार आहेत असें मानील का ओझें मानील, बाळक स्तनपान न करण्याचा हट्ट धरील त्याला त्याच्या जगण्यावाचण्याला कांहीं एकादा दुसरा उपाय नाहींच.) (७९)

म्हणून भीडेच्या संकटांत फसूं नये, संकोच करूं नये. ह्या जीवास जें कांहीं आवडत आहे तें ह्या जीव गोडी आवडी संबंधानें–तें तुम्हांपुढें (बोलावेंच) बोलावें लागत आहे. तेव्हां देव म्हणतात, कीं उगीच राहा. तुझी चाड–आवड–इच्छा ती सांग. तुला काय आवडत आहे तें तुवां सांगावेंस. (म्हणून संकोच करूं नये, जीव गोडीस आवडत आहे तेंही तुमच्यापुढे बोलावें की ना!! तेव्हां देवांनीं म्हटलें कीं उगा रहा. तुझी जी कांहीं आवड आहे ती तुवां सांगावीस.) (८०)

**श्लोक ३ रा**

**एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम॥ ३॥**

यथात्थत्वम् = जसें आहे तसें अगदीं यथातथ्य. आत्मानं परमेश्वर = स्वतः परमेश्वराला–प्रेमस्वरूप ईश्वराला. ते ऐश्वरम् पुरुषोत्तम = सर्व शक्तिमान, सर्वश्रेष्ठ, अनंतकोटि ब्रह्मांडनायक असें तुमचें ऐश्वर्य.

अन्वयः—परमेश्वर! एवम् आत्मानम् एतत् यथात्थत्वम्। पुरुषोत्तम! ते ऐश्वरम् रूपम् द्रष्टुम् इच्छामि।

अर्थः—हे परमेश्वरा! हे देवा! याप्रमाणें आपलें यथात्थत्व म्हणजे जसें आपण आहांत, तशा आपणांस मी पहावें अशी मजला इच्छा झाली आहे. हे पुरुषोत्तमा! आपलें ऐश्वर्यरूप तें मी पहावें असें इच्छितों.

हे पुरुषोत्तमा! तुम्हीं आपलें जसें वर्णन केलें तसें जें षड्गुणैश्वर्य ईश्वरी सामर्थ्य आहे, तें रूप मी पाहूं इच्छितों. श्लोक ३ (ओव्या ८१–८८)

**(एवमेतद्यथात्थत्वम्)—**
**मग बोलिला तो कीरीटी। म्हणे तुम्हीं केली जे गोष्टी।**
**तिया प्रतीतीची दृष्टी। निवाली माझी ॥ ८१ ॥**
**(परमेश्वर) आतां जयाचेनि संकल्पे। हे लोक परंपरा होय हारपे।**
**(आत्मानम्) जया ठायाते आपणपे। 'मी' ऐसे म्हणसि ॥ ८२ ॥**
**(रूपमैश्वरम्)—ते मुदल स्वरूप तुझे। जेथौनि ईये द्विभुजे हन चतुभुजे।**
**सुरकार्याचेनि व्याजे। घेवो घेवो येसी ॥ ८३ ॥**
**पै जलशयनाचिया अवगणिया। का मच्छ कूर्म ईया मिरवणिया।**
**खेळ सरलिया तु गुणिया। सांठविसी जेथें ॥ ८४ ॥**
**उपनिषदे जे गति। योगी हृदयीं रिगोनि पाहाति।**
**जयातें सनकादिक आहाती। पोटाळुनिया ॥ ८५ ॥**
**(द्रष्टुमिच्छामि ते) ऐसे अगाध जे तुझे। विश्वरूप कानी आईकिजे।**
**ते देखावया चित्त माझे। उताविळ देवा ॥ ८६ ॥**
**देवे फेडुनिया सांकड। लोमे पुशिली जरी चाड।**
**तरि हेचि एकी वाड। आर्ति जी मज ॥८७ ॥**
**तुझें विश्वरूप अघवे। माझिये दृष्टीसी गोचर होआवे।**
**ऐसि थोर आशा जीवे। बांधोनि आहे ॥ ८८ ॥**

गोष्टी–गोठी. प्रतीतीची दृष्टी=अनुभवाची प्रचीति दिठी. निवाली=प्रसन्न झाली, धाली, (प्राप्ताची) प्राप्तीची झाली. (८१) जयाचेनि–जे याचेनि. लोक=सप्तलोक, तीन लोक, (एकविस स्वर्ग) शद्बसृष्टि. परंपरा=संप्रदाय, अनुग्रह. जया–तिया. (८२) स्वरूप–रूप. जेथौनि–जेथुनि. (द्विभुजः स्यात् सदा रविः) द्विभुजे–दिभुजे. घेवो घेवो येसी=रूपानें रुपाचा होतोस, स्वरूपानें स्वरूपाचा होतोस, प्रकाशानें प्रकाशतोस. (८३) मछ–मच्छ–मत्स्य. ईया–इया. तु गुणिया सांठविसी जेथें (जेथ)=गुण लावणारीं तीं तुझीं रुपें तुवां सांठविण्याचें होतें. (८४) गति–गाती. योगी–योगिये. पाहती–पाहाती. (८५) कानि–कानी (लोकलज्जा?). आईकिजे=ऐकिजे. (८६) सांकड=संकोच. पुशिली–पुसिली. जरि–जरी. चाड–इच्छा. वाड–वाढ=मोठी. आर्ती=आतुरता, उत्कट इच्छा. (८७) विश्वरूप––विश्वरूपपण. अघवे–आघवे. दृष्टीसी–दिठीसी. ऐसि–एवढी. आशा–आस. (८८)

यावर तो किरीटी अर्जुन म्हणूं लागला कीं, अहो देवा! तुम्हीं जी कांहीं गोष्ट (ज्यांच्या मूळ संकल्पानें–इच्छेनें हा विश्वाचा अनादिक्रम निर्माण होतो, त्याबद्दल आपण जे बोलिलांत (त्याची) तिजबद्दल मजला प्रतीति आली व माझी दृष्टि निवाली आहे. त्या प्रतीतीनें मजला समाधान झालें आहे. (८१)

आतां मला जे विचारावयाचें आहे तें असें कीं, ज्याच्या संकल्पानें ही लोकपरंपरा होते व हारपते, नाहींशीं होते, लय घेऊन असते, असा जो ठाव किंवा असें जें सर्वस्वाचें ठिकाण ज्यास 'मी' असें आपण स्वतःच्या सर्वस्वास म्हणतां, तें रूप मी जाणावें. (८२)

तें तुमचें मुद्दल स्वरूप किंवा रूप जेथून ही अशी दोन भुजांचीं किंवा चतुर्भुज अशीं स्वरूपें ह्या देवकार्याकरितां निमित्तें तुम्हीं घेऊन असतां–पुन्हः पुन्हः (एकसारखे, वरचेवर जें कांहीं तुम्हीं तें मुद्दल स्वरूप घेऊन ह्या देव कामाकाजाकरितां देव काजाचें निमित्तच करून, तेंच तें पुन्हां घेऊन) येतां तें रूप मी जाणावें, हा नरजन्म हा तेथील मुद्दल आहे; पण तेंच जसें व्याज व तेंच रूप मी जाणावें. नरजन्म हा तेथील मुद्दल आहे, पण तेंच जसें व्याज व तेंच कसें मुळीं मनुष्य देहानें नटतें. ह्या देहास नटविणें तें

तुमचें तेथें येणें हें हरघडी होणारें, तेथें दोन भुजांची तसेंच चतुर्भुजांची असेंच तें सर्वस्वाचें आपलें मुद्दल स्वरूप जेथून तुम्हीं करतां-येणारें होतां. ( ८३ )

त्याचप्रमाणें जलशायीनेच्या वेषानें रूपानें अंगिकार करण्याच्या क्षीरसागरांतील-शेषशयनाच्या आरंभापासून तसेंच मत्स्य कूर्म इत्यादि जीं खेळणीं खेळणारा अलंकार घालून वस्तु सुशोभित केली जशी अशी ती काय खेळणीं म्हणावींत व सर्व खेळ संपल्यावर जेथें तुम्हीं 'गुणिया' असें गुणवान् जेथें सांठविलें असतां-आपले आपणांतच आपणास सांठवून असतां (मांत्रिक का गारोडीच एक जसा?) जेथें तुमचें मुद्दल स्वरूप सांठलेलें असतें तें मी जाणावें अशी इच्छा आहे. (जलाशायीच्या रूपानें, वेषानें वेषावर मत्स्य कूर्म आदि वस्तूंनीं अलंकारिलेलें व खेळ सरल्यावर जेथें तूं गारूडी मांत्रिक सांठविला होऊन असतोस ते रूप पहावें अशी इच्छा आहे. ( ८४ )

उपनिषदें जें गातात (उपनिषदांना जी गति देणारे, अहो! भगवान गोपाल श्रीकृष्णाची जी गति तीच कीं उपनिषदांची-का उपनिषदाची जी गति तीच भगवंतांनीं आपण होऊन गतीस येऊन ती पुरविली होणारी) योगी जे अंतःकरणांत शिरून पाहातात, ज्यासच सनकादिक निर्गुण ब्रह्म जे तेही पण आपलें तें रूप आपल्या पोटीशीं धरून आहेत, फिरफिरून पोटाळून, आलिंगून असतात असें तें तुमचें रूप मी पहावें अशी माझी इच्छा आहे. (८५)

अहो! जें सागरासारखें अगाध तुमचें विश्वरूप तें मी कानानीं ऐकिलेंच ऐकावें ह्या माझ्या डोळ्यांनी पाहाण्यास मिळावें ते माझ्या दृष्टींत उतरावें म्हणून अहो देवा! माझे चित्त-मन अगदीं फार उतावीळ झालें आहे. ('कानीं पेरिलें, डोळां उगविलें, व्यापलें भरलें तोचि हरी') (८६)

देवानीं तें जें सांगण्यासंबंधीचे एक सांकड-संकटच जसें, ते दूर करून जरी लोभामुळें ती इच्छा माझी तिजविषयीं पुसण्याविचारण्यासाठीं प्रश्न केला आहे तेथें तर मजला मोठी उत्सुकता येऊन आहे-माझी उत्कंठा अतिशयतेने वाढली आहे-मी अति उत्कंठित झालो आहे.

(कसलाहि संकोच न करितां संकोच मुळींच न धरितां देवांनीं माझें चित्त कसें केलें आहे म्हणाल तर मजमध्यें असलेला जो ह्या स्वभावाचा संकोच करणारा का भीड वाहाणारा (भिडस्त) असा-संकोच तो भित्राच जसा आंत आंतच-(मागें मागेंच) पाय घेणारा असा जो मी त्या माझ्या भ्याडपणा देवांनीं काढून टाकिला व आतां घरोबाच एक लोभाचा झाल्यानें घरांत वागण्याचें होणें तेथें ह्या देहाचें उजविणेंच झालें पाहिजे, असेंच जेंव्हा तेंव्हां जेथें तेथें घरोबा झाला, लोभच एक जडला. व ह्या लोभामुळें जी कांहीं इच्छा वर येणारी झाली आहे, उत्पन्न झाली आहे, तिजबद्दल विचारण्यांत मजमध्यें मोठी चतुरता उपजली आहे, उगवली आहे. तें आपलें स्वरूप पाहाण्याची उत्कट इच्छा मनांत उपजली आहे. माझें मन उत्कंठित होऊन आहे.) (८७)

तुमचें अवघें विश्वरूप माझ्या दृष्टीस गोचर व्हावें, अशी एक मोठी आशा ह्या उराशीं मी बांधून आहें. तें रूप पाहाण्यासाठीं जीवच कीं मी आपला बांधून ठेविला आहे जसा.

तें रूप तुम्ही मजला दाखवालच अशी ह्या मनास एक मोठी आशा लागली आहे, उत्कट इच्छाच येऊन आहे. तें रूप मी पाहीनच पाहीन अशी मला एक मोठी आशा वाटत आहे. (८८)

**श्लोक ४ था**

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४॥**

मन्यसे=तुमच्या मनीं येत असेल (तर). शक्यं=अशक्य नाहीं असें. मया द्रष्टुं=मजला तें दिसेल. योगेश्वर ततः=त्या माझ्या, तुमचें विश्वरूप देखण्या-(पाहाण्या)-वरच कीं ततः योगेश्वर खरें असें आत्मरूप दाखवाल का दिसेल असें करा. अव्ययम्=अक्षय्य, अविनाशी (निर्विकार विष्णुच जसा, शब्द हा लिंग विभक्ति व वचन यामुळें विकृतीचा होत नाहीं.)

अन्वयः— प्रभो ! यदि मया तत् रूपं द्रष्टुं शक्यम् इति मन्यसे । अव्ययम् आत्मानम् मे दर्शय । ततः त्वं योगेश्वर ।

अर्थ—हे प्रभो ! जर मला तें आपलें ईश्वरी स्वरूप पहाणें, दिसणें शक्य आहे, असें तुम्हांस वाटत असेल तर योगेश्वरा, भगवंता, श्रीकृष्णा ! तुम्हीं आपलें अव्यय, अविनाशी, निर्विकार, असें 'आत्मरूप' मला दखवा. माझे ते विश्वरूप पहाण्याचे मनोरथ पूर्ण करा. (श्लो. ४ था ओ. ८९–११५)

(मन्यसे यदितच्छक्यं)
परि आणीक येथ येक सारंगी । तुज विश्वरूपाते देखावया लागी ।
पै योग्यता माझां आंगी । असें किं नाहीं ॥ ८९ ॥
पै आपले आपण मी नेणे । ते कां नेणसि जरी देव म्हणे ।
तरि ज्वरित काय जाणे । निदान रोगाचे ॥ ९० ॥
आणि आर्तिचेनि पडिभारे । आर्तु आपलि टाकि विसरे ।
जैसा तान्हेला म्हणें नुपरे । समुद्र मज ॥ ९१ ॥
ऐसा सचाडपणाचिया भुलि । न सांभाळवे समस्या आपलि ।
या लागि योग्यता जेवी माउलि । बाळकाची जाणे ॥ ९२ ॥
(द्रष्टुमिति प्रभो) तियापरि श्रीजनार्दना । विचारि जो माझी संभावना ।
मग विश्वरूप दर्शना । उपक्रमु किजे ॥ ९३ ॥
तरि ऐसि ते कृपा करा । येऱ्हवि नव्हें म्हणा हे अवधारा ।
वाया पंचम आलापे बधिरा । सुख केउते देणें ॥ ९४ ॥
येऱ्हवि येकल्या बापियातें तृषे । मेघु जमापुरते काई न वरषे ।
परि जालि ही वृष्टी उपखे । जरि खडेवरि वर्षाव होये ॥ ९५ ॥
चकोरा चंद्रामृत फांवले । येरा आण वाहुनि काय वारिले ।
परि डोळ्याविण पाहले । वायाचि जाये ॥ ९६ ॥
(दर्शयात्मनमव्ययम्)
म्हणोनि विश्वरूप तु सहसा । दाविसि हा किर भरंवसा ।
का जे कडाडा आणि गहिंवसा । माजी नित्य नवा तूं कीं ॥ ९७ ॥
(योगेश्वरततोमेत्वम्)
तुझें औदाय जाणो स्वतंत्र । देतां न म्हणसि पात्रापात्र ।
पै कैवल्या ऐसे पवित्र । कि वैरिया दिधले ॥ ९८ ॥
मोक्ष दुराध्य कीर होये । परि तोही आराधी तुझे पाये ।
म्हणउनि धाडिसि तेथें जाये । पायिकु जैसा ॥ ९९ ॥
तुवां सनकादिकांचेनि माने । सायुज्जि सौरस दिधला पुतने ।
जे विषाचेनि स्तनपाने । मारू आली ॥ १०० ॥

हा गा राजसु यागाच्या सभासदि । देखतां त्रिभुवनिचि मांदि ।
कैसा शतधा दुर्वादि । निस्तेजि निंदिलासि ॥ १०१ ॥
ऐसिया अपराधा शुशुपाळा । आपणपया ठावो दीधला गोपाळा ।
आणि उत्तान चरणाचिया बाळा । काय ध्रुवपदि चाड ॥ १०२ ॥
तो वना आला याचि लागि । जे बैसावे पितयाचे वोसंगि ।
कि तो चंद्र सूर्याहि परिस जंगि । श्लाध्य केला ॥ १०३ ॥
ऐसा वनवासिया सकळां । देता तूंचि येकु धसाळा ।
पुत्रा आळविता अजामेळा । आपणपे देसि ॥ १०४ ॥
जेणे उरि हातलासि पांपरा । तयाचा चरण वाहासि दातारा ।
अझुणि वैरियाच्या कलेवरा । विसंबेसि ना ॥ १०५ ॥
ऐसा अपकारिया तुझा उपकार । तु अपात्रियाहि उदार ।
दान मागोन दारवटेकर । जालासि बळिचा ॥ १०६ ॥
तु ते आराधि ना आईके । होति पुंसा बोलावित कौतुके ।
तिये वैकुंठि तुवां गणिके । सुरवाड केला ॥ १०७ ॥
ऐसा पाउल पाउलि वायाणि मिषे— । आपणपे देवो लागसि वानवसे ।
तो तुं कां अनारिसे । मजलागि करिसी ॥ १०८ ॥
आगा दुभतेयाचेनि पवाडे । जे जगाचे फेडी सांकडे ।
तिये कामधेनुचे पाडे । काय भुकेले ठाति ॥ १०९ ॥
म्हणोनि म्यां जे विनविले कांहि । ते देवो न दाविति हे किर नाहि ।
परि देखावया लागि देई । पात्रता मज ॥ ११० ॥
तुझे विश्वरूप आकळे ऐसे । देखती जरि माझे डोळे ।
तरि आर्तीचे डोहळे । पुरवी देवा ॥ १११ ॥
ऐसी ठाये-ठाव विंनति । जंव करूं सरला सुभद्रापती ।
तंव तया षड्गुण चक्रवर्ती । साहवेचिना ॥ ११२ ॥
तो कृपा पियूष जळ । आणि येरू जवळा आला वर्षाकाळ ।
ना ना श्रीकृष्ण ते कोकिळ । अर्जुन वसंत ॥ ११३ ॥
नातरि चंद्रबिंब वाटोळे । देखोनि क्षीरसागर उचंबळे ।
तसा दुणेहि वरि प्रेमबळे । उल्हासतु जाला ॥ ११४ ॥
मग तये प्रसन्नतेचेनि आटोपे । गर्जोनि म्हणितले सकृपे ।
पार्था देख देख अमुपे (अमुप) । स्वरूप माझे (स्वरूपें माझीं) ॥ ११५ ॥

येथ येक–एक एथ. सारंगी–शार्ङ्गी ( शार्ङ्गीन् = धनुर्धारी विष्णु. ) माझा–माझिया. (८९) पै–हे. ज्वरित = रोगिया. निदान = कारण व स्वरूप. मूळ कारण, रोग परीक्षा, दावे, दोर, शुद्धता शेवट. (९०) आर्ति = आतुरता. पडिभारे = अतिशयतेनें. टाकी–ठाकी = अधिकार, योग्यता, चालरीत, ह्या जन्मामध्यें झालेलीं जीं कर्में त्यासंबंधींची निवृत्तता, सीमा. नुपरे–न पुरे. (९१) सचाड = प्रबळ इच्छा. भुलि = चुकी, चकणें, जें मोहानें, मूर्च्छा, अज्ञान, दुःख, प्रेमाचें वेड. समस्या = अपेक्षा, शंका, शक्ति, आकांक्षा, इच्छा. (९२) संभावना (संभवना) = योग्यता, पूजा, संभावना, अनुरूपता, उचितता: उपक्रमु = आरंभ. (९३) म्हणा हे–हे म्हणा. वाया = व्यर्थ. पंचम आलापे = पंचम स्वरांतील उत्तम गायन. केउते = कोठून, कसें तें. (९४) येकल्या-एकले. बापियाचे = चातकाचे. काइ–काय. वरषे–वर्षे. जालीही–

जहालीही. उपखे=व्यर्थ जाते; उपाशीपणाची, तेथें कोरडेपणच एक. जरि–जन्हि. खडेवरि–खडकी. होये–होय. (९५) पाहाले—उजेड, प्रकाश, उजेडाचा. फावले=दिवस उगवल्यानें प्राप्त झाले. (९६) कडाडा आणि गहिवसा (गहिसा)=जाणत्या नेणत्यांना; ज्ञानियामध्यें व मूर्खामध्यें. (९७) स्वतंत्र=(न्या.) कर्ता, वयांत आलेले, दुसऱ्याच्या आधीन नसलेले. देता–देता दानी=दान देतांना. वैरिया–वैरियाहि. (९८) दुराध्य, दुःआध्य–आध्या–आध्य=उत्कंठापूर्वक स्मरण. आराध्य=उपासनेचें करणें, तोषविणें, पूजेचें–प्राप्तीचें करणें, कीर=निश्चयानें: पाइक=चाकर. म्हणउनि–म्हणोनि. (९९) सायुज्जि–सायुज्यीं=एकरुपतेंत, सारखेपणांत. सौरस=सायुज्यमुक्तींतील गोडी. पूतना=आपला विषानें माखलेला स्तन कृष्णास पाजून मारण्यासाठीं हिला म्हणजे पूतनेला कंसानें पाठविलें होतें. कृष्णानें स्तन पिऊन तिचे प्राणच शोषिले. (१००) राजसु–राजसूय. यागाचां–यागान्चिया=यज्ञाच्या. सभासदि=सभासदी, (व्य.) पंच, (सभासद=सभा, समाज, घर, धर्मशाळा, न्यायमंदिर, दूत. देखता=समोर. मांदी=समुदाय, जमाव. शतधा=(शतंधा=दूर्वा) शंभरदां ठेवणारा, धरणारा. (पुरोधस् धस्–धा=ठेवणारा, धरणारा.) दुर्वाद=निंदा. दुर्वादि–दुर्वाक्यशब्दिः निस्तेजि निंदिलासि–निस्तेजिलासि=अपमानिला गेलास. निस्तेजस्=पराक्रमहीन, तेजोहीन, अंधुक, मूर्ख. (१०१) अपराध्या–अपराधिया–अपराध्दि=चूक, गुन्हा, पाप, अपराध्द=नेम चुकलेला, दोषी, अपराधी, बेसावध, पापी. बेलापराध्द=उल्लंघिलेलें, (अपराध चुका, दोष, पाप, गुन्हा, इजा, इत्या.) अपराधः भंजन=शंकर, अ, नकारार्थि. पराधिः=शिकार, पारध. शुशु=शिशु. (शिशुकस्=त्वरा, अभ्यास). आपणपया–आपणपेया. उत्तान (उत्तान=निद्रोन्मुख, उभा, उघडा, सुबोध, उंच; उत्तान–पद=उद्भिज्ज, सृष्टि; जमिनींतून वर येणारे (=उद्भिज्ज, उद्भिद्.) चरण=उत्तानपादः राजाचें नांव. चाड=योग्यता. (१०२) पितयाचे–पितयाचिया. वोसंगी=मांदीवर. (उत्संग=मांडी, आलिंगन, पर्वताची उतरण.) श्लाघ्य=स्तुति, आर्जव; श्रेष्ठ, स्तुत्य, बढाइ. (१०३) वनवासिया=दुःखिया, आपन्नाना–दुःखितांना. धसाळा=उदार, उदारपणानें देणारा. अजामेळा–अजामिला. (१०४) उरि–उरस्=वक्षःस्थळ, ऊर. हातलासि–हाणितलासि. पांपरा=लाथा (पामन्+घ्न, पापन्+अदि=गंधक) पामा=खरुज, पामन=खरजुडा (ना.) कलेवरः (कलेवर)=शरीर. (कलावत्=कलानिपुण, चंद्र, कलावती वीणा, अप्सरा.) विसंबेति ना–विसंबसी ना=विसरत नाहींस. वैरी=जो शंख, (वांगडी, कानशील, कपाळाचें हाड, जलचर, कुबेर–निधि ? (वि.) शंख). (१०५) अपकारिया=अनिष्ट, हानी, अपाय करणारासही. अपात्रियाहि=अयोग्यास: दान मागोन–दान देऊन, म्हणोन. दारवटेकर=दार राखणारा द्वारपाळ. जालासि–जाहालासि. (१०६) आराधिना=उपासना, आराधना (राध=सज्ज होणें, शुभाशुभ सांगणें, सिध्दीस जाणें.) करीत असतांना पुसा=पुंसा=पोपटाला. सुरवाड (केला)=सुकाळ, वैकुंठ सुखाची प्राप्ति. गणिका=वेश्या, हत्तीण, हत्तीला भुलवून आणणारी हत्तीण; नरवेल; जुई. (१०७) ऐसा पाउला पाऊलि वायाणि–ऐसी पाहुनि वायाणि=अशी व्यर्थ, मिथ्या, लटकी, निमित्ते. वानवसे–वानिवसे=अकस्मात्, कौतुकानें, स्वच्छेनें, सहज. वानवस=मध्यगृह. अनारिसे=वेगळे, निराळें, भिन्न, भलते. (१०८) आ गा–हा गा. पवाडे=विस्तारानें. सांकडे=संकट. पाडे=वत्स, वासरूं, खोंड. ठाती–ठायी=ठावाचें, ठायीचें (भुकेले असती.) (१०९) म्यां–मिया. देवो न दाखविती–देव दाखविती. किर=निश्चयेंकरून. (११०) देखती जरी–जरी आणसी. (१११) ठावे ठाव=यथायोग्य, योग्य ठावाची. षड्गुण चक्रवर्ती=ज्ञान, वैराग्य, यशश्री, ऐश्वर्य व धर्म इत्यादिकांचा राजा चक्रवर्ती भगवान श्रीकृष्ण (भगवत् शब्दांतील षड्गुणैश्वर्याची व्याख्या–ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । ज्ञानवैराग्ययोश्चैवषण्णांभग इतीरणा ॥). (११२) जळ (जड)–सजळ=पाणी, गाईचा गर्भाशय. कृपापियूषसजल=कृपामृताचे मेघ=येर=अर्जुन. कोकिळ=कोकिळ पक्षी (कोकिलानंद=आम्र. कोकिळ इक्षु=काळा ऊंस) वसंत=चैत्र वैशाख वसंत ऋतु षड्ऋतूंपैकीं

पहिला. वसंततिलका = काव्यांतील एक छंद. पंचमसुर = कोकिळ गायनांतील एक राग. (सं.). ना ना = अथवा. (११३) दुणेहिवरि प्रेमबळें = दुपटीपेक्षां जास्त, अत्यंत प्रेमबळानें. चंद्रबिंब वाटोळें = पूर्ण चंद्र. उल्हासतु–उल्लसित. जाला–जाहाला. (११४) तये–तिये. आटोपे–आटोप = भरानें, आवेशानें. गर्जोनि–गाजोनि = गर्जना करून. सकृप सकृपे = मूर्तिमंत दयारूप. (सकृत् = एकदां, एकवार: स = सहित, सदृश्य, एकच) अमुप (= अपार, अगणित.) स्वरूप माझे–अमूपे स्वरूपे माझी. (११५)

हे श्रीशार्ङ्गधरा ! परंतु माझ्या मनांत एक विचार आला आहे कीं, तुमचें विश्वरूप पाहाण्याची योग्यता माझें अंगीं आहे कीं नाहीं ? (८९)

(तें स्वरूप पाहाण्यास माझे अंगीं योग्यता आहे किंवा नाहीं हे मी कांहीं जाणत नाहीं) व देव म्हणतील कीं, तसें ते रूप पहाण्याची योग्यता जी, ती तूं स्वतः कां जाणिवेंत घेत नाहींस ? तर अहो देवा ! असें पाहा किं जो (तापाने आजारी आहे असा) रोगी कां भवरोगी आहे त्यास ह्या रोगाचें निदान मूळ कारण कां स्वरूप तसेच त्यावर औषध तें कसें समजेल ? [ अहो ! जर भवरोग्यानें आपले अज्ञान, मूर्खपण व रोगाचे निदान जाणलें तर मग भवरोग वैद्याची गरज ती काय ? ] (९०)

ज्याच्या मनांत एखाद्या गोष्टीविषयीं अतिशय आतुरता उत्पन्न झाली आहे, तो आपली योग्यताच मुळीं ती विसरतो ; अधिकार विसरतो ; जसा अतिशय तहानेला–(तान्हेला) तो म्हणूं करतो कीं माझी तहान पुरविण्यास–तहान भागविण्यास समुद्र हाही पण पुरेल कीं नाहीं अशी शंकाच आहे ! समुद्रसुध्दां आपल्या पाण्यानें माझी तहान भागवूं शकणार नाहीं. असें, आर्त–आतुर जो आहे, तो आर्ततेमुळें आपली योग्यता विसरून बोलणें करतो. (९१)

अशा तऱ्हेनें इच्छा प्रबळ झाली आहे व त्यामुळें भुलविणेंच एक होत आहे. याकारणामुळें स्वतःची समस्या (आकांक्षा, गूढ प्रश्न, इच्छा, शक्ति, अपेक्षा, किंवा पूर्ण करण्याचा श्लोकांश–शंका) हीच पूर्ण केली का सांभाळली जात नाहीं आणि म्हणुनच म्हणतो कीं, बाळकाची योग्यता ती माउलीशिवाय दुसरें कोण जाणणार ? माउलीच ती योग्यता जाणणारी होय. (९२)

त्याप्रमाणें अहो जनार्दना ! आपण माझ्या अधिकारासंबंधीं का योग्यतेविषयीं विचाराच्या समुजतीस घेऊन ती योग्यता स्थिर करावी आणि मगच की अहो, तें विश्वरूप दर्शनाचें आदर्श पहावें तें आरंभाचें व्हावें –विश्वरूप दाखविण्यास प्रारंभ करावा : योग्यता दर्शन व प्रारंभ हीं बरोबरीनें चालत असावींत. मगच आपण विश्वरूप दाखविण्यास आरंभ करावा. (९३)

नाहीं तर हें कांहीं आपलें स्वरूप तें विश्वरूप दर्शनाच्या योग्यतेचें नाहीं असें म्हणा ! का आपण देव आहो न आहोंत असें तरी म्हणा : अहो, बहिऱ्यास तें उत्तम पंचम रागाचें गाणें कसचें तें सुख देणारें कीं ? योग्यता व दर्शन यांचा आपल्या कृपेच्या अभावामुळें परस्पर मेळ झाला नाहीं, तर विश्वरूपदर्शन मुळींच पदरांत पडणार नाहीं, विश्वरूपदर्शनाचा उपयोग होणार नाहीं. अहो ! जो बहिरा आहे त्याचेपुढें अगदीं पंचमसुरांत सुंदर गाणें गाईलें तर त्यामुळें त्या बहिऱ्यास काय सुख का आनंद वाटेल ? मुळींच वाटणार नाहीं. (करितां देवांनीं कृपा करून माझी योग्यता स्थिर करावी व मगच आपलें विश्वरूपदर्शन दाखविणेस प्रारंभ करावा ही विनंति.) (९४)

एरव्हीं पाहिलें असतां एकाद्या चातकाची तृषा शमन करण्यासाठीं मेघानें वर्षाव केला तर तो वर्षाव तर सर्व जगासही पुरून असतो,–पुरता होतो. परंतु जर का ती झालेली वृष्टि खडकावर झाली (का खड्यावरच जर कां वर्षाव झाला) तर मग काय ती व्यर्थच जशी (खडेवरी वर्षाव ती वृष्टि व्यर्थच) तेथें कसचें तें तृषेचें शमन होणें तें !!! (९५)

अहो, चकोरानें चंद्रामृत मिळावें म्हणून मनापासून इच्छा केली, तर चंद्र आपलें जेवढें अमृत तेवढें चकोरासच देतो; आणि इतरांना तो अमृत घेऊ नका, घ्याल तर शपथ आहे, बाजूस व्हा असें म्हणतो काय? मुळींच नाहीं. त्यांनाही पण तो तें चंद्रामृत देतोच. पण पहाणाराला–घेणाराला–सडोळस अशी दृष्टि असली पाहिजे. ती दृष्टि नसेल तर काय उपयोग? ते सर्व वायांच जाणार! वृत्ति बुद्धि चित्त भावरूपी डोळाच एक जर नाहीं तर डोळयाशिवाय पाहिलेलें तें वांयांच जाणारें होतें ना? (९६)

ज्या गहन अशा कडाड म्हणजे ज्ञानी लोकांना व दुर्गम खोल अशा नेणत्यांना तुम्हीं नित्य नवे तरुण प्रशंसेचे भासतां, असें आपण भगवान श्रेष्ठ आपलें विश्वरूप मला सहज लीलेनें, आनंदानें, कौतुकानें दाखवालच असा भरंवसा मजला आहेच आहे. (९७)

अहो देवराया! आपलें औदार्य किती वर्णन करावें? तसेंच तुमचा उदारपणा म्हणजे आगळा असा जगावेगळाच निराळा–स्वतंत्र आहे. तुमच्या मनांत एकदां कृपेचा–(दयेचा) उद्‌भव झाला कीं, पात्र अपात्र याचा विचार न करतां भरमसाट देणें देतां. तुमचा (कट्टर) वैरी जरी असला तरी त्याला कैवल्य का मोक्ष यासारखें पवित्र देणें देतां. म्हणून असें वाटतें कीं, तुमचा उदारपणा–औदार्य–जगावेगळा–जगरीतीपेक्षां निराळा–स्वतंत्र आहे. (९८)

अहो! मोक्ष हा उपासना करण्यास निश्चयानें कठीण असा आहे. पण तो तर तुमचे पाय सेवीत आहे, तुमच्या पायाची सेवा करीत आहे. म्हणून त्यास जिकडे धाडाल तिकडे तो जातो जसा का चाकरच एक! (९९)

तुम्हीं निर्गुण अशा सनकसनंदनाच्या मानानें उपमेस योग्य असे जे त्यांच्या उत्कर्षावरच की अहो! अभिमान, गौरव, सत्कारावरच की सायुज्यतेचें महत्व का सायुज्य गोडी–मुक्तींतील गोडी पूतनेस दिधली, जे का विषाचें असें स्तनपान तुजला देऊन मारण्यास आलेली (सर्व विषयच की विषाचे असे तेथे वाचाच मुळीं लटपटली–मेलीच मरूं होणारी) ती. (१००)

अहो! राजसूय यज्ञाच्या सभेमध्यें–सभागृहामध्यें त्रिभुवनांतील सर्व संत सज्जन (गोळा झाले आहेत) जमले होते. त्यावेळीं सर्व श्रेष्ठ असें तुम्हीं निस्तेज केले गेलांत, निंदिले गेलांत. शिशुपाळानें तर भर सभेंत तुम्हांस दुर्वाक्य शब्दीं–वाईट शब्द बोलून–तुमची निंदा केली. तेथें शतप्राय असा दुःसह वादच एक त्यामध्यें तुम्हीं अवमानिले गेलांत. (१०१)

अहो! गोपाळा! अशा प्रकारचा घोर अपराध शिशुपाळादिकांकडून झाला असतांही, त्यांवर आपण कृपा करून त्यांस आपले जवळचा ठाव दिलात; 'उत्तान चरण' नांवाच्या राजाचा मुलगा ध्रुव याला तर अढळपदाचें महत्व दिलें, निश्चितपणाची योग्यता दिली. तेथें त्यास तेथची कांहीं अढळ अशा ध्रुवपदाची इच्छा आवड का चाड ती कसची जरी! त्यास नव्हती! (१०२)

त्याचें जें वनांत् येणें होतें तें कशाकरितां, तर जें का बापाच्या वोसंगीं म्हणजे मांडीवर बसण्यास मिळावें म्हणून! असा तो ध्रुव बाळ तुम्हीं तर चंद्रसूर्यापेक्षांहि स्तुत्य, श्रेष्ट, श्लाघ्य असा करून ठेविला आहे! (१०३)

याप्रमाणें जे जे दुःखानें व्यास–ग्रस्त झालेले सकळ वनवासी त्यांना तुम्हीं (धसाळा!) उदारपणानें देणें दिलेलें कृपा केली की, इतकेंच काय! पण साऱ्या आयुष्यांत कधींहीं ज्यानें देवाचें नांवसुद्धां घेतलेलें नाहीं, अशा त्या अजामेळ पामरानें पुत्रमिषानें नारायण नामोच्चार घडल्यानें मरतेवेळीं आपल्या मुलास हांक मारली व तो भेटावा म्हणून आळविलें, एवढ्या कारणावरच तुम्हीं त्याला आपलें सर्वस्व दिलेंत. त्याचा उद्धार केलात! 'आपणपे ऐसी' म्हणजे आत्मपद–मुक्तिपद त्याला बहाल केलेंत. (१०४)

ज्यानें उरावर लाथ हाणितली त्याचा चरण तुम्हीं अहो ! दातारा अजुनही उरीं वाहून आहांत ! त्याचप्रमाणें वैरीयाच्या कलेवरास म्हणजे शरीरास तर तुम्हीं केव्हांहि मुळींच सुद्धां विसरत नाहींत कीं ! (श्री वत्सलांछन म्हणून श्री विष्णूच्या वक्षस्थळीं असलेली मुद्रा किंवा चिन्ह याबाबत प्रसिद्धी आहेच) श्री वत्स म्हणजे श्री विष्णूच्या छातीवरील पांढरा केशमय भोंवरा होय.) (१०५)

अशा तऱ्हेनें अपकार करणाऱ्यावरही तुम्हीं उपकार केलेले आहेत अपात्रीं ही तुम्ही उदारपणच कीं दाखविलेलें ' दे दान ' म्हणून बळीचा द्वारपाळही कीं होऊन आहांत. (१०६)

जी गणिका-वेश्या तुमचें ऐकत नव्हती, आराधनाही पण करीत नव्हती, उगीच सहजपणें आपल्या पोपटास कौतुकानें शिकवीत-पढवीत होती, अशा त्या गणिकेला देवादिकांना दुर्लभ असा वैकुंठींचा रहिवास दिलांत. (१०७)

अशा निमित्तमात्र (लटकी, मिथ्या, व्यर्थ) मिषानें तुम्हीं आपलें सर्वस्व पावलोपावलीं देऊं लागतां; पण आतां मजला मात्र निराळें, वेगळें का परकेपणाचें असें करीत आहांत; असें कां बरें ? (१०८)

अहो ! दुधदुभत्याचे विपुलतेमुळें जगाची दुधदुभत्यासंबंधींची अडचण दूर करते अशी अहो ! कामधेनु जी ती तर सर्व कांहीं इच्छिलेले मनोरथ पुरविते ! तिचें वासरूं कधींतरी उपाशीं (भुकेले) असेल काय ? असतें काय ? (१०९)

म्हणून मी जें जें कांहीं पाहण्याची इच्छा व्यक्त करीन, तें तें देव मजला दाखवितीलच परंतु तें देखणें पाहाण्याची योग्यता, पात्रता मात्र माझे (ठायीं) ठिकाणीं यावी-असावी. ती आपण मजला द्यावी की. (११०)

माझ्या डोळ्यांना विश्वरूप दिसणें शक्य आहे असें जर अथवा माझे डोळें विश्वरूप पाहूं शकतील असे आपणांस वाटत असेल तर अहो देवा ! माझ्या मनांत विश्वरूप पाहाण्याची जी उत्कंठा-आर्तता-वाढून आहे, ती पूर्ण करा, विश्वरूप पहाण्याचे माझे डोहळे पूर्ण कराच. (१११)

अशी अर्जुनानें केलेली यथायोग्य विनंति भाकलेली करुणा ऐकून त्या ज्ञान, वैराग्य, यश, श्री, ऐश्वर्य, धर्म अशा षड्गुणचक्रवर्तींना उगीच बसवेना, राहवेना, तें त्यांना सहन करवेना ! (११२)

येथें देव हे तर कृपामृताचे मेघ व अर्जुन हा तर जवळच आला आहे पावसाळा; असा अथवा असेंही म्हणूं कीं श्रीकृष्ण हे कोकिळ होत व अर्जुन हा वसंत ऋतुच कीं एक-येथें आतां तें वर्षणें का पंचमसुरांतील गायन तेंच होणारें. (११३)

अहो ! वाटोळें असें पूर्ण चंद्राचें चंद्रबिंब पाहून तर क्षीरसागर उचंबळून येतो; तसा दुपटीपेक्षांही अधिक अशा प्रेमबळानें अर्जुन उल्लसित होऊन आहे. (११४)

अशी ती अर्जुनाची उत्कट इच्छा पाहून संतोष पावलेले श्रीकृष्ण पूर्ण कृपायुक्त होऊन वर त्या प्रसन्नतेच्या आवेशानें, भरानें गर्जना करीत म्हणाले कीं पार्था ! अर्जुना ! पाहा !! पाहा !!! अपार अशीं, अगणित अशीं माझीं स्वरूपें ती ! पाहा ! (११५)

**श्रीभगवानुवाच**

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

रूपाणि = स्वभाव, शरीर, आकृति, प्रकार, सौंदर्य, वर्ण इत्यादि रूपें. (रूपक = रूपें, आकृति : रूपवत् = देखणा. रूपिन् = तुल्य, सुंदर. रूप्य = रूपें, रुप्याचें नाणें.) शतशः अथ सहस्रशः = शेंकडों

(म्हणावीत) का हजारों अशीं (म्हणावीत) तीं (अथ=प्रारंभ, प्रश्न इ. अर्थी) नानाविधानि=(नाना =अनेक, पुष्कळ. विधा=प्रकार, पद्धति, उत्कर्ष, कर्म. विधः=प्रकार, विमान, हत्तीचें अन्न, वेध करणें, समृद्धि) अनेक प्रकारचीं. दिव्यानि=स्वर्गीय, सुंदर, तेजस्वी, देवाचीं, भयंकर कसोटीचीं. नानावर्णाकृतीनि च=(आकृति=आकार, शरीर. वर्ण=(१) स्तुति करणें, (२) वर्ण=मनुष्याची जाती. (वस्तुधर्म, उत्कर्ष, सोनें, कांति, रंग; अक्षर, आकृति, प्रकार.)

अन्वय--पार्थ। शतशः। अथ। सहस्रशः। मे रूपाणि। पश्य। रूपाणि। -नानाविधानि। दिव्यानि। नाना वर्ण। -आकृतीनि। च॥५॥

अर्थ—हे पार्था! पाहा पाहा माझीं रूपें तीं शेंकडोंशें, हजारों तीं, तीं बहुविधतेचीं अशीं दिव्य अशीं अनेक वर्णांचीं तीं तसेंच अनेक आकृतींचीं अशीं. (श्लोक ५ वा ११६ ते १४०)

(श्री भगवानुवाच-षड्गुणैश्वर्यस्य)—
एकचि विश्वरूप देखावे। ऐसा मनोरथु केला पांडवे।
किं विश्वरूपमय आघवे। करूनि घातले॥ ११६॥
(धर्मस्य) बाप उदार देव अपरमितु। याचक स्वईच्छा सदोदितु।
असे सहस्रवरि देतु। सर्वस्व आपले॥ ११७॥
(ज्ञानस्य)—अहो शेषाचे डोळे चोरिले। वेद जयालागी झकविले।
लक्ष्मिये परि राहाले। जिव्हार जे॥ ११८॥
(श्रियः श्रियाः)
ते आता प्रगटुनिया अनेकधा। करीत विश्वरूप दर्शनाचा धंदा (धांदा)
बाप भाग्या अगाधा। पार्थाचेया॥ ११९॥
(यशसः)
जो जागता स्वप्नावस्थे जाये। तो जे (विश्वरूप) स्वप्निचे आघवे होये।
तेवि अनंत ब्रह्म कटाह आहे। जो आपणचि जाला॥ १२०॥
(वैरागस्य, समग्रस्य, इति प्रति एकम् अनुइति)
तेथिची सहजमुद्रा सोडिली। आणि स्थूल दृष्टीची जवनिक फेडिली।
किंबहुना उगडिली। योग ऋद्धि॥ १२१॥
परि हा देखेल की नाहीं। ऐसि सेचि न करि काही।
येकसरा म्हणतसे पाहि। स्नेहातुर॥ १२२॥

श्रीभगवानुवाच—

(पश्य मे पार्थ रूपाणि—'करुणारस')—
अर्जुना तुवा दावा येक म्हणितले। आणि तेचि दाखवूं तरि काय दाखविले।
आता देखै अवघेचि भरिले। माझ्यांचि रूपी॥ १२३॥
(शतशोऽथ सहस्रशः) येके कृशे येके स्थूले। येक ऱ्हस्वे येक विशाळे।
एक एक सरळे। अप्राप्त येके॥ १२४॥
येके अनावरे प्रांजळे। सव्यापारे येके निश्चळे।
उदासिने स्नेहाळे। तीव्रे येके॥ १२५॥
एके संते सदामंदे। स्तब्धे येके सानंदे।
गर्जित एके निःशब्दे। सौम्ये एके॥ १२६॥

एके घूर्णिते सावधे। अलगे अगाधे।
येके उदारे अतिबद्धे। क्रोधि येके ॥ १२७ ॥
येके साभिलाशे विरक्ते। अनिद्रिते येके निद्रिते।
परितुष्टे येके आर्ते। प्रसन्ने येके ॥ १२८ ॥
येक अशस्त्रे सशस्त्रे। येक रौद्र अति मित्रे।
भयानके येक विचित्रे। लय (स्छे) स्ये येके ॥ १२९ ॥
येके जनलीला विलासे। येके पाळणशीळे लालसे।
येके संव्हारते सावेशे। साक्षिभुते येके ॥ १३० ॥
(नानाविधानि दिव्यानि)—
येके नानाविधे परि बहुवसे। आणि दिव्य तेजे प्रकाशे।
तेवीचि एक एका ऐसे। वर्णेहि नव्हे ॥ १३१ ॥
(नाना वर्णाकृतीनि च)—
येके तांतले साडे पंघरे। तैसी कपिलवर्णे अपारे।
येके सर्वांगी सेंदुरे। डंवरले नभ ॥ १३२ ॥
येके सावियाचि चुळकी। जैसे ब्रह्मकटाह खचिले माणिकी।
येके अरूणोदया सारिखी। कुंकुम वर्णे ॥ १३३ ॥
येके शुद्ध स्फटिके सोज्वळे। येके इंद्रनिळ सुनिळे।
येक अंजन वर्णे सकाळे। रक्त वर्णे येके ॥ १३४ ॥
येके लसत्कांचन पिंवळी। येके नवजलद शामळी।
येके चांप गौरि केवळी। हरिते एके ॥ १३५ ॥
येके तप्त ताम्र तांबडी। येके ते श्वेतचंद्र चोखडी।
ऐसि नानावर्ण रूपडी। देख माझी ॥ १३६ ॥
हे जैसे का आनान वर्ण। तैसे अक्रुति (आकृति) अनारिसेपण।
लज्जा कंदर्प जो रिघाला शरण। तैसी सुंदरे येके ॥ १३७ ॥
येके अतिलावण्य सागरे। येके स्निग्ध वपु मनोहरे।
शृंगार श्रियेचीं भांडारे। उघडिली जैसी ॥ १३८ ॥
येके पीनावयव समासाळे। येके अतिशुष्क विक्राळे।
एके दीर्घ कंठे वेताळे। विकटे येके ॥ १३९ ॥
एवं नानाविधाकृती। इया पाहाता पार नाही सुभद्रापती।
ययाच्या येकेकि आंग प्रांती। देख पां जग ॥ १४० ॥

येकचि–एकचि. (११६) स्वइच्छा–स्वेच्छा. (११७) चोरिले=विश्वरूप दर्शनांत लपले, दर्शनासाठीं लपविले. झकविले=वेदानांही विश्वरूप दर्शनाचा थांग लागूं दिला नाहीं. राहिले–राहविले=लक्ष्मी जरी, तरी सुद्धां तिजपासून बाजूस केलें (लपविलें.) जिव्हार रजे–जिव्हार जे=जीवीचे गुज, रहस्य. (११८) प्रगटुनिया–प्रगटुनि=प्रगट मी. धंदा–धांदा=व्यापार, कर्मधंदा, समृद्धतेची महति महिमान, व्याप. पार्थाचेया–पार्थाचिया. (११९) स्वप्नावस्थे–स्वप्नावच्छे, जे–जेवी. अनंत ब्रह्मकटाह=अनंत ब्रह्मांडें; (अनंत=विष्णु, बलराम, शेष; चौदा गांठीचा हातांत बांधावयाचा रेशमी दोरा; निस्सीम ब्रह्म, अपार आकाश;) (विश्वरूप=ईश्वर; अनेक रूपाचे; विष्णु; आगरु चंदन.) स्वप्निचे–स्वप्न=निद्रेंत (झोपेंत) दिसणारें नाना प्रकार, आळस, जीवावस्थाविशेष, झोप. स्वप्नकृत=शाकविशेष. स्वप्न्या=ज्या नाडींत

जीव असतां स्वप्न पडतें ती. स्वपनं=निजणें, निद्रा (स्वप्). (१२०) सहज (स्वाभाविक, मूळची) मुद्रा–सहसा (अकस्मात) रूप मुद्रा सोडिली=आपल्या स्थूल मूर्तींचा पडदा दूर सारून आपले निजरूप उघडें केलें (मुद्रा सोडिली) जवनिक=पडदा. योगऋद्धि=योगबळ. किंबहुना उघडली=किम् प्रश्न इत्यादि अर्थी, कोणता, काय. बहु=पुष्कळ, पुष्कळपणाचें असे महत्वाचे असें तरी काय नव्हेच=सहज. (१२१) हा–हा हे. येकसरा=एकदम. स्नेहातुर=अत्यंत प्रेमोत्सुक. (१२२) दाखवूं–दावूं. दाखविले–दाविले. (१२३) कृशे=सूक्ष्म, अशक्त, रोडके. स्थूळ=विशाळ, पंचभूतात्मक देह, इंद्रियग्राह्य, लठ्ठ. येक–एके. ऱ्हस्वे–लघु=ठेंगणें. विशाळे=मोठे विस्तृत. कुशळे पृथुतरे=अति कुशल, अति स्थूल, अति मोठी. (प्रथ्=प्रसिद्ध करणें, स्तुति करणें, पसरणें. पृथ्–पृथु=स्थूल, मोठा, कुशल. पृथुतर–पृथग्जन=पापी, मूर्ख, नीच. पृथुक=बालक पोहे. तर तम भाव=चांगले वाईट, कमी जास्ती समजण्याची बुद्धि; तारतम्य भाव.) सरळ=प्रामाणिक, उदार, नीट. अप्राप्ते=नियमानें सिद्ध नसणें, लग्नास योग्य न झालेला. अप्रांते=सीमा का शेवट का अग्र नसलेलें. (१२४) अनावरे=आच्छादन, वेष्टण नसलेली. प्रांजळे=सरळ, कपटहीन. सव्यापारे=कार्य व्यवसाय अभ्यास सहिततेची. निश्चळे=स्थिर. उदासिने =वैराग्ययुक्त, तटस्थ; स्नेहाळे=प्रेममय; तीव्रे=तिखट, दुःसह, तीक्ष्ण, अधिक. (१२५) संते–शांते. सदामंदे–सन्मदें=मांजोरी (दामन्=दावे, दोरी, माळा. सदा=निरंतर.) मंद=धीमा, मंद, जडबुद्धीचा, आळशी, मूर्ख, अंधुक, दुष्ट. स्तब्धे=क्रियाहीन, जड. गर्जित–गर्जिते=संतापित, युध्द, आवाज, गर्जना. निःशब्दे=ध्वनिरहित भाषणांतील पदें वाक्येरहित. सौम्ये=शांत, साधु, सुंदर, बुधग्रह. (१२६) घूर्णिते =झोपेंत लोळणारी, बेसावध, मूर्छित. सावधे=दक्ष, उद्योगी, तत्पर, सावध, लक्ष देणारी. असलगे= उथळ, उघडी. (असलं=मंत्र, शास्त्र, लोखंड.) आगाधे–अगाधे=खोल, गूढ, अविद्वान्, अप्रतिष्ठित, खोल, खळगा, चीर इत्यादि. उदारे=दानशूर, श्रेष्ठ, मोठा, प्रामाणिक मनुष्य व वक्तृत्वपूर्ण, मधुर, योग्य, भव्य, विपुल. अतिबध्दे=गोठलेली, कबज्यांत असलेली, बांधलेली. क्रोधि–क्रुद्धे=राग, कोप, रागावलेली. (१२७) साभिलाषे=उत्कट इच्छा, मर्जी, श्रेयसहिततेची. विरक्ते=वैराग्ययुक्त, निस्पृह, उदासीन. अनिद्रिते–उन्निद्रिते–उन्निद्र=निद्रारहित, विकसित: निद्रिते=झोंपलेले, निजलेले. (निद्रा=झोंप, सुस्ति, फुल मिटलेली.) परितुष्टे–परितुष्टि=तोष, समाधान, संतोष, सुख. आर्ते=रोगी, अनाथ, विनाशी, ग्रस्त, दुःखी, दुःखग्रस्त. प्रसन्ने=बिनचुक, प्रसन्न (द्राक्षमध), संतुष्ट, स्वच्छ, उघडे. (१२८) रौद्रे=भयानक रसाची, भयंकर, उष्णतेची, यम. अतिमित्रे–(अतिभीः=कडकडणारी वीज)=मित्र, स्नेही सूर्य, मित्र= (रा०) शत्रूच्या पलीकडचा राजा, दोस्त. (अति=अतिशय स्तुति, पूजा इ. अर्थी). भयानके=नवरसांपैकीं एक भयंकर, भयानक. विचित्रे=अनेक रंगांची, आश्चर्यकारक लयस्थे–स्थे=समाधिस्थ, तालाची समता, तद्रूपता, एकाग्रता, प्रलय. (१२९) जनलीला विलासे–जनन=उत्पत्ति, वंश. जन=जन्मणें, लोक, मनुष्य, जग. लीला=क्रीडा, विलास, शोभा. विलास=हावभाव, श्रृंगार, चेष्टा, शोभा, सुखोपभोग, प्रादर्श. पाळणशीळेलालसे=पालन, संरक्षणशील. लालसा=मिळण्याची इच्छा, उत्सुकता. संव्हारते–संव्हारके=सारांश, एकी, नाश: सावेशे=आवेश, आसक्ति, मनोभावना, आविर्भाव, भूतसंचार. साक्षिभूते=साक्षिन्=पाहाणारा, परमात्मा: साक्ष्य=दृश्य, पुरावा, साक्ष. भूत=सारखा. (१३०) नानाविधे=अनेक प्रकारची. परिबहुवसे–(बौहे, बव्हे, बव्हसे ९–१७)–परि=चोहींकडे, बहु=पुष्कळ. वस् =राहाणें, आच्छादणें. दिव्यतेजे–दिव्यतेज. प्रकाशे=उजेडाची, स्पष्ट. प्रकाशक=उजेड देणारा, प्रसिद्ध करणारा. प्रकाश्यता=उघडपणा. वर्णेहि=वर्ण, मनुष्यजाती, वस्तुधर्म, उत्कर्ष, सोनें, कांति रंग, अक्षर, आकृति, प्रकार. (१३१) तांतले साडे पंधरे=तावलेलें चोख, उत्तम सोनें. कपिल (वर्णे)=पिंगट, पुंडरीक दिग्गजाची स्त्री कपिला–कपिलकळा=काळी, द्राक्षासारखी. अपार= अमर्याद (नदीचें पैलतीर). सेंदुरे–जैसें सिंदुरे. सिंदुर–तिलक=वृक्षविशेष, हत्ती, सुवासिनी. डंवरले=

लेप केलेले, माखलेले. (१३२) सावियाचि=स्वभावतः सुंदर. चुळकी–चुलुकी–चुलुक=चूल, जलपान–विशेष, (गोधा मत्स्य). चुल्ल=पिचका डोळा, पिचक्या डोळ्यांचा. कटाह=पाताळ लोक (कढई). ब्रह्म=तेज, चैतन्य, ईश्वरीज्ञान. खचिले–खचितले–खचित=गुंफलेलें, कोंदण केलेलें, मिश्रित युक्त. अरुणोदय=पहांट, सूर्योदय. अरुण=तांबुस, पिंगट, धुरकट, सूर्य. स्फटिके–स्फटिक=स्वच्छ पांढऱ्या रंगाचा एक दगड. (स्फट, स्फटा=सर्पाची फणा). सोज्वळे=(उज्वळ=तेजस्वी) सतेज. इंद्रनिळ विंद्रनिळ=नील मणि. (विंद्रावण=पातळ करणें, पळविणें) सुनीळे=(नीळ=निळा, निळा रंग, नीळ मणी, मोठा काळा भ्रमर.) सु=शुभ, अनायासें, उत्तम, अतिशय इ. अर्थी. अंजन=शाई, उटणें, काजळ, सकाळे, सकालम्=प्रातःकाळीं, (सकाळ=वेळींच, पहांटे) रक्तवर्ण–(रक्त=केशर, कुंकू, (रुधिर=तांबडें). आसक्त, स्वच्छ, रंगविलेला, तांबडा. (१३४) लसत्कांचन (सम) पिवळी=लसत्=पसरणारा, शोभणारा. कांचन=सोनें, कांचन, बाहवा, सोनचाफा. कांची=कमरपट्टा. पीत=पाजळलेली पिवळी. नवजलद शामळी–सजल जलद श्यामळी–(जलद=मेघ. श्यामल=निळा, निळेपणा, काळा, काळा सांवळा, भ्रमर, पिंपळ. नव=नवे, तरुण, ताजे.) श्याम=निळा श्यामिका=हिणकसपणा. चांपेगौरी केवळी =चाफ्याच्या फुलाप्रमाणें गोरी [चंप=काचन वृक्ष; चांपे. चांपेय=सोनचांफा, नागचांफा. चंपक=चांफा, सोनकेळ: चंपालु–चंपकाली=फणसः चंपु=गद्यपद्यात्मक (ग्रंथ किंवा) काव्य. गौरी (गौर=पांढरा स्वच्छ)=रजोदर्शन न झालेली मुलगी, पार्वती. केवळी–केवळं=खरोखर, मात्र.] हरित=हिरवी. (१३५) तप्तताम्र तांबडी=तापलेलं तांबें जसें अशी तांबडी (तांब्र, ताम्र, ताम्ब्र.) श्वेतचंद्र चोखडी =पांढरा चंद्र=चंद्रमा, कापुर, पाणी, सोनं, मोतीं चांगली. (१३६) आन आन=निरनिराळे. आकृति –आकृतीही. अनारिसेपण=वेगळेपण. लज्जा–लाजा (लाह्या), कंदर्प=मदन. (१३७) सागरे (समुद्र) –साकारे=आकार असलेली. स्निग्ध=मित्र, प्रेमळ, मऊ, वपु=शरीर, आकृति. मनोहरे (मनोहारिन्, मनोज्ञ) मनोहर=चित्ताकर्षक, सुंदर. शृंगार=नवरसांपैकीं पहिला, मैथुन, शोभा. श्रि=सेवा करणें, पाळणें. पचविणें. श्री=शोभा, मोठेपणा, कीर्ति, संपत्ति, लक्ष्मी, भांडार–भांडागार=कोठार, खजिना. (१३८) पीनावयव समासाळे=पीन=लठ्ठ, पुष्ट=पुष्ट अवयवाची बांधेसूद व मांसभरित अशी शरीरे: अति शुष्क विक्राळे–शुष्के अति विक्राळे. (शुष्क=नीरस, वाळलेली. वि=अधिक्यविशेष. कराल=मोठा, विशाल, भयंकर, दांत पुढें आलेला). विक्राळ=मधून जाणारे का पाय टाकणारे: दीर्घ कंठे=उंच मानेची: कंठे–कंठ=गळा, आवाज, समीपता: कंठस्थ=तोंडपाठ, जिव्हामुलीय. वेताळे=पिशाच्यांच्या राजासारखी. विताळे=मोठ्या मस्तकाची–वेताळ=द्वारपाळ: विकटे=विकट=मोठी, भयंकर, कुरूप. (१३९) नाना विधा आकृति–नानाविधाकृति (कृति=रचना, क्रिया, पीडा. कृति=कातडे, भूर्जपत्र, कृतिका नक्षत्र. कृत्तिकाभव=चंद्र, षडानन. कृतिवास=महादेव. कृतिन्=पंडित, पुण्यवान, कुशल, समर्थ. आकृति =आकार, शरीर, पार–पारू=शेवट, पेलतीर, अंत. येयांच्या–ययाच्या. येकेकि–एकैकी–एकेकी. आंग-प्रांती=आंग=शरीर अवयव, उपाय प्रांत=अंत, कांठ, बाजू, सीमा, शेवट, अग्र. प्रांतदुर्ग=दुर्ग भेद: अंग भाव=गौण व प्रधान यांचा संबंध. (१४०)

तें विश्वरूप एक फक्त पहावें असा त्या पांडवाचा–अर्जुनाचा मनोरथ, तो देवांनीं तर आतां सर्व कांहीं विश्वरूपमय असेंच करून टाकलें, असें झालें. (११६)

(असें देवांनीं केल्यानें तर परम आश्चर्यच एक ह्या वृत्तीस आलें. वृत्ति उदारभाव पाहूं लागली व म्हणाली कीं) अहो ! बाप–देव हे तर परम उदार असे आहेत. त्यांच्या औदार्याच्या अपरिमितपणाचें नवल तें काय सांगावें बरें ! स्वतःची इच्छाच मुळीं ते याचकपण करणारी व तेथें सदोदितपण हेंच सेवते–सेवा करणारें असें त्या याचनेबरोबरच असणारें असें तेथें अहो ! स्व इच्छेनें मागणें केलेलें कसें नेहमींपणच

एक का नित्य ब्रह्म असें त्यांनीं मागणें हजारहा हातांनीं पुरवावें हें केव्हांही. इच्छाही हजारों हातांनीं पुरविली गेल्यानें देवांनीं आपलें सर्वस्वच त्यास सहस्रवरि दिलें. – का देत असणें असें तें देवाचें करणें ते वेळा हीच मुळीं सहस्रपणेंच दिले–हजार वेळां–हजारहा दिले; डोळाच जसा पुरुष सहस्र! तेथें एकच वेळ ही हजार वेळांची अशी परम भाराची होय. (११७)

अहो! शेषानें मागितलें तों त्याचें सर्व आंगच मुळीं डोळ्याचें करून तें जीवींचें गुज दाखविलें गेलेलें–तेथें काय शेषाचे डोळे चोरिले म्हणावे? तर तसें नाहीं. अहो! देहबुद्धि हीच मुळीं सर्व ज्ञानदृष्टीची केली; तेथें देहबुध्दीस तर कांहींच समजणारे होत नाहीं! पण ह्या जीवदशेस जी गोडी पोहोंचविली गेली, (ह्या जीवदशेचें रहस्य जें पोहोंचतें झालेलें) तेथें ज्ञानरूप जो भगवान तोच मुळीं ती गोडी होय; तें गुज होय! तें रहस्य होय! असें नव्हे काय? अहो! वेदांनीं तर सर्व कांहीं अतिशय महत्व देऊन सांगितलें: अनेक गोष्टी, अनेक प्रसंग, अनेक दिव्यें वेदांनीं जरी सांगितलीं तरीपण ते जे देव (सर्वस्व का रहस्य जे पूर्ण गोडीचें असे) ब्रह्मभावाचे ते तर त्या वेदांनीं नेति नेति म्हणून संपविले. तेथें त्यांनीं तें ब्रह्म का तो देव हा दाखवूं केलाच नाहीं. त्या परम वस्तूबद्दल त्यांनीं मौनच घेतलें: तेथें वेद हे झकविले गेले असें न म्हणावें काय? परम भाग्यवान अशी श्रीलक्ष्मी तिजलाहि ते सौख्य स्वर्ग, गुज, का गोडी ही वाहाण्यास लाविली तरी लक्ष्मीसही तें गुज सांगण्याचें राहिलें असें आहे: असें तें जें जिव्हारींचें का जीवींचें गुज, जीवित गोडीचें रहस्य ते शेषाच्या देहबुद्धीच्या डोळ्यांचें लपविणें करून गोडीस आणिलेले, वेदांनीं नेति नेति इथपर्यंतच म्हणूं केलें व लक्ष्मी अति प्रेमाची अगदीं भगवंताच्या जवळची तिजलाही तें सांगण्याचें राहिलें! तेथें मुळामध्येंच कीं तीच मुळीं त्या गोडीस आल्यानें तें जाणणें हें केव्हांहीं होणारें नव्हेच. अहो! जिव्हार असें जीवींचें का वाणी सरस्वतीचें का रसाना चातुर्याचें तें तर परम गोडीचें असेंच होय. (११८)

असें हें आतां ह्या पार्थाचे वेळेस अनेक प्रकारें करून, अनेक रूपांनीं स्पष्ट करून विश्वरूपाचें दर्शनच एक धंद्याचें केलें, कर्माचें केलें, व्यापारमात्र केलें असें होऊन आहे; धंदाच एक जसा का विश्वरूप दर्शनाचा होऊन आहे; विश्व, रूप, आणि दर्शन हीं धंद्यास आलीं. अहो! काय त्या पार्थाचें भाग्य सांगावें–वर्णावें बरें कीं, तें तर अगाध असें होऊन आहे; पार्थाचे देहबुद्धीचे होणे ते सर्व ह्या धंद्यास आणिले, कर्माचें केलें, व्यापाराचें झालें; 'मिऊ नको' म्हणणारें असें दिव्य असेंच तें सर्व विश्वरूप दर्शनच एक असें झालें. (११९)

जागता असा जो नेहमीं जागताच तो स्वप्नावस्थेस गेला तरीपण जागताच जसा तो तर जसा विश्वरूपच एक का स्वप्नींचें जागतें जसें का त्याप्रमाणें अनंत असें जें ब्रह्मस्वरूप ब्रह्मांड त्याचा जो कटाह टेंकडी कमर आधार जो तो तर देव! आपण होऊन आला आहे असें होय. (१२०)

विश्वरूपाची अशी तेथीची सहज मुद्रा सोडिली, सहसा निजरूप तेथीचें तेंच उघड केलें, का स्थूल दृष्टीचा पडदाच बाजूस केला; किंबहुना अहो! काय म्हणावें कीं देवांनीं योगबळच ते ऋद्धीचें उघडलें, पुढें केलें असें झालें. (१२१)

परंतु हा पाहील कीं नाहीं, ह्यास पाहवेल कीं नाहीं, हा देखेल कीं नाहीं, हा पाहात आहे कीं नाहीं, अशी आठवणच मुळीं देव करीनात. सर्वस्वपणें कीं अहो एकसारखे सस्नेह, स्नेहप्रीतीचें, स्नेहातुरतेचे असेंच त्यांचें ते बोलणें होऊन आहे, असेंच येथें पाहा! (१२२)

हे अर्जुना! तुला एकच ते रूप दाखवूं म्हणूं केलें आणि तेंच जर दाखवूं केलें तर तेथें काय बरें दाखविलें हें निटसें समज. तेथें देखणें देखिलें असें कांहींच पदरांत पडणारें नच झाल्यानें काय कांहीं देखिलें, पाहिलें, पाहविलें कीं नाहीं असें होईल, म्हणून पाहा कीं अवघें हें सर्व माझ्या रूपामध्यें भरलेलें आहे. (१२३)

एक कृश, एक स्थूल, एक ऱ्हस्व–खुजट, एक विशाळ, एक विस्तीर्ण, एक नीट सरळ, एक पृथुतर मोठी कुशल, एक अप्राप्त–अप्रांत. (१२४)

एक अनावर, एक प्रांजळपणें व्यापाररत, एक निश्चळ, एक उदासीन, एक स्नेहाळ, एक तीव्र. (१२५)

एक शांत, संत, एक सदामंद, सन्मद, माजोरी, एक स्तब्ध, एक सानंद, एक गर्जित, एक निःशब्द, एक सौम्य. (१२६)

एक बेसावध घूर्णित, एक सावध, एक उथळ, एक उघडे, एक असलग, अगाध, एक उदार, एक अतिबद्ध, मायापाशबद्ध, एक क्रुद्ध. (१२७)

एक साभिलाष, एक विरक्त, एक अनिद्रित उन्निद्रित–विकसित, एक निद्रित, एक परितुष्ट, एक आर्त, एक प्रसन्न. (१२८)

एक अशस्त्र, एक सशस्त्र, एक रौद्र, एक अतिमित्रे, एक भयानक, एक विचित्र, एक लयस्थ, (समाधिस्थ). (१२९)

एक जन (जनन) लीला विलासरत, एक पालनशील लालस, एक संहारक सावेश, एक साक्षीभूत. (१३०)

एक नानाविध परिबहुवस, एक अतिशयतेच्या बहुत प्रकारें परीपरीची, एक दिव्य तेजानें प्रकाशित त्याचप्रमाणें एक एकसारखे असे वर्णेही पण नसणारे, (१३१)

एक तर चोख, तप्त सुवर्णाप्रमाणें तावलेलें तसें, कपिल वर्णाची अपार अशी, एक तर सर्वांगी सिंदुराचा लेप केला आहे अशी सिंदुरानें जसें का नभ का आकाशच ऊंवरिलें–माखलें आहे, अशी. (१३२)

एक तर स्वभावतःच सुंदर–सावियाची चुलुकी जसें का ब्रह्मरूपी टेंकडीच माणकाच्या कोंदणानें रत्नखचित दिसणारी अशी, एक अरुण उदयासारखी कुंकुम वर्णाची. (१३३)

एक शुद्ध स्फटिक वर्णाप्रमाणें सोज्वळ तेजस्वी, एक इंद्रनीळाप्रमाणें सुनिळ, एक अंजन वर्णाची सकाळच्या आकाशवर्णाची–जशी संध्यारागानें सुलग्न सुशोभित अशा नेत्रांजनाची, एक रक्तवर्णाची. (१३४)

एक विलसणारा कांचन जसा अशी पिवळी, एक नव्या मेघाप्रमाणें श्यामल, एक चांपेगोरीप्रमाणें–केवड्याच्या पानाप्रमाणें केवळ, एक हरित हिरव्या रंगाची. (१३५)

एक तापविलेलें तांबें जसें अशी तांबडी, एक श्वेत अशी चंद्रासारखी निव्वळ, अशीं अनेक वर्णांचीं माझीं रूपें पाहा. (१३६)

ही आन आन एकाहून एक निराळी अशी, भिन्न अशी, अशा आकृतीमध्येंही पण एक सारखेपण नाहीं–: एक तर इतकी सुंदर कीं लाजून जाऊन कंदर्पही शरण रिघाला अशी–; कृति जेथें केली जात नाहीं तेथें मग दुसरा उपाय तो कोणताच सांपडणारा होत नसल्यानें आतां आकृतीच जशी का व आतां येथें (अक्षता भिजविलेले तांदुळ!) तांदुळाच जसा ह्या मदनानें आपलासा करून आश्रयाचा केला, तेथें सौंदर्यच एक आयतेंच जसें का, तेथें कंदर्पही लज्जायमान होऊन शरण गेला अशी, तेथीलच्या आश्रयाचें का होतां आलें नाहीं. असें ते मदनाचेंहि पण शरण रिघणें जसें. (१३७)

एक तर साकारतेमुळें अति लावण्यवंत अशी, लावण्यसागर अशी, एक स्निग्ध=स्नेहवपुमुळें का मनोहारी अशी, तेथें शृंगारलक्ष्मीचीं भांडारेंच उघडिलीं आहेत जशीं का. (१३८)

एक पीन–पुष्ट अवयव समांसाळ, एक अति शुष्क अशी विक्राळ, एक तर दीर्घ कंठाची, म्हणजे लांब मानेची, एक विशाळ मस्तकाची, अशी वेताळे का विताळे, एक अकटोविकट अशी. (१३९)

याप्रमाणें नानाविधाकृतीची–आकृतीच तेथें अनेकविधा कृति त्यांना पारच नाहीं. हे सुभद्रापति! अशा त्याच्या एक एकाच्या आंगप्रांतीं जग हें पाहा–जगासच कीं तेथें पहा. (१४०)

**श्लोक ६ वा**

**पश्यादित्यान्वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**

आदित्यान्=बारा आदित्य. वसून्=अष्टवसू. रुद्र=अकरा रुद्र; ११ ही संख्या (रुद्ररोदनं=सोनेंरुपें). अश्विनौ=अश्विनीकुमार. मरुत=एकुण–पन्नास मरुत् देव, गण समुदायः अदृष्टपूर्वाणि (अदृष्ट=दैव, पूर्वजन्मींचें पापपुण्य) पूर्वीं न पाहिलेलीं अशीं आश्चर्ये, स्वरूपें. पश्य=पाहा, पाहा.

अन्वय—भारत । आदित्यान् । वसून् । रुद्रान् । अश्विनौ । तथा मरुतः । अदृष्टपूर्वाणि बहूनि आश्चर्याणि । पश्य ॥ ६ ॥

अर्थः—आतां येथें ह्या माझ्या देहामध्येंच कीं जे बारा आदित्य त्यांना पाहा. त्याचप्रमाणें अष्टवसु, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, एकूणपन्नास मरुत् नामक देव का गण समुदाय (महादेवाचे सेवक) त्यांनांही पहा. हे भरत–कुलोत्पन्न अर्जुना! येथें पूर्वीं कधींही नच पाहिलेलीं अशीं आश्चर्येंच आश्चर्यें, आश्चर्यांची अशीं तीं स्वरूपें पाहा. (श्लोक ६ वा ओ. १४१–१४७)

**(पश्यादित्यान्)**
**जेथें उन्मीळण होता दृष्टी। तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी।**
**पुढती मिनलनिमि दिठी (निमीलनी मिठी)। देत आहाती ॥ १४१ ॥**
**(वसून्) वदनीचिये वाफेलवे। होत ज्वालामय आघवे।**
**येथ पावकादिक पाहावे। समूह वसूंचे ॥ १४२ ॥**
**(रुद्रान्) आणि भ्रूलतांचे सेवट। कोपे मिळो पाहाती एक वाट।**
**तेथ रुद्र गणांचे संगट्ट (संघाट)। अवतरत देख ॥ १४३ ॥**
**(अश्विनौमरुतस्तथा) पै सम्यतेचा वोलावा। मिति नेणिजे अश्विनौ देवा।**
**श्रोत्रि होत पांडवा। अनेक वायु ॥ १४४ ॥**
**(बहून्यदृष्टपूर्वाणि) या परी येकेकाचिये लीळे। जन्मती सुरसिद्धांची कुळे।**
**शांत अपारे आणि विशाळे। रूपे इये पाहे ॥ १४५ ॥**
**जयाते सांगावया वेद बोबडे। पाहावया काळाचेही आयुष्य थोडें।**
**धातया परी न सांपडे। ठाव जयाचा ॥ १४६ ॥**
**जयाते वेदत्रय कधी नाईके। (पश्याश्चर्याणि भारत) तिये इये प्रत्यक्ष देख अनेके।**
**भोगी ऐश्वर्याची (आश्चर्याची) कौतुके। महासिद्धि ॥ १४७ ॥**

उन्मीळण (उघडणें) होता दृष्टी–उन्मीलन होत आहे दिठी. मिनलनिमि दिठी–निमीलनी मिठी=मिटल्यावर विलीन होत असतात. (१४१) वदनीचिये– वदनीचिया. येथ–जेथ. पाहावे पावे. वसूचे–वसूंचा. (१४२) संघट्ट–संघाट. देख–देखे. (१४३) सम्यतेचा–सौम्यतेचा (सम्यक्=प्रिय, योग्य, रम्य.) श्रौत्रि होत–श्रोत्री होती. (श्रोत्रिय=वेदवक्ता ब्राह्मण.) (१४४) शांत–ऐसी. पाहे–पाही. (१४५) थोडे–थोडके (१४६) वेदत्रय–वेदत्रयी. नाईके–नायके. ऐश्वर्याची–आश्चर्याची. कौतुके–कवतिके. (१४७)

जेथें दृष्टि उघडली होत आहे तेथें कीं अहो! आदित्यच आदित्य! सृष्टीच सृष्टि! आदित्याच्यापुढें पसरल्या आहेत असें दिसत आहे. नंतर डोळे मिटल्यावर त्या विलीन होत आहेत. (डोळे मिटतांनाही पण तेथें डोळे उघडण्यामिटण्याची मिठीच कीं पडली होत आहे.) (१४१)

अहो! तेथीलच्या वदनामधून जी वाफ निघत आहे, तिजबरोबर सर्व कांहीं अवघे ज्वालामय होत आहे; तेथेंच कीं पावक आदिकरून जे ते अष्टवसूंचा समूहच–,अष्टवसूंचा समुदायच कीं तो असें म्हटले होत आहेत. (१४२)

अहो! भ्रुलताचे शेवट जेथ एकत्र मिळूं पाहातात तेथें अकरा ही संख्या रुद्राची ती तेथें रुद्र गणाचें समुदाय अवतरत आहेत, उपजत आहेत, उगवत आहेत, असें दिसत आहे. (१४३)

अहो! सौम्य सौम्य असाच कीं एक तेथें ओलावा (सौम्य! इदम् एकम् ब्रह्म आसीत् अग्रम) तेथें माझ्या सौम्यतेच्या आश्रयाने अश्विनीकुमार इतके उत्पन्न झाले–होत आहेत कीं तेथें मितीच नाहीं; ह्या कानामध्यें तर अनेक वायु उत्पन्न होऊन वाहात आहेत. (१४४)

याप्रमाणें एकएका ह्या अदृष्टपूर्वाणि अशा माझ्या वदनाच्या सहज लीलेमध्येंच कीं सुरांची तसेंच सिध्दांचीं कुळें ही जन्म घेत आहेत–जन्मत आहेत, उगवत आहेत. अशीं अनेक अपार व विशाल मोठीं रूपेंही इथें पाहा. (१४५)

ह्या रूपाविषयीं सांगतां सांगतां वेद बोबडे तोत्रेच कीं होऊन आहेत. तें रूप पाहाण्यासाठीं तर काळाचेंही आयुष्य अल्प असें होय; बहुत काय पण अहो! ब्रह्मदेवासहीपण येथीलच्या त्या रूपाचा ठाव सांपडणारा होत नाहीं कीं! (१४६)

ज्या स्वरूपाला वेदत्रयी ही कधीं ऐकत नाहीं अशी ती इथे, प्रत्यक्ष अनेक अशी देख, व आश्चर्याची कौतुकेंच सर्व अशी एक महासिध्दीच कीं, उपभोगण्याचे करून का भोगून ऐस! भोगीत रहा. (१४७)

**श्लोक ७वा**

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

इह (ऐहिकीच्या)=ह्या माझ्या देहांत. एकस्थ=एका–, आत्म्या, वरच–, उमे झालेलें. कृत्स्नंजगत्=सर्व जग. आद्य=सर्वांचें आदि जे आद्य, आजीचे, सद्यःकालीन, आजकालचें. सचराचरं=चराचरासहित. मम देहे=ह्या माझ्या देहांत. गुडाकेश=निद्रेचा स्वामी, निद्रा आकळणारा, निद्रा जिंकणारा.

**अन्वय.**—गुडाकेश। इह–मम देहे। सचराचरम् कृत्स्नं जगत् आद्य एकस्थं। तयाच यत् अन्यत्। द्रष्टुम् इच्छसि। तत्हि पश्य!

**अर्थ**:—हे निद्रा जिंकणाऱ्या अर्जुना! येथें इह ह्या माझ्या देहांत एकस्थ, (ब्रह्मस्थ) आद्य असें सर्व चराचर जगत् पाहा, तसेंच आणीकही जें जें कांहीं पाहूं इच्छितोस तेंही पाहा. (श्लोक ७वा ओ. १४८–१६२)

**(मम देहे गुडाकेश) ईयां मूर्तीच्यां कीरीटी। रोम मुळी देख पां सृष्टी।**
**सुरतरू तळवटी। तृणांकुर जैसे ॥ १४८ ॥**
**आणि चंडवाताचेनि प्रकाशे (वातायनाचेनि प्रभासे)। उडता परिमाणु दिसती जैसे।**
**भ्रमत ब्रह्मकटाह तैसे। अवेव संधी ॥ १४९ ॥**

(इहैकस्थं) येथ येक येकाच्या प्रांत देशी। विश्व देख विस्तारेसी।
(यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि) आणि विश्वहि परौते मानिसी। जरी देखावे वर्ते॥ १५०॥
तरि इही विषयीं काही। येथ सर्वथा सांकडे नाही।
सुखे आवडे ते माझ्या देही। देखसी तूं॥ १५१॥
ऐसे विश्वमूर्ति तेणे। बोलिले कारुण्यपूर्णे।
तंव देखतु आहे कीं नाही म्हणे। निवांतचि येरू॥ १५२॥
येथ कां पां हा उगला। म्हणौनि श्रीकृष्णे येरू पाहिला।
तंव आर्तीचे लेणे लेइला। तैसाचि आहे॥ १५३॥
(न तु मां इति)
मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे। अझुनि सुखाचि सोय न सांपडे।
परि दाखविले ते फुडे। नाकळेचि येया॥ १५४॥
हे बोलोनि देव हासिन्नले। हांसोनि देखणिया म्हणितले।
आम्हि विश्वरूप दाखविले। वरी देखसी ना तूं॥ १५५॥
(अर्जुनाशयः) यया बोला येरे विचक्षणे। म्हणितले हां जी कवणा ते उणे।
तुम्हि बका करवि चांदिणें। चरऊं पाहा मा॥ १५६॥
हा हो उटुनिया आरिसा। आंधळेया दाऊं बैसा।
बाहेरिया (बहिरिया) पुढें श्रीहृषीकेशा। गाणिक करा॥ १५७॥
मकरंद कणाचा चारा। जाणता घालुनि दर्दुरा।
वाया धाडा मग श्रीसारंगधरा। कोपा कवणा?॥ १५८॥
जे अतिंद्रिय म्हणौनि व्यवस्थिले। केवळ ज्ञानदृष्टीचया भागा फिटले।
ते तुम्ही चर्मचक्षूंपुढे सूदले। मी कैसेनि देखो?॥ १५९॥
परि हे तुमचे उणे न बोलावे। मी साहे तेचि बरवे।
येथ आथि म्हणितले देवे। मानु बापा॥ १६०॥
सांच विश्वरूप जरि दावावे। तरी आधी देखावया सामर्थ्य द्यावे।
परि बोलत बोलतही प्रेमभावे। धसाळ गेलो॥ १६१॥
काय जाले न वाहाता भोय परिजे। तरी तो वेळु सिकिलिया जायिजे।
परि आतां (दिव्यं ददामि ते चक्षुः) माझे निजरूप देखिजे। ते दृष्टी देऊं तुज॥ १६२॥

मूर्तीच्या–मूर्तिचिया. तृणांकुर–त्रृणांकुर. (१४८) चंडवाताचेनि प्रकाशे=दश्यामुळे-(प्रकाश=मोठ्यानें, बहुजनसमक्ष, विवेक, ज्ञान, वृक्षहीन, उमललेले, प्रकाशणारा उजेड, प्रदर्शन, कीर्ति, फैलाव. चंड=तीव्र, उष्ण, चपल, चिंच, यमकिंकर, रागीट. चंडेश्वर=शंकर. चंडकुसुम=तांबडी कण्हेर. चंडांशु=सूर्य.) वातायनाचेनि प्रभासे. (वातायन=घोडा तंबू खिडकी, देव्हडी, झरोका; प्रभास=प्रभाषणं, स्पष्टीकरण, तेज, सौंदर्य). उडता–उडत. परिमाणु–परमाणु. अवेव–अवयव. (१४९) येक येकाचिया=एकेकाचिया. मानिसी–मानसि. (१५०) इही–इयेही. विषयीं–विषयींचे. माझां–माझिया. (१५१) देखतु–देखत. का–कीं. म्हणे–न म्हणें, ना म्हणें. (१५२) येरु–जंव. (१५३) हासिन्नले–हांसिले. दाखविले–तरि दाविले. वरी–परी. (१५५) विचक्षणे=चतुर, दक्ष. कवणाते–कवणासि ते. चरऊ–चरवूं. (१५६) उटुनिया–उटोनिया=घासून पुसून, स्वच्छ करून. दाऊं–दावूं. बाहेरिया–बहिरिया (बहिऱ्या). गाणिक–गाणिव (गाणें). गाणिक्यं=वेश्यासमूह. गणक=मूल्यवान्. गणिका=चीस भुलवून आणणारी हत्तीण. गाणपत=समुदायाचें, मुख्यत्वाचें. (१५७) मकरंद=पुष्परस,

पुष्पमधु. सारंगधरा–शार्ङ्गधरा. (१५८) व्यवस्थिले–व्यवस्छिले. दृष्टीचया–दृष्टिन्चिया. कैसेनि–कैसेन. देखो–देखे. (१५९) मी–मीचि. (१६०) दावावे–आम्हि दावावे. यावे–कीं यावे. धसाळ गेलो= विसरून गेलो, मनाचे मोकळेपण अतिशयतेचे झाले का उदार असें झालें. (१६१) काय–काई. वाहाता–वाहता. भोय–भुई. वेलु सिकिलिया जायिजे–वेलु विलया जाईजे. परि–तरि. देऊ–देवो. (१६२)

हे कीरीटी ! ह्या मूर्तीच्या रोमरोमाच्या मुळांमध्येंच कीं सृष्टि ही (अथवा सृष्टीच्या सृष्टीच) पाहा. ती सृष्टि किंवा त्या सृष्टि त्या कशा दिसत आहेत म्हणशील तर जशा का देव वृक्षाच्या–सुरतरूच्या तळामध्येंच खालीं कीं जसें तृणांकुर उगवावेत तशा दिसत आहेत. (१४८)

(१) चंडवात म्हणजे वावटळ सुटली असतां तिच्या प्रकाशानें उडत असलेले पृथ्वीचे परमाणु जसे दिसतात तसे ह्या मूर्तीच्या अवयवाच्या सांध्यामध्यें ब्रह्मकटाह अनेक ब्रह्मांडें भ्रमत आहेत असें दिसत आहे.

(२) घोड्याच्या सौंदर्य तेजाचे प्रभास तेज तेथें परमाणु उडत रहातात ते द्वारकेजवळ असलेलें जें वीर्य त्या वीर्यामुळें तर तेज सौंदर्य–त्यामुळें जें कांहीं स्पष्टीकरणांत येणारे परिमाणु [परमाणु (व्रीहि अथवा) कवडशांतल्या कणांचा एकतिसांश $\frac{1}{30}$ परिमाण=मोजणें, प्रमाण, इयत्ता, वजन, किंमत, आकार, माप, वजन, तोळा, शेर, पायली, गज, महिना, इत्यादि. (अक्षर, शब्द मात्रांनीं मीयते इति मात्रा)] ते त्या स्पष्टीकरणाच्या तेजानें का सौंदर्यामुळें जसें का ब्रह्मकटाहच ह्या मूर्तीच्या अवयव–अवयवासांध्याच्या ठायीं दिसणारे होत आहेत.

(३) खिडकी, झरोका, देव्हडी, तंबू, इत्यादींच्या स्पष्टीकरणावरच जें कांहीं तेज पडतें, प्रकाशतें, का जें सौंदर्य म्हणून आहे, तें त्या तंबूस का देव्हडीस म्हणा, खिडकीस म्हणा का झरोक्यास म्हणा. जे कांहीं स्पष्ट करण्यानें सौंदर्य येणारे, तेथें ब्रह्मकटाहच जणूं त्या मूर्तीच्या अवयव संधीमध्यें दिसत आहेत.

उष्णवाताच्या उजेडानें कवडश्यातल्या कणाच्या एकतिसांश $\frac{1}{30}$ ते कण उडतांना दिसतात जसे अथवा झरोक्यांतून पडलेल्या कवडश्यामध्यें जसे परमाणु भ्रमत असलेले दिसतात (उजेडानें व्रीहि जशा उडत दिसतात) तसें ब्रह्मकटाह मूर्तीच्या अवयव संधीचे ठायीं भ्रमत आहेत असें दिसतें आहे–असें दिसत आहे. (१४९)

अशा त्या एक एका ब्रह्मांडाच्या कडेस, कांठी, शेवटीं अग्रभागीं, सीमेवरच्या देश म्हणजे जागेवर, दृष्टीच्या टप्यामध्यें अथवा नियमामध्यें विश्वच सर्व कीं विस्तारासहित पाहा, तसेंच विश्वाच्या पलीकडचेही कांहीं एकादें पहाण्यांत आलें–पाहाणें घडले; तर तेहीपण तेथेंच घडत असलेलें–वर्तत असलेलें (उदरनिर्वाहाचें) आहे कीं. (१५०)

विश्वाच्या पलीकडचेंही जरी पाहाणें घडलें तरी सुद्धां येथें कांहीं बिघडले असें होणार नाहीं–संकट वाटणार नाहीं. जें कांहीं आवडेल ते सुखानेंच कीं माझ्या देहामध्यें तूं पाहाशील. (१५१)

कारुण्यपूर्ण अशा श्रीविश्वमूर्तीनीं श्रीकृष्णानीं तेव्हां पाहात आहे कीं नाही, असें तेथें कांहीं हुंकाराचें तें होईना म्हणून, तो अर्जुन तर निवांतच कीं असें पाहून ! (१५२)

श्रीकृष्णांनीं तेव्हां अर्जुन येथें उगीचच कीं आहे असा जेव्हां पाहिला तेव्हां तर तो (देहबुद्धीचें पाहाणें तें बहिर्मुखाचें तें तें पाहाण्यांतच गुंग झालेला) आर्तीचे लेणे लेईला आहे–असा मूळचा जसा होता तसाच कीं तो आहे असाच त्यास दिसला. (१५३)

वर देवांनीं म्हणूं केलें कीं येथें हा अर्जुन तर अतिशयच उत्कंठित असा त्याची ती रूप पाहाण्याची उत्कंठा मुळींच कमी नाहीं, ओहटीची झालेली नाहीं; पण त्यास अजुनही कांहीं सुखाची ती सोय सांपडत नाहीं असें दिसतें. देवांनीं जें कांहीं दाखविलें तें त्यास खरोखर आकळत नाहीं असें दिसतें. (१५४)

असें बोलून देवांनीं हास्य केलें व हांसून देखणा, पाहाणारा जो अर्जुन त्यास म्हणूं केले कीं, आम्हीं विश्वरूप तें दाखविलें–दाविलें पण तूं तर ते देखतच का पाहातच मुळीं नाहींस कीं! (१५५)

(यावर आतां अर्जुनाचा अभिप्राय तो कसा तें सांगतों) अशा ह्या त्या विश्वरूपाच्या बोलण्यावर सर्वज्ञ दक्ष असा जो अर्जुन त्यानें म्हटलें कीं हो! हो! अहो जी! हे मग तें असें जें तें कुणास बरें उणें असें कुणाचें तें उणें पाहाणारे ते! अहो देवा! तुम्हीं तर चकोराच्या ऐवजीं बकाकडूनच कीं चांदणें तें चरवूं पाहात आहांत कीं–अहो चातक का हंस तेच तें चांदणें चरणारे–आचरणारे–सेवन करणारे–व्यवहारास घेणारे (चरविणारे) होतील ना? काय बगळे का मिथ्यात्व का ढोंग सोंग ते चांदण्याचें भोजन करणारे होतील? (१५६)

अहो! आरसा घासूनपुसून स्वच्छ करून तो तर तुम्हीं आंधळ्याच्या पुढें करीत आहांत! बहिरा का बर्हिमुख जो त्याजपुढें कीं अहो, हृषीकेशा गायनाचें तें गाणें गाऊन, (दाखवून दाखविण्याचें का गाणें) गाण्याचे ते करीत आहांत कीं व्यभिचारी भक्तीचे सामुदायिक असे ते करीत आहांत ना! (१५७)

अहो पुष्पांमधील रसांचा चारा पुष्पमधुचा चारा तो बेडकास का दर्दुरामच कीं, (गांवांच्या समुदायास–मेघांस–एका पर्वतासच कीं, वाघ जे त्यास कीं) जाणून बुजून घालून कीं वायां जाणें जें त्या पुष्परसाचें तेंच तुम्हीं करीत आहांत व मग वर अहो! शार्ङ्गधरा कोप करीत आहांत जे ते कुणावर बरें अहो? (१५८)

अहो! जें ज्ञानदर्शन अतिंद्रिय असें–इंद्रियाच्या आटोक्यांतलें नव्हे असें तें आहे, अशी जी व्यवस्था ह्या ज्ञानासंबंधीं शास्त्रांनीं सांगितली, जी स्थापना, स्थिति, शास्त्रानुरूप नियम, निश्चितता, कबुलायत दर्शन–, (अहो जें केवळ एका ज्ञानदृष्टीनेंच सर्वथैव पाहिलें देखिलें, प्राप्त होणारे पाहातां येतें, ज्ञानदृष्टीच्या वांट्यास असलेलें असें जें) तें तर तुम्हीं चर्मचक्षू म्हणजे आंधळ्या पुढेंच कीं टविलें–सूदलें–असें तें मी कसें बरें देखणार कीं अहो! अहो! (१५९)

पण तुमचें असें हें उणें काढावें का (बोलणें) बोलावें तें केंव्हांहि न–अहो, येथें मीच ते सहन करून असावें हेंच बरें, मीच येथें नच बोलावें हें बरें! यावर देवांनीं म्हटलें कीं अहो! तुझें हें म्हणणें खरेंच खरें (यथा) असें आहे. आम्हींही ते मानतों–कबूल करतो कीं. (१६०)

खरें तें विश्वरूप जर का दाखविण्याचें करीत आहांत तर मग अगोदर तें पाहाण्याचें सामर्थ्य ह्या दृष्टीस देणें ते नको का? वर देवांनीं म्हणूं केलें कीं हो! हो! अहो! दृष्टिसामर्थ्य द्यावेंच द्यावें अगोदर व मगच कीं तें रूप दाखवावें असें आहे पण बोलतां बोलतां सहजपणेंच कीं एका प्रेमभावामुळेंच मी तें विसरलों गेलों व मुकाट्यानें स्वस्थच कीं राहिलों (प्रेमभावें जीव जगीं या नटला एकचि रस प्याला.) (१६१)

अहो! येथें विशेषसें असें कांहीं झालें तरी तें कां तसें कां कसें म्हणावें? कारण जमीनीची सेवा केल्याशिवाय का ती जमीन नच नांगरतां जर का तिजमध्यें बीं पेरिलें तर तो वेळ लयाचा होतो, का लपण्याची जी जागा जें घर तेथिचा होतो–अथवा वेल म्हणजे उपवन नुसतें शिंपण्याचें केलें तर तो वेळ वांयाच (का व्यर्थ) जातो का शिकण्यासवरण्यावरच जातो. (तें गमन चलन का कंप तो का चालन तें वायांच जावें असें होतें) करितां आतां माझें निजरूप तें पहाण्यासाठीं तुजला दिव्य दृष्टि देतों. त्या दिव्य अशा आपल्या चक्षूंनीं तें तूं देखावेंसच–तुझ्या दृष्टिस तें दिसावेंच असें होईल! (१६२)

**श्लोक ८ वा**

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥**

द्रष्टुम=पाहाण्यास, देखणे देखण्यास. शक्=समर्थ असणें, संभवणें, शक्य असणें स्वचक्षुषा–अनेन एव=ह्याच आपल्या डोळ्यांनीं. (चक्ष्=पाहाणें, स्पष्ट बोलणें.) दिव्यं ददामि ते चक्षुः=तुजला दिव्य असे स्वर्गीय, सुंदर, तेजस्वी, देवाचे डोळे देतो. मे योगम् ऐश्वरम् पश्य=माझा योग–चित्तानुरोध–जीवात्मा व परमात्मा यांचा संयोग. ऐश्वरम् (ईश=१ शक्ति असणें. २ समर्थ, स्वामी, धनी, महादेव.)=ईश्वराचें ईश्वरत्व, महादेवाचें देवपण, महत् दिव्य असें जें स्वामीचें श्रेष्ठपण, परमेश्वराचें सर्व शक्तिमान् असें जें ईश्वरत्व, श्रेष्ठत्व.

अन्वय—अनेन एव स्वचक्षुषा। मां द्रष्टुं न शक्यसे। तु। ते दिव्यं चक्षुः ददामि। मे योगम् ऐश्वरम् पश्य।

अर्थ :—ह्या तुझ्या आपल्या डोळ्यांनीं मजला पाहाणें शक्य नाहीं, संभवनीय नाहीं. मजला पाहाण्यास तूं समर्थ ( योग्य का सिद्ध ) होणार नाहींस म्हणून तुजला दिव्य असे तेजस्वी डोळे का स्वर्गीय दृष्टि देतों. माझे (ईश्वरप्राप्तीच्या उपायाचे का सान्निध्याचे योगाचे जे आत्मयोगाचे असें जें कांहीं) ईश्वरत्व ऐश्वर्याचें तें पाहा. ॥ ८ ॥ (श्लोक ८ वा ओ. १६३–१६४)

**(पश्य मे योगम् ऐश्वरम्) मग तिया दृष्टि पांडवा। आमचा ऐश्वर्य योग आघवा।**
**देखोनिया अनुभवा। माजिवडा करी ॥ १६३ ॥**
**ऐसे तेणें वेदांतवेद्यें। सकळ लोक आद्यें।**
**बोलिले जी आराध्यें। जगाचेनि ॥ १६४ ॥**

माजिवडा–मा जिवडा ( जिवडा माज करी ) करी=जीव हा अनुभवानें अनुभवास आण. (१६३) सकळ लोक आद्ये–सकळ लोकैक–लोकएके आद्ये=सर्वांच्याहि मूळ पुरुषानें. आराध्यें=परमपूज्य अशा कृष्णानें, जगाच्या उपास्ये ( देवतेनें ) सर्व जगानें आराधना करण्यास का तोषविण्याम का संपादण्यास योग्य असे जे (१६४)

हे पांडवा! मग त्या दृष्टीनें, त्या डोळ्यांनीं आमचें जें ईश्वराचें ईश्वरत्व तें कसें आहे ? परमेश्वराचे शक्तिमानत्व ते योग्य, सिद्ध का समर्थ असें तें कसें तें सर्व पाहून देखण्याचें करून ह्या अहो ह्या जीवड्यास अनुभवाचे कर–अहो जीवडा जीव तो प्रत्यक्ष ज्ञान परिणामाचा कर, व ज्यांत जडस्वरूपाचा त्याग करून केवळ आनंद स्वरूपाचें आणि परमात्म्यांशीं असलेल्या ऐक्यभावाचें चिंतन केलें जातें ज्यांत योगी परमात्मा आणि इतर सारे विश्व यांच्या ऐक्यांचा अनुभव होतो. (१६३)

असें (ह्या वेदांतानें शब्दब्रह्मानें जाणण्यास योग्य अशा) भगवंतांनीं ( सकळ लोक जन जग निजस्वरूप, असामान्य तोच आद्य असा प्रथमचा मूळचा सर्वांचाहि जो मूळ पुरुष अशा– ) जगाच्याही जगानें पूजा–आराधना करण्यास का तोषविण्यास का संपादण्याम योग्य अशा जगाच्या उपास्यानें बोलिलें की जी. (१६४)

**संजय उवाच—**

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः।**
**दर्शयामास पार्थाय परमम्रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

ततः=(त्यास दिव्यदृष्टि दिल्यापासून–दिव्यदृष्टि दिली म्हणून) त्यानंतर, त्याअर्थीं. राजन्=स्वामी, राजा, श्रेष्ठ, [नांवापुढें लावलेलें उपपद जसें–हे धृतराष्ट्रराजा ( राजन् ), जसें–चंद्र–रामचंद्र ] महायोगेश्वरः=(महायुग=चार युगांचा काळ) ज्यांत जड स्वरूपाचा त्याग करून केवळ आनंदस्वरूपाचें आणि परमात्म्याशीं असलेल्या ऐक्यभावाचे चिंतन केलें जातें.

तसेंच ज्यांत योगी, परमात्मा आणि इतर सारें विश्व यांच्या ऐक्याचा अनुभव होतो

(अनुभव येतो) तो महायोग-अशा महायोगाचें जें ऐश्वर्य-ईश्वराचें ईश्वरत्व, श्रेष्ठपण, सर्व शक्तिमान असें. हरिः = संसार तम्, नाम, विष्णु, सूर्य-चंद्र, शंकर, अग्नि (सिंह, घोडा, वानर) इत्यादि, रूपम् = हिरवा तांबडा, तांबूस, पिंगट, उदी, रंगाचें, पार्थाय दर्शयामास-दर्शयामास, आश्वासयामास = पार्थास दर्शन दिलें, स्वरूप (आरसा, डोळा) देखणें दाखविलें. रूपम् परमम् ऐश्वरम् = (परमम् = उत्कृष्ट, सर्व श्रेष्ठ, पराकाष्ठेचें, मुख्य, उच्चैः उत्कृष्ट. रूपम् = स्वभाव, शरीर आकृति, प्रकार, सौंदर्य वर्ण. ऐश्वरम् = ईश्वराचे ईश्वरत्व.

अन्वय:—

संजय उवाच—

राजन्। एवम् उक्त्वा। ततः। महायोगेश्वर। (ईश्वरः) 'हरिः। ७०।' परमम्। रूपम्। ऐश्वरम्। पार्थाय दर्शयामास ॥ ९ ॥

अर्थ—

**संजय म्हणाला:**—हे राजा! या प्रमाणें बोलून नंतर दिव्य दृष्टि दिल्यानंतर (ज्यांत योगी परमात्मा व सारें विश्व यांचे ऐक्य असते अशा योगानें समर्थ का शक्तिमान असलेले शक्तिपणाचे श्रेष्ठ ईश्वर स्वामी, का महादेव) श्रीहरि त्यांनीं आपलें (सर्व श्रेष्ठ ईश्वराच्या) ईश्वरत्वाचें अर्जुनास दर्शन दिलें. (स्वभाव, आकृति, प्रकार सौंदर्याचें तें) आपल्या रूपाचें स्वरूपाचें असणें तें पार्थास देखणें दाखविलें (आपलें ईश्वराचें ईश्वरत्व पार्थास (आरसा डोळा कां) स्वरूप ते पार्थास पाहविलें, दर्शनाचें केले ॥ ९ ॥
(श्लोक ९ ओव्या १६६-१९६)

**(संजय उवाच्:—राजन्)**
**पैं कौरव कुळ चक्रवर्ति। मज हाचि विस्मय पुढत पुढति।**
**जे श्रियेहुनि त्रिजगति। सदैव असें कवणि ॥ १६५ ॥**
**(महायोगेश्वरः)**
**नातरि खुणेचे वाणावयालागी। श्रुतिवांचुनि दावा पा जगी।**
**नातरि सेवकपण आंगीं। शेषाच्याचि आथी ॥ १६६ ॥**
**हां हो जयाचेनिहि सोसे। सिणती आठ प्रहर योगी जैसे।**
**अनुसरले गरूडा ऐसे। कोणिह आहे ॥ १६७ ॥**
**परि ते आघवेचि येकिकडे केले। सां पे श्रीकृष्ण सुख येकंदरे जाळे।**
**जिये दिवसाहुनि जन्मले। पांडव हे ॥ १६८ ॥**
**परि पांचाहि आंतु अर्जुना। श्रीकृष्ण सावियाचि जाला आधीना।**
**कामुक जैसा अंगना। आपैता कीजे ॥ १६९ ॥**
**पढविले पाखिरू ऐसे न बोले। या परि क्रीडामृगहि तैसा न ले।**
**कैसे दैव येथ सुरवाडले। ते जाणो न ये ॥ १७० ॥**
**आजि परब्रह्म सगळे। भोगावया दैवाचे डोळे।**
**कैसे वाचेचे हन लळे। पाळित आसे ॥ १७१ ॥**
**हा कोपे कीं निवांत साहे। हा रुसे तारे बुझावित जाये।**
**नवल पिसे लागले आहे। पार्थाचे देवा ॥ १७२ ॥**
**येन्हवि विषय जाणोनि जन्मले। जे शुकादिक दादुले।**
**ते विषय वानिताचि जाले। भाट जयांचे ॥ १७३ ॥**

हा योगियांचे समाधि धन-। की होऊन ठेले पार्था आधीन।
या लागि विस्मय माझे मन। करितसे राया ॥ १७४ ॥
तेवीचि संजय म्हणें कायिसा। विस्मय थोर कौरवेशा।
श्रीकृष्णें स्वीकारिजे तया ऐसा। भाग्योदय होये ॥ १७५ ॥
(एवमुक्त्वा) म्हणोनि तो देवांचा रावो। म्हणें पार्था ते तुज दिठी देवो।
जया विश्वरूपाचा ठावो। देखसी तूं ॥ १७६ ॥
(ततः) ऐसी श्रीमुखौनि अक्षरे। निघति जंव ना येकसरे।
तंव अविद्येचे आंधारे। जावोचि लागे ॥ १७७ ॥
ते (ती) अक्षरें नव्हति देखा। ब्रह्म साम्राज्य दीपिका।
अर्जुना लागी चित्काळिका। उजविल्या श्रीकृष्णे ॥ १७८ ॥
(दर्शयामास पार्थाय)
मग दिव्य चक्षु प्रगटला। तया ज्ञानदृष्टि फाटा फुटला।
यया परि दाविता जाला। ऐश्वर्य आपुले। १७९ ॥
(परमम्) हे अतार जे सळक। ते जिये समुद्रीचें कल्लोळ।
विश्व हे मृगजळ। जया रश्मिस्तव दिसे ॥ १८० ॥
जिये अनादि भूमिके निटे। चराचर हे चित्र उमटे।
आपणपे श्रीवैकुंठें। दाविले तया ॥ १८१ ॥
मागा बाळपर्णी येणे श्रीपति। जै वेळ येकु खादली माती।
तै कोपोनिया हाती। यशोदा धरिला ॥ १८२ ॥
मग भेणे भेणे जैसे। मुखि झाडा घावयाचेनि मिसे।
चौदाही भुवनें सावकाशे। दाविली तिये ॥ १८३ ॥
नातरि मधुवनि ध्रुवासि केले। जैसे कपोळ शंख सिवंतले।
आणि वेदाचियेहि मति ठेले। ते लागला बोलो ॥ १८४ ॥
तैसा अनुग्रहो पै राया। (हरिः) श्रीहरि केला धनंजया।
आतां कवणिहिकडे राया। ही माया ऐसि भाष नेणेचि तो ॥ १८५ ॥
(रूपमैश्वरम्)—
येकसरे ऐश्वर्य तेज पाहिले। तया चमत्काराचे एकार्णव जाले।
चित्त समजि (समाजी) बुडोनि ठेले। विस्मयाच्या ॥ १८६ ॥
जैसा आब्रह्म पूर्णादकी। पोहे मार्कंड एकाकी।
तैसा विश्वरूप कौतुकी। पार्थ लोळे ॥ १८७ ॥
म्हणें केवढे गगन एथ होते। ते कोणे नेले पां केउते।
ते (ती) चराचर महाभूते। काई जाली ॥ १८८ ॥
दिशांचे ठायेहि हारपले। अधार्ध (अधोर्ध्व) नेणो काय जाले।
चेहलिया स्वप्न तैसे गेले। लोकाकार ॥ १८९ ॥
नाना सूर्य तेज प्रतापे। सचंद्र तारांगण जैसे लोपे।
तैसी गिळिली विश्वरूपे। प्रपंच रचना ॥ १९० ॥
तेव्हां मनासि मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपेचि न सांवरे।
इंद्रियाचे रश्मि माघारे। हृदयावरि भरिले ॥ १९१ ॥

तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडले । ठकासि ठकपण ठेले ।
जेथ मोहनास्त्र घातले । विचार जाता ॥ १९२ ॥
तैसा विस्मित पाहे कोडे । तंव पुढां चतुर्थु होते रुपडे ।
तेचि नानारूप चहुंकडे । मांडोनि ठेले ॥ १९३ ॥
जैसे वर्षाकाळीचे मेघोडे । कां महाप्रळईचे तेज वाढे ।
तैसे आपणेनिविण कव्हणिकडे । नेदिचि उरो ॥ १९४ ॥
प्रथम रूप समाधान । पावोनि ठेला अर्जुन ।
सवेचि उघडिले लोचन । तंव विश्वरूप देखे ॥ १९५ ॥
ईहीची दोन्ही डोळां । पहावे विश्वरूप सकळा ।
तो श्रीकृष्णे सोहळा । पुरविला ऐसा ॥ १९६ ॥

बाणावया–वानावया. दावा–दाखवा की अहो. नातरी सेवकपण–ना सेवकपण तरी. (१६६) सिणती–सिणत. आठै–आठही. प्रहर–पाहार=प्रहर. कोण्हि–कवण (१६७) सां पे–(सां पे कृष्ण सुखा एकंदरे जाहाले–कृष्ण थोर सुखा भरले न कृष्ण सुख एकंदर जाले) साम्+सा=सांत्वन, सलोखा, तह, सौम्यपण, स्तोत्र, सामवेद, सुरावर म्हटलेली ऋचा, गानभेद, सुर, स्वर, समता, सामान्य धर्म पे–(प+ह) प=२१ संख्या, रक्षक पिणारा. येकंदरे=एकपणाचे, एकास्थानीचे. दिवसाहूनी–दिवसीहूनि (१६८) सावियाचि=सहज. आधिना–आधीना. जैसा–कां जैसा. आपौता–आपैता=स्वाधीन. (१६९) न ले–न बोले, न चाले: सुरवाडले=अनुकुल झाले. (१७०) सगळे–हे सगळे. दैवाचे–सदैव याचेचि. (१७१) जिणोन=जिंकून. दादुले=परम समर्थ, जितेंद्रिय, समर्थ, नवरा, घरमालक, धनी. विषय [ विषय–(विषयांतचि=सर्वत्र जाणारे, व्यापक जाणारे, असें विष, विषय.)] वानितांचि निवांत जाले विषयचि वानिता जाहाले=देवाची रासक्रीडा वर्णून कृतार्थ–, निवांत झाले–, राहिले. भाट=स्तुतिपाठक. जयाचे–ययाचे. (१७३) आधीन–अधीन. (१७४) कायिसा–कायसा. विस्मय–विस्मयो. होये–होय. (१७५) दिठी–दिव्यदृष्टि. जया–जे या. (१७६) तंव–जंव. [तंव–तंव तंव जों जों–तों तों. तन्मय जाहाले–(तंबक्षीर=तंवक्षखीर, वंशलोचन. तवराजः='हड' वनस्पतीनें शुद्ध केलेली साखर.) तविष= समुद्र, स्वर्ग, सामर्थ्य, धंदा, व्यवसाय, सुंदर आकृति, नदी, पृथ्वी. (१७७) ते–ती. ब्रह्मसाम्राज्यदीपिका =ब्रम्हींचें साम्राज्य दाखविणाऱ्या मशाली. उजळिल्या–उजळलिया. चित्कळिका=ज्ञानकलिका, कळि बुद्धिरूप फुलांच्या कळ्या, ज्ञानदिवा. (१७८) चक्षु=डोळा, प्रकाश. प्रगटला–प्रकटला=स्पष्टपणें आला, व्यक्त झाला. पाटा (फांटा) फुटला=ज्ञानदृष्टि वाढली. ययापरी–येयापरी. ऐश्वर्य=ईश्वरी सामर्थ्य, विश्वरूप. (१७९) कल्लोळ–कां कल्लोळ. (१८०). निटे समान पातळीचा, सपाट, नीट, स्वच्छ. आपणपे=स्व–स्वरूप. (१८१) वेळ येक–एक वेळ. माती–होती माती. (१८२) मुखि–मुखीं. चौदाही चवदाही (१८३) मधुवन=वसंत वनामध्यें; यमुनेच्या तीरावरील एक वन. यामध्यें एक मधु नांवाचा राक्षस राहात असे. ह्या वनाचा पुढें शूरसेन देश झाला. याच ठिकाणीं शत्रुघ्नाने मथुरा स्थापिली. ध्रुवासि= स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाला. शंख–शंखे ठेले=नच आकळले. (१८४) अनुग्रह–अनुग्रहो=स्वीकार, कृपा. कवणिहिकडे राया–कवणेकडे ही माया. (१८५) तेज पाहिले–तेजें पाहालें (ईश्वराचें ऐश्वर्य.) पकाशले. एकार्णव=समुद्रतुल्य अशी (स्वरूपेंच, स्वरूपें). जाले–जाहाले. समजि (समज्या=सभा, मंडळी.)–समाजी=जमाव, सभा. विस्मयाच्या–विस्मयाचिया=आश्चर्यमय झाले. (१८६) आ, आड =सर्वत्र, समुच्चय अर्थी–आब्रह्म=सर्वत्र चैतन्य तत्व, ब्रह्मतत्व भरलेलें, अशा पाण्यामध्यें. मार्कंड– मार्कंडेय=ऋषिविशेष. आपण अल्पायुषी आहों असें कळल्यावरून यमदूत आले असतां यानें शंकराच्या पिंडीस विळखा घालून धांवा केला. तेव्हां शंकरांनीं त्यास वांचवून उदंड आयुष्य दिलें. एकाकि=

असहाय, एकटा. (१८७) कोणे-कवणे. ते चराचर-तीं चराचरें. काईजाली-काय जाहाली. (१८८) ठावेहि-ठावही. अधार्ध-अधोर्ध्व. (अधस्=पाताळांत, अधोलोक, खालचे बाजूचा अर्धे=स्थान. अर्ध=निम्मा भाग, किंवा अर्ध्याहून अधिक अर्धार्ध-अर्धार्धे=चतुर्थांश. अध्यर्ध=दीड, वरचा अर्ध.) नेणों काय जालें-काय नेणों जाहालें. चेइलिया=जागे झाल्यावर. लोकाकार=जन, जग, अवलोकन, आकृति चिन्ह, तोंडाचे भाव. (लोकानुराग=भूतदया.) (१८९) आपणपेंचि=आपलें सर्वस्व. इंद्रियाच्या रश्मि=इंद्रियाचे (वृत्तीरूप) किरण. रश्मि=(लगामाची दोरी) किरण. (१९१) ताटस्थ= उदासीनता, सानिध्य, स्तब्धता. ठकासि ठकपण ठेलें-ठकासि ठक लागले= (ठ=बारा संख्या, टक= एकाग्रता, तटस्थता. टकि=बांधणें. टंक.) (१९२) चतुर्भु=चार यज्ञाग्नि [(१) दक्षिणाग्नि, (२) गार्हपत्य, (३) आहवनीय, श्रौतस्मार्त-अग्नि. (अहिताग्नि=अग्निहोत्री आहित = ठेवलेले, केलेले.) पंचमहायज्ञांपैकीं (१) ब्रह्मयज्ञ, (२) देवयज्ञ, (३) पितृयज्ञ, (४) भूतयज्ञ, (५) मनुष्ययज्ञ, चतुर्भुज=चतुर्भुज आकृति विष्णु, चौकोन. (चतुर सन्=विष्णु, सनक, सनंदन, सनत्कुमार, सनातन हीं रूपें. चतुर वर्ग= धर्म, अर्थ, काम, मोक्ष. धनुर्वेद चतुर=ग्रहण, धारण, प्रयोग, प्रतिकार, चतुर भद्र=(१) धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांनीं युक्त. (२) धर्म, अर्थ, काम, बल.) (१९३) मेघोडे-मेघौडे=मेघ. आपणे-नविण- आपणाविण. कव्हणिकडे-कवणीकडे. (१९४) (स्वरूप=(१) तुल्य, सुंदर, शहाणा. (२) सहज स्वाभाविक, स्थिति, (३) स्वभाव प्रकार.) रूप [=(१) लक्षण, स्वरूप. (२) रूप, चेहरा. (३) आकार, आकृति. (४) अनुरूप, साजेसें. (५) चक्षुरिंद्रियांचा विषयरंग व आकार. (६) दृश्यपदार्थ. (७) मूळधर्म, स्वभाव. (८) रुपया नाणें. (९) प्रकार, पद्धत. (१०) चिन्ह, लक्षण. (११) जात. (१२) प्रतिबिंब, प्रतिमा. (१३) सादृश्य. (१४) कित्ता. (१५) एक (१ संख्या.) (१६) व्यक्त संख्या (अंक). (१७) अध्ययन. (१८) शब्द. (१९) खिल्लार, पशु (२०) कविता.]-स्वरूप=मूल स्वभाव, आकार, प्रकार इत्यादि. उघडिले-उघडि. (१९५) दोन्हि-दोहि. विश्वरूप-विश्वरूपा. (१९६)

संजय म्हणाला :—हे कौरवकुळांतील चक्रवर्ती राजा, धृतराष्ट्रा, मजला पुन्हः पुन्हः हेंच एक आश्चर्य वाटत आहे कीं, ह्या श्रियेपेक्षांहीं कोणी दुसरी एकादी ह्या त्रिभुवनामध्यें, सदैव, देव दैव सान्निध्याची निरंतरतेच्या भाग्य ऐश्वर्याची अशी कोणी आहे काय-असेल काय? (श्री म्हणजे धनीपणाची का मालकी हक्क बाळगणारी अशी, आश्रयणारी, स्थितीला जाणें, वास करणें, अवलंबणें, पूजा करणें, सत्कार करणें, चिकटून रहाणें. श्री म्हणजे=शिजवणें. अधिश्री=तापविणें.) (१६५)

अथवा खुणेचे, चिन्हाचे, लक्षणाचे ते, टोकण्याचे ते वर्णन करण्यासाठीं, अहो! दाखवा कीं ह्या जगी श्रुति (वेद, कान, गायनांत स्वरांच्या मूर्छना.) माऊली वांचून दुसरी एकादी कोणी आहे का? का सेवकपण पहावें तों तें शेषाच्या (दोन हजार डोळ्यांचा जो शेष त्याच्या) आंगींच कीं आथी आथी बहु- योग्य असें ते सेवकपण वाखाणिलेलें कीं. (१६६)

हां अहो! माझें म्हणणें ऐका कीं, ज्या स्वरूपाच्या हव्यासानें का इच्छेनें सोसानें-सोसाचें होऊन योग्याप्रमाणें-जसा का योगीच होऊन-जो अनुसरत (पद्धतीचें अनुकरण करणारा) आहे ; आठही प्रहर सोब- तीचा होत आहे असा गरुडासारखा कोणी आहे का? (१६७)

पण तें अवघें सर्व कांहीं बाजूसच राहिलें. प्रस्तुत तर-सांप्रत श्रीकृष्ण सुखच एकंदरतेस आलें आहे. सर्व अवघा श्रीकृष्णच एक असें होऊन आहे. ज्या दिवसापासून, कीं ज्या दिवशीं श्रीकृष्ण ते जन्मले, पांडव हे जन्मले. (१६८)

कृष्ण सुख पांडवांचे ठायींच भरून आहे; पण पांचाहिमध्यें अर्जुनासच कीं भगवान श्रीकृष्ण तर सहजपणेंच वश झाला आहे, त्याच्या आधीन झाला आहे. अहो, कामुक म्हणजे विषयासक्त (उपमा-

चक्रवाक अशोक.) जसा अंगनेनें अथवा कन्याराशीनें–आपैता म्हणजे स्वाधीन केला–(सर्वत्र स्मरण पिढिजाद दास जसा–) होतो का जसा. (१६९)

पढविलेले (शिकविलेले) पांखरूंही असें सुरस बोलत नाहीं का बोलणारें नव्हे, अहो! क्रीडा मृगहीपण तसा चालत बोलत नाहीं–(पाळलेले पशुही इतके आज्ञाधारक नसतात जसें का–नच अंगीं हेंणें लेवून असत नाहीं.) अहो, ह्या अर्जुनाचे दैव–भाग्य कसें येथें देवपणास अनुकुल आलें आहे (पहा). तें कांहीं जाणता–समजण्यास–येतच नाहीं. (१७०)

आज सगळेच्या सगळें हें परब्रह्म भगवान श्रीकृष्ण ते भोगावे–उपभोगावे तेथे ह्या अर्जुनाचे की डोळे सदैव असे. (निरंतरच्या देवपणाचे असेंच कीं, एक दैव भाग्य पाहात आहे अहो कसें ते पाहा कीं) वाचेचे लळे (तो भगवान श्रीकृष्ण कीं, ह्या अर्जुनाच्या तोंडचे शब्द) कसे झेलीत आहे, पाळित पोषित आहे. अर्जुनाचे डोळेच कीं भगवंतानीं आपलेसे केले आहेत (रक्षिले आहेत, व्यापिले आहेत, भोगिले आहेत, संयोगाचे केले आहेत, उपभोगले आहेत कीं) जे का त्यांच्या तोंडून जे जे कांहीं शब्द येत आहेत ते ते त्यांनीं समृद्ध केले आहेत–(उल्हसिततेनें उपभोगिले जात आहेत, धारण केले जात आहेत.) (१७१)

अर्जुन रागावला तर देव हे तर तें रागावणें निमुटपणेंच कीं सहन करीत आहेत. हा (अर्जुन) रुसला तर त्यास समजावित आहेत. अहो! नवलच कीं एक जे का ह्या देवास तर पार्थाचें वेडच एक लागलें आहे कीं! (१७२)

एरव्हीं पाहिलें असतां विषय जिंकून जे शुकादिक समर्थ असें दादुले जन्मलेले ते तर विषयच कीं सर्वत्र (जाणारे) व्यापक आहेत असे वर्णितांना त्यांचे त्या विषयाचे स्तुतिपाठकत्वच होऊन आहे [ते विषयच कीं निवांतपणें त्यांचे (शुकादिकांचे) स्तुतिपाठक झाले कीं.] (१७३)

हा परब्रह्म भगवान श्रीकृष्ण तर योगियांचे समाधिधन–भाग्य ते तर सर्वथैव पार्थाच्या आधीन होऊन आहे. या कारणास्तव अहो! राया, माझे मन विस्मय का आश्चर्यच एक करीत आहे! मजला आश्चर्यचकितता येऊन आहे. (१७४)

आणखीही संजय म्हणाला कीं, अहो कौरव ईशा! येथें विस्मय तो कसचा तरी? कारण भगवान श्रीकृष्णांनीं ज्यास स्वीकारावें त्याचा तर असा भाग्योदय केव्हांही होतोच कीं! तो तर भाग्यशालीच म्हणावा कीं. (१७५)

या करितां तो देवाचा राव भगवान श्रीकृष्ण म्हणत आहे कीं, हे पार्था! तुजला दिव्य असें दृष्टीचें सामर्थ्य देऊं, ज्यायोगेंकरून ह्या विश्वरूपाचा अंत, सीमा, ठावच एक तूं पाहाशील कीं! (१७६)

अशीं तीं भगवान श्रीकृष्णाच्या श्रीमुखांतून अक्षरें निघतात न निघतात तों तों एकदमच (अविद्या–अज्ञानाची–अहंकारें–) अज्ञान–आंधारे तीं जाऊं लागलीं, नाहींशीं होऊं लागलीं, नाहींशीं होत आहेत असें झालें. (१७७)

अहो असें पहा कीं, तीं कांहीं साधीं अक्षरें नव्हतीं, ती तर ब्रह्माचें ऐश्वर्य दाखविणारी मशालच का चित् कलिका ज्ञान दिवटीच एक, तो ज्ञान दिवाच तेजोमय असा, श्रीकृष्णानीं उजळ केलेला, प्रकाशिलेला कीं. (१७८)

त्या ज्ञान दिव्यानेंच का दिपामुळेंच एकदिव्य असा डोळा (का चक्षूच) उगवला प्रगटला व त्यास ज्ञानदृष्टीचा एक फांटा फुटला असें झालें. याप्रमाणें आपलें (ईश्वराचें ईश्वरत्व) ऐश्वर्य देव अर्जुनास दाखविता झाला. (१७९)

रामकृष्णादि अवतार जे सकळ, ते ज्या ब्रह्मतेज सागराचे कल्लोळ तेथें तर हे विश्व का जग हे मृगजळासारखें जसे त्या दिव्यतेज राशीच्या योगानें दिसणारें होत आहे. (१८०)

अहो! ज्या आरंभ-उत्पत्ति रहित ईश्वरत्वाच्या अशा अनादि सत्स्वरूपाच्या भूमिकेवरच कीं हें चराचर स्थावर जंगम अद्भुततेचें चित्रच एक असें उमटत आहे. तें आपलेंच स्वतःचे सर्वस्वच की भगवान् श्री वैकुंठांनीं, श्रीकृष्णांनीं त्या अर्जुनास दाखविलें. (१८१)

पूर्वी बाळपणीं ह्या श्रीपतीनें—श्रीविष्णूनीं जेव्हां की एक वेळ माती खाल्ली होती, तेव्हां तर यशोदा-मातेनें कोपास चढून त्याला हातींच धरिलें, त्याचा हातच कीं धरिला. (१८२)

व त्यामुळें भीतभीतच कीं जसें का मुखींचा झाडाच एक यावा ह्या उद्देशानें–निमित्तानें कीं अगदीं (स अवकाशपणें) सावकाशपणें तिजला आपला आधार देऊन—आपल्या ठायींच्या थाऱ्याची करून चौदाही भुवनें दाखविलीं. (१८३)

अथवा अहो! देव प्रगट झाल्यावर स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाला मधुवनामध्यें–शत्रुघ्नानें स्थापिलेल्या मथुरा नगरीमध्यें, वनामध्यें वसंत (वसंत पुष्प–वन रसास आलें जसें) तेथें भगवान श्रीकृष्णांनीं त्याचे कपोल प्रांत (गुडघ्यावरची वाटी अथवा) गालप्रदेश ते शंखानें सिंधु पुष्पानें स्पर्शिले; त्यायोगेंकरून तर तो ज्या गोष्टी वेदांच्याहि मतीनीं नच पाहिलेल्या त्याच कीं अप्रतीमतेच्या अशा तो बोलूं लागला. (१८४)

तशाच तऱ्हेचा कीं स्वीकार, उपकार का कृपा (इंद्रियग्रह नच पण) कीं अहो, राया, भगवान श्रीहरीनीं धनंजय अर्जुनावर केली; त्यायोगें तर मायाच कीं ती हे राया! अशा तऱ्हेचें कांहींही बोलणें त्यानें केलेंच नाहीं. (ही माया आहे असें त्याने म्हटलें नाहीं. त्यास माया अशी ही कल्पना का बोलीच मुळी ती आली नाहीं. मायेसंबंधींची भाषा, बोली का कल्पना त्यास सुचली नाहीं) माया अशी गोष्ट का माया असे कांहींच बोलिले जाईना.–माया ती त्यास सूचित झाली नाहीं. कारण कृपाच कीं ती सर्व परमेश्वरच कीं, देवपणच एक तेथें संचरून असलेलें. (१८५)

एकदम ईश्वराचें ईश्वरत्व तेंच ऐश्वर्याचे असें तेजच कीं प्रकाशलें तेथें सर्व चमत्कारच चमत्कार! अनेक अनेक चमत्कारच ते सर्व एका समुद्रासारखे अफाट असें होऊन आहेत; एकत्रित होऊन आहेत. दृष्टीच्या आटोक्यांत येऊन आहेत; चित्तास विस्मय वाटून ते अनेक समाजामध्येंचे कीं! असें होऊन आहेत. (१८६)

सर्वत्र ब्रह्म उदकच परिपूर्ण असें भरलेले तेथें मार्कंडेय तो एकटाच असहाय असा पोहत आहे तो आपण अल्पायुषीच कीं असें कळल्यावरून यमदूत आले असतां त्याने शंकराच्या पिंडीस घट्ट विळखा घालून शंकराचा धांवा केला, तेव्हां शंकरांनीं त्यास वांचवून पूर्णायुष्याचें–उदंड आयुष्याचें केलें–शंकरानीं त्यास उदंड आयुष्य दिलें. त्या मार्कंडेयाप्रमाणें अर्जुन एकटा असहाय असा, कौतुकानेंच कीं तो विश्वरूपामध्यें लोळत आहे. !! (१८७)

तो म्हणतो कीं अहो, केवढें तरी येथें आकाश (गगन) तें होतें; तें कोणी कुठें नेलें? तें काय जाहालें! व तीं चराचरींची महाभूतें तीं काय जहालीं कोण जाणे!!! (१८८)

दिशांचे (ठाय ठाव)–ठाव का ठिकाणही येथें लागत नाहीं. दिशा सीमा नाहींशा झाल्या, हारपल्या. येथें दीड तसेंच वरचा अर्ध तो काय झाला? कुठें गेला. अहो! जागें झाल्यावर स्वप्न पडणें जसें संपतें, तसें लोकांचे आकारही आतां दिसत नाहींत–, नाहींसे झाले आहेत! (१८९)

अथवा सूर्य तेजाच्या प्रतापानें चंद्रासहितही तारांगण गगन तें लोपतें जसें, त्याप्रमाणें ह्या विश्वरूपानें तर सर्व वस्तु (प्रपंच रचनाच तिन्हीं देव तेच मुळीं) गिळून टाकली, आंत सामावून घेतली आहे! (१९०)

त्यामुळें कीं अहो! मनास तर आपलें मनपण ते स्फुरेचना! बुद्धि ती आपल्या स्वतःच्या बुद्धि-सर्वस्वास, जाणतेपणास सांवरूं शकत नाहीं; व ह्या इंद्रियांपासून निघणारे जे तन्मात्ररूपी वृत्तिकिरण ते तर हृदयाच्याठायींच सर्वथैव भरून गेले आहेत. हृदयच एक तेथें भरभरून आलें आहे त्या वृत्ति किरणांनीं कीं! (१९१)

उदासीनपण, स्तब्धता–सान्निध्यता तीं सन्निधतेचीं सर्वथैव झालीं आहेत. एकाग्रतेस एकाग्रता येऊन आहे. जेथें का सर्व विचारांना अविचारणीयानें, एक मोहिनीच जशी घातली आहे असें होऊन आहे! (१९२)

तसा अर्जुन तर विस्मित होऊन आहे, विस्मयाचा होऊन आश्चर्यच एक असा आश्चर्याचा होऊन कौतुकानेंच कीं पाहात आहे! जें चतुर्भुज सांवळें सुंदर रूपडें त्याजपुढें होतें तेंच कीं अनेक रूपांवरच मांडलें गेलें आहे, पुढें होऊन आहे! तेथें ब्रह्म, देव, पितर व मनुष्य ह्या चार यज्ञाग्नींचें केलेलें तें चतुर्भुज तेंच कीं यज्ञभूत म्हणजे झालेलें आहेपणाचें जें त्या अर्जुनाच्या होण्यावरच, असण्यावरच, आहेपणावरच कीं मांडलें जात आहे, पुढें येऊन आहे! अहो, यज्ञभूत असाच कीं तो अर्जुन म्हटला गेला. (१९३)

पावसाळ्यामधील मेघ ते सर्व कांहीं व्यापून आहेत. जसे मेघा(आपणा)शिवाय कोणीहीकडे कांहींही उरत नाहीं; मेघच एक (आपण) सर्वाठायीं व्यापून आहे, पुरता होऊन आहे, किंवा महाप्रळयाचे वेळेस सर्व एक तेजच मुळीं वाढतें असें व्यापक, तसा अर्जुन आपणच एक सर्व तेजाच्या वाढीचा, व्याप्तीचा (आपण) तेज व्याप्तीच एक आपणच ते व्याप्ति तेज वाढतें आहे असा झाला. (१९४)

येथें आतां प्रथमतः त्या चतुर्भुज रूप दर्शनानें तर त्यास समाधानच एक पोहोंचलें पावते झाले, व आतां सहजच त्यानें डोळे उघडले, तों काय! विश्वरूपच एक कीं, (देखत आहे तो) तो पाहात आहे!(१९५)

ह्याच इहीं दोन्हीं डोळ्यांनीं सकळ, सर्वच्या सर्व त्या विश्वरूपास पाहावें, अशी इच्छा करून असलेला जो अर्जुन, त्याचा हट्टच तर आतां सर्व कांहीं विश्वरूपमय करून टाकल्यानें–(विश्वरूप पाहाण्याचा हट्टच त्याचा तो भगवान) श्रीकृष्णांनीं अशा ह्या रूपाच्या सोहळयानें, (सर्वत्र तेच एक मिरविलें मांडल्यानें) पुरविला कीं! (१९६)

**या इथून पुढें** आतां पांच श्लोकांत भगवंतांनीं आपल्या विश्वरूपाचें ऐश्वर्य वर्णिलें आहे—

**श्लोक १० वा:—**

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम्।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्॥ १०॥**

(तत्र कृत्स्नं अविभक्तम् जगत्–तत् एकस्थम् देवदेवस्य शरीरे तदा पांडवः अपश्यत.) (१३)

अद्भुत दर्शनम्=आश्चर्यकारक अशारूपाचा देखावा, [अद्भुत=(१) चमत्कारिक, आश्चर्यकारक, नवरसांपैकीं एक. (२) रूप=दर्शनम्. दर्शनम्=पाहाणे, अवलोकन, ज्ञान, नेत्र, आरसा, रूप (सांख्य-मिमांसादि प्रत्येक.) अभिप्राय; श्रृंगारचेष्टांमधील पहिलें.] वक्त्र=तोंड, मुख, चेहरा. (वक्त्र आसवः=लाळ. वक्त्रखुर=दांत. वक्त्रज=ब्राह्मण. वक्त्रतालं=तोंडानें वाजविण्याचें वाद्य. वक्त्र परिस्पंद=भाषण. वक्त्र भेदिन्=कडुपणा. वक्त्रवासः=नारिंग. वक्त्रशोधनं–वक्त्रशोधिन्=ईडर्निंबू.) नयन=डोळा, नियम, मार्गास लावणें, डोळयांतील बाहुलीं. (नयन उर्ध्वेज्य=भिवई. नयन छदः=पापणी. नयनोत्सव=दिवा, ज्यापासून डोळयांस आनंद होतो तो.) दिव्य आभरणम्=स्वर्गीय सुंदर तेजस्वी, देवाच्या कसोटीची आभरणें अलंकार, (भूषण, पोषण.) दिव्य अनेक उद्यत् आयुधम्=उद्यत (=तीव्र, कठोर, शिक्षित, व्यग्र, उद्योगी, तत्पर, सज्ज, जवळ आलेले, आरंभलेले, ओढलेले, उचललेले.) (यम) उचललेले, नियमन केलेले, हत्यार, आयुध, शस्त्र, (आयु=आयुष्य.) (आयुधिकः आयुधीय=योध्दा. आयुधंपिशाचिका=युद्धाचे वारे. आयुषं=आयुष्यं.)

**अन्वय:**—तत् विश्वरूपम्–अनेक वक्त्रम्–अनेक–नयनम्–अनेक अद्भुत दर्शनम्–अनेक दिव्य आभरणम्–अनेक दिव्य उद्यतं आयुधम् देवदेवस्य शरीरे अपश्यत.

**अर्थ:**—तें दर्शन कसें होतें म्हणावें तों–त्या रूपाला अनेक मुखें होतीं–अनेक नेत्र होते–अनेक अनेक अशी त्यांत अद्भुततेचीं देवतादर्शनें (दिसत) होतीं. अनेक असे दिव्य तेजस्वी अलंकार त्याजवर घातलेले होते. त्याचे हातांमध्यें दिव्य अशीं तेजोमय आयुधें शस्त्रें होतीं (त्याचे हातांनीं दिव्य तेजोमय अशी अनेक शस्त्रें धारण केलीं होतीं, का उचलून धरिलेली होतीं.) ॥ १० ॥ (श्लोक १० ओ. १९७–२१७)

**शृंगार रस:—**

**(अनेक वक्त्र नयन) मग तेथें सैंध देखे वदने । जैसि का रमानायकाचीं राजभुवने । नाना प्रगटली निधाने । लावण्यश्रियेची ॥ १९७ ॥**

**कीं आनंदाची वने सासिन्नली । जैसि सौंदर्या राणिव जोडली ।**
**तैसी मनोहरे देखिली । श्रीहरीची वक्त्रे तेणे ॥ १९८ ॥**
**तयाही माजी एकैके । सावियाचि भयानके ।**
**काळ रात्रिचि कटके । उठावलि जैसी ॥ १९९ ॥**
**की ये मृत्यूसीचि मुखे जाली । हो का जे भयाची दुर्गे पन्नासिली ।**
**की महाकुंडे उघडिली । प्रळयानळाची ॥ २०० ॥**
**तैसि अद्भुत भयासुरे । तेथ वदने देखिली वीरे ।**
**आणिके असाधारणे साळंकारे । सौम्ये बहुते ॥ २०१ ॥**
**पै ज्ञानदृष्टीचेनि अवलोके । परि वदनांचा सेवट न टके ।**
**मग लोचन ते कौतुके । लागला पाहो ॥ २०२ ॥**
**तंव नाना वर्ण कमळवने । कि विकाशलि तैसि अर्जुने ।**
**नेत्र देखिले पाळिंगने । आदित्यांची तैसी ॥ २०३ ॥**
**तेथचि कृष्ण मेघाचिया दाटि । माजिकल्पांत विजूंचिया स्फुटि ।**
**तैसिया वन्हि पिंगला दिठी । भूभ्रंगातळि ॥ २०४ ॥**
**(अनेकाद्भुत दर्शनम्)**
**हे एकेक आश्चर्य पाहाता । तिये एकेचि रूपी पंडुसुता ।**
**दर्शनाची अनेकता । प्रतिफळली ॥ २०५ ॥**
**मग म्हणे चरण ते कवणिकडे । केउते मुकुट के दोर्दंडे ।**
**ऐसी वाढविता हे कोडे । चाड देखावेयाची ॥ २०६ ॥**
**तेथ भाग्यनिधि पार्था । का विफल होईल मनोरथा ।**
**काय पिनाकपाणीचिया भाता । वायकांडे आहाति ? ॥ २०७ ॥**
**नातरि चतुराननाचिये वाचे । (काय) आहेति लटकिया अक्षरांचें सांचे ।**
**म्हणोनि साद्यंतपण आपाराचे । देखिले तेणे ॥ २०८ ॥**
**जयाची सोय वेदा न कळे । तयाचे सकळावेव येकेचि वेळे ।**
**अर्जुनाचे दोन्हि डोळे । भोगिते जाले ॥ २०९ ॥**
**चरणौनि मुकुटवरि । देखत विश्वरूपाचि थोरि ।**
**(अनेक दिव्याभरणं) जे नाना रत्न अलंकारि । मिरवित असे ॥ २१० ॥**

परब्रह्म आपलेनि आंगे। लेयावया आपणचि जाला अनेगे।
तिये लेणि मी सांगे। काईसया सारिखी॥ २११॥
जये प्रभेचिया झळाळा। उजाळ चंद्रादित्य मंडळा।
महातेजाचा जिव्हाळा। जेणे विश्व प्रकटे॥ २१२॥
तो दिव्यतेज श्रृंगारु। कोणाचिये मतीसि होय गोचरु।
देव आपणपेचि लेइले ऐसे वीरु। देखत असे॥ २१३॥
(दिव्यानेकोद्यतायुधम्)
मग तयेचि ज्ञानाचा डोळा। पाहात कर पा(प)ल्लुवा जंव सरळा।
तंव तोडित कल्पांतिचिया ज्वाळा। तैसी शस्त्रे झळकत देखे॥ २१४॥
आपण आंग आपण अलंकार। आपण हात आपण हातियेर।
आपण जीव आपण शरीर। देखे चराचर कोंदले देवे॥ २१५॥
जयाचिया किरणाचे निखरेपणे। नक्षत्राचे होती फुटाणे।
तेजे खिरडला वन्हि म्हणे। समुद्रीं रिघो॥ २१६॥
मग कालकूट कल्लोळी कवळले। नाना महाविद्येचे (विजूंचे) दांग उमलले।
तैसे अपार कर देखिले। उदितायुधि॥ २१७॥

शृंगार=नवरसांपैकी पहिला, मैथुन, शोभा, प्रेमरस, नटणें, साजणें, हत्तीची सोंड रंगविणें. शृंगार-योनि=मदन. रमानायक=विष्णु (रमा=पत्नि. लक्ष्मि, संपत्ति, सुदैव, कांति, शोभा. रमास्पद=श्रीकृष्ण, रमापति. रमाप्रिय=विष्णु. रमाप्रियं=कमळ. नायक=पुढारी, पति, उपपति, माळेंतलें पदक, पद्मबीज, मुख्य पुरुषपात्र.) राजभुवने=मालकीचे स्वर्ग. (राज=यक्ष, सोम, मालक. भुवन=जग, लोक, स्वर्ग, जन, पाणी, आकाश. भुवनेश=राजा. भुवनौकस्=देव. भुवनकोष=भूगोल. भुवन-त्रय=स्वर्ग, मृत्यु, पाताळ.) निधान=आधार, निधि, खजिना. लावण्यश्री=सौंदर्य, सेवा, सौंदर्य शोभा, सौंदर्य पाळणे जे. प्रकटली=व्यक्त स्पष्ट होऊन आली. (१९७) सासिन्नली=भरास आली. आनंद-वन=सुखाचीं घरें, अरण्यें, समुदाय, पाणी. (वन अर्चक=माळा गुंफणारा. वन अलिका=सूर्यकमळ. वन आखु=ससा. वन आखुकः=रान मृग वनमाला=गुडघ्यापर्यंत लोंबणारी माळ. वनलक्ष्मी=केळ. वनवासिन=डोम कावळा, डुकर. कंद (व०) वनसरोजिनी=रान कापशी. आनंदकानन=काशी क्षेत्र. आनंदपट=वधूचा लग्नांतील पोशाख. आनंदथुः=हर्ष. आनंदि=जिज्ञासा, आनंद (१९८) सावियाची=सहजजि. (१९९) जाली–जाहली. महाकुडे=(कुंड=स्थाली, कमंडलु, तळें, पुष्करिणी, माप (वि.) पतिजिवंत असता जारापासून झालेला, टांकी, भिक्षापात्र, कुंडउध्नि=मोठ्या कांसेची गाय. कुंडकीटक=वेश्यापालक.)=महत् होमकुंडे, वैश्वदेवाचें पात्र. पन्नासिली=शृंगारिली, रचिली, विस्तारिली. (२००) मयासुर–भ्यासुर असा धारणे=विलक्षण. (२०१) अवलोके न टके=पाहाण्याने शेवट लागत नाहीं. (२०२) पालिंगने–पालेगने=समुदाय, पंक्ति, ओळ, पृथ्वी, (पाल्=संरक्षण करणें). नानावर्ण-नानावर्णें. (२०३) तेथचि–तेथेचि. स्फुटि–फुटि=प्रगट होणें, विकास, चमकणें, चमक, वन्हि. पिंगळा=अग्निप्रमाणें पिंगट. भ्रुभंगातळी=भिंवयाखालीं. (२०४) प्रतिफळली=अनुभवास आली, नांवरूपास आली. (२०५) दोर्दंडे=बाहु: केउते=कोणीकडे. कोडें=आवडीने. (२०६) विफल–विफलत्व. पिनाकपाणीचिया–पिनाकपाणी-याच्या–आता काय कांडे=काय महादेवाच्या भात्यामध्यें वायफळ जाणारे असे बाण कधीं सांपडतील–असतील काय? (२०७) चतुरानन=ब्रह्मदेव. सद्यःसद्यंतपण=साद्यंतपण आहेती–आहाती. (२०८) वेदाजयाचि सोय नकळे=वेदांना ज्याचें पूर्ण अस्तित्व मार्ग, अंत, खोली, सोय, लाभली नाहीं, लागली नाहीं. सांपडली नाहीं; सकळावेव–सकळावयव; एकेचि–एकाचि. (२०९) चरणौनि मुगुटवरि=पायांपा-

सून मुगुटा का मस्तकापर्यंत. विस्व–विश्व. (२१०) कायिसयासारिखे=कशासारखी. (२११) झळाळा= प्रकाशानें, कांतीनें. उजाळू=तेज, प्रकाश तेजस्विना. प्रभा–जे प्रभा मंडळा जे=प्रभा कांतीनें तेजस्विना आलेली चंद्र व आदित्य मंडळांनां, बिंबांना जी प्रकटे–प्रगटे. (२१२) मतिसी होय गोचर=बुद्धिला कळणार, समजणार. (२१३) तेथचि ज्ञानाचा डोळा–तेथेंचि ज्ञानाचिया डोळा पाहात करपाल्लवा–पाहात पाहात करपल्लवा=हातांची चंचलता किंवा विस्तार, हाताना. (२१४) हतियेर–हातियार. (२१५) निखरेपणे=प्रखरपणामुळें. खिरडला=पोळलेला, दिपून जाऊन मार्गे हटलेला. होति–होत. (२१६) कालकूट कल्लोळी=काळकूट विषाच्या प्रचंड लाटांनीं महाविद्येचें (विद्या=तत्वज्ञान, ब्रह्मज्ञान, ज्ञान, विद्या, मंत्रशास्त्र, पार्वती, विद्याधर, विद्याध्र=उपदेवविशेष.) (महाविद्युत्‌चे) महाविजूंचें; डांग=मोठा समुदाय, अरण्य उमलले–उमटले. उदितायुधि–उद्यतायुधि. (२१७)

त्या रूपामध्यें पुष्कळशीं तोंडें–वदनें तो पाहात आहे. तीं तोंडें कशीं तर जशीं का रमास्पद जो भगवान श्रीकृष्ण त्याची रमण्याची ती स्वर्गीय ठिकाणेंच अनेक अशीं अथवा ती आधाराची अशी लावण्य सौंदर्य सेवेची शोभा, सौंदर्य पालन करणारी पाळणेंच व्याप्ति, विशालता, जशी ती व्यक्त स्पष्ट प्रगट होऊन असलेली अशी. (१९७)

सुखाचीं घरेंच कीं भरास आलेलीं जशी सौंदर्यासच ते अधिकारास्पदतेचें जोडणें जोडलेले तशी त्यानें श्रीहरीची वक्त्रे चित्ताकर्षक सुंदर, मनोहर, अशीं पाहिलीं. (१९८)

त्यामध्येंही एक एक तर भयकारक, भयंकर, भयानक सहज अशा रसांत, व्यवहारित असलेली जशी कां काळवेळेची अशी रात्रीची तीं सैन्येंच उठाव घेऊन आहेत अशीं. (१९९)

तीं कशीं तर जशीं का मृत्यूसच कीं मुखें झालीं. ती जशी भयाची दुर्गेंच कीं विस्तारलेलीं, शृंगारलेलीं, रचलेलीं अशीं किंवा जशी महाप्रळयाग्नीचीं होमकुंडेंच जशी उघडली आहेत. (२००)

तशीं तीं तोंडें अद्‌भुत अशीं आश्चर्यकारक, चमत्कारिक, भयासूर–भ्यासूर, तीं त्या पार्थ वीरानें पाहिलीं. व आणीकही असाधारण विलक्षण व अलंकारासहित अशीं–पुष्कळशीं सौम्य वदनें, त्यानें पाहिलीं. (२०१)

पण ज्ञानदृष्टीच्या अवलोकनानें, अथवा ज्ञानचक्षु म्हणजे बुद्धिच्या पाहण्यानें पाहिलें तर तेथें वदनांचा तो शेवटही लागेना; म्हणून सहज कौतुकानेंच कीं, तो अर्जुन त्या विश्वरूपाचे डोळे–लोचन पाहूं लागला ! (२०२)

तों ते लोचन कसें तर अनेक वर्ण कमळाची वनेंच कीं विकासलेलीं, तशा पंक्तीच–समुदायच कीं आदित्यांचे–देवांचे ते अर्जुनानें देखिले. (२०३)

तेथें कृष्णमेघांच्या दाटीमध्यें कल्पांत समयींच्या विजांच्या कडकडाटामुळें–प्रफुल्लिततेचें असें फोडण्यानें विकासानें, चमकण्यानें भिंवया–भुवयांखालीं तर वन्हीप्रमाणें पिंगट अशी दृष्टि–नेत्र का अवलोकन शक्ति ती त्यानें पाहिली. (२०४)

असें हें एक एक आश्चर्य पाहातां पाहातां त्या एकाच मुळीं विश्वरूपामध्येंच अनेक दर्शनें दर्शनास आलीं–अनुभवास आलीं. (२०५)

मग तो मनांत म्हणूं लागला कीं त्या विश्वरूपाचे चरण ते कुणीकडे आहेत कोण जाणे ! त्याचा मुगुट तो कुणीकडेस का कोठे आहे ? बाहू म्हणजे हात ते कोणते ? अशी उत्कंठा त्या रूपाचे अवयव पाहाण्याची इच्छा तो आवडीनें वाढवून आहे. (२०६)

तेथें अहो! सर्व भाग्याचा सदैवतेचा सांठाच तो अशा त्या पार्थाचे मनोरथ ते विफल निरर्थक-निरुपयोगी होतील म्हणावेत तर तसें नव्हेः तो जे जे कांहीं पाहाण्याच्या आवडीची वाढ घेऊन आहे ते ते सर्व त्यास दिसतही आहे की! अहो! ते ते सर्व पाहाण्याची त्याची हौस पुरती होऊन आहे. असें केव्हांही! कारण काय! तर अहो! महादेवाच्या भात्यांमध्यें वायफळ का फुकट जाणारे (असे वायफळ) बाण नसणारच केव्हांही! असतात काय? नसणारच. (२०७)

अथवा असेंही म्हणूं कीं काय ब्रह्मदेवाच्याही वाचेच्या ठायीं कांहीं का-खोट्या-लटक्या अक्षरांचे सांचे आहेत म्हणावें काय? केव्हांही नसणारच. आणि म्हणूनच की अर्जुनानें त्या अमर्याद, अपार अशा विश्वरूपाचें सायंतपण कीं तत्क्षणींच आतांच की सर्वपणाचें ते देखिलें. (२०८)

अहो, वेदांना ज्याचें पूर्ण अस्तित्व (मार्ग, अंत, खोली, सीमा लाभलें नाहीं, लागलें नाहीं) सांपडलें नाहीं, अशा त्या विश्वरूपाचे सकळ अवयव एकाच वेळेला, अर्जुनाच्या दोन्हीही डोळ्यांनीं भोगण्याचें केलें, उपभोगिलें, पाहाण्याचें केलें, अनुभविलें. (२०९)

चरणापासून तो मुगुटासहितही तो विश्वरूपाची ती थोरी पाहात आहे, ती थोरीव तर अनेक अलंकारांनीं शोभली-मिरवली आहे अशी. (२१०)

अहो! आपल्या परब्रह्म अंगानें तीं लेणीं धारण करावींत म्हणून अनेक अंगाचा झाला; आपल्याच अंगाने ते अलंकार लेण्यास आपणच कीं अनेक झाला आहे. तीं लेणीं कशासारखीं होतीं तें मी सांगतों. (२११)

ज्या रूपाच्या परब्रह्माच्या प्रभेच्या झळाळानें चंद्र व आदित्य मंडळें तीं प्रकाशतात, प्रभावंत होऊन शोभत आहेत तो तर अहो! महातेजाचा जिव्हाळाच कीं, ज्यायोगे हे विश्व प्रगटत आहे-दिसत आहे कीं. (२१२)

असा तो अहो! विश्वरूपाचा श्रृंगार, शोभा, प्रेमरस, नटणें, सजणें, तें कोणाच्या बरें मतीस तो कळणारा-समजणारा असा-इंद्रियज्ञान आटोक्यातलें दृश्य असें कुणाच्या मतीस, बुध्दीस, इच्छेस, सन्मानास अभिप्रायास-उपदेशास सुलभ होईल बरें असे ते देवच कीं, अहो आपले सर्वस्वानें सर्वस्वच ते आपण लेईले आहेत, असे वीर पार्थ तो देखत आहे. (२१३)

आतां तेथेंच कीं तो ज्ञानाचा डोळा संरक्षण करणारा पाहात आहे. (कर= हात किरण पल्लव, पालवी विस्तार, चंचलता.) तो सगळया विषयांचें थोडें थोडें ज्ञान जेव्हां का हात विस्ताराच्या करपालवी-करपल्लवी-सरळपणानें पाहात आहे-हातामध्यें जशी का शस्त्रेंच झळकत आहेत, ती शस्त्रे तर प्रळयाच्या-कल्पांत समयींच्या ज्वाळाच कीं त्या, ती शस्त्रें तोडीत आहेत असें अर्जुन पाहात आहे. (२१४)

आपणच आंग, आपणच अलंकार, आपण स्वतःच हात, आपणच कीं हतियेर, आपणच जीव, आपणच शरीर, असें देखणें दिसणारे ते स्थावर जंगम चराचर जग ते देवानेंच परब्रह्मानेंच स्वर्गीय कां देवच प्रकाशलेले, स्तुति केलेले आहे, कोंदलेले आहे असें देखत-पाहात आहे. (२१५)

अहो, देवाच्या म्हणजे परब्रह्माच्या किरणप्रखरपणामुळें नक्षत्रें तीं जसें कां फुटाणेच कीं भाजत फुटत आहेत; अहो! त्या परब्रह्माच्या तेजानें पोळलेला वन्हि म्हणत आहे कीं आतां तेज हे सहन होत नाहीं. परब्रह्माचे देवाचे तेज असह्य म्हणून समुद्रीच कीं रिघावा करावा का लपावें हें बरें! (२१६)

कारण की अहो तेथें देवामध्यें का परब्रह्माच्या ठायीं तर लाटा उसळत आहेत कालकूट विषाच्या कीं! अथवा महाविजूंचे पेटलेलें असें अरण्यच जसें अशीं-शत्रूंना मारण्यासाठीं शस्त्रेंच घेतलीं आहेत ज्या हातांत असे हात अर्जुनाने पाहिले. (लाटा उसळल्या आहेत कालकूटाच्या अथवा महाविजेनें अरण्यच पेटलं आहे जसें, अशी शत्रूस मारण्यासाठीं ज्या हातात शस्त्रें घेतली आहेत असें हात पाहिले.) (२१७)

**श्लोक ११वा**

**दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११॥**

दिव्य = स्वर्गीय, सुंदर, देवच. माल्य = माळ. अंबर = आकाश, कापड, मेघांचा समुदाय, कापूस. धृ = धारण करणें (धर = संरक्षक, धरणारा, पर्वत.) गंध = वास गर्व, लेशमात्र, चंदन, सुगंधी पदार्थ. (गंधर्व = कोकिळा, कस्तुरीमृग, घोडा, स्वर्गींचे गवई.) अनुलेपन = उटणें, सुगंधीद्रव्य, लावणें. आश्चर्यमयम् = विस्मयतेचा, विस्मयजनक. देवम् = ईश्वर, देवता, राजा. [ देव् = खेळणें. देवकुल = देऊळ, देवालय. देवता = देवपणा देव का देवाची मूर्ति. देवत्र = देवसेवेसाठीं दिलेली भूमि वगैरे. देवद्रोणी = देवाचा छबीना. देवन् = व्यवहार, स्तुति. देवयान = मोक्षमार्ग. देवयोनि = यक्ष, गंधर्व इत्यादि उपदेवता (देव = धर्म, पति, इंद्रिय). देवर = दीर. देवर्षि = देवता असून ऋषि. देवल = पुजारी. देवानां प्रिय = बोकड, मूर्ख. देविक = देवासंबंधीं. देवी = देवता, आंगणांतील ओटा, ब्राह्मी, गोकर्णी इत्यादि लता. सरस्वति, सावित्रि, राजाची पट्टराणी, ब्राह्मणी, दुर्गा. देवृ = दीर.] अनन्तम् = निस्सीम, अपार; विष्णु, बलराम, शेष, 'अनंत' नांवाचा हातांत बांधण्याचा चौदा गांठींचा रेशमी दोरा; ब्रह्म, आकाश. विश्वतोमुखम् = जग, ब्रह्मांड सगळा. मुख, तोंड, द्वार, प्रारंभ, उपाय, पहिला, मुख्य.

अन्वय :—(तत् विश्वरूपम् ) । दिव्यमाल्य अंबर धरम् । विश्वरूपम् दिव्य गंध अनुलेपनम् देवं सर्व आश्चर्यमयम् । विश्वतः मुखम् । अनन्तम् ।

(तत्र जगत् कृत्स्नम् अविभक्तम् तत् एकस्थम् देवदेवस्य शरीरे तदा पांडवः अपश्यत् )

अर्थ (१) स्वर्गीय, सुंदर, दिव्य अशी माळ, अशा दिव्य माला धारण केल्या आहेत, आकाश वस्त्र संरक्षणार्थ धारण केलें आहे, दिव्य, देवतुल्य असें सुवासाचें गंध–उटणें अंगी अनुलेपन केलें आहे, सर्व आश्चर्यमय असा सर्व प्रकाशमय असा देवच एक तो विश्वतोमुख अनन्त—(सर्व जगत् अविभक्त ते एकस्थ असें देवदेवांच्या शरीरीं पांडवानें तेव्हां पाहिलें.)

(२) अंगावर दिव्य माळा आणि उंची वस्त्रें असून गंधाची उटी त्यानें लाविली होती; असें तें अत्यंत आश्चर्यकारक प्रकाशमय अनंत आणि विश्वतोमुख विश्वरूप भगवंतानें अर्जुनाला दाखविलें. ॥ ११ ॥

(श्लोक ११ वा ओ. २१८–२३६)

(दिव्यमाल्यांबरधरम्)
**की भेणें तेथूनि काढि दृष्टी । मग कंठ मुगुट पाहातसे किरीटी ।**
**तंव सुरतरूची सृष्टी । जयापासोनि कां जाली ॥ २१८ ॥**
**जिये महासिद्धिची मूळपीठें । सिणली कमळा जेथ वावटे ।**
**तैसी कुसुमे अति चोखटे । तुरंबिली देखिली ॥ २१९ ॥**
**मुगुटावरी स्तबक । ठायी ठायी पूजा बंध अनेक ।**
**कंठि रूळताति अलौकिक । माळादंड ॥ २२० ॥**
**स्वर्गें सूर्य तेज वेढिलें । जैसे पंधरेनि मेरूतें मढिलें ।**
**तैसे नितंबावरि गाढिले । पितांबर झळके ॥ २२१ ॥**
**श्रीमहादेव कापुरे उटिला । का कैलास पारजे डंवरिला ।**
**नाना क्षीरोदक पांघुरविला । क्षीरार्णव जैसा ॥ २२२ ॥**

कां जैसी चंद्रमयाची घडी उपलविली। मग गगना करवि बुंथि घेवविली।
तैसी चंदन पिंजरी देखिली। सर्वांगी तेणे ॥ २२३ ॥
जेणें स्वप्रकाशा कांती चढे। ब्रह्मानंदाचा निदाघ मोडे।
जयाचेनि सौरभ्य जीवित जोडे। वेद्वतीये ॥ २२४ ॥
जयाचे निर्लेपु अनुलेपु करी। जे अनंगुही सर्वांगी धरी।
तया सुगंधाची थोरी। कवण वानी ॥ २२५ ॥
(सर्वाश्चर्यमयंदेवम्)
ऐसी येकेक शृंगार शोभा। पाहाता अर्जुन जातसे क्षोभा।
तेवीचि देव बैसला कीं उभा। की सन्मुख नेणवे ॥ २२६ ॥
बाहेरी दृष्टी उघडुनि राहे। तंव अवघे मूर्तिमय देखतु जाये।
आता न पाहे म्हणोनि उगा राहे। तरी आंतुही तैसेचि ॥ २२७ ॥
अनावरे ते रूप समोर देखे। तया भेणे पाठिमोरा जंव ठाके।
तंव तयाहिकडे श्रीमुखे। करचरण तैसेचि ॥ २२८ ॥
अहो पाहाता कीर प्रतिभासे। येथ काहि नवलावो काई असे।
परि न पाहाताहि दिसे। चोज आईका ॥ २२९ ॥
कैसे अनुग्रहाचे करणें। पार्थाचे पाहाणें आणि न पाहाणें।
तयाहिसकट श्रीनारायणें। व्यापुनि घातले ॥ २३० ॥
म्हणोनि आश्चर्याच्या पुरी येकी। पडिला ठाये ठाव थडी ठाकी।
तव चमत्काराचिये आणिखी। महार्णवीं पडे ॥ २३१ ॥
(अनंतं विश्वतोमुखम्)
ऐसा अर्जुन असाधारणें। आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें।
कवळुनि घेतला तेणें। श्रीअनंतरूपें ॥ २३२ ॥
तो विश्वतोमुख स्वभावें। आणि तेचि दाखवावयालागी पांडवें।
प्रार्थिला आतां आघवें। होऊनि ठेला ॥ २३३ ॥
आणि दीपें का सूर्ये प्रगटे। अथवा लोपलिया देखावें खुंटे।
तैसी नव्हे दिठी जे श्रीवैकुंठें। दिधली आहे ॥ २३४ ॥
म्हणौनी किरीटीसि दोही परी। तें देखणें (देखावेचि) पडताहे देखे अवधारी।
हे संजय हस्तनापुरी। सांगतसे राया ॥ २३५ ॥
म्हणे किंबहुना अवधारिले। पार्थे विश्वरूप देखिले।
नाना आभरणीं भरले। विश्वतोमुख ॥ २३६ ॥

काढी दृष्टि–काढली दिठी. जाली–जाहली. (२१८) कमळा=लक्ष्मी. दावटे=विश्रांति पावते. चोखटे=चांगली. तुरंबिली=धारण केली. (२१९) स्तबक=पुष्पगुच्छ. (२२०) पंधरेनि–पंधरेनें=सोन्यानें. गाढिलें=कसलेले नेसलेले. (२२१) पारजें–पारदे=पाऱ्यानें. डंवरिला=लेप दिला, मढविला. क्षीरोदक–क्षीरोदकें=पांढऱ्या वस्त्रानें, दुधानें, पाण्यानें समुद्र पांघरविला जसा. (२२२) चंद्रमयाची–चंद्रम्याची=चांदिण्याची घडी उकलिली. बुंथि=बुरखा. चंदनपिंजरी–चंदनी पंजरी=चंदनाची उटी. पिंजर =पिंगट रंगाचा पिंजरा, सांगडा.) (२२३) जेणें–तेणें. निदाघ–दाह=उष्ण, उष्णता, घाम, उन्हाळा, ग्रीष्मऋतु. सौरभ्य–सौरभ्ये. वेधवतीये–वेदवतीये=अन्न, गंधवती, पृथ्वी. वेधवती=दृष्टि, लक्ष. वेद

म्हणजे अन्न तें प्रसवणारी पृथ्वी–पृथ्वी गंधवती आहे. ज्याच्या सुगंधानें पृथ्वी गंधवती होते. (२२४) जयाचे निर्लेप–जयाचेनि–लेप = निर्लेप परमात्माही ज्या सुगंधाचे लेप करतो. निर्लेप = साधु, संपर्कशून्य लेप = भक्ष्य, कालवलेला पदार्थ लेपन = चोपडणें, चोपडण्याचा पदार्थ. अनुलेपु–आनुलेपु. अनंगुही सर्वांगीं धरी = मदन हा अंगरहित असूनही ज्याची उटी सर्वांगाला लावतो. (अनुलेपन = सुगंधि द्रव्य लावणें, उटणें.) वानी = वर्णन करी. (२२५) येकेक–येकेक. क्षोभा जातसे = भांबावला, वेडावला, भांबावून जाऊं लागला. सन्मुख–संमुख = तोंडासमोरचा. शयानु हे = शयालु, शयन, झोपाळु, निजलेला, शय्या, बिछाना, गांठ मारणें, गुंफणें. (२२६) बाहेरि दृष्टि–बाहेर दिठी. राहे–पाहे. अवघे–अघवे. जाये–आहे. आतां–मग आतां. (२२७) अनावरे–अनावर = अगणित, आवरतां न येणारी. रूप–मुखें. (२२८) आहो–अहो. येथ काहीं नवलाहो काइ असे–एथ नवलावो (आश्चर्य) काइ असे. चोज = नवल, आश्चर्य. प्रतिभास = प्रतिबिंब. प्रतिभा = असाधारण बुद्धि, शक्ति, तेज. (२२९) अनुग्रहाचे = कृपेचे. पाहाणे –पाहणे. घातले–घेतले. (२३०) पुरी = पुरांत, प्रवाहांत. येकी–एकी. ठाये–ठाय–ठाये ठाव = तात्काळः थडी–तडी (पा. भे.) ठाकी = तात्काळ कांठावर, तीरावर गेला. चमत्काराचिये–चमत्काराचिया. (२३१) असाधारणे = विलक्षणतेनें. विंदाणे = कौशल्यानें, चातुर्यानें, आत्मकलेनें. कवळुनि = व्यापून. (२३२) विश्वतोमुख = सर्वव्यापी ईश्वर. दाखवावया–दावावया. अघवे–आघवे होऊनि ठेला = सर्व स्वरूपें नटला. (२३३) सूर्य–सूर्ये. लोपलिया = निमुटलिया, झांकली असतां : देखावे–देखावेचि. दिठी–दृष्टि. श्रीवैकुंठे = श्रीकृष्णांनीं. (२३४) ते देखणे देखे अवधारी–ते देखणे देखावेचि पडताहे देखे अवधारी· (पा. भे. आंधारी) देखणे = विश्वरूप ते देव श्रीकृष्ण. देखणे = दिसत होतें; देखणे, देखणा, सुंदर, सर्व सौंदर्याचा पार्थ झाला असें तेथें झालें. दृष्टीच सर्व–डोळाच एक सर्व–रूप डोळस झाले असें देखणेंपण, परम सौंदर्य पार्थास आलें. किरीटी हा सर्व डोळाच झाला, रूपाचा झाला, देखणा झाला, सुंदर झाला, असें म्हणतां येत नाहीं पण रूपाचा झाला असें म्हणतां येतें. सुंदर हे विशेषण वेशास लावतात–गोप वेश सुंदर, वेश सुंदर. (२३५) आभरणी–अभरणी = अलंकार, पालनपोषण. (२३६)

तेथें अहो जसा का तो, तें नच पाहावें म्हणून त्यानें आपली दृष्टि तो सहज भीणेची झाल्यानें बाजूस केली व कंठ मुगुट पाहूं लागला, तेथें किरीटीनें देववृक्षाची सृष्टीच एक जशी त्या विश्वरूपापासूनच कीं झालेली आहे, उगवली आहे असे (त्यानें) पाहिलें. (२१८)

कंठमुगुट सुरतरूची सृष्टि जेथून महान् अशा सिद्धीची मूळपीठेंच–मूळची ठिकाणें आद्य अशीं स्थानेंच कीं, स्थान महात्म्याचीं तीं देवांचीं सिंहासनें झालेलीं, शिणलेलीं, ती लक्ष्मी कमला नांवाची जेथें विश्रांतीस येते (बावटे) तशी चांगली अति उत्तम कीं पुष्पें, कुसुमें धारण केलेली ती पाहिली. (२१९)

मस्तकावर पुष्पांचे गुच्छ आहेत, ठिकठिकाणीं अनेक असे देहकराराचे पूजोपचार, पूजाबंध आहेत. अनेक सन्मानाचे, अर्चेचे जोडणे, अनेक अंगस्थिति ठाण, शरीर, स्नायु, अनेकतेनें मन लावलेले वृत्ति बाळगणें जे का धरणें जे, रचणें जें, शोभा देत हालत आहेत. कंठामध्यें लोकोत्तर असे मालादंडच (राजनीतीचा चौथा उपाय) चार किंवा सोळा हात लांबीच्या माळा कीं रूळत आहेत. (२२०)

स्वर्गानें सूर्याचें सर्वेच्या मर्व तेज पांघरण्याचें केलें आहे, अंगाभोंवतीं वेढून घेतलें आहे; जसें का पंधरा नंबरच्या उत्तम सुवर्णानें मेरु पर्वतास मढिलें आहे. मेरु (एक पर्वत; जपमाळेतील मुख्य मणि पाठीचा कणा त्यावर) पर्वतावर बसविला आहे जसे कां, तसे नितंब म्हणजे कटिपश्चात् भागावर कसलेले, नसलेले, स्थिर केले जसे ते रूप कृष्ण का विष्णु का पितांबरधारी म्हटलेले ते सुवर्णासारखे पिंवळे तेज झळकत आहे. (२२१)

(दिव्यगंधानुलेपनम्) श्रीमहादेव, श्रीशिव कापुरामुळें आरशाप्रमाणें स्वच्छ दिसत आहे: कापुरानें उटिला आहे (सात्वत्=भक्तः, सत्वगुणयुक्त, सात्विक) अथवा कैलास पर्वत (शंकर व कुबेर यांचें निवासस्थान, शिवलोक, हिमालय शिखरविशेष) पान्यानें डंवरिला–, मढविला, अथवा क्षीरसमुद्र, क्षीरोदकें पांढऱ्या उदकानें पांघरविला आहे जसा कां, (२२२)

जशी चंद्रम्याची, चांदिण्याची घडीच एक उकलिली व मगच गगनाकडून बुरखा, पडदा, खोळ घेवविली गेली, तशी चंदन पिंजरी–चंदनाची उटी त्या स्वरूपाच्या सर्वांगीं त्यानें पाहिली. (२२३)

त्यायोगें आपल्या स्व-प्रकाशास कांति शोभा प्रभाच एक वाढीची होऊन आहे–आपल्या स्वतःच्या प्रकाशावर कांति चढली आहे, कांतीचा हात चढला आहे. ब्रह्मानंदाचा निदाघ दाह (घाम, उष्णता, उष्णऋतु ग्रीष्म) मोडला जात आहे– ज्याच्या सुगंधानें वेदवती जी त्या पृथ्वीला जीवित जोडले आहे, जीवितास आणलें आहे–आयुष्याचें केलें आहे. (२२४)

ज्यास कसलाहि कर्माचा लेप लागत नाहीं, निर्लेप परमात्माही ज्या सुगंधाचा लेप करतो–मदन हा अनंग–अंगहीन का अंगरहित असा असूनही ज्याची उटी सर्वांगाला लावतो, त्या सुवासाची–परिमळाची–सुगंधाची–पुण्याची थोरी, शोभा, महती कुणास वर्णन करतां येईल बरें! (२२५)

(सर्वाश्चर्यमयंदेवं)—अशी एक एक ती त्या विश्वरूपाच्या शृंगाराची शोभा पाहून तर अर्जुन अगदीं वेडावून गेला–क्षोभाचा होऊन आहे–भांबावून जाऊं लागला. वर देव तो बसलेला आहे किंवा उभा आहे अथवा शयालु म्हणजे पहुडलेला आहे का सन्मुख, समोर आहे हे कांहीं त्यास जाणवेना. (२२६)

तो आपली दृष्टि उघडून बाहेर पाहूं लागला तों काय! अहो! सर्व कांहीं देवमयच होऊन आहे. असें त्यास दिसूं लागलें. अवघे सर्व कांहीं देखणे मूर्तिमयच होऊन जात आहे, म्हणून कांहीही पाहूंच नये कीं म्हणून तो उगा–स्वस्थ राहिला; तरी आंतहीपण तसेच सर्व मूर्तीमयच होऊन आहे! (२२७)

अनावर अशी, अगणित अशी, आवरतां न येणारीं अशीं मुखें समोर दिसूं लागली–; असे आंतबाहेर तें त्याचें पहाणें तेथें मनास जराशी भीतीची छटा आल्यानें पाठिमोरा होऊन पाहूं लागला तेव्हां तेथेंही पाठीमागेंही तसेंच दिसणें दिसत आहे, तशींच श्रीमुखें त्यास दिसत आहेत; तसेंच हात व पायही दिसत आहेत! (२२८)

अहो! पाहातां पाहातां तीं श्रीमुखें प्रतिभासाचीं स्वरूपाचीं–स्फूर्तीचीं अशींच दिसत आहेत, भास तोच प्रतिभासत आहे व आतां येथें नवल तें काय म्हणावें तर आश्चर्य तें कसलें तें मानावें तर अहो त्यास, त्यानें न पाहातांही कीं दिसत आहे! असे नवलच एक ऐकावें की जी! (२२९)

अहो! त्यास का त्यावर कृपानुग्रहाचें तें देवाचें करणें तें येथें पार्थाचें पाहाणे होत आहे; तसेंच त्यामें न पाहाते जें की त्याहीसकट श्रीनारायणानीं सर्व कांहीं व्यापून घेतलें आहे. (२३०)

त्याजमुळें तर अर्जुन हा एक आश्चर्याच्या पुरामध्येंच कीं पडला आहे. आश्चर्याच्या प्रवाहामध्येंच असलेला तो तत्काळ तीरावर कां कांठावर येऊन पाहातो तों काय! तर आणीक एका नव्याच अशा चमत्काराच्या महासमुद्रामध्येंच जाऊन पडला होत आहे! (२३१)

(अनंत विश्वतोमुखं)—असा तो अर्जुन हेतु आभास विशेषत्वेंकरून विलक्षणतेच्या असामान्य अशा आपल्या त्या दर्शनें पाहाण्याच्या त्या वृत्तीनें का विश्वरूपांनीं आपल्या दर्शनाच्या कौशल्यानेंच का आत्मयोग कलेनेंच कीं अर्जुन तर व्यापून घेतला आहे असा. (२३२)

अहो! तो विश्वतोमुख असा सर्वव्यापी ईश्वर तर सहज स्वभावें करूनच कीं असलेला व तोच कसा आहे तें पाहाण्यासाठीं पाण्डव अर्जुनानें विनविलेला तो तर आतां अवघे सर्व कांहीं सर्व स्वरूपें घेऊन नटला आहे कीं. (२३३)

वर दीपामुळें तें रूप दिसावें अथवा सूर्यप्रकाशामुळें ते प्रगट व स्पष्ट व्हावे, का दृष्टि मिटली असतां का झांकली तर देखणें देखावें, पाहावें, पाहाणें व्हावें–होत आहे; तें आतां बंद झाले तशी कांहीं ती दृष्टि नव्हती जी का श्रीवैकुंठनायकांनीं श्रीकृष्णांनीं त्यास तें रूप पाहाण्या–देखण्याची दृष्टि दिलेली आहे ती. (२३४)

याजकरितां किरीटी, अर्जुनास तर दोहींकडूनही–दोन्हीही तऱ्हांनीं तें देखणें जसें का अंधारामध्यें पहाणें पडत होत आहे, असें जाणा: (असें समजा, असा निर्णय जाणा.): उच्चारणा मर्यादा रूप देण्याची ती कीं: असें संजय तो धृतराष्ट्रास हस्तिनापुरामध्यें सांगत आहे. (२३५)

तो म्हणतो कीं अहो! बहुत काय! पण जाणलें कीं पार्थानें विश्वरूप तें सर्वव्यापी ईश्वराचें तें देखणेचें केलें. अहो! तें विश्वतोमुख तर अनेक अनेक अशा अलंकारांनीं नटलेलें त्यानें पाहिलें–तेथें अनेक असे पुष्कळसे अलंकारच कीं त्याच्या अंगचे झालेले; अहो! आभरणांनीं तें रूप सर्वथा भरलेलें आहे, असें त्यानें पाहिलं. (२३६)

**श्लोक १२ वा**

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥**

दिवि सूर्यसहस्रस्य–युगपद उत्थिताभवेत्–यदि सदृशी भाः=आकाशामध्यें हजारों सूर्य उगवले, जसें का युगपदाचें येणें झालें आहे व असें झालें असतां जशी प्रभा असेल: सास्यात् भाः=तशी ती प्रभा असेल का होती कदाचित्: तस्य महात्मनः=त्या महान् अशा महत्तत्वाचा केलेला सर्वथा अशा त्या आत्म्याची.

अन्वय :—

सूर्यस्य सहस्रस्य–युगपद उत्थिता भाः सा यदि भवेत् सदृशी भाः भासः तस्य महत् आत्मनः स्यात.

अर्थ :—

एकाच वेळीं जर का हजारों सूर्यांची प्रभा आकाशामध्यें–युगपदच–व्यापून असलेलें ( उमटलेलें पाऊल तें युगाचें आहे असें–युगच आपलें चरण घेऊन आलें आहे–वर आलें आहे) अशी प्रभा प्रगट होईल का पसरेल तर ती हजारों सूर्यांची प्रभा त्या विश्वरूप भगवंताच्या अतुल कांतीसारखी कदाचित (का न जाणो) झाली तर होईल; सारांश काय तर हजारों सूर्यांच्या तेजाहूनही विश्वरूपाचें तेज अधिक होतें. ॥ १२ ॥ (श्लोक १२ वा ओ. २३७ ते २४१)

**(दिविसूर्येति)—**

**तये आंग प्रभेचा देवा। नवलावो काईसया सारिखा सांगावा।**
**कल्पांती एकचि मेळावा। द्वादशादित्यांचा ॥ २३७ ॥**
**तैसे ते दिव्य सूर्यसहस्रवरी। जरी उदैजते का येकेचि अवसरी।**
**तऱ्ही तया तेजाची थोरी। उपमु न ये ॥ २३८ ॥**
**आवघेयाचि विजूंचा मेळावा कीजे। आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे।**
**तेवीचि दशकही मेळविजे। महातेजाचा ॥ २३९ ॥**

**(यदि भाः सदृशी)—**
**तऱ्ही तये अंग प्रभेचेनि पाडे । हें तंव कांहिं कांहि तेज होईल थोडें ।**
**आणि तया ऐसे कीर चोखडे । त्रिशुद्धि नाही ॥ २४० ॥**
**ऐसे माहात्म्य श्रीहरीचे सहज । फांकतसे सर्वांगीचे तेज ।**
**ते मुनीकृपा जी मज । दृश्य जाहले ॥ २४१ ॥**

तये–तिये. आंग–अंग. नवलावा=कौतुक. काइसया–काइसया ऐसा. देवा=हे राया, हे राजा धृतराष्ट्रा; अथवा देवा=देव श्री तर नवल नवलच एक तेथें त्या विश्वरूपाची अंग प्रभाही, बाराहि आदित्य कल्पांतीं प्रकाशणारे असे ते देव श्री विश्वरूपाचें रूप नवलाचें. देवांची अंगप्रभा ही नवलाच्या देवपणाची तेथें कौतुक कसें तर सर्व अंगप्रभाही सर्व तेजाची–का सर्व तेजच एक. येकचि–एकचि. होये–होय. (२३७) उदैजते–उदैजती. येकेचि–एकेचि. (२३८) अवघेयाचि–अघवयाचि. महातेजाचा दशक =दिव्य तेज शृंगार दशावताराचा जसा–तेथें दशसंख्यारूप आवरणाग्नि. (येथे २२९ ओवी पुन्हां घेतली आहे न पाहातांही दिसे बाबत.) (२३९) पाडे=योग्यतेनें. तंव–तेज, तेज. नाही–नोहे. (२४०) महात्म्य –महात्म्य या. मुनिकृपा=व्यासांच्या कृपेनें मजला दृश्य झालें, दिसलें असें संजय सांगत आहे. (तसेंच असें ही म्हणूं कीं श्रीज्ञानेश्वर महाराजांना ते निवृत्तिमुनिरायांच्या कृपेनें–प्रसादानें–ध्यान ते हृदयासि आले असे होय.) (२४१)

(येथें देव हें संबोधन कोणी राया राजा धृतराष्ट्रासही लावितात; पण तें कसें बरें त्या देवकोटीच्या त्या बाराही आदित्य कल्पांती प्रकाशावेत अशा तेजाचें तें रूप तेथें राय धृतराष्ट्र हे संजयानें सांगितलेले गेलेले म्हणून देवाच्या त्या स्वरूपाबाबत वर्णन कसें तर—)

त्या देवाच्या विश्वरूपाच्या अंगकांतीचा अंगचा तेजाचा नवलाव काय सांगावा! —नवलाव कौतुकच कीं एक देव श्रीकृष्ण ते!–तेथे त्या कौतुकाची का नवलाची ती उपमा कुठें पुरती होईल, तर कल्पांतींच्या वेळीं बाराही सूर्यांचा एकच मेळावा जसा का होऊन आहे असा होय. ‘आदित्य, ज्योति सहिष्णु गति सत्तम, विष्णु’ इ. बाराही कल्पांतीं प्रकाशावेत असें असें तें देवाचें रूप नवलाचें! देवाची अंगप्रभाही नवलाची!–देवाचें कौतुक तें कसें तर सर्वांग प्रभा ही सर्व तेजाची अशी! (२३७)

तसे ते जसें का दिव्य सूर्य सहस्रशः तेजोमय हजारदां सूर्य एकाच वेळीं उदय घेऊन असतील तरी सुद्धां त्या तेजाची सरी किंवा बरोबरी उपमेची होत नाहीं, उपमेची होणारी नव्हे. (२३८)

अवघ्या विजूंचा मेळावा केला व प्रळय अग्नीची समग्र सामग्री आणिली, त्याचप्रमाणें, तेज दशावताराचे ते–तेही मिळविलें का महा तेजाचा दशकही म्हणजे दशसंख्यारूप आवरणाग्नीही मिळविला. (२३९)

तरी त्या अंगकांतीच्या योग्यतेपुढें कांहीं कांहीं उपमेची ती यथासांगता होणारी होईल; अथवा ही थोडीशीच उपमा असें होय–, पण त्या विश्वरूपाच्या तेजासारखें तेज परम दिव्य असें चोखडें त्रिशुद्धिही नच होणारे! तेथें उपमा थोड्याबहुत अशा योग्यतेची अथवा किंचित किंचिततेची अशी. (२४०)

असे ह्या श्रीहरीरूप श्रीकृष्णाचें सहज माहात्म्य तेथें श्रीहरीच्या सर्वांगीचें तेजच मधुर असें उत्फुल्लपण, टवटवितपण, फुललेलें पावून आहे. (फुल्लेंदीवर श्यामविकासित पंकज लोचन. हृदयानंद, मदिराय तेक्षणा, उत्फुल्ल गात्र, उत्फुल्ल नेत्र, मधुर मधुमोदविलासिनी, मधुर रूचिर चंद्र विकासिनी इत्यादि उपमा येथीलच्या कोटीस पाहाणाऱ्या नव्हतच–) विकास घेऊन आहे–सर्वांगीचें तेजच चोहोंकडे फांकते आहे :— हृदयानंद असें होय :—ते मजला श्रीव्यासांच्या कृपेनें दिसलें–, दृश्य झालें : असें संजय सांगत आहे, वर अहो! श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, श्रीमुनि निवृत्तिरायाच्या प्रसादानें माझे ठायीं ध्यान तें हृदयाच्या ठायीं आलें आहे. (२४१)

**श्लोक १३ वा**

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

तत्र एकस्थं = तेथें एकत्रित झालेलें, एकाच ठिकाणीं आलेले-जसे (यदा भूत पृथक्‌भावं) एकस्थमास्थितः = लहानशा भागावर, एकस्थित. अनेकधा = अनेक प्रकारांनीं (वांटणी न झालेलें, समाहिक, एकरूप, अभिन्न = अविभक्तं-भक्त, विभक्त) प्रविभक्त विस्तार-विकास पावलेले. (भक्त = अव्यभिचारी भाव. विभक्त = निराळेपणाचे असे). प्रविभक्त = भक्त + विभक्त + प्र = ब्रह्मस्पष्ट असे व्यापकतेचे. विस्ताराचे-विकासाचे. अपश्यत् = पाहिले.

अन्वय—

तदा पाण्डवः जगत्कृत्स्नं अनेकधा प्रविभक्तं तत्र देवदेवस्य शरीरे एकस्थं अपश्यत् ।

अर्थ :—

तेव्हां अर्जुनानें त्या देवाधिदेवाच्या (शरीरांत, शरीरामध्यें) शरीराच्याठायीं, एकाच ठिकाणीं एकत्रित एकस्थ लहानशा भागावर सारें जग अनेक प्रकारांनीं विस्तार-विकास पावलेलें आहे असें पाहिलें ॥ १३ ॥

(श्लोक १३ वा ओ. २४२ ते २४५)

**(तत्रेति)—आणि तिये विश्वरूपी येकीकडे । जग आघवे आपुलेनि पवाडे ।**
**जैसे महोदधि माजी बुडबुडे । सिनाने दिसती ॥ २४२ ॥**
**का आकाशी गंधर्व नगर । भूतली पिपीलिका बांधे घर ।**
**नाना मेरूवरी सपूर । परमाणु (दिसती) जैसे ॥ २४३ ॥**
**(अपश्यत्) विश्व आघवेचि तयापरी । तया देवचक्रवर्तीच्या शरीरी ।**
**अर्जुन तिये अवसरी । देखता जाला ॥ २४४ ॥**
**(तत् अष्ट सात्विक भावः)—**
**तेथ येक विश्व येक आपण । ऐसे अळुमाळु होतें जें दुजेंपण ।**
**तेंही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहज ॥ २४५ ॥**

पवाडे विस्तार घेऊन आहे. सीनाने = वेगवेगळे. (२४२) सपुर = (पुर = शरीर, अंतःपुर, माडी, कोठी, चर्म.) उजाळ्याचे, उजळ, लहान लहान. जैसे-दिसती जैसे. (२४३) तया-तिया. (२४४) अळुमाळु = थोडेसे. सहज-सहसा. (२४५)

अहो ! वर त्या विश्वरूपामध्यें एके बाजूस सर्व जग हें आपल्याच की विस्तारानें दिसत आहे-, जगाचें जगपण विश्वभारानें महत्व घेऊन आहे, पवाड्याचें जसें महत्व गात आहे, का (महान् महोदधि म्हणजे) समुद्रामध्यें पाण्याचे बुडबुडे ते जसे एका बुडबुड्यामध्यें कीं दुसरे अनेक असे बुडबुडे वेगवेगळे केले जातात, दूर केले जातात, तसें जग किंवा अनेक विश्वें निरनिराळेपणानें दिसताहेत असें त्यानें पाहिलें. (२४२)

आकाशामध्यें ज्याप्रमाणें गंधर्वनगर किंवा ह्या पृथ्वीवर मुंग्यांनीं बांधलेलें वारुळ किंवा घर जसें, किंवा (अनेक अशा) सोन्याच्या मेरुमण्यावर प्रकाशानें अगदीं डंवरलेलें (झळकणारें प्रकाशरूप पुरांत असलेलें) सुवर्णाचें असे लहान लहान उजळ परमाणु दिसावेत तसें— (२४३)

सर्व विश्व त्या देवाच्याही देवाच्या म्हणजे सर्व देवांचा चक्रवर्ती असा राजाच जो त्याच्या शरीरामध्यें का शरीराठायीं त्या वेळेस अर्जुन पाहाता झाला. (२४४)

तेव्हां तेथें विश्व हें एक व मी हा जो तो एक दुसरा असें जें कांहीं तेंही आटून गेलें व अंतःकरण हें सहजासहजीं, (सहसाच कीं शरीराच्या आंत त्या देवाच्या) विश्वरूपामध्येंच की विरून आहे. (२४५)

श्लोक १४ वा

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥**

विस्मयाविष्टः = सर्व विस्मयाचा झाल्यानें, आश्चर्यचकित होऊन. हृष्टरोमा = ज्याच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहिले आहेत असा. शिरसाप्रणम्य = (कृतानेक) शिरसाष्टांग नमस्कार असा. कृतांजली = हस्तात्र्जुली पुढें करून बद्धांजुळी—हात जोडून आहे. अभाषत = बोलला.

अन्वय—

ततः स धनंजयः । विस्मयाविष्टः । हृष्टरोमा । देवं शिरसा प्रणम्य । कृत अंजलिः । अभाषत ॥

अर्थ :—

त्यानंतर धनंजय अर्जुन आश्चर्यभरित होऊन–विस्मयाचा झाल्यानें सर्व अंगावर रोमांच उभे राहिले आहेत असा होत्साता (देवांना विश्वरूप) श्रीकृष्णांनां शिरसाष्टांग नमस्कार करून कृतांजलि म्हणजे हात जोडून बोलता झाला.

(श्लोक १४वा–ओ. २४६ ते २५४)

**(स्वरभंगः) आंतुला (आंतुलिया; आंतु) महाआनंदा चेईरे जाले ॥**
**(स्तंभः) बाहेर गात्राचे भय (बळ) हारपोनि गेले ।**
**(रोमांचः) आपाद पां गुंतले । पुलकांचले ॥ २४६ ॥**
**वार्षियेचिये प्रथमदशे । वोल्हवलया (वोहळलया) शैलांचे सर्वांग जैसे ।**
**विरुढे कोमलांकुरी तैसे । रोमांच आले (जालें) ॥ २४७ ॥**
**(स्वेदः) सिवतला चंद्रकरी । सोमकांत द्रवो (द्रावो) धरी ।**
**तैसिया (श्वेद) स्वेद कणिका । शरीरी दाटलिया ॥ २४८ ॥**
**(वेपथुः) माजि सांपडलेनि (अलिकुळे) आळिउळे ।**
**जळावरि कमलकलिका जेवि आंदोळे ।**
**तेंवि आंतुलिये सुखोर्मीचेनि बळे । बाहेरि कांपे ॥ २४९ ॥**
**(अश्रु) कर्पुर कदळीचेनि गर्भपुटे । उकलता कापुराचेनि कोंदाटे ।**
**पुळिका गळती तेंवि थेंबुटे । नेत्रौनि पडति ॥ २५० ॥**
**(वैवर्ण्य) उदईलेनि सुधाकरे । जैसा भरलाचि समुद्र भरे ।**
**तैसा वेळोवेळां उर्मि भरे । उचंबळत असे ॥ २५१ ॥**
**(प्रलयः) ऐसा सात्विकाहि अष्टभावा । परस्पर वर्तत आहे हेवा ।**
**तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥ २५२ ॥**
**(प्रणम्य इति) तैसाचि तया सुखानुभवापाठी । केला द्वैताचा सांभाळ दिठी ।**
**मग उससोनि किरीटी । वास पाहिली ॥ २५३ ॥**
**जेथ (तेथ) बैसला होता जिया सवा । तयाचिकडे मस्तक खालविला देवा ।**
**मग जोडुनि कर संपुट बरवा । बोलतु असे ॥ २५४ ॥**

महानंदा=महा आनंदास. चेईरे=जागतेपण आलें; स्फुरण झालें. भय=अरिष्ट, भीति, संकट, भीतीप्रद. बळ=देह, हात; पर्ण, स्थूलता, आकार, सत्व. आपाद पांगुतले पुलकांचले=आपाद मस्तक रोमांच उभे झाले. (२४६) वार्षियेचिये–वार्षिये=पावसाळ्याच्या. प्रथम दशे=प्रारंभीं. वोल्हवलेया=पाणी वाहून गेल्यावर ओलाव्याचें झाल्यानें. शैलांचे=पर्वतांचे: टेकडीचे: विरूढे=कोमलांकुरी, कोमल तृणांकुर उगवतात. (२४७) द्रवो–द्राव. द्रावः=पलायन, माघार, त्वरा, उष्णता, वितळणें, पाझर. (श्वेद)–स्वेद कणिका=घामाचे बिंदु, कण. दाटलिया=डबडबून आले. (२४८) आळिउळे–अलिकुळे =भ्रमर समुदाय. जळावरी कमलकलिका जेवीं आंदोळे=आंतमध्यें भ्रमर अडकल्यामुळें कमलकलिका जशी हालते. (२४९) कर्पुर कर्दळीचेनि–(कर्दळीची)–केळीचेनि: गर्भपुटे=कापुर चिनीची झाडें=सोपटें= कापुर आंत दाटला म्हणजे सोपट उकलून कापूराचे कण बाहेर पडतात तसें. पुलिका–फुलिंगा=कण. थेंबुटे नेत्रौनि पडती=नेत्रांतून आनंदाश्रु गळूं लागले. (२५०) उदइेलेनि–उदयलेचि. सुधाकरे=चंद्राच्या: भरला–भरलाचि. उर्मीभरे=प्रकाश, वेग, प्रवाहाच्या लाटांनीं उचंबळून येत आहे. (२५१) सात्विकही –सात्विकाही. अष्टभावा-आठा भावा. वर्तत आहे–वर्ततसे. फावली=मिळाली, मिळाले. ब्रह्मानंदाची राणीव=ब्रह्मानंदाचे साम्राज्य. (२५२) उसासोनि=उच्छ्वासानें, उसासा टाकून, उछालीनें. वास पाहिली=सभोंवार पाहूं लागला, चहूं बाजूस नजर टाकिली. (२५३) सवा=बाजूंस बोलतु–बोलत. खालविला–खालाविला=लवविले. (२५४)

(**स्वरभंग**)—आंतमध्यें मोठ्याच कीं आनंदास स्फुरण आलें. (आंतल्या आंत मोठ्याच कीं आनंदाचें असें चित्त झालें आहे. आनंदास जागतेपण आलें, आनंद जागण्यास आला, जागु आला.) (**स्तंभः**) बाहेर गात्रांचें भय किंवा बळ हारपून गेलें (बहिर्मुख असणारीं जीं गात्रें त्यांनीं बळ टाकलें का भयाचें होणें नाहींसें झालें) (**रोमांच**) अंगुष्टापासून मस्तकापर्यंत सर्व अंगावर (हर्ष) आनंदाचे रोमांच उभे राहिले आहेत, त्यामुळें पुलकित तनु झाल्यानें अष्ट सात्विक भावांनीं आपाद सर्व शरीर व्यापलें आहे–सर्व शरीरभर नखशिखांत रोमांच उभे राहिले आहेत. (२४६)

पावसाळ्याच्या आरंभीं पर्वतावरील सर्व मळ इत्यादि वाहून गेल्यावर जसे कोमल तृणांकुर उगवतात तसें त्याचें शरीर रोमांचित झालें–: वर्षाऋतु सुरू झाला म्हणजे अगोदरच्या–प्रथमच्या वर्षावानें पर्वताचे शैल शिखराचें सर्व अंग पाणी वाहून गेल्यावर ओलाव्याचें असें होऊन जातें त्याप्रमाणें प्रथम दशेच्या प्रेमाच्या ओलाव्यानें सकोमलत्वाचे अंकुर यावेत तसें त्याच्या अंगावर रोमांच आले–रोषण रोषणाईच जशी का असा प्रेमाचा ओलावा मुरल्यानें रोमांच उभे झाले–(शंकर जे योगनाथ त्यांची ज्ञानकला–तिजला प्रार्थिलेले ज्ञान-वैराग्यसिद्धि तेथें प्रेम पीक सात्विकभाव आले उगवले.) (२४७)

(**स्वेद**)—चंद्राचे ते अमृताचे किरण अंगास स्पर्शल्यामुळें तर सोमकांत मणि (रात्र, चांदणें, रोहिणी, चंदन, चंद्रविकासी कमळ) तर पाझरतो, (उष्णता वितळली होते), वितळतो, चित्ताकर्षक होतो–ओलावा धरतो, मऊ होतो, क्रीडा पहातो, रसास येतो, जसा तशा स्वेद कणिका घामाचे बिंदु त्याच्या सर्व शरीरभर दाटून आले आहेत (असें झाले)—

(तप्त जरी मदनशरें विनय सोडूं का?)—

अहो! देह हा महत्व घेऊन आहे तेथें चित्त हें रंगलें; सर्व आनंदच एक असें तें होऊन आलेलें, तेथें आतां परमेश्वराच्या स्वरूपाविषयीं विस्मय वाटला. हृष्टरोमा म्हणजे हर्षच हर्षांकित झाल्यानें शरीरावरील सर्व रोम हे हर्ष घेऊन आहेत व त्यामुळें गात्रांचें बळ तें कां देहबुद्धि भय हे सर्वप्रकारें नाहींसें झाल्यानें तेथें चित्त आतां शुद्धि घेऊन प्रेमांकुरास आलें, तें आंतच पाहूं लागलें; आनंदच एक पण तो मूक असा.

अमृत स्रवणारा चंद्र त्याचे सौम्य किरण सोमकांत मण्यास शिवल्यानें तो मणी द्रवीभूत झाला; रस स्रवूं लागला. मनोदेव ह्याच मुळीं सोमरस स्रवूं लागला व आतां सर्व शरीरभर घामाचे सूक्ष्म बिंदू उमे झाले— मनोदेवानें द्राव धरल्यामुळें शरीरभर थबथबून आलेला तो काय घाम म्हणावा! अहो! ती तर (स्वेद कणिका)—स्वच्छ अशी मोत्येंच पारदर्शक कीं सर्व शरीरभर प्रकाशून आहेत. जसा का तो पाराचमुळीं आपलें धातुपण विसरून जाऊन उत्तमत्वाच्या अशा सिद्ध रसासच आला व आतां जसें का ते सर्व शरीर सिद्धांचें असेंच दिसूं लागलें: व अष्टसात्विक भावामधील (जो सिद्ध भावांस आणणारा) जो शरीरभाव तोच मुळीं आंतीलच्या सर्व आनंदाचा असा झाला: महानंदासच जसें चेवणें तें पहावें तो जशीं मोत्यांची जाळीच त्याच्या सर्व शरीरभर पसरली आहे: असें तें काय मोठ्या नवलाचें असें सात्विक भावाचें येणें झालेलं: तेथें सर्व शरीर अष्ट सात्विक भावामधील जो शरीरभावास विसरणारा हर्ष जो देह सिद्ध करणारा तो आतां येथें देहच मुळीं रसानें डबडबून आहे असें झालें.

अष्ट सात्विक भावाचें जें साधारणतः स्पष्टीकरण तें—"स्तंभः स्वेदोऽथ रोमांच स्वर भंगोऽथ वेपथुः। वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्विकाः स्मृताः॥"
स्तंभः=स्तब्धता. स्वेद=धर्म बिंदू. रोमांच=शहारे. स्वरभंग=कांपत बोलणें. वेपथुः=सर्वांग कांपत-कंपत असलेलें. वैवर्ण्य=फिक्कटपणा. अश्रप्रलय=अश्रूंनी नहाणेंच जसें,

(यत्र अग्निश्चमथ्यते यत्रसोमोऽतिरिच्यते तत्र—संजयते मनः) (२४८)

आंतमध्यें भ्रमर अडकल्यामुळें त्याच्या गुणगुणण्यामुळें जशी ती कमलकलिका पाण्यावर (आंदोळत असते—आंदोलन घेऊन असते) आंदोळते त्याप्रमाणें आंतल्या महाआनंदाच्या सुखोर्मीच्या बळानें— (प्रवाह, वेग, प्रकाश उर्मी आंतले बळ घेऊन असल्यानें) आंत पहावें तों सर्व सुखच (आनंदच एक आरोग्यच एक मधुर असें) पण बाहेर पहावें तों सर्व देह थरथरून जात आहे, कांपत आहे; असा त्या सात्विक भावाचा परिणाम होऊन आहे. (२४९)

कापूर कर्दळ म्हणजे कापूरचिनीच्या झाडाची केळीचीं सोपटें ही आंत कापूर दाटला म्हणजे उकलली होऊन, कापुराचे कण बाहेर पडतात त्याप्रमाणें अर्जुनाच्या नेत्रांतून आनंदाश्रु गळूं लागले.

त्यावेळेस अवघें विश्व त्या देवचक्रवर्तीच्या शरीरामध्यें अर्जुनानें पाहिलं. (चक्रवर्ती म्हणजे चक्र किंवा वर्तुल, वर्ति म्हणजे वात का दिवाच एक जो का सार्वभौम राजाच एक त्या भगवंताच्या श्रीकृष्णाच्या शरीराच्याठायीं—अर्जुनानें सर्व विश्व पाहिलें.) देवदिव्य आनंदच एक (सर्व आनंदाचा असा आनंदकोश— आनंदाचा देवच) अशा त्या देवाच्या देहामध्यें अर्जुनानें सर्व विश्व पाहिलें. (२५०)

(**वैवर्ण्य**) सुधाकर (सुधा=अमृत, मध, पाणी, गंगा. सुधाकर=चंद्र. सुधा अंशु=चंद्र, कापूर. सुधारत्न=मोती.) म्हणजे अमृत प्रसवणाऱ्या चंद्राच्या उदयानें जसा नेहमीं भरलेलाच असा (पूर्ण आहे असा) समुद्र तो ही कीं, परिपूर्ण भरला होतो. तसा अर्जुन तर वेळोवेळीं प्रकाशाच्या, वेगाच्या, सुखाच्या प्रवाहानीं, उर्मींनीं तर उचंबळून येत आहे, गहिंवरून येत आहे, भरभरून येत आहे. (२५१)

(प्रळयः)—अशा तऱ्हेनें सत्वगुणयुक्त अष्टसात्विक भावांनां एक ह्या आठही सात्विक भावांच्यामध्यें, परस्पर हेवाच येऊन आहे; तेथें तर अहो ह्या जीवदशेस तर ब्रह्मानंदाची—शोभाच कीं एक येऊन आहे, लाभली आहे, असें झालें. ब्रह्मानंद साम्राज्यच ह्या जीवदशेस मिळालें असें झालें. (२५२)

(प्रणम्य इति)—तेथें तसाच कीं एक त्या सुखाच्या अनुभवाच्या पाठीवर—(वरचेवर तो) सुखानुभव येऊन आहे. (तेथें) द्वैतच एक ह्या दृष्टीनें पाहिलें होत असल्यानें तेथें मग उच्छ्वासच एक घेऊन अर्जुनानें सभोंवार पाहूं केलें. (ह्या सुखाच्या अनुभवावर द्वैतच एक नेहमीं पाहिलें जाणारें ह्या दृष्टीनें पाहणें तेंहीपण

तसेंच द्वैत होऊन राहिलें आहे.) दृष्टीनें द्वैतभाव कायम ठेविला व मग उचंबळून जाऊन उससोनि का श्वासाच्या उछालीनें उच्छ्वास घेऊन अर्जुन तो सभोंवार पाहूं लागला कीं, कांहीं एक ह्या दृष्टीस कशाचा कांहीं आश्रय घेतां येईल काय? अशी आशेची, उसासाची ती दृष्टि होऊन चहूंकडे पाहूं लागली वर उच्छ्वास घेऊन अर्जुनानें सभोंवार नजर टाकली. (२५३)

तेथें तो ज्या बाजूस बसला होता तिकडेच कीं देव होते त्यांनां पाहून, तेथें देव आहेत असें समजून त्याचेकडे पाहून त्यानें आपलें मस्तक खालविलें. (मस्तक नमविलें, नम्रतेचें झालें तेथें नमस्करणच एक जसे झालें,) भगवान श्रीकृष्णाच्या पायांवरच कीं, शीर टेकविलें व मग दोन्ही हात जोडून त्यानें देव भगवान श्रीकृष्णाची प्रार्थना करण्यास सुरवात केली. (२५४)

**( ह्या पुढील १७ ते ३१ श्लोक अखेर—अर्जुनाचें भक्तियुक्त स्तोत्र आहे.)**

**अर्जुन उवाच :—**

**पश्यामि देवांस्तव देव देहे । सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थं । ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥**

तव देव देहे देवान् पश्यामि=तुम्ही जे देव त्यांच्या देवदेहामध्यें का शरीरामध्यें अनेक देव मी पहात आहें. भूतविशेष संघान्=विशेषत्वानें असलेले, विशेषाविशेष भूतसंघ त्या सर्वांनांही तेथेंच तुमच्या देव शरीरांतच मी पहात आहे. कमलासनस्थ ब्रह्माणम् तसेंच ईशम्=कमलाच्या आसनामध्यें असलेला ब्रह्मदेव त्यास मी तेथेंच पहात आहे; तसेंच ईश जो परमात्मा त्यासही तेथें मी पहात आहे. ऋषींश्च सर्वान्=सर्व ऋषींना. च=तसेंच. उरगांश्च दिव्यान्=दिव्य असे जे सर्प यज्ञसूत्ररूपी दिव्यच एक जे होऊन आहेत त्यांनाहीः

अन्वय :—

देव । तव देहे सर्वान् देवान् पश्यामि । तथा सर्वान् भूतविशेषसंघान् । तव देवदेहे पश्यामि । ऋषीन् सर्वान् उरगान् च एव देव देहे पश्यामि ॥ १५ ॥

अर्थ :—

देव! तुमच्या देवदेहामध्यें अनेक देव (त्या सर्व देवांना) मी पहात आहें. विशेषसे भूत (भूत विशेषत्वानें असलेले असे भूत) संघ त्या सर्वांना मी (**तुमच्या देहामध्यें**) पहात आहें. कमलासनस्थ जो ब्रह्मदेव त्यास तसेंच ईश जो परमात्मा त्यासहीपण (तेथेंच तुमच्या देहामध्येंच) मी पहात आहें–सर्व ऋषींनाही तेथें मी पहात आहें, तसेंच दिव्य अशा सर्पांनां यज्ञसूत्रें दिव्य अशीं जीं त्यांनांही मी (तेथेंच तुमच्या देहामध्येंच) पहात आहे.

(श्लोक १५ वा. ओ. २५५–२६५)

**अद्‌भुत रस—**

**(अर्जुन उवाच पश्यामि देवांस्तव देहे—)**
**म्हणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुम्ही ।**
**जे हे विश्वरूप की आम्ही । प्राकृते देखो ॥ २५५ ॥**
**परि सांचचि (भले) केले गोसाविया । मज परितोषु जाला साविया ।**
**जी देखिलासि जो इया । सृष्टीसी तूं आश्रया ॥ २५६ ॥**
**देवा मंदराचेनि आंगलगे । ठायी ठायी श्वापदांची दांगे ।**
**तैसी इये तुझ्या (तुझिया) दही अनेगे । देखतसे भुवने ॥ २५७ ॥**

आहो आकाशाचिये खोळे । दिसती ग्रहगणांची कुळे ।
का महावृक्षि अविसाळे । पक्षि जाति जे ॥ २५८ ॥
तयापरी श्रीहरी । तुझिया विश्वात्मकी इये शारीरी ।
स्वर्ग देखतसे अवधारी । सुरगणेसी ॥ २५९ ॥
(सर्वांस्तथाभूतविशेषसंघान्)—
प्रभु महाभूतांचे पंचक । येथ देखत आहे अनेक ।
आणि भूतग्राम येक येक । भूतसृष्टीचे ॥ २६० ॥
(ब्रह्माणम् ईशम् कमलासनस्थम्)
जी सत्यलोकु तुजमाजि आहे । देखिला चतुरानन हा नोहे ।
आणि येरीकडे जंव पाहे । तंव कैलासुही दिसे ॥ २६१ ॥
श्रीमहादेव भवानियेसी । तुझ्या देखतसे एक अंशी ।
आणि तूंते ही गा हृषीकेशी । तुजमाजीं देखे ॥ २६२ ॥
(ऋषींश्चसर्वानुरंगाश्चंदिव्यान्)
पै कश्यपादि ऋषिकुळे । इये तुझिया स्वरूपी सकळे ।
देखतसे पाताळे । पन्नगासी ॥ २६३ ॥
किंबहुना त्रैलोक्यपति । तुझिया येकाचि आवेवाची भिंती ।
इये चतुर्दश भुवने चित्राकृती । अंकुरली जाणो ॥ २६४ ॥
आणि तेथिचे जे जे लोक । ते चित्र रचना जी अनेक ।
ऐसे देखतसे अलौकिक । गांभिर्य तुझे ॥ २६५ ॥

जयजयजी–जयजयाजी. विश्वरूप = अनेकरूपाचे. विष्णु. प्राकृते–प्राकृत = संस्कृतोत्पन्न अपभ्रंश पावलेली भाषाविशेषः माया प्रवर्तक हलका मनुष्य; प्रकृतिपासून झालेले अशिक्षित अडाणी; सामान्य; नेहमीचा. ग्राम्य = मूळचे. (२५५) केलें–भलें केलें. परितोष = संतोष, तृप्ति. जाला–जाहला. साविया = सहज. आश्रय = प्रतिष्ठा, आधार, गृह. (२५६) मंदराचेनि अंगलगे = (मंदर = स्वर्ग, आरसा, मंदार वृक्ष, मोत्याचा हार, मंद, स्थूल. मंद्र = गंभीर शब्द. मंदिर = गृह, देवालय. अंगलग = समागम संबंध.) उपाय अंग संबंधानें. दांगे = कळप, अरण्यें तुझा–तुझ्या–तुझिया. भुवन = जग, उदक. श्वापदें = हिंस्र पशु, वाघ. (२५७) खोळे = उदरामध्यें, पोटामध्यें. ग्रह–गणांचीं कुळें = ज्योतिर्गोल समुदाय मोजमाप शरीर सेवक [(ग्रहणांचीं कुळें ?) = ग्रह = हेतु, यत्न, ज्ञान; ज्योतिर्गोल. ग्रहण = स्वीकारणें, ज्ञान, मान, गण = समुदाय. कुल = धरणें, देश, शरीर, समुदाय, घर.] अविसाळे–आमिसाळे = घरटीं. (अवि = मेंढा, डोंगर, सूर्य, वायु, लोंकरीचें वस्त्र, शाल, मालक. शाला = स्थान, गोठा, गृह, पागा, घराचा भाग, खोली, घर, सभागृह, मुख्य–खांदी, खांदा. आमिसाळे–आमिष = मांसविकार इच्छा, मोहक पदार्थ, नजराणा, जीवनोपाय, भक्ष्य. आल = पुष्कळ. साल = शाल. साल (शाल) पुष्प = स्थल पद्म. सालग्राम = शाळिग्राम. साल (शाल) भंजिका = बाहुली) पक्षिजाति जे–पक्षिजातांची. (२५८) विश्वात्मके–विश्वात्मकी = जग, ब्रह्मांड, (सगळा) आत्माच एक. [विश्वात्मा = परमात्मा, शंकर, विष्णु (सुंठ). विश्वात्मना = सर्वथा परिपूर्ण. विश्व = स्थूल देहाभिमानी जीव, जग, स्वाधीनतेचा, स्वतःचा, जिवंत, संबंधी. विश्वात्मक = जग, हें स्वतःच तेथें जिवंतपण हेंच संबंधी म्हटलें.] स्वर्गे–स्वर्ग = देवलोक. सुर = देव, सूर्य, विद्वान. सूरलोक = स्वर्ग लोक. सुरगण = देवसमुदाय. (२५९) देखत–दिसत. भूतग्राम = प्राण्यांचे संघ. येकयेक–येकैक–एकेक. पंचक = पांच, पांचांचा समुदाय,

पांच टक्क्यांचें (२६०) सत्यलोक=ब्रह्मदेवाचें स्थान (२६१) तुझा–तुझ्या–तुझिया. येके–एके. औंसी–अंशी ही–ही गा. देखे–जी देखे. (२६२) पन्नगाशी–पन्नगेसी. (पन्नग=सर्प.) पाताळे=अधोलोक (ज्योतिषांत लग्नापासून चौथें स्थान.) (२६३) येकाचि–एकेकाचि. अवेवाची–अवयवाचि ये =शरीराचे विभाग. भिंती=भिंत, अवकाश. आंकुरली जाणे–अंकुरली जाणो. [अंकुरली (अंकुर=कोंभ, मोड, केश; आश्चर्यकारक, आकारानें उगवलेली, कोंभास आलेली)] चित्राकृति=आश्चर्यकारक शरीर (चित्र=नाना रंगाचा आश्चर्यकारक, चंदनाचा टिळा; कूटप्रश्न; काव्यालंकार. आकृति=आकार शरीर) (२६४) अलौकिक (अद्‌भुत) अलोकिक. रचना=कृति, रचणे, व्यवस्था, उद्योग, विन्यास गांभीर्य =गंभीरपणा, स्वभावाची खोली. (२६५)

आतां अर्जुनाच्या त्या प्रार्थनेस तर एक आश्चर्यकारक का **विस्मयोत्पादक रस** येऊन आहे. त्यास सर्व एक चमत्कारच वाटून, ह्या विश्वरूपाच्या दर्शनाबाबत तो नम्र होऊन प्रार्थून आदरत आहे, कीं अहो! जी देवा! आपला जयजयकार असो! जय हो!! जय हो!!! स्वामिन् अहो! आज आपल्या कृपेचें तें नवलच एक मजला वाटत आहे कीं, जें आम्हीं प्राकृतांनीं (प्रकृतिमंतांनीं मूळच्यांनीं, सामान्यांनीं नेहमीच्या नेहमींचे जे आम्हीं त्यांनी) तुमचें विश्वरूप तें अनेक रूपांचें झालेलें विष्णुरूप तें आम्ही पहावें, हें जन्मास आल्याचें एक नवलच पाहिलें असें आहे, योग्यता तें रूप पाहाण्याची ती म्हणजे आपल्या कृपेचे –दयेचे तें नवल–नाविन्य तें मजला तर एका आश्चर्याचें होऊन आहे. (२५५)

अहो जी जय जय! जय हो हे स्वामिन! तुम्हीं अहो देवा! साच म्हणजे खरेंच कीं अहो सांच्यामधून दाबून काढावें अशा मूर्तीचें होणेंच एक जसें का माझे झाल्यानें तेथें मला तर भले भले असेंच होऊन आहे! अहो, गोसाविया स्वामिन्! ह्यामुळें तर मजला सहज तृप्ति–संतोष झाला आहे, जे का ह्या सृष्टीस आश्रय, प्रतिष्ठा, आधार का गृहच एक असे आपण जे त्यांना मी पाहिलें–देखिलें ते ह्या सृष्टीची प्रतिष्ठाच कीं अहो! आपण आहांत असें मी पाहिलें. (२५६)

जी अहो जय जय! हे स्वामिन्! अहो देवा!! स्वर्गाच्या समागमानें का संबंधावरच कीं,–अहो मोत्याच्या हारानेंच कीं, एका भूषविलें जाणें तेथें स्पर्धा ती केवढी अहो! ह्या आरशाचे तें रूप दाखविणें तेथें तर अहो! ग्राम्यपणच कीं एक मानिलें होत असणारें–तेथेंहीपण कांहीं उपायाचें अंग सांपडावें, संबंधाचें व्हावें अशी चढाओढ होऊन असतें जें. अहो! ह्या स्वर्गवृक्षासाठीं तर–ह्या मंदार वृक्षासाठीं कीं, चढाओढीवरच मुळीं संबंधीं म्हटलें जाणारें का समागमाचें असें होणारें तेथें तर गाइ झाल्या श्वापदें ठिकठिकाणीं त्या हिंस्र पशूंचे ते अथवा शार्दूलांचे ते समुदाय–कळप (असणारे–तेथें पुरवणी का जरूरीचे भाग दुय्यम साधन का मदन हा हावभाव का नृत्य आवरिलेलें अलंकार शोभा का रंगभूमिकाच एक जशी.) असावेत जसे का तसें ह्या तुमच्या देव देहामध्यें अनेक अशीं तीं भुवनें का जगेंच कीं देहउदकरूपानें मी पाहात आहे. [मंदराचल (=कुलाचल ७; महेंद्र, मलय, सह्य द्रुति मान, ऋक्ष, विंध्य, व पारियात्र.) देवांनीं व असुरांनीं मंथन दंडानें क्षीरसागर मंथन केलेला, अभिनव जलसुंदर, भूतमंदर–भगवती दुर्गा जी तिचें स्थानच एक जसें मंदरवासिनी, 'दुं दुर्गे दुरितं हर'!!! (२५७)

अहो जी स्वामिन्! आकाशाच्या पोटामध्यें, उदरामध्यें, डेऱ्यामध्यें–अहो! जें पंचमहाभूतापैकीं एक जें आकाश (पोकळ जागा; प्रकाश; परमात्मा शून्य.) त्या भागामध्यें, (युद्धामध्यें रूपांतर होणारें जें का आकाशाच्या इतर भूतचारांच्या का चार भूतांच्या ठायींचें होणें तें का त्यांना आपल्या ठायींचें करणें जें त्यामध्यें) ज्योतिर्गोल जे (ग्रह=हेतु, ज्ञान, यत्न) त्याचे समुदायघराणीच जशीं का (अथवा देश, प्रांत, शरीर, गृह) अथवा असेंही म्हणू, कीं ग्रह म्हणजे हेतु, यत्न, ज्ञान, व ग्रहण म्हणजे स्वीकारणें, मान, ज्ञान, (का श्वासरूपी त्या सूर्यचंद्राचा ग्रास जो) इत्यादींनीं शरीरेंच तीं, तीं शरीररूपानें असलेलीं दिसत आहेत तीं कशीं

दिसत आहेत म्हणावें, तर जशीं का एका महान् थोर अशा वृक्षावर असलेलीं पक्षिजाती–वर्गाचीं तीं घरटींच जशीं का ती पक्षिजाति जशी का पक्षि–स्वभावोक्ति (सा.) का पक्षिवर्णे (पंखयुक्त, पक्षी, बाण.) "अहो आकाशाच्या पोटांत ग्रहगांचे समुदाय (कुळें) दिसावेत अथवा एखाद्या महान् वृक्षावर पक्षिजातिचीं घरटीं दिसावींत तशीं भुवनें तीं दिसत आहेत." (२५८)

जयजयाजी अहो स्वामिन्! हे स्वामिन् आपला जयजयकार असो! त्यासारखे आपण हे भगवन् श्रीहरी तुमच्या ह्या विश्वात्मक म्हणजे जग हें स्वतःच आपण तेथें जिवंतपण हेंच स्वतः संबंधींचें म्हटलें परमात्मा शंकर, विष्णु असे ह्या आपल्या देव शरीरामध्येंच कीं देवगणासहितही मी स्वर्गच कीं पाहात आहे असे जाणा. तसेंच, हे श्रीहरी तुमच्या ह्या विश्वात्मक शरीराचे ठायीं देव समुदायासहीत स्वर्गही मीं पहात आहें! (२५९)

अहो हे भगवन्! प्रभु! महाभुतें जीं पांच त्याचें पंचक (भूत आनंद; भूतपंचकपर आनंद, महाभूत-पंचक परम आनद, अद्‌भूतपंचक, परमभुतपंचक महदानंद, परभूतपंचक महानंद.) पांच पांच अशा पांचांच्या समुदायाची, पांचांची केलेलीं अशीं अनेक पंचतत्वाची गोठली आटुळी शरीरें मी देखत–पाहात आहें–तसेंच भूतसृष्टीचें, भूतसृष्टीमधीलचे भूतग्राम–प्राण्याचे संघ येथें मी पहात देखत आहे मजला दिसत आहेत. "हे प्रभु पाचांच्या समुदायाचें महाभूतांचें अनेकपणें असणें तें येथें मी पहात आहे–तसेंच भूतसृष्टीमधील एक एक प्राणी समुदायही मी पहात आहे." (२६०)

अहो जी जय जय हे स्वामीन्! जय हो जय हो अहो जी देवा! मी आपल्या देव देहामध्येंच कीं सत्यलोक आहें. तुम्हांमध्यें अहो चतुरानन ब्रह्मदेव हाच कीं अहो प्रजापतिच नव्हे काय? तसेंच दुसरीकडे पाहातों आहें तो, तो तर कैलासही दिसत आहे. "अहा हे स्वामिन्! तुम्हामध्यें सत्यलोक आहे हा पाहिलेला ब्रह्मदेवच की तो! बाजूसही एकीकडे मजला दिसत आहे:" (२६१)

अहो जी स्वामिन्! जय हो! जय हो! अहो भूतेश, श्रीमहादेव, श्री भवानी देवीसहित तुमच्या (मुख्य आदित्यांपैकीं) एका अंशामध्यें, (गौण अवतारच जसा असा) दिसत आहेत. तसेंच तुम्हासही कीं अहो हृषीकेशा! तुमच्या (आपल्या) मध्येंच कीं, मी पहात आहे जी पार्वतीसह श्री महादेव तुमच्या एका अंशीं दिसत–देखत आहे–तुम्हासही अहो! हृषीकेशी तुम्हांमध्येच की मी पहात आहे (तुम्हांमध्येंच तुम्हीं दिसत अहा!) (२६२)

अहो! (कश्यप हा मरीचीस झालेला कर्दम कन्या 'कला' हिजपासून झालेला पुत्र होय.) कश्यप, विश्वामित्र, अत्रि, गौतम, भारद्वाज, जमदग्नि. वसिष्ठ (मरीचि, अंगिरस, अत्रि, पुलस्त्य पुलह ऋतु वसिष्ठ) आदिकरून [काश्यप हा विभांडक ऋषि होय. हा वसुदेवाचा पुरोहित होता. ह्यानेंच पांडवांचें व कृष्ण-बळिराम ह्याचे जातकर्मादि संस्कार केले. हा सावर्णि मन्वंतरांतील सप्तऋषींपैकीं एक होय.] जीं ऋषि-कुळें तींहीपण तुमच्या स्वरूपाच्या ठायीं मी देखत आहें. त्याचप्रमाणें पन्नगासहितही सप्त पाताळें [अतल, वितल, सुतल, महातल (नाग व असुर यांचें स्थान) रसातल, तलातल व पाताळ] हीपण मी पाहात आहें. पण कश्यप आदिकरून ती सकळ ऋषिकुळें ह्या तुमच्या स्वरूपामध्यें मी पहात आहें, तसेंच नागासह का सर्पासह तेथें पाताळेंही मी देखत आहें. (२६३)

आपला जयहो! हे स्वामिन्! आपला जय असो! एवढेंच काय सांगावें! पण अहो त्रैलोक्यपति! तुमच्या एकाच अवयवाच्या भिंतीमध्यें, अवकाशामध्यें चौदाही भुवनें (सप्तलोक–भूर्, भुवर्, स्वर्, महर्, जनस् व तपस् व सप्त पाताळें) हीं चित्राप्रमाणें उमटलेली दिसत आहेत; ती चित्रेंच जशी का अशीं दिसत आहेत. बहुत काय! पण अहो हे त्रैलोक्य स्वामिन् तुमच्या एक एका अवयवाच्या भिंतीमध्येंही चवदा भुवनें तीं कशीं का चित्राकृतीच एक चितारली आहे असे मजला जाणवत आहे. (२६४)

तसेंच तेथीलचे लोक ते म्हणजे अनेकपणानें असलेली चित्ररचनाच एक अशी-ह्या लोकाचें जें कांहीं तेथीलचें होऊन असणें, तें म्हणजे जसें का आपले अलौकिक, अद्भुत असें तुमचें आपलें गांभिर्यच की तेथें तुमचे गंभीरपण हेंच जसें उमटलें आहे, ह्या लोकचित्ररचनेनें ते मी पहात आहें, माझ्या पहाण्यांत येत आहे, मला दिसत आहे. तेथचे लोक ते चित्र रचनाच एक जशी कां अशी अनेकतेची रचना मी देखत आहे! हे स्वामिन् तुमचे गांभिर्य लोकोत्तर असे आहेः (२६५)

**श्लोक १६ वा**

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं । पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवाऽऽदिम् । पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १६ ॥**

अनेक बाहूदरवक्त्रनेत्रम् = अनेक बाहु-हात, उदर-पोटें, वक्त्र-मुखें, नेत्र-डोळे असलेलें. सर्वतः अनंत रूपम् = चोहोंकडे अनंतपणानें तें रूप (नटलें) आहे. नान्तंनमध्यं न पुनः तव आदिम् = त्यास अंत नाहीं, मध्य नाहीं व आदीही पण नाहीं असें तुम्हींच तुम्हांस की आदि मूळ होत. विश्वेश्वर विश्वरूप = हे विश्व = जग, ब्रह्मांड, सगळा ईश्वरा, विश्वरूपा, ईश्वरा, विराट स्वरूपा अहो!

अन्वय :—

हे विश्वेश्वर । हे विश्वरूप । त्वां अनेक बाहूं । त्वां अनेक उदरं । त्वां अनेक वक्त्रं । त्वां अनेक नेत्रं । अनंतरूपम् सर्वतःपश्यामि । तव न अन्तं । तव न मध्यं । न पुनः तव आदिम् । ‘अनंतरूपम् सर्वतः पश्यामि’ ॥

अर्थ :—

हे विश्व जगतांच्या ब्रह्मांडाच्या ईश्वरा, हे विश्वरूपा, हे शक्तिमंत परमेश्वरा! अनेक बाहू, अनेक उदरें, अनेक वदनें, अनेक नेत्र असलेलें असे तुम्हांस मी पाहात आहें. अनंत असे तुम्ही!! तुमचा ना अंत, ना मध्य, ना आदि! अहो! तुम्ही आपलें आपणांसच आदि असे तुमचें तें रूप आहे व तेंच हे अनंतरूपा! मी चोहोंकडे पहात आहें. ॥ १६ ॥ (श्लोक १६ वा. ओ. २६६-२९३)

**[ विश्वात्मा-भूतात्मा-सर्वभूतात्मा-सर्वभूत आत्मक,**

आत्मज्ञान, आत्मपंचक, आत्मभू; आत्म म्हणजे मूल तत्व भाव ज्ञान हें एक जाणीव, ती जाणणे-प्रत आली. तेथें भूतमात्राचा भाव जो तो त्या जाणिवेप्रत आला असें हें सर्व भूतांचें जें जाणणे प्रत येणें, तेथें जसें सर्वभूत हें आत्म म्हणजे आपल्या स्वभावाच्या योग्यतेस घेऊन आहे; असें तें, तेथें सर्वभूत आत्मक, सर्व भावानें स्थित आहे, असें तें आतां भूतात्मा म्हणजे (परमात्माच एक असें तें तेथें) भाव हाच भूत भावन आत्माच जसा ह्या भूत सृष्टींचा तेथें देवत्वच एक भावबळानें किंवा भावावर उभें असल्यानें तेथें कर्मानें लिंपणें नाहीं.

येथें जीवदशेचें आंग तें ‘**आत्म**’ ह्या शब्दानें दर्शविलें गेलें: म्हणून तेथें एकच बाजू महत्वास येते; व ती ह्या देहाभिमानाची होय. ती दुसऱ्या तिसऱ्या कसल्याही गुणाची, व्यवसायाची का स्वभावाची नाहीं. म्हणून येथें मोठ्या श्रेष्ठ माणसापुढें जशी नम्रता, विनय, लीनता ही महत्व घेऊन असते तसें येथें ह्या आत्म शब्दापुढें -भावापुढें (लीनतेमुळेंच मुळीं भाव म्हणजे रूप वर येणारें होतें म्हणून येथें रूपास महत्व आहे. विनयाचे का लीनतेचे-उसासा घेऊन जीवदशेवरचे ओझें हलकें केलें असें होणारें तें) हें केव्हांही विसरूं नये. स्वभाव हा जो एक ज्ञान म्हणा का अज्ञान म्हणा असा आढ्यता घेऊन असलेला तो ह्या विनयामुळें आपल्या लीनतेस आल्यानें भूतमात्रांना वंदनच एक जसें झालें असें होतें; तेथें भाव हा जागा झाल्यानें (जाणिवेस आल्यानें, हिंमतीचा झाल्यानें), सगुणत्वानें प्रकाशूं लागल्यानें, ह्या जीवसृष्टीस (जीवभावास जसें) परमात्म-

रूपच आलें आहे असें होतें. तेथें मग ईशत्वाचे गुण हेंच सुयोजन असें स्वभावाचें रम्यपण व्यक्तिमात्रास पाहाण्यास दिलेलें असें एक शांत, स्वाभाविक लक्षण होय. येथें आढ्यता ही हार खाते; म्हणून ती आत्मभू का आत्मकारण सांभाळण्यासाठीं येथें हाच एक उत्तम असा धडा तोच कीं ह्या लीनतेचा होय. तो वस्तुजाताचें महत्व अस्थानीं असें होऊं देत नाहीं. जेथील (योग्यता किंवा) महत्व हें तेथेंच दिलें गेल्यानें ह्या व्यवसायास का स्थितीस (अथवा स्वरूपाचे रम्यपणास) एक आधार येऊन असतो.

येथें ह्या उपप्राणाचे जसें तें स्वतः आत्म म्हटलेलें तेंच सांभाळलें गेलें, व तें (आत्म) स्वरूप दर्शनाचें असें ह्या जीवदशेचे आंतच पाहिलें असें होय. येथेंच आत्मपंचक तें शिवच एक का मोक्ष का योग एक, असें ह्या स्वभावसिद्धतेनें दर्शनाचें झालें असें होतें–अशा ह्या योगास का क्रियेस जीवभावापेक्षांहि ज्यास्त महत्व आहे. येथें योगक्रिया हीचमुळीं जशी का आपल्या योग्यतेस आणिली असें होतें.]

(अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम् )
यया दिव्य चक्षूचेनि पैसे। चहूंकडे जंव पाहात असें।
तंव दोर्दंडिका जैसे। आकाश कोंमेले ॥ २६६ ॥
तैसे येक निरंतर। देवा देखतसे तुझे कर।
करित अवघे व्यापार। येकेचि काळीं ॥ २६७ ॥
मग महाशून्याचेनि पैसारे। उघडिली ब्रह्म कटाहाची भांडारें।
तैसीं देखतसें अपारें। उदरें तुझीं ॥ २६८ ॥
जी सहस्र शीर्षाचे निमेळे देखिले (दाखले)। कोटिघरी होताति येकेवेळे।
की परब्रह्मन्ति वदन फळे। मोडोनि आलें ॥ २६९ ॥
तैसी वक्रे जेउतीं तेउतीं। तुझी देखतसे विश्वमूर्ती।
आणि तयाचि परी नेत्र पंक्ति। अनेक सैंघ ॥ २७० ॥
(त्वां सर्वतोनंतरूप) हे असो स्वर्ग पाताळ। की भूमी दिशा अंतराळ।
हे विवक्षा ठेलि सकळ। मूर्तिमय देखतये ॥ २७१ ॥
तुजविण एकादीकंडे। परमाणूहि येतुला कोडें।
अवकाश पहातसे परि न सांपडे। ऐसे व्यापिले तुवां ॥ २७२ ॥
इये नानापरि अपरिमिते। जेतुली सांठविली होती महाभूतें।
तेतुलाहि पवाड तुवा अनंतें। कोंदला देखतसें ॥ २७३ ॥
ऐसा कवणिये ठायिहूनि आलासी। येथ बैसलासि कीं उभा आहासी।
आणि कवणिये मातेच्या पोटी होतासी। तुझें ठाण केव्हढें ॥ २७४ ॥
तुझें रूप वय कैसें। तुज पैलीकडे काय असे।
तू कासयावरी आहासी ऐसें। पाहिलें मियां ॥ २७५ ॥
तंव देखिलें जी आघवेसी। तरी आतां देवा तुज ठाव तूंचि।
तूं कवणाचा नव्हेसी ऐसाचि। अनादि आईता ॥ २७६ ॥
तूं उभा ना बैठा। दिघडा ना खुजटा।
तुज तळीं वरी वैकुंठा। तूंचि आहासी ॥ २७७ ॥
तूं रूपें आपणा ऐसा। देवा तूंचि तुझी वयसा।
पाठि पोट परेशा। तुझें तूं गा ॥ २७८ ॥

किंबहुना आतां । तुझा तूंचि आघवा श्री अनंता ।
हे पुढती पुढती पाहातां । देखिलें म्यां (मियां) ॥ २७९ ॥
(नन्तंनमध्यंनपुनस्तवादिम् )—
परी या तुझे रूपा आंतु । जे उणीव येक देखतु ।
जे आदि मध्य अंतु । तिन्हीं नाहीं ॥ २८० ॥
येन्हवी गिंवसिलें आघवा ठायीं । परि सोय न लाहेचि केहि ।
म्हणौनि त्रिशुद्धि हे नाहीं । तिन्ही येथ ॥ २८१ ॥
एवं आदिमध्यांतरहित । (पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप)
तूं विश्वेश्वर अपरिमिता । तू देखलासि जी तत्वता ।
विश्वरूपा ॥ २८२ ॥
तुज महामूर्तीचिया आंगी । उमटल्या पृथक्मूर्ती अनेगी ।
लेइलासि वानेपणाची आंगी । ऐसा आवडत आहासी ॥ २८३ ॥
नाना पृथक् मूर्तीचिया (मूर्तितिया) द्रुमवेली । तुझिया स्वरूपमहाचळी ।
दिव्यालकार फळी फुली । सासिन्नलिया ॥ २८४ ॥
हो कां जे महोदधि तूं देवा । जालासि मूर्तितरंग हेलावा ।
कीं तूं वृक्ष येक बरवा । मूर्तीफळीं फळलासी ॥ २८५ ॥
जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्री गगन गुढारलें ।
तैसें मूर्तिमय भरलें । देखतसे तुझें रूप ॥ २८६ ॥
जी येकेचिया एकेकीच्या अंगप्रांतीं । होय जाय हे त्रिजगती ।
येवढ्याहि तुझ्या आंगी मूर्ती । कीं रोमा जालिया ॥ २८७ ॥
(स्पष्ट भावार्थ गद्य)
ऐसा पवाड मांडोनि विश्वाचा । तूं कोणपां येथ कवणाचा ।
हे पाहिले तंव आमुचा । सारथि तो तूंचि ॥ २८८ ॥
तरी मज पाहाता श्रीमुकुन्दा । तू ऐसाचि व्यापक सर्वदा ।
मग भक्तानुग्रह तया मुग्धा । रूपातें धरिसी ॥ २८९ ॥
कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहातां वोल्हावती मन डोळें ।
खेंव (खेम) देवों जाईजे तरी आकळे । दोहींचि बाही ॥ २९० ॥
ऐसी मूर्ती कोडसवाणी कृपा । करूनि होसी ना विश्वरूपा ।
की आमच्याच दिठी सलेपा । जे सामान्यत्वे देखती ॥ २९१ ॥
तरी जाता दिठीचा विटाळु गेला । तुवा सहज दिव्य चक्षु केला ।
म्हणोनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ॥ २९२ ॥
तरी (परी) मकरतुंडा मागिलीकडे । होतासी तो तूंचि येवढें ।
रूप जालासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ २९३ ॥

या–यया. पैसे=योगानें. दोर्दंडि=बाहूंच्या ठायीं. [दोर्दंड=बाहु. (दोर्दंड, भुजदंड, वाग्मी, वाग्दोर, वसुद, महेंद्र, दुर्धर)] दोर्दंडि आकाश कोंभेले=तुम्हां विश्वरूपाच्या बाहूंना जणुं आकाशाचे अंकुर फुटले आहेत; कोंभ आले आहेत असें ते (बहुरूपी) अंकुर दिसूं लागले. (२६६) येक–एकैक–एकचि. सदोदिततेचें=चिरंतरचें असें एक एकच देखतसे–देखत असे. (२६७) महाशून्याचेनि पैसारे=अव्यक्ताच्या विस्तारानें. ब्रह्मकटाहाची=ब्रह्मांडाची. भांडारे=भांडारगृहें (२६८) सहस्रशीर्ष=पुरुष निमेळे देखिले–

दाखले. परब्रह्मचि=परब्रह्मच वदन फळांनीं डंवरून–,मोडोनि–मांडोनि भरास आले आहे. (२६९) तयापरि –तयाचि–परी अनेक–अनेका. सैंघ=दाट. (२७०) विवक्षा=विचार, विवंचना, भाषा, बोली. (२७१) एकादीकडे–एकादि–याकडे. (२७२) नानापरी–नानाभूतीं. अपरिमित–अपरंमित. पवाड=विस्तार. कोंदला=व्यापिलेला. (२७३) कवणियें–कवणे. ठायींहूनि–ठायाहुनि तूं. मातेच्या–मातेचिया. ठाण= स्थान. (२७४) कासयावरी–काइसयावरी. ऐसें–हें ऐसें म्यां–मियां. (२७५) तुज–तुझा. आईता– –आयता. (२७६) दिघड–दिघडा=उंच, धिप्पाड. ना खुजटा=ना ठेंगणा. (२७७) आपणा– आपणिया. तूंचि तुझी–तुझी–तूंचि. (२७८) तुझा–तुझे. आघवा–आघवे. पुढती–पुढत. म्यां–मियां. (२७९) तुझे–तुझिया. जे–जी. (२८०) गिंवसिले=शोधिले. सोय न लाहेचि केहि (कहि)=पत्ता लागत नाहीं. म्हणौनि–म्हणोनि. (२८१) उमटल्या–उमटलिया. वानेपणाची=अनेका प्रकारच्या नानारंगांची रंगांची आंगी=अंगरखा. आवडत–आवडतु. (२८३) मूर्तीचिया–मूर्ति तिया. द्रुमवेली=द्रुपवल्ली ,वृक्षवेली. तुझां–तुझिया – तुझ्या. स्वरूप महाचळी=(अचल=निश्चल, अबाधित, पृथ्वी, ब्रह्म, पर्वत–) महत् स्वरूपाचे (रूपाचे) ठायीं. फळी फुली–फुली फळी. सासिन्नलिया=भरल्या. (२८४) जालासी मूर्तितरंग –जाहालासी तरंगमूर्ति. वृक्षयेक–येकवृक्ष. मूर्तिफळी–मूर्तिकफळी. (२८५) गुढारले=लपले व्यापले, आच्छादिले. (२८६) येकेचिया–एकेकीच्याः रोमाजालिया=एक एक रोम, त्रिजगती होय, एवढ्या मूर्ती (त्रिजगती=जगत–जगे–लोक–तिन्हीं जगतांची–स्वर्ग, मृत्यु, पाताळ–होय अशी. जगती=पृथ्वी, जमीन, लोक, गाय–छंद. जगतीश्वर=राजा. जगतीसह=वृक्ष.) (१८७) मांडोनि–मांडूनि. कोण–कवण. कवणाचा –कोणाचा. तो तूंचि–तोचि तूं. (२८८) भक्तानुग्रह–,भक्त अनुग्रह–, भक्तानुग्रहे. मुग्धा=तरुण व सुंदर स्त्री, गोजिरवाणा, सुंदर. (२८९) सावळे–सांवळे. (सबली=तिन सांज) वोल्हावती=समाधान पावतात, निवतात. खेव देवो–खेम देऊ=क्षेम, आलिंगन द्यावे तर. (२९०) कोडिसवाणी=लहान व सुंदर. ना –गा. दिठी सलेपा=मलिन अज्ञान दृष्टीला. सामान्यत्वें=सामान्य मनुष्याप्रमाणें. (२९१) सहज– सहजे. यथारूप देखवला–यथारूपें देखिला. (२९२) मकर तुंडा मागिली (मागिलें) कडे=रथावर मकराच्या तोंडामागें जे तुम्ही बसले होतां. तो तूंचि–तूंचि तो. जालासि–जाहलासि. फुढे–पुढे. (२९३)

ह्या माझ्या आपल्या दिव्यदृष्टीच्या विस्तारानें, जेव्हां का चहूंकडे मी पाहात आहें, तेव्हां तर अहो! विश्वरूपाच्या तुमच्या ह्या बाहूंनां जणूं आकाशाचे अंकूर फुटले आहेत असें दिसत आहे. आकाशास कोंभ आलेले असे ते बाहूरूपी अंकूर आहेत, असें दिसत आहे, असें दिसूं लागलें. (२६६)

तसें निरंतरत्वें एक, सर्व बाहुरूपी आकाशास बाहूंचे कोंभ आलेले, असे तुमचे कर देखण्यास येत आहेत. ते कर सर्वही व्यापार व व्यवहार एकाच काळीं सर्व करीत असलेले असें तेथें एकत्व. (२६७)

तेथें अव्यक्ताच्या विस्तारामुळें–महाशून्याच्या पैसारानें पसाऱ्यानें–जशीं का ब्रह्मांडाचीं भांडार गृहें ब्रह्मकटाहाची भांडारें उघडिलीं गेलीं त्याप्रमाणें तुमची, हे देवा! अपार अशीं उदरें मी देखत आहें. (२६८)

अहो सहस्रशीर्ष जो पुरुष त्यानें आपलें पुरुषपण दाखविण्यानें–दाखल्याचें झालें व त्याचा मेळ बसण्यावरच कीं जशी का एकाच वेळीं कोटि कोटि वदनफळें त्या परब्रह्मरूपी वृक्षास आलींः (परब्रह्म तें वदन फळांनीं डंवरून आलें आहे–) पुरुषच एक सर्व आपल्या शरीरी का अंगी लेईला आहे. असें तें सहस्रशीर्ष पुरुषाचें होणें तेथें वृक्षच जसा एक वदन फळांनीं मोडून आला का मांडला गेला आहे जसे.— (२६९)

तशीं तुझीं जेवढीं तेवढीं वदनें, वक्त्रें ती सर्व मी पाहात आहे, तसेंच डोळ्यांच्या पंक्तीही पुष्कळशा अशा मला दिसत आहेत— (२७०)

असें हें असून तेथें स्वर्ग म्हणजे देवलोक तसेंच पाताळ का भूमी, दिशा व अंतराळ असे निरनिराळे-पण अथवा ही भूमी आहे, का दिशा आहे, का अंतराळ? असा कांहीही विचारचमुळीं येथें हेतूंचा होईना व सर्व कांहीं मूर्तिमय होऊन गेलें आहे. सर्व कांहीं मूर्तिच एक असें दिसत आहे. (२७१)

तुमच्याशिवाय एकाद्या बाजूस कांहीं आहे असें नाहीं. परमाणु एवढीही रिकामी जागा पहावी तर मुळीच सांपडत नाहीं. असे तुम्हीं सर्वत्र व्यापून आहांत. (२७२)

अनेक तरीपण अपरिमित–अमर्याद–अनियमित तेथें परिमाण का मर्यादाच नाहीं, अशीं जितकीं महाभूतें तीं सांठवणीचीं (सांठविलेलीं होतीं) तितका सर्व तुमचा पवाड (विस्तार) तुम्हीं अनंतांनीं कीं तुमच्या रूपानें मूर्तीनें व्यापला आहे–कोंदला आहे. (२७३)

असे अहो तुम्हीं देवा! कोणत्या त्या ठावाठिकाणाहून आले आहांत! तुम्हीं बसलेले आहांत का उभे आहांत? तसेंच कोणत्या मातेच्या 'मायेच्या' पोटीं होतां? तसेंच तुमचें स्थान, आकृति असण्याची ती प्रकार, तऱ्हा ती केवढी अथवा कसले ते, कसल्या त्या आकृतीचें होणें! असे तुम्हीं कोणत्या त्या ठावाहून आले आहांत! येथें तुम्हीं बसलेले आहांत का उभे आहांत! तुम्हीं कोणत्या त्या मायेच्या पोटीं जन्मला होतां का तुमचें ठाण तें केव्हडें तें बरें!!! (भंग तो 'देहुडाचरण' का 'कटी कर' असे जे कांहीं) ते. (२७४)

तुमचें रूप तें कसें आहे, तुमचें वय तें काय का वयास येणें तें कसें तुम्हांपलीकडे काय आहे? तुम्ही कशावरती ती आपली प्रतिष्ठा घेऊन आहांत! का कांहीं एकादें वाहन तुम्हांस आहे किंवा कसें? तें मी पाहिलें; तें मजला देखिलें होऊन आहे–तें मजला देखणें देऊन आहे. (२७५)

तुमचें सर्व कांहीं पाहिलें व आतां असें मला समजत आहे कीं तुमचा ठाव का सीमा तुम्हींच आहांत. तुम्हीं कोणाचेही नव्हत, असें अनादि अगदीं पहिल्यापासूनच कीं आईते असे आहांत! (२७६)

तुम्हीं ना उभे आहांत, ना बसले आहांत, ना दीर्घ कीं उंच असे आहांत, ना खुजटा म्हणजे ठेंगणे आहांत! अहो हे वैकुंठनायका! तुमच्या खालीं,–तुमच्या तळामध्यें तसेंच तुमच्या वरतीही तुम्हीच कीं व्यापून आहांत! (२७७)

तुम्हीं रूपानें (डोळसपणानें तुम्हां) आपणासारखेच आहांत अहो देवा! (तुम्ही वयोमानानें का वयास येण्यानें जे कांहीं एक वयाचें होणें हें) तुम्हींच तुम्हांस वय होत. अहो, श्रेष्ठ अशा ईश्वरा! तुमचे तुम्हींच की, तुम्हांस पाठ का पोट असें आहांत. (२७८)

बहुत काय बोलूं! पण अहो! हे अनंता! तुमचे अवघे सर्व कांहीं तुम्हीच सर्वपणें आहांत असें मजला तुम्हांस वरचेवर पुन्हः पुन्हः पहाण्यानें उमजत आहे–निरीक्षण्यानें देखिलें होत आहे. (२७९)

पण ह्या तुमच्या रूपा (–स्वरूपा डोळसपणा) मध्यें (देखणेपणामध्यें, स्वरूपवंतामध्यें) (जी कांहीं एक उणी (पुरी नेणती) बाजू आहे ती (उणिवेची अशी मी पहात आहें; मजला जाणवत आहे. ती) ही कीं तुम्हांस कांहीं आदि (पहिलेपण का मुख्य असें), मध्य (कटिप्रदेश का मध्यभाग का योग्य असें,) का अंत [म्हणजे साधारणपण का स्वराचें होणें जें कांहीं (अंत=जवळचे होणे का खरेपण का सीमा.)] अशी तिन्हीही नाहींत. (२८०)

एऱ्हवीं पाहिलें असतां अवघ्या सर्व ठिकाणीं तुम्हांस शोधलें–हुडकलें तरी कांहींही तेथें स्वरूप आनंदाची सोय का शोध म्हणून लागत नाहीं व असें आहे म्हणून त्रिशुद्धिही का निःसंशयतेनें असे म्हणावें लागतें कीं, तिन्ही ही जी म्हटलेली आदि, मध्य, अंत, [(१) मुख्य, (२) कटिप्रदेश कां मध्य योग्य, (३) जवळचे होण्यानें खरेपणाची सीमा,] अशी ही तिन्ही येथें नाहींत. सर्व ठिकाणीं शोधिलें पण शोध लागत नाहीं म्हणून निःसंशय ही तिन्ही (आदि, मध्य, अंत) येथें नाहींतः (२८१)

याप्रमाणें एकंदरीत तुम्ही आदिमध्यांतरहित असे अपरंपार, (अमर्यादतेनें असणारे असे विश्वाचे) ईश्वर! (अहो, ह्या जगाच्या–ब्रह्मांडाच्या सगळेपणानें असणारे तुम्हीं जे सगळेपणाचे–स्वामिन्! समर्थ! परमेश्वर! महादेव! श्रेष्ठ अशा) अपरिमित असे शक्तिमंत! जी अहो! विश्वाच्या रूपा! जगाच्या ब्रह्मांडाच्या स्वभावा! शरीरा, सगळेपणाच्या आकृतींच्या! सगळेपणाच्या प्रकारा! अहो जगाच्या सौंदर्या! ब्रह्मांडाच्या वर्ण, वस्तु, धर्म, कांति का उत्कर्ष, अक्षर अशा विश्वरूपा! तुम्हीं मुख्यत्वेंकरून खरे पाहातां, तत्वतः–स्वरूप, आकृति, अवस्था, ब्रह्म, पदार्थ, चित्ताचे, असे देखिले पाहिले आहांत कीं, (२८२)

तुम्हा महामूर्तींच्या अंगीच कीं, महत्पूजनीय (उत्सवाच्या तेजाच्या, यज्ञच कीं मूर्तिमंत अशा, तुमच्या मोठ्या व श्रेष्ठ अशा प्रकाशाच्या पूजाच होणारी जशी का ह्या ब्रह्मांडाची अशा, नमस्कारच होत आहे तुम्हांस अशा मूर्तींच्या, प्रतिमेच्या, आंगामध्येंच, अवयव, शरीर, उपायामध्येंच कीं ज्यांना शरीर आहे) अशा मुख्य पृथक् अनेक मूर्ति उमटलेल्या आहेत–(मदन, विलेपन द्रव्य, हावभाव, अंगास वस्त्रालंकारांनीं शोभविणें, स्वीकार, प्रतिज्ञा, अंगुलिभूषण, आंगठी) तेथें तर तुम्ही असें शोभत आहांत कीं, अनेक प्रकारच्या रंगांची अंगरखींच सर्वत्र सांगोपांग अशीं लेइलेले अंगावर धारण केलेले जे, ते तुम्हीं मला आवडत आहांत, तुम्ही विस्ताराचे घडलेले आहांत असें मजला वाटत आहे. "तुम्हां महामूर्तींच्या अंगीं–भरजरी अनेक मूर्ती उमटल्या आहेत तेथें अनेक प्रकारच्या रंगाचा आंगरखा तुम्हीं धारण केला आहे असे तुम्हीं आवडत आहांत." (२८३)

अथवा असेंही आवडणारे होत आहांत कीं, पृथक् मूर्ती त्या सांचलेल्या अशा वृक्ष व वेलीच तुमच्या अचल स्वरूपावर असलेल्या त्यानीं आपल्या फुलांनीं व फळांनीं अलंकारच की ते तुमचे तुम्हीं भरास आलेले होत. "अथवा पृथक् मूर्ति त्या वृक्ष व वेलीच कीं त्यांनीं तर तुमचे स्वरूप ते पर्वतासारखे ते आपल्या फळांनीं व फुलानीं आच्छादिलेले आहे." (२८४)

अहो! देवा, जे तुम्हीं महान् असे उदधीच (उत्सवाचे असें मेघच का समुद्रच असे तुम्हीं तर हालणारे) तेथें आंदोळणारे असे जे तरंग त्याची एक मूर्तीच जाहाले आहांतः कसें तर तुम्ही बरवे असे श्रेष्ठ वृक्षच एक (कीं मूर्ति, शरीर, प्रतिमा, पाणी मस्तक–) सूर्याचे तरंग का किरण अथवा ब्रह्माचे हालणारें तरंग–मूर्तिरूपी फळानीं फुलाफळास आलेले शोभलेले होत. "देवा! तुम्ही महोदधि! मूर्ति ते तरंग हालवते असे! जसे का तुम्हीं वृक्षच एक मूर्तिरूपी फळानीं फळलेले, फळास आलेले, शोभलेले होत." (२८५)

अहो, ते तुम्हीं कसे तर जसे का त्या सर्व भूतांमध्यें अहो, भूतळच एक, का भूतांनीं (वृक्षांनीं पृथ्वीची सपाटीच एक मांडिलेली आहे जसें कां गगनीचे तान्यानीं (नक्षत्रानीं गगनच कीं) आकाश ते व्यापिलें आहे. (आच्छादिलें का बिछाईलें आहे जसें) [गगन–नक्षत्रनेमि, नक्षत्राचा परिघ अथवा नक्षत्ररूपी चाकाचा घेर तो, चंद्र का ध्रुव अथवा विष्णुच म्हटला, तेथें सत्तावीस मोत्याची माळा ती कीं अलंकार होऊन आहे.] त्याप्रमाणें मी तुमचें महामूर्ति रूप पाहावें तो तर अवघे मूर्तिमयानें भरलें आहे असें मी देखत आहे. "कसे तर जसें का भूतळींच भूतळ मांडलें, शोभलें, गगनींच्या नक्षत्रानीं गगनच कीं आच्छादिलें, व्यापिलें, त्याप्रमाणें मूर्तिमय असेंच कीं तुमचें महामूर्ति रूप मूर्तिनीं भरलेलें आहे असें मीं पाहात आहे." (२८६)

अहो, जी त्या मूर्तिमयांच्या एक एका मूर्तीच्या (शरीराच्या–प्रतिमेच्या अंग, अवयव, शरीर, उपाय, प्रदेशामध्यें, अंगावर अंगाच्या) आंतमध्यें तर त्रैलोक्यच कीं हे होत जात आहे: एवढ्या अशा तुमच्या आंगीं मूर्ति आहेत ज्या का तुमच्या एकरूप केंसाच्या ठायीं दाटलेल्या जशा. "त्या एका एका मूर्तीच्या

अंगावर अंगप्रदेशात हें त्रैलोक्य होत जात आहे अशा तुझ्या अंगीं मूर्ती की तुम्हा महामूर्तीच्या एकेका केसाचे ठिकाणीं झाल्या आहेत.'' (२८७)

असा विस्तार ह्या विश्वाचा, (जगाचा, ब्रह्मांडाचा) मांडून आहांत असें तुम्हीं कवण आहांत कोणाचे ते आहांत असें पाहिलें तेव्हां तर की अहो! आमचा सारथी जो तोच की तुम्ही होत कीं अहो!! असा विश्वाचा विस्तार मांडून आहांत जे तुम्हीं ते कोणाचें कोण असावे ते हें पाहिले तों तर आमचा सारथि जो तेच का तुम्ही अहो! (२८८)

अहो मुकुंदा! तें रूप पाहून तर मला असें वाटत आहे कीं तुहीं तर सदा सर्वदा असेच व्यापक आहांत व भक्तावर कृपा अनुग्रह करण्याच्या इच्छेनें कृपेस स्वीकारून सगुण गोजिरवाणें अशा रूपास धरितां. (२८९)

अहो! कसें हो, सांवळें सुंदर रूप, मन हरण करणारें असें मनोहरी, तें पाहून तर माझे डोळे निवत आहेत–वोल्हावत–म्हणजे शांत होत आहेत. खेंव खेंम आलिंगन देऊं जावें, तो तें तर ह्या दोन्ही बाह्यांनींच की आवरिलें का वेढलें जात आहे, दोन्हीं बाह्यांनाहीं आलिंगनानें सांपडत आहे, आलिंगनाचें होत आहे. (२९०)

अशी मूर्ति सुंदर, शरीर मनोहर, प्रतिमा मन हरण करणारी कृपाच ती, स्वीकार करून आहांत–(अशी मूर्ति, शरीर, प्रतिमा) तीच की अनुग्रहानेंच विश्वरूप होत आहे गा, की अहो! येथें तर आमच्याच दृष्टी मलीन कीं त्या मुळेच तर त्या मूर्तीस सामान्यत्वेंच (अगदीं सामान्य साधारण मनुष्याप्रमाणेंच) की आम्हीं देखत पाहात आहोंत. (२९१)

तरी आतां तो दृष्टीचा, (पहाण्या–देखण्याचा तो) विटाळ गेलाः (असे झालें आहे) तुम्ही सहजपणेंच माझ्या साध्या डोळयांचा दिव्यच की एक असा नेत्र केला (आहे) आणि म्हणूनच कीं तुमचें यथारूपानें असणें म्हणजे माहात्म्य, उत्कर्ष तो तुमचा महिमा कीं, मजला देखवला–पाहवला जात आहे. (२९२)

पण अहो! मकरतुंड म्हणजे मगराच्या तोंडासारखा केलेला रथाचा अग्रभाग जो त्याच्या मागीलच्या बाजूस असलेले होतां जे तुम्हीं तेच की तुम्हीं एवढे रूप जाहाले आहांत हे (खरे) मी ओळखलें की अहो! (२९३)

श्लोक १७ वा

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम्।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥**

किरीटिनं = शिरोभूषण, मुगुट धारण करणारा श्रीभगवान (किरीटी = अर्जुन) गदिनम् = (गदा = आयुध.) गदा धारण करणारा. चक्रिणं च = हातामध्यें चक्र धारण करणारा विष्णु. (चक्रिन् = कुंभार, सर्प.) तेजोराशिम् = तेज = प्रताप, उष्णता, कांति, बल यांचा समुदाय एकवटून आला आहे असा तेजोमय. सर्वतःदीप्तिमंतम् = चहुंबाजूंनीं तेजस्वी (धगधगित तेजाचा.) दुर्निरीक्ष्यम् = जवळ उभे राहूनही पहाणे अशक्य अशा असह्य तेजाचा. समंतात् = चोहोंकडे, जवळच्या प्रदेशांत. दीप्त अनल अर्कद्युतिम् = प्रखर (तेज) असे अग्नि व सूर्य यांच्या एकवटलेल्या तेजानें प्रकाशमय झालेला. अप्रमेयम् = अनुमानानें नच करणारा का सिद्धांतास नेणारा.

अन्वय—

किरीटिनं (पश्यामि)। चक्रिणं (पश्यामि)। गदिनं (पश्यामि)। सर्वतः दिप्तिमंतं (पश्यामि)। च। तेजोराशिम् (पश्यामि)। समंतात (पश्यामि)। दुर्निरीक्ष्यम्। दीप्त अनल अर्क द्युतिम् (पश्यामि)।

अप्रमेयम् पश्यामि ॥ १७ ॥

अर्थ—

मस्तकावर मुगुट, हातांत गदा व सुदर्शन चक्र हीं आयुधें आहेत ज्याच्या, व चहुंबाजूंनीं तेजस्वी तसेंच प्रकाशमय असे ते, तुमच्या त्या रूपाची प्रभा असह्य झाल्यामुळें ते जवळून पाहाणें अशक्य–, प्रदीप्त अग्नि व सूर्य यांच्या कांतीसारखी तेजस्विता असलेले अनुमानानें नच सिद्धांताप्रत कां सिद्धतेप्रत येणारे–तसेंच नुसत्या ज्ञानाच्याद्वारें प्रमाणपूर्वक जाणणें शक्य नाहीं–असें तें तुमचें अमर्याद स्वरूप मी पाहात आहें ॥ १७॥ (श्लोक १७ वा ओ. २९४–३०६)

(किरीटिनं गदिनं चक्रिणंच)—
नव्हे (नोहे) तोचि हा शिरी। मुगुट लेइलासि श्रीहरी।
परी आताचे तेज आणि थोरी। नवल की बहुडे ॥ २९४॥
तेचि ये हे वरिलिया हाती। चक्र परिजितिया आयती।
सांवरितासि श्रीविश्वमूर्ती। ते न मोडे खुण ॥ २९५॥
येरीकडे तेचि हे (नोहे) गदा। आणि तळिल (तळिलिया दोही)
दोन्ही भुजा निरायुधा। वागोरे सांवराया श्रीगोविंदा।
संवसारिलिया ॥ २९६॥
आणि तेणेचि वेगें सहसा। माझेया मनोरथा सरिसा।
जालासि विश्वरूप विश्वेशा। म्हणोनि जाणे ॥ २९७॥
(तेजोराशिंसर्वतोदीप्तिमंतम्)
परि कायसे बाह्य (बा हे) चोज। विस्मो करावयाहि पवाड नाही मज।
चित्त होऊनि जातसे निर्बुज। आश्चर्ये येणे ॥ २९८॥
हे येथ आथि का येथ नाहि। ऐसे असोहि (विवरो) न ये काहि।
नवल अंगप्रभेची नवाई। कैसी कोंदतसे सैंघ ॥ २९९॥
(दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्)—
येथ अग्नीचीहि दिठी करपत। सूर्य खद्योत तैंसे (तैसा) हारपत।
ऐसे तीव्रपण अद्‌भुत। तेजाचे इया ॥ ३००॥
हो का जे महातेजाच्या महार्णवी। बुडोनि गेली सृष्टी आघवी।
की युगांत विद्युंच्या पालवी। आच्छादे गगना ॥ ३०१॥
ना तरी संहार तेजाच्या ज्वाळा। तोडुनि मांच बांधला अंतराळा।
(दुर्निरीक्ष्यम्) आतां दिव्य ज्ञानाच्याहि डोळा। पाहवेना ॥ ३०२॥
उजाळु अधिक अधिक बहुवसु। घडाडित आहे अति दाहसु।
पडत दिव्य चक्षूलही त्रासु। न्याहाळिता ॥ ३०३॥
हो कां जे महाप्रळयीचा भडाड। होता काळाग्नि रुद्राच्या ठाई गूढ।
तो तृतिय नयनाचा मढ। फुटला जैसा ॥ ३०४॥
तैसे पसरलेनि प्रकाशे। सैंघ पांचवणिया ज्वाळांचे वळसे।
पडता ब्रह्म कटाह कोळसे। होत आहाती ॥ ३०५॥
(पश्यामित्वाम्)—ऐसा अद्‌भुत तेजोराशी। जन्मा नवल म्यां देखिलासी।
नाही व्याप्ती आणि कां कांतीसी। पार जी तुझिये ॥ ३०६॥

शिरः=डोकें, शय्या. (शिरजः=केस. शिरी=हिंस, बाण) बहुडे–बहु हे. (२९४) ये–हे. वरिलिया–वरिलियेचि. (२९५) हे–नोहे. तळिल–तळिलिया दोही. निरायुधा–निरायुद्दा. वागोरे वागारे=लगाम, वाग्दोरः सांवराया–सांवरावया. संवसारिलिया–संसरिलिया=पुढें केल्या, सरसावल्याः (२९६) तेणेचि–नेणे.च. माझेया–माझिया. विश्वरूप–विश्वरूपा. (२९७) वा हे–बाहे. पवाड–पाड. निर्बुज=गोंधळून. आश्चर्यें–आश्चर्य. (२९८) असोहि–विवरो. (विवरो न ये–विश्वासोहि न ये.) कोंदतसे–कोंदलीसे. (२९९) तैसे–तैसा. ईया–यया. (३००) कां–कां जे–महातेजाच्या–(माहोमहो) तेजाचिया. विजूंच्या–विजूंच्या=विद्युल्लतांचिया. पालवी=पदरांनीं. आच्छादे=झांकली (३०१) मांच–माळा=शेतांत पीक राखण्यासाठीं अंतराळीं उंच लाकडाच्या घोडीवर जागा करतात का घर बांधतात तें. ज्ञानाचाहि ज्ञानाचियाहि (३०२) उजाळु–उज्ज्वल. अधिका अधिकु=अधिकाधिक दाहसु=दाह करणारा. न्याहाळिता निहाळिता (३०३) मढ फुटला=कळा फुटला उमलला, फुलला. (३०४) पसरेलेनि–पसरलेनि. पांचवणिया––पांचवन्हिचेया–पाचवनेचेया=पंचाग्नीच्या (पांचवनी–पांच वन्हि; १ प्रळयानळ, २ विद्युदनळ, ३ वडवानळ, ४, शिवनेत्रानल व ५ द्वादशादित्यानळ हे पंचाग्नि) कोळसे कोळिसे. (३०५) आणिका=आणिक. आणिका कांतीसी–आणि का कांतीसी–आणि–कातीसी (३०६)

पूर्वीचा मुगुट जो तोच हा आतांचा नव्हे काय? अहो, पूर्वीचा जो तोच मुगुट हा आपल्या आत मस्तकीं आपण धारण केला आहे. पण आतांच्या तेजाचें नवल व थोरपणा तो काय सांगू! कीं, बहु नवलाचें असे अद्भुतपण बहुत असेंच ते, ते जसें का सर्व मेघच कीं आपण मस्तकीं धारण केलें आहेत जसे (मेघदीप=वीज. मेघनाद=वरूण, मोर, मेघगर्जना.) (२९४)

पूर्वीं जें तुमच्या–विश्वमूर्तीच्या हातांत होतें तेंच कीं हे अहो! चक्र. तें फेंकण्याची तयारी (सिद्धता का सुदर्शनचक्र ते फिरविण्याची ती आईती सिद्धता) ती आपण काळवेळ सांवरून आहांत अशी जी कांहीं लिंग, पुरावा, ज्ञानसाधन, ब्रह्मचर्य, खूण ती तर, मुळींच येथें मोडत नाहीं–ती स्पष्टपणें दिसत आहे.

वरच्या हातीं असलेलें ते चक्र–जसें का ती आईतीच एक ते त्या विष्णुमूर्तीस–त्या दीप्तमूर्तीस सांवरीत असलेली! अशा त्या खुणा कांहीं मोडून जात नसलेल्या–त्या खुणा समजेस येणाऱ्या अशा आहेत. (२९५)

दुसऱ्या बाजूच्या हातांमध्यें असणारी ती गदा [=आयुध, भाषण, वाणी, वाक्य, (गदा आगदौ=अश्विनीकुमार. गदायित्नु=धनुष्य, मदन, बडबड्या)] व खालच्या दोन भुजा आयुधाशिवाय असलेल्या त्या अहो, हे श्रीगोविंदा, त्या तर घोड्यांना सांवरण्यासाठीं घोड्यांचे वाग्दोर, आनीन–लगाम पुढेंच केल्या आहेतः त्या वाग्दोर आनीन (वाग्=शब्द, सरस्वति; भाषण, वचनरूपी लगाम) हातीं धरण्यानें कीं,

दुसरीकडे तीच ही गदा नव्हे काय? अहो! तीच ती कीं असून तळांतील दोन्ही भुजा, ज्यांच्या ठायीं कोणतेंच आयुध नाहीं, त्या (वागोरे का) अनीनीच त्या संसारिलेल्याना (संसरिलेल्याना) की अहो श्रीगोविंदा, झेपण्याकरितांच कीं अहो! आहेत. (२९६)

आणि त्याच आईतीच्या गतीनें वेगानें माझ्या मनोरथासारखेच अगदीं सहजपणेंच हे अहो! विश्वरूपा! हे महामूर्ति! विश्वेशा! तुम्ही झालेले आहांत आणि म्हणूनच तर मी हे जाणूं जात आहें–मी जाणत आहें. (२९७)

रूपसंबंधीं येथें नवल तें कसचें! मी विस्मयाचें व्हावें अशी योग्यता चतुरता, लायकी माझी ठायी नाही, या स्वरूपाच्या आश्चर्यानें तर माझे चित्त तर अगदींच मोहित का थक्क होऊन गेलें आहे. (२९८)

हें स्वरूपाचें दर्शन येथें महत्व का महिमान पाहून आहे! खरेंच तें सहजपणेंच येऊन आहे! ते महत्वाचे असें होय कीं नव्हें? असें आश्चर्यच एक मजला वाटत असल्यानें तेथीलची महिमा ती अहो खरी

कीं उगीच भामक अशी हे ह्या वेळेस कांहीं विवरण्यास का विचाराच्या महत्वास येईना: (येथें विश्व हे श्वासच मुळीं घेईना: त्यामुळें ह्या रूपी विश्वासासच मुळीं येणें होईना) पण अहो! ह्या विश्वरूपाच्या अंगप्रमेची तेजाची–कीर्तीची नवलाची अशी (नाविन्य) नवलाई ती तर अगदीं कोंदकोंदून आहे. (२९९)

त्या तेजापुढें तर अग्नीचीहि दृष्टि (दिठी) करपत आहे. (पांढरी होत आहे; पण ती कांहीं फुटून जात नाहीं.) इतकी आपल्या अंगची तेजस्विता–कांति असल्यानें येथें अनेक सूर्य का हा सूर्य हीपण जसा का एकादा काजवाच तसा कोणीकडेच हारपून जात आहे. असें अद्‌भुत तीव्रपण आपल्या अंगाच्या तेजाचें आहे कीं अहो हे भगवन्! (३००)

ते कसें आहे म्हणावें, तर जसें का महतोमहान् अशा अपरंपार तेजाच्या महासमुद्रामध्यें तर ही सर्व सृष्टीच मुळीं बुडून गेली आहे. अथवा अहो! युगाचा अंतच होत जसा का तेव्हां तर तो विजांच्या कडकडाटानीं का पदरांनी तर सर्व गगन हेंच झांकलें व्हावें का आच्छादित होऊन जावें जसें कां (३०१)

किंवा संहार तेजाच्या ज्वाळीं तोडून एक मांचच कीं अंतराळींच (माळा) बांधला आहे व आतां तर तें अद्‌भुत असें महातेज ह्या दिव्य ज्ञानाच्या डोळ्यांनींही पण पहाणेंच नाहीं कीं अहो! का रूप तें दिव्य असा ज्ञानाचा डोळाच एक ब्रह्मतेजपुंज तोच मुळीं पहावेना असें झालें आहे. (३०२)

तेथीलचे तेज का उज्ज्वलपण हे तर अधिकाधिकच एकसारखे तेथें धडाडित आहे, असें झाल्यानें ते त्या दाहकपणासच आवरून आहे; येथें असें वाटत आहे कीं, सर्व दाहकपण जे ते येथूनच आपल्या दाहकपणास आलेले व आतां तर दिव्यचक्षूंनही पण तें न्याहाळण्याकरितां त्रास होत आहे–तेथें तो दिव्यज्ञान डोळाचमुळीं त्या तेजापुढें दिपून जात आहे. (३०३)

अहो! ते कसें म्हणावें, तर महाप्रळयाच्या अग्नीचा भडाड का भडका तो तर काळ अग्नीरूपी, रुद्राच्या श्रीशंकराच्या ठायींचा गुप्त का गूढ असा असलेला, जो तृतीय नेत्र, त्याचा (कळिका), कळा मढच जसा का फुटला आहे त्या तेथीलच्या डोळ्यांची ठेवणच मुळीं फुटली आहे कीं काय असा तो डोळा तेथें पाहातांना (अति त्रास) भडभडाटच होत आहे. महाप्रळयींचा भडभडाट तो कसा तर काळाग्निरुद्राच्या ठायींचा गूढ जो तृतीय नेत्र त्याचा मढच की फुटला जसा का? (३०४)

तसें त्या पसरलेल्या प्रकाशामुळें जसें का पांचही अग्नींच्या ज्वाळा वळसे–वेढे हे पडावेत का बसावेत व त्यामुळे ब्रह्मकटहाचे जसे का कोळसेच होऊन यावेत. (३०५)

अहो असा अद्‌भुत! सर्व तेजाची राशीच तो! अहो! ह्या जन्मास आल्याचें तें मी एक नवलच पाहिलें! अहो, जी तुमच्या त्या कांतीच्या व्याप्तीचा पारच मुळीं नाहीं कीं जी अहो!!! (३०६)

**श्लोक १८ वा:—**

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥**

अक्षरं परमं वेदितव्यम् = जाणावें असें तें परम अक्षर तुम्हीं आहांत. अस्य विश्वस्य परं निधानम् = ह्या विश्वाचा एक निधीच, ह्या विश्वाजवळ असलेला गुप्त ठेवा. त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता = नच खर्च होणारे असे शाश्वततेचे धर्म ·क्षणाचे गोप्तार, म्हणजे रक्षणकर्ते. सनातनः त्वं पुरुषः मे मतः = मला वाटतें तुम्हीं सनातन (सदातन–पुरातन) असे पुरुष आहांत.

अन्वय:—

मेमतः। त्वं अक्षरं परमं वेदितव्यम्। त्वं अस्य विश्वस्य परं निधानम्। त्वं अव्ययः। शाश्वत धर्मगोप्ता। त्वं सनातनः पुरुषः ॥ १८ ॥ (श्लोक १८ वा ओ. ३०७-३०९)

अर्थ :—

अहो! मला वाटतें कीं, श्रेष्ठ असें जें अक्षर, जें जाणावेंच जाणावें असें तेंच तुम्हीं आहांत. जें केव्हांही नाश न पावणारें–सर्वदा अविनाशी असें ते तुम्हीं आहांत, तुम्ही ह्या विश्वाचे श्रेष्ठ असे निधीच आहांत गुह्य ठेवा आहांत!) तुम्हीं अव्यय अक्षय्य का नाशरहित असे विष्णु केव्हांही खर्च न होणारे असे शाश्वततेचे धर्मरक्षक आहांत, तुम्ही सनातन असे पुरुष आहांत! ॥ १८ ॥

(त्वम् अव्ययः इति) देवा तूं अक्षर। औटावियें मात्रेसि पर।
श्रुति जयाचें घर। गिवसिताति ॥ ३०७॥
जे आकाराचें आयतन। जे विश्व निक्षेपैक निधान।
(त्वमस्य विश्वस्य परं निधानम्) ते अव्यय तूं गहन। अविनाश जी ॥ ३०८॥
तूं धर्माचा ओलावा। अनादिसिद्ध तूं नित्यनवा।
जाणे मी सदतिसावा। पुरुष विश्वेश तूं ॥ ३०९॥

अक्षर = अविनाशी. औटविये मात्रेसी पर = साडेतीन मात्रांच्या म्हणजे ओंकाराच्या पलीकडे. गिवसिताति–गिवसित आहाती = शोधितात. (३०७) जे–जो. विश्वनिक्षेपैकनिधान = विश्वसांठविण्याची जागा. का आधार, निधि, (३०८) नित्यनवा सदतिसावा = छत्तीस तत्वाच्या पलीकडील सदतिसावा पुरुष नेहमी नवाच असा विश्वेश (विश्वेश्वर = शिव)–विशेष. (३०९)

देवा! तुम्ही अविनाशी असें अक्षर आहांत औटावियें मात्रेसी पर म्हणजे साडेतीनि मात्रांचा म्हणजे ओंकाराच्याहि (अ, उ,म, अर्धमात्रा) पलीकडचे तुम्हीं आहांत. अशा तुमचे घर श्रुति त्या नेहमी शोधित, हुडकीत असतात. (३०७)

तें अक्षर आकाराचे (आयतन म्हणजे) गृहच असून हें विश्व सांठविण्याची ती जागा (निधि, आधार) होय. ते अव्यय असे तुम्ही गहन (दुर्गम्, खोल) व अविनाश असे आहात. (३०८)

अहो देवा, तुम्हीं धर्माचा ओलावा आहांत. तुमच्या अनादिसिद्धतेमुळें तुम्हीं नित्य नवे असे आहांत. तुम्ही अहो! सदतिसावे पुरुष आहांत–तुम्ही अहो! श्रीविश्वेश–श्रीविश्वेश्वर शिव–असे पुरुष विशेष आहांत असें मी जाणतो–असे मला वाटतें. (३०९)

श्लोक १९ वा

अनादिमध्यांतमनन्तवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम्।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥

अनादिमध्यांत = ज्यांत आदि, मध्य, अंत नाहींत असे. अनन्तवीर्यम् = अतुल पराक्रमी. अनन्त बाहुम् = ज्यांच्या बाहूंचा अंत नाही अशा अनंत भुजांचें. शशिसूर्यनेत्रम् = चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत असे. दीप्तहुताशवक्त्रम् पश्यामि = हुताश म्हणजे प्रदीप्त झालेल्या अग्निप्रमाणें ज्याचें वक्त्र म्हणजे मुख आहे अशा तुम्हांस मी पहात आहें. स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् = ह्या सर्व विश्वास तुम्हीं आपल्या तेजानें तेजवान् करीत (आहांत) असणारे. [अतुल = अप्रतिम, अतिशय–(व.) (१) तीळ. (२) कफ.]

अन्वय—दीप्तहुताशवक्त्रं त्वां पश्यामि। स्वतेजसा विश्वम् इदं तपंतम् त्वां पश्यामि। अन्–आदि मध्य अन्तम्। अनन्तम् त्वां पश्यामि। अन् अन्तवीर्यम् त्वां पश्यामि। अनन्त बाहुम् त्वां पश्यामि। शशिसूर्यनेत्रम् त्वां पश्यामि ॥ १९ ॥

अर्थ—आपल्या दीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें ह्या विश्वास तेजवान करणारे किंवा तापविणारे–, तपः सामग्रीनें तापविणारे, ज्यास आदि, मध्य किंवा अन्त नाहीं असें अनन्त, ज्यांच्या पराक्रमाचा अन्त नाहीं असे–अतुल–अतिशय पराक्रमी, अप्रतीम वीर्यवान्, ज्याच्या बाहूंचा अंत नाहीं असें आपण 'अनंतबाहु' व ज्याचे नेत्र चंद्र व सूर्य हे होत. अशा तुम्हांस मी पहात आहें. ॥ १९ ॥

(श्लोक १९ वा ओव्या ३१० ते ३१४)

(अनादिमध्यान्तमनंतवीर्यम्)—
तूं आदि मध्यांत रहितु । स्वसामर्थ्ये तू श्री अनंतु ।
विश्वबाहु अपरिमितु । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥
(शशिसूर्यनेत्रम्)—पै चंद्र चंडांशु डोळा । दावितासि कोण प्रसाद लीला ।
येका रूससी तमाचा डोळा । येका पाळिसी कृपादृष्टी ॥ ३११ ॥
(पश्यामि त्वांहुताशवक्त्रम्)
जी एवंविधा तूंते । मी देखत असे निरूते ।
पेटले प्रळयाग्निचे उजिते । तैसे वक्त्र हे तुझे ॥ ३१२ ॥
वणवेनि पेटले पर्वत । कवळुनि ज्वाळांचे उभड उठत ।
तैसीचि चाटित दाढा दंता आंत । जिव्हा लोळे ॥ ३१३ ॥
(स्वतेजसाविश्वमिदंतपंतम्)—
इये वदनीचिये उबा । आणि जी सर्वांग कांतीची प्रभा ।
विश्व तांतले अति क्षोभा । जात आहे ॥ ३१४ ॥

स्वसामर्थ्ये–श्वस्सामर्थ्ये (श्वस=वांचणें, श्वास घेणें व सोडणें. श्वस+आ=समाधान करणें. श्वस+उत=उघडणें. श्वस्+निर=स्फुंदणें. श्वस+वि=भरंवसा ठेवणें.) अपरिमित=अमर्यादित, अपार, नच जोडलेला, नच मापलेला. (परिमिती=प्रमाण, माप, मर्यादा.) विश्व=जग ब्रह्मांड. सगळा=सगळेपणानें चरणच एक असे; ब्रह्मांड हेंच ज्यांचे चरण आहेत असा. (३१०) चंडांशु=सूर्य (चंड=प्रखर. अंशु=किरण.) कोण–कोप. (कोण=कोपरा, शस्त्राची धार, काठीः कोप=राग) प्रसादलीला=प्रसन्नतेची क्रीडा, शोभा, विलास, कल्याण करणारा. तमाचां–तमाचिया. डोळा=अक्षि. (अक्ष=व्यवहार, परमार्थज्ञान, गाडीचा आंस, ऐशीं गुंजाचें वजन फांसा.) पाळितासि–पाळितोसि. (३११) एवं=(१) प्रकार. (एवंगत=अशास्थितींत.) (२) स्वीकार (३) उपमा, (४) अवधारणा (५) वाक्यपुरण. (पूरक=पूर्णता करणारे. पूरणफूल) एवं प्रायः=अशा प्रकारचे. [विध=(१) प्रकार, (एवंविध=अशा प्रकारचा.), (२) वेधकरणें. (३) समृद्धि (४) हत्तीचें अन्न. (५) विमान.] विधा=पद्धत, क्रिया विधि, प्रकार, जात एवंविधा=अशा प्रकारें, अशा प्रकारचा. निरुते=खरोखरी. उजिते=उजेड, प्रकाश. (उज्ज=सरळ करणें.) (३१२) वणवेनि–वणिवेनि=दावाग्नि, दावानल, वणवा. (दाव=अरण्य, उष्णता वणवा.) उभड=भडाड, धडाड. तैसीचि–तैसी दाढा दंता आंत–दाढा दातांत : जिव्हा–जीभ. दांत–दंता आत जिव्हा–जीभ. (३१३) उबा=उबारा, धग, उबाऱ्यानें. कांतीची–कांतीचिया. तांतले=तापले. (३१४)

तुम्हीं आदि–मध्य–अंतरहित असे आहांत! तुम्हीं स्वसामर्थ्यवान् असे अनंत आहांत! तुम्ही अपरिमित, अमर्याद, अपार, अशा हाताचे विश्वबाहुं आहांत! विश्वामधील सर्व बाहु हे तुमचेच हात होत! तुम्हींच ह्या विश्वाचे चरण आहांत! विश्वामधील सर्व चरण हे तुमचेच होत! तेथें विश्व हेच चरण तुमचें की! (३१०)

याहीवर चंद्र हाच डोळा जेव्हां का तेव्हां तर प्रसाद-प्रसन्नतेची लीला दाखविणारे का कोप आला असतां चंडांशु हाच डोळा तेथें कोपच तो तोहीपण प्रसादानें लीलाच एक ती असें आपण आहांत! एकावर तर तमाचा डोळा करून रुसणारे होता व एकावर कृपादृष्टीनें प्रसन्न होऊन त्याचे पालन व कल्याण करणारे होतां! (३११)

याप्रमाणें तुम्हांस मी खरोखर पहात आहें! तेथें जसें कां प्रळयाग्नीच्या प्रकाशानें-लखलखाटानें पेटलेलें असें,-प्रदीप्त झालेलें असें तुमचें हें वक्त्र-वदन-मुख होय!! (३१२)

पर्वत वणव्यानें पेटले म्हणजे ज्वाळांचे भडाड, उभड उठूं लागतात; त्याप्रमाणें (दांता आंत) दांत व दाढा चाटित आहे अशी लोळत असलेली ती तुमची जिव्हा दिसत आहे. (३१३)

त्या वदनाच्या उबाऱ्यानें तसेंच त्या तुमच्या सर्वांग कांतीच्या प्रभेमुळें सर्व विश्व दिपून जाऊन, तापून जाऊन क्षोभ पावत आहे, क्षोभास येऊन आहे. (३१४)

श्लोक २० वा

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।**

**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥ २०॥**

द्यावापृथिवि=रोदसी, आकाश व पृथ्वी. इदं अंतरंहि=हें अंतरहि पण (अंतर=मन, सीमा, अवकाश, आच्छादन, छिद्र; अंतःकरण, परब्रह्म, मधली जागा, मधला मनुष्य. पिढि, चूल, जात, जामीन, उत्कर्ष, वस्त्र, हेतु.) व्याप्तं त्वया एकेन=तुम्ही एक जे त्यांनींच व्यापिलें आहे. दिशश्च सर्वाः=सर्व दिशाही पण. इदं उग्रं अद्‌भुत रूपं तव दृष्ट्वा=तुमचें हें अद्‌भुत व उग्र रूप पाहून. लोकत्रयं-प्रव्यथितम्=तिन्हीं लोक भीतीनें व्यथा पावत आहेत. महात्मन्=हे महान् आत्म्या! हे महत्! महाशय, थोर मनाचा, श्रेष्ठ, बलिष्ट, परमात्मा.

अन्वय:—

महात्मन्। त्वया एकेन इदं अंतरम्व्याप्तं। द्यावापृथिवी ही त्वया एकेन व्याप्तं। दिशश्च सर्वाः त्वया एकेन व्याप्तम्। अद्‌भुतं तव इदं उग्रं रूपं दृष्ट्वा। लोकत्रयं प्रव्यथितम्।

अर्थ:—

हे महात्मन! हे परमश्रेष्ठा! हे परमात्म्या! त्या तुमच्या दीप्त मूर्तीनें, अंतरीक्ष-आकाश, व पृथिवी-मधील=पृथिवीपासून तो तहत् आकाशापर्यंतचें अंतरही पण, तसेंच सर्व दिशाहि तुम्हीं एकठ्यांनींच व्यापिलेल्या आहेत; असें हें तुमचें अद्‌भुत व उग्र रूप पाहून तिन्हीं लोक हे भयभीत होऊन गेले आहेत, व्यथा पावत आहेत. ॥ २० ॥ (श्लोक २० वा, ओ. ३१५ ते ३२६)

**(द्यावा पृथिव्योरि)—**
**कां जे भूर्लोक आणि पाताळ। पृथिविहन अंतराळ।**
**अथवा दशदिशा समाकुळ। तेज वक्र॥ ३१५॥**
**ते अवघेचि तुवा येकें। भरले देखत आहे कौतुकें।**
**परि गगनाहि सकट भयानकें। आटपविलें जेवीं॥ ३१६॥**
**(दृष्ट्वाद्भूतं रूपमुग्रं तवेदं)**
**नातरी अद्‌भुत रसाच्या कल्लोळीं। जाली चवदाहि भुवनांची कडियाळीं।**
**तैसे आश्चर्य मग मी आकळीं। काई एक॥ ३१७॥**

नावरे व्याप्ति हे असाधारण । न साहवे रूपाचे उग्रपण ।
सुख दुरी गेले तरी प्राण । विपाये धरिजे (धरिजग) ॥ ३१८ ॥
देवा देखोनिया तूंते । नेणो कैसे जाले भयाचे भरिते ।
(लोकत्रयंप्रव्यथितम् महात्मन्) आतां दुःख कल्लोळी झळंबंते ।
तिन्ही भुवनें ॥ ३१९ ॥
येऱ्हवी तुज महात्म्याचे देखणें । तरि भय दुःखासि कां मेळविणे (मेळवणे)।
परि हे सुख नव्हेचि जणे (जेणे) गुणें । ते जाणवत हे मज ॥ ३२० ॥
जंव तुझे रूप नव्हे दिठे तंव । जगासी संसारिकच गोमटे ।
आतां देखिलासी तरी विषय विटे । उपनला त्रासु ॥ ३२१ ॥
तेवींचि तूतें देखिलियासाठीं । काई सहसा तुज देऊ (देवो) येईल मिठी ।
आणि नेदी तरी शोक संकटी । राहो केवी ॥ ३२२ ॥
म्हणोनि मागा सरो तंव संसार । आडवितसे (आडवीत येतसे) अनिवार
आणि पुढा (तूं) तंव अनावर । न येसी घेवो ॥ ३२३ ॥
ऐसा माझारिले सांकडां । बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा ।
ऐसा ध्वनि जी हा फुडा । चोजवला मज ॥ ३२४ ॥
जैसा आरंबळला आगी । तो समुद्रा ये निवावयालागी ।
तंव कल्लोळ पाणियाच्या तरंगी । आगळा बिहो (बिहे) ॥ ३२५ ॥
तैसे या जगासी जाले । तूंते देखोनि तळमळित ठेले ।
ययामाजी पैल भले । (ज्ञान) सूरांचे (ज्ञानशूराचे) मेळावे ॥ ३२६ ॥

भूर्लोक–द्यौर्लोक = अंतरिक्ष, स्वर्ग. हन = आणि. समाकुळ = सकळ. तेजचक्र–दिशाचक्र–तेज दिशाचक्र दिशा–चक्र = जग, क्षितिज. तेजस् = पंचमहाभूतापैकी तेजस तत्व; सत्वगुण, परब्रह्म, स्वाभिमान. तेजमात्रा = ज्ञानेंद्रिय. (३१५) ते–हे. येके–एके. आल्पविले–आप्लवजे–आप्लविले–प्लव = प्लुत बुडी, उड्डाण, तीन मात्रांचा स्वर. आप्लव, प्लवनं = स्नान, बुडवणें (प्लु = पोहणें, उडत जाणें) आप्लाव, आप्लवः = महापूर, थबकत जाणें. अल्पविणें = मागें टाकणें, तिरस्कृत, क्षुल्लक, तरुण, विरळा, थोडें करणे जें. अल्पायुः = बोकड (३१६) अद्भुत = चमत्कारिक, आश्चर्यकारक रसाच्या–रसाचा–रसाचिया. जाली–जाहाली. चौदाहि–चवदाहि. भुवनांची–भुवनासी. कडियाळी = वेष्टण. आश्चर्य–आश्चर्यचि. काई–कार्यी–काय. (३१७) परि–तरि. विपायें = कदाचित्‌च धरिजे गा = धरी जग. (३१८) देखोनियां –ऐसें देखोनि. भरिते = पुष्टपण, पूर्णपण, भरलेले. झळंबते = झळंबत असती, बुडतात विरघळतात. (३१९) तरि भय दुःखासि का मेळवणे–भय दुःखासि दुरावणें–कां मेळावणे. जणे–जेणें. जाणवताहे–जाणवत आहे. (३२०) नव्हे दिठी = नोहे दृष्ट, अनुभुत. उपनला–उपजला. (३२१) तूंते–तुज साटी–साठीं काई–काय. देऊ–देवो. शोक संकटीं राहो केवीं = पुत्र शोक संकट हे केवळ वन्हि जे जाळुनि घाली माता पितरातें. (३२२) आडवितसे–आडवित येतसे. अनिवार = फार. तंव–तूं (३२३) माझारिले–माझारिलिया सांकडा = मधल्या कचाटींत. हुरडा = होरपळणें, भाजणें. ऐसा–ध्वनिजी हा–ऐसा हा ध्वनि जी. (३२४) आरंबळला = पोळला. निवावयालागीं = विझविण्याकरितां (पोळो ते) निवण्यास, निवविण्याकरितां. कल्लोळ पाणियाच्या तरंगीं आगळा बिहे (बिहो लागे लागला) = समुद्राच्या उसळणाऱ्या लाटांनीं अधिकच भय वाटतें. (३२५) जाले–जाहले. सुराचे–ज्ञानसुराचे–ज्ञानशूरांचे मेळावे = समुदाय (३२६)

अहो ! जे भूलोक, अंतरिक्ष, स्वर्ग, द्यौर्लोक पाताळ आणि पृथिवी; तसेंच ज्या सकळ दहाहि दिशा–तेज चक्र व दिशाचक्र हे सर्व तुम्हां एकानींच सहजपणेंच कीं भरून गेलें आहे. (३१५)

हें सर्व कांहीं तुम्हीं एकट्यानींच सहज कौतुकानेंच कीं भरलें आहे, व्यापलेंच आहे; वर गगनासारखीं भयानकेंही तुम्हींच कीं आपणामध्यें (बुडवून) घेऊन अल्प अशीं केलीं आहेत. असें मी देखत पहात आहें–एवढेंच नव्हे तर गगनासारखीसुद्धां तुम्हीं व्यापिल्यामुळें ते भयानक जें तेंहीपण आंतमध्येंच जसें वल्हविलें जात आहें. तें जरी अनन्त तरी आतां याच्यामुळे लहानच होऊन आहे. (३१६)

एवढेंच नव्हें तर याहीवर तें कसें आहे म्हणाल तर तो नऊहि रसांमधील जो अद्‌भुत रस तो जेव्हां कल्लोळास येतो, तेव्हां सप्त भुवनें व सप्त पाताळें अशीं तीं चवदाही भुवनें वेष्टिलेलीं होतात आवरून घेतली जातात; त्याप्रमाणें मी आश्चर्याचा झाल्यानें ते रूपही पण आश्चर्याचें असें तें मी व तेथील सर्व कांहीं आवरून–आकळून घेत आहें जसा. (३१७)

अहो, अशी तेथीलची ती व्याप्ति ही असाधारण म्हणजे विलक्षणतेची असल्यानें तुमच्या रूपाचें उग्रपण हे महात्मन्! माझ्याच्यानें मुळींच पाहवत नाहीं! साहवत नाहीं. अहो! येथें सुख ते तर नाहींच पण माझे जे पंचप्राण तेही पण कसेंबसेंच मी सांभाळून आहें त्या विश्वाम त्या देहास त्या प्राणांनीं कसें कदाचित् पण सांभाळलें आहे–झेपलें आहे!!! (त्या जग ब्रह्मांडानेंच कां लोकानेंच जसें!) (३१८)

अहो देवा! तुम्हांस पाहून तर मजला एक भयाचें भरतेंच आलें आहे (मजमध्ये भीतीचें वारेंच सुटलें आहे) व आतां दुःखकल्लोळामध्यें ही तिन्हीं भुवनें स्वर्ग, मृत्यु, पाताळ झळंबून असलेली अशीं आहेत. तिन्हीं भुवनें त्या ब्रह्माग्नीनें जशीं तेजोमय करून टाकली आहेत. (३१९)

एरव्हीं (तुमचें महात्म्याचें पाहाणें–देखणें कां) तुम्हा महात्म्यास पाहाण्यानें (का देखण्यानें) कां बरें भय वाटावें (का दुःखाचे मेळवणें व्हावें तें)! अहो, ते तुमचें रूप पाहण्यानें तर येथें भय आहे का दुःख आहे हे कांहींच तेथीलच्या कठिणपणामुळें (उग्रपणामुळें) समजेचना! येथें कशास बरें मी म्हणूं कीं ते भय देत आहे कां भीति दाखवीत आहे, का मनाला त्यामुळें दुःख होत आहे. त्या कामामुळें–कामरूपामुळें, तेथें जसें एक लवणेंच होऊन आहे–म्हणून येथें त्यास भय का दुःख म्हणणें हे तरी काय!!! परंतु एवढे मात्र खास की हे कांहीं सुख या संज्ञेस येत नाहीं–त्या जग जण–गुण संख्येमुळें मजला तें जाणवत आहे. तेथें जाणण्याचा गुण का मनुष्यपण हेंच मुळीं एका बुद्धिप्रभावाचें असल्यानें–तें मजला जाणवत आहे, एवढें खास (गण–जण) महात्म्याचें देखणें–तुम्हांस पाहाणें किंवा त्या सर्व विश्वास पाहाणें. ते देखणे होऊन असलेले विश्वास पाहाणारे असल्यानें–महात्म्याचे, महान् आत्मा, मयः=महत् जी ब्रह्मशक्ति का शांतब्रह्म का मूळमाया अथवा दैवी गुणमयी ती महत् तिनें व्यापिलें असल्यानें–ती सर्व ब्रह्म आत्माच करून आहे व अशी ती तन्मय झाल्यानें तेथें त्या तुमचें महात्म्याचें देखणें हें जशी ती माताच एक होय–महत् ब्रह्म योनीच होय. म्हणून तेथें मातेचे देखणें तें त्यानें भय का दुःख वाटावे असें म्हणणें तरी काय–पण एवढ्यानेंच तेथें म्हणावें लागते कीं तेथीलच्या 'जण' संख्येनें त्या मनुष्य प्राण्याच्या बुद्धीची जी संज्ञा, जाणणें, तीस ते सुख कांहीं सुख असें म्हणतां येणार नाहीं–असें म्हणत आहे–का मिळविणें मेळवणें, मेळविणें–दाम करी काम–दाम कामरूप होऊन बोलत आहे; तेथें भय व दुःख कां बरें स्वतांत मिळवून घ्यावें? परंतु हें कांहीं खास सुख नव्हेच नव्हे!!!

एरव्हीं तुम्हां महात्म्याचे देखणें पाहाणे तेथें कां बरें भयरूपी दुःखास (काय दुरावणें होऊन असते, का) मेळवणे होऊन असणें तें व्हावें पण ज्यायोगेकरून ते मजला जाणवत आहे ते तर जण म्हणजे संख्या मनुष्य गुणामुळें की होत आहे असें नाही. (३२०)

जोपर्यंत तुमचें रूप दृष्ट (झाले नाहीं का) अनुभूत झाले नाहीं तोपर्यंतच जगास संसारिक ते गोमटे चांगले असें वाटते; पण आतां तुम्ही देखिले गेल्यामुळें तर विषयावर वीट येऊन आहे; विषयासंबंधी त्रासच एक उपजला आहे; विषयाविषयी त्रासच एक येऊन आहे. (३२१)

तुम्हांस देखणें केलें एवढ्यानेंच काय बरें तुम्हांस एकदम मिठी असें होईल व मिठी जर का नच दिली का पडली तर शोकसंकटामध्यें जगणेंच शक्य नाहीं तेथे तुमच्या भेटीच्या विरहामुळें शोकरूपी मांकडेंच एक तेथें जगावें तरी कसें? (३२२)

अहो देवा! येथें मागें सरावें का मागें हटावें तर हा संसार अनिवारपणानें आडवीत आहे, आडवा येत आहे व पुढें पाहावें तों तुम्हीं तर अनावर असे ते मुळीं घेतांच येईनात असें होऊन आहांत. (३२३)

अशा तऱ्हेच्या मधल्या कचाटींत सांपडलेल्या त्रैलोक्याचा तर हुरडाच की (भाजला असे भाजणें होरपळणेंच की) होत आहे. अहो, भेटी नाहीं, संसार आडवीत आहे, मागेंच सरणें होत आहे (शिवाय) तुम्हीं अनावर (असे) घेतां येईनात, अशा संकटामध्यें पडलेलें त्रैलोक्य होरपळत आहे, पोळत आहे. अहो देवा! असा हा खराच विचार मजला येऊन आहे–(ध्वनि, समजूत, मनन, शंका, विचार हा मज चोजवला फुडा कीं.) (३२४)

ज्याप्रमाणें आगीमध्यें पोळला तो तापाचें दुःखाचें निवर्णे व्हावें म्हणून समुद्रास आला; व येथें समुद्रामध्यें उसळणाऱ्या लाटा पाहून तर त्यास अधिकच भय वाटूं लागते, त्यास जास्तच भय वाटूं लागतें की! (३२५)

तसें मागें सरतां येईना, संसार आडवीत आहे–आडवा येत आहे, अथवा पुढें तुम्हीं तर (अनावर असे) मुळींच घेतां येईनात, असें ह्या जगास झालें आहे की! तुम्हांस पाहून (तुमची भेट होऊ नये) तेथे तर तळमळच एक लागून आहे. अहो, येथें पैलपैल लांब दूरचे असें जें सुरांचें म्हणा का ज्ञानशूरांचें म्हणा का ज्ञानसुरांचे बोध जाणीव बुद्धिचे ते देव व विद्वद्वर म्हणजे भूभार हरण करण्यासाठीं मनुष्यरूपानें पृथ्वीवर अवतीर्ण झालेले हे देवाचे समुदाय मेळावे ते भलेच भले होत कीं. (३२६)

**श्लोक २१ वा**

**अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥**

अमी सुरसंघा त्वां विशंति = हे देवसंघ तुम्हांस आपलेसे करून आहेत. केचित्भीताः प्रांजलयो गृणंति = कांहीं भ्यायल्यामुळें प्रांजळपणें गुणगान करीत आहेत [गृण = (गृ = शब्द करणे)] महर्षिसिद्धसंघाः स्वस्ति इति उक्त्वा त्वां पुष्कलाभिः स्तुतिभिः स्तुवंति = महर्षींचे व सिद्धांचे संघ 'स्वस्ति' क्षेम असो म्हणून तुम्हांला पुष्कळशा स्तुतींनी स्तवीत आहेत.

अन्वय:—अमी सुरसंघाः त्वां विशंति। केचिद् सुरसंघाः भीताः त्वां प्रांजलयः गृणंति। अमी महर्षि सिद्धसंघाः त्वां स्वस्ति। इति उक्त्वा पुष्कलाभिः स्तुतिभिः स्तुवंति ॥ २१ ॥

अर्थ:—भूभार हलका करण्यासाठीं मनुष्यरूपानें पृथ्वीवर अवतीर्ण झालेले हे देवाचे समुदाय तुम्हांला आपल्या आंगचे करून आहेत, कांहीं जे देव समुदाय किंचित् भय पावलेले ते प्राञ्जळपणानें तुमचें गुणगान करीत आहेत. महर्षींचें समूह तसेंच सिद्धांचे संघ (समुदाय उठणे का युद्ध) ते तुम्हाला स्वस्ति असें म्हणून क्षेम, कल्याण असो ह्या जगताचे असा आशिर्वाद तुम्हांस मागत आहेत तुम्हाकडून देववीत आहेत व पुष्कळशा स्तुतींनीं तुम्हांस स्तवीत आहेत. ॥ २१ ॥ (श्लोक २१ वा ओवी ३२७ ते ३३१)

भयानक रस—(अमी हित्वा सुरसंघाविशंति)—
हे तुझेनि आंगिक तेजे। जाळुनि सकळ कर्मांची बीजे।
मिळत तुज आंत निजे। सद्‌भावेसी॥ ३२७॥
(केचित्भीताः प्राञ्जलयो गृणंति)
आणि हे एक साविियाचि भयभीर। सर्वस्वे धरूनि तुझी मोहर।
तुज प्राथितांति कर। जोडोनिया॥ ३२८॥
देवा! अविद्यार्णवी पडिलो। जे विषय वागुरे आंतुडलो।
स्वर्ग संसाराचिया सांकडलो। दोही भार्गी॥ ३२९॥
देवा ऐसी येथें आमची जी सोडवण। तुजवांचूनि करिल कोण।
तुज शरण गा सर्व प्राण। म्हणतांति (देवा)॥ ३३०॥
(स्वस्तीति) आणि महर्षि अथवा सिद्ध। का विद्याधर समूह विविध।
जी हे बोलत तुज स्वस्तिवाद। करिती स्तवन॥ ३३१॥

अंगिक–आंगिक–अंगिके=आंगच्या; सकळ=सर्व. निजे–महजे निजे आपले सहज स्वाभाविक; सद्‌भावेसी=भलेपणानें, आस्तित्वावर, वस्तुस्थितीवर सहज प्राप्ति का मिळणी होण्यावर. (३२७) हे–हे एक. सावियाचि=सहज. भयभीर–भयभीरु=भीति, संकटास भिणारा भित्रा (भीरुचेतस्=हरीण. भीरु=भित्री स्त्री भीरुका भयब्राह्म=प्राणरक्षणार्थ ब्राह्मणत्व सांगणारा, भित्रा ब्राह्मण. मोहर–मोहरू= माग. (३२८) अविद्यार्णवी=ईश्वरासंबंधीं, अज्ञान समुद्र (वे.) माया (वे) कर्म–प्रवाह, लाट, समुद्र, अंतरिक्ष इंद्र, सूर्य. अर्णवांबरा=पृथ्वी. अर्णव मंदिर=वरुण, विष्णु जे–जी. विषय वागुरे=विषय-रूपी जाळयात. आंतुडलों=सांपडलो सांकडलों=पेचांत पडलों. दोन्हीं भार्गी=दोन्हीं बाजूंनीं (भागिन्=मालक, हक्कदार, वारस, षड्‌गुणैश्वर्यसंपन्न. भाग=वाटा, ½ रुपया अकरा संख्या, वांटणी, दैव, भाग्य, चौथा हिस्सा. (३२९) ऐसी आमची जी सोडवण–ऐसे आमुचें सोडवणें. ऐसी–येथें. करिल कोण–कीजैल कवणें. प्राण–प्राणें म्हणतांति–म्हणत. (३३०) महर्षि–ऋषि=पश्चाताप पावलेला, पुराण प्रसिद्ध तपस्वी (१) श्रुतर्षि (२) कांडर्षि (३) परमर्षि (४) महर्षि (५) राजर्षि (६) ब्रह्मर्षि (७) देवर्षि हे सात प्रकार. (३३०) विद्याधर =उपदेवविशेष. (विद्याधरोऽप्सरसो यक्षरक्ष गंधर्व किन्नराः) स्वस्तिवाद=कल्याण असो असें म्हणत आहेत, कल्याणकारक भाषण करीत आहेत. (स्वस्ति=कल्याण, कुशल, पुण्य, आशिर्वाद, पापक्षालन,) तुज–बोलत तुज. (३३१)

हे देवसंघ, हे देवांचें समुदाय, तुमच्या आंगच्या तेजानें, बलवीर्य प्रतापानें कीर्तीनें सुवर्णानें, सर्व कर्मांची बीजें जाळून टाकून नाहीशीं करीत आहेत; तुम्हांशीं सहज सद्‌भावानें, आपलेपणाच्या भलेपणानें, वस्तुस्थितीसह निज सहज स्वाभाविकांत मिळून आहत. (३२७)

आणीक दुसरे कांहीं एक सोज्ञतीचे पण ते जसें पापभीरुपणाचें भयच घेऊन असल्यामुळें, भयभीत होऊन तुमची मोहर धरून चालत आहेत–तुम्हांसच मोहऱ्याचे करून तुम्हांअभिमुख होऊन, तुम्हांसच मार्ग मोहरा करून आपलें दोन्ही कर जोडून प्रार्थित आहेत! (३२८)

ते म्हणतात कीं, अहो देवा! अज्ञान अविद्येच्या समुद्रामध्येंच जसें आम्हीं पडलों आहोंत व तेथें ह्या विषयरूप जाळयामध्यें सांपडलों त्यामुळें स्वर्ग व संसारामध्यभागीच्या पेचांतच पडलों आहोंत–नितंबिनी-रूपी वागुराच जशा आडविणाऱ्या ह्या संसारामध्यें— (३२९)

देवा! अशी आमची स्थिति कां अडचणीच्या पेचांत सांपडलेली अवस्था, तीपासून आमची सोडवण करणें तुम्हांशिवाय देवा! कोण बरें जाणतो ते? कोण बरें आमची सोडवण ती करील? सर्व

प्राणेंकरून सर्व जीवेंप्राणें आम्हीं शरण शरण असें आहोंत. असें तुम्हांस म्हणत आहोंत तेथें जीव जगविण्याची कां प्राणांची वेळच मुळीं जीव कीं प्राण अशी तेथे बिकट पेचांचा डावच एक बसल्यानें आतां देवा असें सहज उद्‌गार पुढें येऊन आहेत देव अहो ! असें तेथें काकुळतीस येऊन म्हणणें होत आहे. (३३०)

महर्षि, पुराणप्रसिद्ध तपस्वी, अथवा जे सिद्ध [उपदेव विशेष, साधु ऋषि (व्यासादि) अष्टसिद्धि पावलेला त्रिकालज्ञानी] विद्याधराचे-उपदेव विशेषाचे-तसेंच अप्सरस (स्वर्गातील गाणाऱ्या वेश्या) यक्ष गंधर्व (संगित विद्या) व किन्नर [घोडा, कस्तुरीमृग, कोकिळ. गांधर्वविवाह=प्रीतिविवाह.] यांचे समुदाय विविधतेचे असें ते कल्याणकारक भाषणानें स्तुतिवादानें तुमचें स्तवन करीत आहेत ते 'कल्याण असो' असें म्हणत आहेत-ते तुम्हांस ह्या जगताचें, विश्वाचें कल्याण असो असा आशिर्वाद मागत आहेत. (३३१)

### श्लोक २२ वा

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

उष्मपाः=पितर (उष्मन्=उष्णता, वाफ, प्रताप, उन्हाळा, उत्साह, श् ष् स् ह् हे वर्णः: उष्मन +प=अग्नि, पितरा,-पंचाग्निसाधन करणारा) संघ=समूह. वीक्षन्ते=पहात आहेत विक्षणं=पहाणें, नेत्र, वीक्ष्य=नट, घोडा, दृश्य पदार्थ, आश्चर्य सर्वे विस्मिता एव=हे सर्व निश्चयानें विस्मितच असे झालेले.

अन्वयः—सर्वे । रुद्र । आदित्याः । वसवः । च । ये साध्याः । विश्वेदेवाः । तथा । च । अश्विनौ-(देवा) । मरुतः । उष्मपा । च । गंधर्वः । यक्षाः । असुराः सिद्धसंघाः । त्वां वीक्षन्ते विस्मिताःच एव ॥ २२ ॥

अर्थ :—अकरा रुद्र (शंकराचे अकरा अवतार, शिवगण समूह.) बारा आदित्य (अदिति पुत्र-धातृ, मित्र, अर्यमन्, रुद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वत, पूषन् (जगत्पोषक) सवितृ, त्वष्टृ व विष्णु हे बारा आदित्य.) आठ वसू—(देवता विशेष-आप, ध्रुव, सोम, धर किंवा धत, अनिल, अनल, प्रायुष, प्रभास) तसेंच साध्य देव-(म्हणजे होण्याजोगे का उगम गती प्रत नेण्यास योग्य, न्या०) प्रतिपाद्य विषय साध्य हे देवविशेष होत. सूक्ष्म व मोठ्या योग्यतेचे हे बारा आहेत) विश्वदेव (अग्निदेव किंवा देवता) तसेंच अश्विनौदेव, मरुत, पितर, गंधर्व, यक्ष, कुबेर, (**कुबेर याला तीन पाय, एक डोळा, व आठ हात आहेत, हा देवांचा खजिनदार आहे.**) असुर (रक्षांसि) व सिद्ध यांचें संघ म्हणजे समुदाय मेळावे, हे सर्व विस्मित होऊन तुम्हांस पहात आहेत. ॥ २२ ॥ (श्लोक २२ वा, ओ. ३३२-३३९)

**(रुद्रादित्याइति)—**
**हें रुद्रादित्यांचें मेळावे । वसु हन साध्य आघवे ।**
**अश्विनौदेव विश्वदेव वैभवे (विभवे) । वायुहि हे जी ॥ ३३२ ॥**
**अवधारा पितर (गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः) आणि गंधर्व ।**
**पैल यक्षौ रक्ष गण सर्व । जी महेन्द्र मुख्य देव ।**
**का सिद्धादिक ॥ ३३३ ॥**
**(वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे)**
**हे आघवेचि आपलाल्या (आपुलालिया) लोकीं ।**
**उत्कंठित (आपण, लुझिया) अवलोकी । हे महामूर्ती देवकी ।**
**पाहाताति ॥ ३३४ ॥**

मग पहात पहात प्रतिक्षणि। विस्मित होऊनि अंतःकरणीं।
(स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः श्लोक २१, करित निज मुगुटी ओवाळणी।
प्रभुजी तुज ॥ ३२५ ॥
ते जय जय घोष कलरवे। स्वर्ग गाजविताति आघवे।
ठेविती ललाटावर बरवे। कर संपुट ॥ ३२६ ॥
तिये विनय द्रुमाचिये आडवि। सुरवाडिली सात्विकाची माधवी।
म्हणौनि करसंपुट पल्लवी। तूं होतासि फळ ॥ ३२७ ॥
(वीक्षन्ते त्वाम्-[रूपं महत् ते—२३]) जी लोचना भाग्य उदैले।
जी का मना सुखाचे सुयाण पाहाले। जे अगाध इही देखिले।
विश्वरूप तुझे ॥ ३२८ ॥
हे लोकत्रय व्यापक रूपडे। पाहाता देवाहि चवक (वचक) पडे।
ययाचे सन्मुखपण जोडे। भलतेया कैसे (भलतया कडूनि) ॥ ३२९ ॥

विश्वदेव = नित्यबहुवचन, देवभेद, नागर सभ्य. (विश्व = विश्वदेव, जग, सर्व, स्थूल देहाभिमानी जीव) अश्विनौदेव–अश्ववाजिन अश्विनीकुमार, सूर्यपत्न कुमार देवाचे वैद्य वैभवे ऐश्वर्य, समृद्धि, सामर्थ्य–विभवे संपत्ति, धन, मनाचे औदार्य, मोक्ष, पालन = वायुहि हे = वायु, वायु देवता, शरीरांतील पंचप्राण (३३२) पितर आणि गंधर्व-पितर हन गंधर्व, अग्नि आणि गधर्वः: पितर = बाप, आईबाप, पितृलोकवासी सोमप. गंधर्व = देवाचा गवई, मेल्यापासून तो पुन्हां जन्मेपर्यंत जीवाची स्थिति गंधर्व वेद = सामवेदाचा उपवेद. गंधर्वहस्त (हस्तक) = एरंड ] यक्षोरक्ष गण–यक्षरक्षोगण = यक्ष = पाणी, भूत, दैवयोनी विशेष कुबेर सेवक दैवी दृश्य, कुबेर, [यक्ष आवास = वड (यक्ष तरु) यक्ष कर्दम = केशर, आगरु, कापूर चंदन व कस्तुरी याचें समभाग (मिश्रण) यक्षराज = कुबेर, मल्लभूमि] गण = शंकर सेवक समुदाय. महेन्द्र = (१) इंद्र ज्यांत मुख्य देव आहे. (२) इंद्र, पुढारी सिद्धादिक = त्रिकालज्ञानी, उपदेव विशेष, साधु, ऋषि (व्यासादि) अष्टसिद्धि मिळालेला. (३३३) महामूर्ति देवकी = देवाची आपली महामूर्ती; दैविकी = देव स्वरूप (देवक = खेळाडू.) महाभूता–देवतारूप–दैवतरूप–दैवी अशी–दैविकी) पाहाताति–पाहात आहाती. (३३४) करीत निज मुकुटी–मुगुटी–ओवाळणी = मस्तके लववितात. प्रभु जी–प्रभुजी = हे स्वामिन्! (३३५) कलरवे = मंजुळ ध्वनीने शब्दानें गाजविताति–गाजविती. ठेविती–ठेवित. कर-संपुट = [(संपुट = द्रोण, संबळी, संपुष्ट, मुद्रा, विशेष (संध्या)] [विनय = शिक्षण, वळण, शिष्टाचार, नम्रता, निग्रह, नियमन, शिक्षा, दंण्ड नीति अनीनी, वर्तन, दूर करणे (विनयग्राहिन्— विनयरुची = आज्ञाधारक) विनयन = दूर करणाराः दूर करणे; शिक्षण द्रुम = कुबेर, किन्नर, वड, पारिजातक वृक्षः जोडलेले हात, बद्ध हस्त (३३६) अडवी–अटवी = बागेत अरण्यांत (अट = जाणे, हिंडणे अट्ट = अतिक्रमण, अनादर, हिंसा) सुरवाडिली–सुरवाडली = प्राप्त कां अनुकुल झाली. सात्विकाची माधवी–कृष्णपत्नि विष्णुपत्नि पृथ्वी माध्वी माधवी = मोहाची दारु, मधाची साखर म्हणोनि करसंपुट पल्लवी तूं होतासि फळ) = अष्टसात्विक भाव [(१) स्तंभ (२) स्वेद (३) रोमांच, (४) स्वरभंग, (५) कंप. (६) वैवर्ण्य (फिक्कटपणा, मालिन्य) (७) अश्रु (८) (वैवर्ण–नीलपीतादि रहित वर्ण (८) प्रळय] रूपी वसंत प्राप्त झाला म्हणून त्यांना करसंपुटरूप–मुद्राविशेष–पालवी फुटून शेवटीं फळरूप तूं त्यांना जोडलास. (३२७) सुयाणे–सुयाण = भाग्य, सुकाळ. पाहाले–पाहले = उत्कर्ष, लाभ, वृद्धि, उदयाचे झाले इहीं देखिलें विश्वरूप तुझें–तुझें देखिलें विश्वरूप इहीं. (३२८) चवक–वचक = भय, धाक. ययाचे–याचे. भलतेया कैसे–भलतयाकडुनि. (३२९)

हे अकरा रुद्रांचे व बारा आदित्यांचे समूह तसेंच अष्टवसू व साध्यदेव जे ते सर्व, अश्विनौ देव, विश्वदेव, वायु देवता हे आपापल्या लोकीं देवाची महामूर्ति अवलोकन करण्यास उत्कंठित होऊन पहात आहेत. (३३२)

हे आण कीं, पितर, आई बाप, अग्नि व पंचाग्नि साधन करणारे तसेंच गंधर्व, व ते पलीकडे असणारे दैवी दृश्य पाहाणारे असे यक्ष व देव शत्रूचे गण (म्हणजे शंकर सेवक, समुदाय) जे, ते, एवढेंच नव्हें तर इंद्र ज्यांत मुख्य देव का पुढारी आहे असे जे तेही तसेंच उपदेवविशेष असे सिद्ध आदिकरून ते [आपआपल्या लोकीं देवाची महामूर्ति अवलोकन करण्यास–(तुझिया अवलोकीं आपण–) उत्कंठित होऊन पहात आहे]. (३३३)

हे सिद्धादिक देवयोनि विशेष महेंद्र इंद्र पुढारी असें हे सर्व आपापल्या लोकी ती देवाची मूर्ति (अवलोक पहाणें, डोळा, शोध, दृष्टि, अवलोकन कटाक्ष) दृष्टीस पडावी, देवकी–महामूर्ति, (विश्वमूर्ति, दीप्तमूर्ति, अमूर्तिमान् पितृभेद 'अनेक मूर्ति' अव्यक्तः ती महाभूतांना देवतारूप अशी का दैवतच ती त्या महाभूतांचें अशी दैवी) ती देवतारूप महाभूतांना दैवच एक देणारी अशी ती (महामूर्ति) पाहाण्यासाठीं ते उत्कंठित झाले आहेत. उत्कंठित होऊन पहात आहेत. (३३४)

मग ते अहो प्रभु! आपलें रूप पाहतां पाहातां प्रत्येक क्षणीं अंतःकरणामध्यें विस्मित होऊन आपणापुढें अहो! देवा! आपलीं मस्तकें लववीत आहेत; ते निजमुगुटानीं आपणांस ओवाळणीच करीत आहेत. (३३५)

ते सर्व जय हो! जय हो अशा मंजुळ ध्वनीनें–जय–जय! अशा घोषानें (पितृभेद घोष आवाज शब्द,) गर्जनेनें स्वर्गच कीं गाजवीत आहेत, जागवूं लागत आहेत: (देवांचें वसतिस्थान का निर्मळ सुख जो स्वर्ग तोच जागवीत आहेत–एकविसही स्वर्ग ते गाजवीत आहेत) व आपले जोडलेले हात म्हणजे करसंपुट ललाटावर (ठेवित) ठेवून आपणास नमस्कार करीत आहेत. ललाटावर ठेविलेल्या आपल्या जोडलेल्या करसंपुटांनीं आपणांस नमन, नमोनमः असें नमस्करणच एक करीत आहेत. (३३६)

तेथें त्या विनयवृक्षाच्या–शिष्टाचार, वळण, नम्रता, नियमन, नीति, वर्तन (अनीति)च्या बागेंत अष्टसात्विक भाव–स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप इत्यादि–हाच ऋतु वसंत प्राप्त झाला म्हणून त्याला करसंपुट पल्लवी–पालवीमध्यें फलरूप तुम्हींच त्यांना जोडलांत–करपल्लवाचें संपुटामध्यें का संपुटामुळें आडविली गेलेली ती देवाची विश्रांति ही त्या विनयरूप वृक्षाच्या बागेंत कुसुमाकर वसंत प्राप्त होऊन तेथें अष्टसात्विक भावरूपी माधवी–वसंत ऋतुंतील लक्ष्मी म्हणजें सात्विकाची सृष्टि–भावरूप संपत्ति (भाक भाष, प्रतिज्ञा, वचन, शब्द भाव) पुढारून आली व तिनें भाव देव विश्रांतीचें सात्विक भावाचे कलरव दैवी दृश्य पितृभेद घोषरूप फळ तुम्हास जोडून दिलें जें तुम्हीं तेथें होतांच होतां कीं तुमचें ते असणें देवफळास आलें–देव जोडले गेले असें झालें. (३३७)

जी अहो! त्यायोगें ह्या माझ्या डोळ्याचें एक भाग्य उदयास आलें आहे. ह्या मनानें का जीवानें सुखाचा सुकाळ भाग्यकाळच पाहिला असें होऊन आहे. अहो, ह्या माझ्या डोळ्यांनीं आपलें विश्वरूप देखिलें. (३३८)

त्यामुळें आतां हें तिन्ही लोकांना व्यापून असणारें आपलें रूपडें ते इतर दुसऱ्या देवांनीं पाहिलें असतां त्यांनाही पण भय आदराचें होतें असें तें आहे अशा ह्या रूपाचे सन्मुखपण भलत्यासच कसें बरें जोडले जाईल? भलत्याकडून ते कसें बरे आपल्या सन्मुखपणाचें असें होईल का आपल्या सन्मुखपणास आणलें जाईल? [च्यवन–गतीचे भयानें नागवलें जाणें, गळून जाणें, गळणें, भ्रष्ट होणें जें चव्यं, चव्यकं चवि, चविका–चवक (व०) मद्यविशेष का मद्य. कड = अडाणी, मुका. कडि, कंड् = हर्ष पावणें गर्व मानणें, फोडणें, तोडणें, कांडणें, सडणें,]—भलत्या अडाण्याकडून त्याचें सन्मुखपण तें कसें जोडलें जाईल बरें?

अहो, देवांनाही जेथें भय, धाक का वचक पडत आहे, तेथें ते भलत्यासलत्याकडून तुमचें सन्मुखपण जोडलें होईल असें कसें बरें ! तें आपले सन्मुखपणानें भलत्या सलत्याकडून जोडले जाणारे नव्हेंच नव्हे. (३३९)

**श्लोक २३ वा**

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥**

ते महत् रूपम् = तुमचे ते महत् रूप (महत् बुद्धि का महान विशाळ असें विश्वरूप-(गुणमयी जी मूळमाया तिचेंच. तें आपलें जसें महत् ब्रह्मरूपं). बहुवक्त्रनेत्रम् = (वक्त्र हेच नेत्र-अनेक वदनें तीं नेत्रच जसें-) अनेक वदनें, अनेक नेत्राचे असें, अनेकतेनें एकत्वाचे होणारे असें. [बाहु = पुष्कळ मोठी, अतिशय उदार, वज्र, शहाणा, हिरा, अभ्रक, चंद्रबिंब, महत्वाचें, कार्यक्षम, मेहनती, समृद्ध, सहनशील, विद्वान, शिव, ब्रह्म, विष्णु, आदर, सिंह इत्यादि बहु शब्द संधीचे अर्थ होत.] महाबाहो = हे विश्वरूपा ! महाबाहूच एक जमा असें तें आपलें रूप, (अथवा अर्जुनास संबोधिलेले ते विशेषण.) बहुबाहु, बहुउरू, बहुपादम् = अनेक बाहु, अनेक मांड्या अनेक पाय असलेले. बहु उदरम् = अनेक उदरांचें असें. बहु दंष्ट्रा करालम् = अनेक दाढामुळें कराल असें काळाचें जसें ते रूपं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथिताः तथा अहंहिप्रव्यथितः = तुमचे रूप पाहून लोक भयभीत होऊन आहेत तसेंच मीहीपण भयभीत झालों आहें.

अन्वयः—हे महत्तत्व (बुद्धि) ! हे महाबाहो ! ते (महत्) रूपं, ते महत (रूपं) बहुवक्त्रनेत्रम् (रूपम्) ते महाबाहु (रूपम्) ते बहुबाहु (रूपम्) बहुउरु (रूपम्) बहुपाद (रूपम्) बहुउदर (रूपं) ते बहु दंष्ट्रा करालम् (रूपम्) दृष्ट्वा लोकाः प्रव्यथिताः तथा अहमृहि प्रव्यथितोऽस्मि ॥ २३ ॥

अर्थ :—हे महत् ब्रह्म ! हे महत्तर बुद्धि ! हे विश्वरूपा ! हे महाबाहो ! तुमचे ते महत् म्हणजे विशालरूप (महत् = ) अतिशय व्यापक असें आहे. अनेक वदनें, अनेक नेत्र असलेले, अनेक उदरें असलेलें असें तें अनेक दंष्ट्रा-दाढा-मुळें कराल म्हणजे काळाचे जसें ते पाहून हे लोक भयभीत झाले आहेत त्याचप्रमाणें मीहीपण भयभीत होऊन आहे (महत) ह्या विशेषणास महदादीनी जसें त्या मूळरूपासच संबोधिलेले तेथें "महाबुद्धिः, महावीर्यः, महाशक्ति, महाद्युति, अनिर्देश्य वपुः श्रीमानमेयात्मामहाद्रिधृक्") ॥ २३ ॥ (श्लोक २३ वा ओ. ३४०-३५२)

**(रूपंमहत्ते बहुवक्त्रनेत्रम्) ऐसे एकचि परि विचित्रे । आणि भयानके वक्त्रे ।**
**बहुलोचन (महाबाहो बहु बाहू रूपादम्) बहु बाहु हे सशस्त्रें । अनंत भुजा ॥३४०॥**
**अनंत (चारु) ऊरू बहु (बाहु) चरण । बहु दंष्ट्रा बहूदर आणि नाना वर्ण ।**
**कैसे प्रतिवदनी मातलेपण । आवेशाचे ॥ ३४१ ॥**
**हाजी (हो कां) महाकल्पाचिया अंती । तंवकलेनि (येमे) यमे जेउत तेउती ।**
**प्रळयाग्निची उजिती । आंबुखिली जैसी ॥ ३४२ ॥**
**नातरी संहार त्रिपुराची यंत्रे । कीं प्रळय भैरवाची क्षेत्रे ।**
**नाना युगांत शक्तीची पात्रे । भूतखिचा वोडविली ॥ ३४३ ॥**
**तैसी जिया तिया (जिये तिये) कडे । तुझी वक्त्रे जी प्रचंडे ।**
**उफाडत दरियामाजी सिंहाडे । तैसे दशन हे रागीट ॥ ३४४ ॥**

जैसे काळरात्रिचेनि आंधारे। उल्हासत निघती संहार खेचरे।
तैसिया वदनी प्रळय रूधिरे। काटलिया दाढा ॥ ३४५ ॥
हे असो काळे आवंतिले रण। का सर्व संहारे मातले मरण।
तैसे अति भयानकपण। वदनी तुझिये ॥ ३४६ ॥
(दृष्ट्वा लोकाः प्रव्यथिताः)
इये बापडी लोकसृष्टी। मोटकी तुवा पाहिले दृष्टी।
आणि दुःख कालिंदियेच्या तटी। वृक्ष होऊनी ठेली ॥ ३४७ ॥
तुज महामृत्यूचिया सागरी। आतां त्रैलोक्य जीवित्वाची तरी।
शोक दुर्वात लहरी। आंदोळत जी ॥ ३४८ ॥
येथें कोपोनि जरी श्रीवैकुंठे। ऐसे न हन म्हणिपेल अवचटे।
जे तुज लोकाचे काई वाटे। तू धन्य (ध्यान) सुखभोगी ॥ ३४९ ॥
तरी जी या लोकाचे कीर साधारणें। वायां आपणपे सूतसे वोडणे।
केवि सहसा माझेचि प्राणे। म्हणे कांपती ॥ ३५० ॥
ज्या मज संहार रुद्र वासिपे। ज्या मज भेणे मृत्यु लपे।
तो मी येथ थरथरां कांपे। ऐसे तुवां केले ॥ ३५१ ॥
परि नवल बापा हे महामारी। यया नाम विश्वरूप जरी।
हे भयानकपण श्रीहरी। भयासुरपण हारी भयासि आणि ॥ ३५२ ॥

भयानके=भयंकर. बहु हे सशस्त्रे–बाहु बहुशस्त्रे हे सशस्त्रें (३४०) ऊरु–चारु=मांड्या. बहु मेहनती (बाहु)—चरण. मातलेपण=उन्मत्तपण. (३४१) हा जी–हो कां. तंवकलेनि=तंवकास येऊन तंवकास आल्यानें, हट्टाला पेटून, कोपास येऊन, रागावून. येमे–यमे. जेउत तेउती=जेथें जेथें, जेम तेम. प्रळयाग्निची उजिती. आंबुखिली जैसी=होळयाचा का आंगठ्यांचा वर्षाव केला, होळया पसरल्या, होळया पेटल्या जशा असा (इतका) उजेड. उजिती=होळया, उजितें, उजेड. आंबुखिली (अंबु=पाणी रक्तांतील जलांश)=आंबुखणें=वर्षणें, फेंकणें. **अभ्युक्षण**, शिंतोडा व आवरण. (३४२) त्रिपुरारिचि–त्रिपुराचेनि–त्रिपुरारीची = प्रळयरुद्र जो शंकर त्याची. क्षेत्र=समुदाय. पात्रे=भांडी. भूतखिचा वोडविली=भूतांची खिचडी भरून, भूतांच्या नाशाकरितां–भूतांच्या खिचडीकरितां येऊन आहेत. (३४३) जयातिया–जियेतिये. उफाडत–उफाळत दऱ्या–न सामत दरि–दरिया (दरी खोरें दरीभृत्=पर्वत) सिंहाडे –सिंह=एकाया वस्त्रावर काढलेलें सिंहाचें चित्र ते चित्रविचित्र रंगाचें जसें. दशन–दर्शन. हे–हे दिसती. (३४४) आंधारे–आधारे. संहार खेचरे=नाश करणारी पिशाच्चे. माखलिया=किटल्या, माखल्या (३४५) आवंतिले–आमंत्रिले=बोलावून आणले. भयानकपण=भिंगुळवाणें, भयानक प्रकार, अतिशय-पणा. (३४६) इये–हे. बापडी–बापडी ये. मोटके–मोटकी–मोटकिये विपाइली पाहिले–येचि पाहिले. दृष्टि–दिठी=किंचित् नजर टाकून पाहिलें असतां. ही जीव सृष्टी=दुःखरूप यमुना नदीच्या तीरावरील वृक्षाप्रमाणें कालियाच्या विषानें (काली, कराली) करपल्यासारखी दिसत आहे. =दुःख कालिंदीयेच्या तटीं वृक्ष होऊनि ठेली. वृक्ष=झाड. (३४७) तुज–तूज. जीवित्वाची तरी=जीविताची नौका, शोक दुर्वात लहरी आंदोळत जी (असे) शोकरूप तुफानानें हेलकावे खात आहे, शोकरूप भयंकर वादळांतील लाटेनें डळमळत आहे. (३४८) येथे–येथ. श्रीवैकुंठे=श्रीकृष्णांनीं. न–हन. अवचटे=कदाचित्, सहज. धन्य–ध्यान धन्य=द्रव्य देणारे, श्रीमंत, सुखी, दैववान्, पुण्यवान्, सद्‌गुणी धनाचे साधन, पाखंडी, दाई, द्रव्य (धन्यवाद=स्तुति, आभार. धन्यवृक्ष=पिंपळ) ध्यान=विचार, चिंतन, एकाग्रता (ध्यान=

ध्वनि) सुख-सुख हे. (३४९) लोकांचे कीर साधारण वांयां आपणपे सू (सू=खुषीनें, योग्य रीतीनें, पूज्य) सु=प्रभुत्व असणें प्रसवणें सू=उत्पन्न करणें, प्रसवणें तसे वोडणे=लोकांच्या भीतीचे निमित्त (म्हणजे) ढाल वोडणें (पुढे करणें) असून खुषीनें देत असून, योग्य रीतीनें देत असून माझीच पांचावर धारण बसली आहे. केविं सहसा माझेचि प्राणे म्हणे कांपती-म्हणे प्राण माझेची कांपती=वस्तुतः माझेच प्राण एकाएकी भीतीनें कंपित झालेले आहेत. साधारणें-साधारण. आपणपे=स्वतःला. आडसूतसे=आड घालतो, व्यर्थ पुढें करतो. वोडण=ढाल, निमित्त. (३५०) वासिपे=वचकणें, भिणें, वासिपणें. थरथरा=अत्यंत (बहुत, अंतर्बाह्य) आहाळ वाहाळे कां पे. (३५१) महामारी=आडमाप वाहणाऱ्या गवताची केलेली. श्रीहरी—भ्यासुरपणें हारी (पराभव) भयासि आणि=भिणेंच एक पुढें कर करून भीतीच हरण करीत आहे. (३५२)

अहो एकच ते विश्वरूप पण विचित्र आणि भयानक वदनें असलेले तसेंच ज्यांस अनेक डोळे आहेत असें व ज्यानें हातांत शस्त्रे धारण केलेलीं आहेत असें अनंत भुजांचे-ते ' अनंत भुजा ' (३४०)

अनंत मांड्या, बहु चरण, बहु उदरें, आणि नानावर्णाची तीं वदनें तेथीलच्या प्रत्येक वदनाचे ठायीं आवशाचे मातलेपण केवढे तरी आहे पाहा! (३४१)

भांडी ऊरू, चारू, चरण बाहु, उदर, वर्ण, वदन (टिटवी, दत्तक, संगीत वैडूर्य खेवणी, मांडा) ऊरू, चारूगात्री येथें व्यक्तितत्वच जसें पुढें केलें आहे जसें हात म्हणजे मनुष्यें ते मातलेपण कसें आहे म्हणावें तर जसें कांहीं महाकल्पाच्या शेवटीं कोपलेल्या का हटवादास आलेल्या यमधर्मानें रागावून जाऊन त्यानें जेथें तेथें प्रळयाग्निमारखा वर्षावच केला.

महाकल्पाच्या शेवटीं तंवकास चढलेला यमनियंता जो त्यानें आगठ्यांची उजितें (उजेड) वर्षाव केला उजितें फेंकलींच का पसरिलीं जशीं का=होळयाच पेटल्या तेथें, अभ्युक्षण, शिंतोडा का आवरण हीच जशी का त्या वदनाना दिलेली=मातलेपणाची एक आंबुखिली शिंतोडयाची उजिती उगवणेंच जशीं (परटानें भट्टींत घालून खळणी करून आणलेले जे परीट घडीचे ते एका पाण्याच्या शिंतोडयानें शुद्ध होऊन अंगावर पेहनण्याच्या योग्य का लायकीचें झालें असें.) (३४२)

संहार त्रिपुराची प्रळयरुद्राची शंकराची तीं यंत्रें का प्रळय भैरवाचीं क्षेत्रें (क्षेत्र समुदाय) युगांतच होत आहे, होतो कीं काय! अशी अनेक शक्तीचीं पात्रें (भांडीं) भूतांच्या नाशाकरितां-भूतांची (खिचडी) खाचाखिच करून-(भूतांच्या खिचडी खाचाखिची करितां) प्राप्त झाली पोहोंचणी ओडवली जशी! (३४३)

त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्याकडेही तुमचीं प्रचंड मुखें उफाळून आहेत. जसें का दरीमध्यें एकाद्या वस्त्रावर काढलेलें सिंहाचें चित्र हें नच मावणारें का एक सारखा उफळा रंगीबेरंगी चित्रविचित्र रंगाचें आकारावर आकार का ध्वनिवर ध्वनि घेऊन असणारें होतें, त्याप्रमाणें तुमचे हे दांत अति रागीट दिसत आहेत. (३४४)

अहो, काळरात्रीच्या आधारामुळें आंधाराच्या आंधारावर संहार खेचरें म्हणजे नाश करणारीं पिशाच्चे उल्हसित होऊन बाहेर निघतात, संचार करणारीं होतात, त्याप्रमाणें तुमच्या वदनामध्यें रुधिरामुळें काटलेल्या (किटलेल्या का माखलेल्या) दाढा दिसत आहेत. (३४५)

हे कसें म्हणावें तर जसें का काळानें सर्व रण हेंच आमंत्रिलें आहे, बोलावून आणिलें आहे किंवा संहारामुळें मरणच कीं माजलें आहे, मातलें आहे, तसें अतिशय भयंकरपण का भिगुळवाणे पण त्या तुमच्या वदनामध्यें आहे. (३४६)

ही दीनवाणी अशी लोकसृष्टि तुम्हीं किंचित् नजर टाकून पाहिली असतां कशी दिसते म्हणावी तर दुःखरूप कालिंदी, यमुना नदीच्या तीरावरील वृक्षाप्रमाणें झाडाप्रमाणें कालियाच्या विषानें करपलेली दिसत आहे. करपलेले वृक्ष जसें तशी वृक्षरूप झाड होऊन नुसतीच उभी आहे. (३४७)

महामृत्यूचा सागरच जे तुम्हीं त्यामध्यें आतां ही त्रिलोक्य जीवितरूपी नौका, तर शोकरूपी अति दुःसह वाऱ्यामुळें डळमळत आहे. ही त्रैलोक्य जीवित नौका शोकरूप तुफानानें हेलकावे खात. आहे. शोकरूप वादळांतील भयंकर लाटामुळें लटपटत आहे, डळमळत आहे. (३४८)

आणि येथें जर का श्रीकृष्णांनीं कोपून जाऊन, कोपास येऊन कदाचित् सहज असें म्हणूं केले कीं तुला लोकांचें तें काय करावयाचें आहे? लोकांच्या ह्या अवस्थेचे—(न्याय) हेतु, आभास–विशेष अवस्थेचें तुवां कांहीं बाहीं वांटून घेणें जें तें कशास? तूं आपल्या ध्यान सुखानें, का धन्यपणाच्या स्तुति आभार, सुखानें ऐस, ध्यानसुख भोगीत ऐस, एकाग्रता, विचार चिंतन, ध्यानधिष्ण्या दृष्ट्या ध्यान योग्य, ऐस. (३४९)

१) अर्जुन म्हणतो, अहो देवा, हे सामान्य लोक तर अस्वस्थ होऊन आहेत. त्यांनीं वायांच की आड घ्यावें. अर्जुनत्वें रक्षण तें असें म्हणावें तर येथें आकस्मिकतेवरच की माझा जीवच, माझे पंचप्राण मुळीं आपलें तें विराट स्वरूप पाहून कंपित होऊन आहेत, अस्वस्थ होत आहेत. थरथरां कापत आहेत.

२) लोक हे खुषीनें, योग्य रीतीनें, बरोबरीचे का तुल्य प्रमाण करून तुमच्या पूज्यतेवरच की निमित्त होऊन, परमात्म्यास, परमात्म्यपण देऊन, त्यास महान् आत्म्याचें करून वांचवीत आहेत, संभाळीत आहेत, काळजी घेत आहेत, झांकीत आहेत, रक्षीत आहेत.

अस्वस्थ अशा या लोकांचें सामान्यपण समाईक असें विलक्षणपणाचें निमित्तच एक त्यांनीं (देहस्थ बुद्धि सारथि) अर्जुनत्वें मजला आड करून रक्षण घ्यावें (मजला आड घेऊन स्वतःचें रक्षण करावें) असें म्हणावें तर तेथें सहसा अतर्किततेनें, अकल्पिततेनें, आकस्मिततेवरच कीं आपलें तें विराट स्वरूप पाहून माझे पंचप्राणच, माझा जीवच की हा तर अस्वस्थ होऊन आहे. भीतीनें थरथर कांपत आहे. अहो देवा! तुम्हीं लोक हे साधारण ते अर्थहीनतेवरच अस्वस्थ म्हणून आड केले, स्वतःवर घेतले, त्याचा परिणाम मजवरच की माझे पंच प्राण व्याकुळ होण्यानें होत आहे, मजलाहि अस्वस्थ करीत आहे.

३) पण अहो, काय सांगावें की ह्या **लोकांचे** (न्यायागत हेतु, आभास विशेष असें अनेकांचें, कां समाईक, का सर्वोपयोगी, **सामान्यगुण** सामान्यनियम सर्वांस लागु असलेले, सामान्य लोकांचें **सामाईक असे** अनेक अनेकांचें एक विलक्षणपणाचें **निमित्तच तुम्हीं मानून आहांत**–पुढें करून आहांत: पूर्णपणें का अनायासेंच सुलभ असें अर्थहीन का निष्फळ म्हटलें–जसें **पण अहो! येथें माझेच पंचप्राण थरथर कांपत आहेत, व्याकुळ** होऊन आहेत. अहो! ह्या **लोकांना आड घालून म्हणजे स्वतःवर घेऊन** (त्याना पुढें करून दर्शयितृ म्हणजे **त्यांना वाटाडे करून**) त्यांचें एक निमित्तच घेतलें आहे. पण येथें तर मजलाचमुळीं कापरें सुटलें आहे. माझेच प्राण एकाएकीं भीतीनें कंपित झाले आहेतः येथें हे **लोक** सुरक्षिततेची ढालच एक आड घेतली आहे. (निमित्तच व्यर्थतेच्या **अर्थहीनतेनें आड केले आहेत**) **तुम्ही आपणा स्वतःवर घेतले त्यांचा परीणाम मजवरच कीं होत आहे.** व येथें तर असें म्हणणें व्यर्थच जसें कां, लोक हे खुषीनें, योग्य रीतीनें, तुमच्या पूज्यतेवरच की निमित्त होऊन परमात्म्यांस परमात्मपण देऊन, महान् आत्म्याचें करून, झांकीत आहेत, रक्षित आहेत.

मी लोकांचें सामान्यपण, सामान्यपरत्वे करून, एक निमित्तच घेत आहे, आड लपण्यास असे देवा, तुम्ही म्हणाल पण वस्तुतः येथें माझेच प्राण थरथर कांपत आहेत. (३५०)

अहो! ज्या मजला काळरुद्र वचकून आहे, ज्या माझ्या दराऱ्यामुळे; भीतीमुळे मृत्यूहि लपून बसतो, तो मी येथें आतां थरथरां कांपत आहे! मी अत्यंत, बहुत, अंतर्बाह्य कांपत आहे, असें तुम्ही अहो! केले!! (३५१)

पण ही आडमाप वाहाणाऱ्या गवताची केलेली महामारीच एक ती बाप! बाप! नवल! नवल! अशी आहे! हिजला विश्वरूप! जरी कसेंही म्हटले तरी, ही भ्यासुरपणें भयासही हारी देत आहे! भयानकपणामुळें मिणें करून, भयानकपणाच्या भीतीसचमुळीं, हरण करीत आहे, भीती नाहीशी करणारी अशी आहे. (३५२)

**श्लोक २४ वा**

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥**

नभः स्पृशम् दीप्तम् = (पेटलेलें) तेजच जसें आकाशास टेकलें–भिडलें आहे. अनेक वर्णम् = वर्णावर्णांचे. व्यात्ताननम् = आनन म्हणजे मुख उघडलें (पसरलें) आहे ज्याचें असा. दीप्तविशालनेत्रम् त्वां दृष्ट्वा = विशाल डोळे दीप्त झालेले त्या तुम्हांला पाहून. अंतरात्मा प्रव्यथितः = अंतरात्मा भिऊन गेला आहे. न विंदामि धृतिम् = मला धैर्य भेटेना, हे विष्णो! शमं न विंदामि = हे विष्णुरूपा! मला येथें शांतपण येईना!

अन्वय :—हे विष्णो! त्वां। नभस्पृशं। दीप्तं। अनेकवर्णं। व्यात्ताननं। दीप्त विशाल नेत्रं। दृष्ट्वा। अंतरात्मा प्रव्यथितः। धृतिं न विंदामि ॥ २४ ॥

अर्थ :—हे विष्णो, तुमचें उघडलेलं मुख आकाशास भिडलेलें (टेकलेलें) आहे, ते पेटलेल्या वन्हीप्रमाणें दीप्त आहे, प्रकाशित आहे. तें अनेक वर्णाचें आहे, त्याचे विशाल नेत्र अग्नीसारखे लाल व तेजस्वी आहेत. त्या तुम्हांस पाहून माझा अंतरात्मा भिऊन गेला आहे. व्याकूळ झाला आहे, मला धीर वाटत नाहीं–मजला शांतपण भेटत नाहीं!!

(कारण कीं हे विष्णो! आकाशास भिडलेले, तेजस्वी अनेक वर्णांनीं युक्त, तसेंच जबडा पसरलेले, प्रदीप्त व विशालनेत्रांचें तुम्हीं अशा तुम्हांस पाहून माझा अंतरात्मा व्याकुळ होऊन गेल्यामुळें मला धैर्य व शांति मिळत नाहीं.) ॥ २४ ॥ (श्लोक २४ वा. ओव्या ३५३–३७४)

**(नभः स्पृशम्) ठेली महाकाळेसी हटेतटे। तैसी किती येके रागिटे।**
**इहीं वाढूनिया धाकुटे। स्वर्गही केले ॥ ३५३ ॥**
**गगनाचेनि वाढपणें नाकळे। त्रिभुवनिचेया वारेया न वेटाळे।**
**(दीप्तम्) ययाचिया वाफा अग्नि जळे। कैसे धडाडित असे ॥ ३५४ ॥**
**(अनेकवर्णम्) तेवीचि येकासारिखा येक नव्हें। येथ वर्णावर्णाचा भेद आहे।**
**हो कां जे प्रळई सावावो लाहे। वन्हीचि या (वन्हि ययांचा) ॥ ३५५ ॥**
**ज्यांचिये आगीची दीप्ति येवढी। जे त्रैलोक्य कीजे राखोंडी।**
**(व्यात्ताननं) कां तयाही तोंडे आणी तोंडी। दांत दाढा ॥ ३५६ ॥**
**कैस वारयासि धनुर्वातु चढला। कीं समुद्र महापुरी पडला।**
**विषाग्नि मारा प्रवर्तला। वडवानलासी ॥ ३५७ ॥**

हळाहळ आगी पियाले । नवल मरण मारा पेटले ।
तैसे संहार तेजा या जाले । वदन देखा ॥ ३५८ ॥
परि कोणे माने विशाळ । जैसे तुटलेया अंतराळ ।
नभासि कव्हाळ । पडोनि ठेले ॥ ३५९ ॥
नातरी कांखेसुनि वसुंधरा । जै हिरण्याक्षु निघाला विवरा ।
तै उघडले हाटकेश्वरा । पाताळ कुहर ॥ ३६० ॥
तसा वक्त्रांचा विकाश । माजि जिव्हेचा आगळा आवेश ।
विश्व न पुरे म्हणोनि ग्रास । न भरीचि कोडे ॥ ३६१ ॥
आणि पाताळ व्याळाच्या फूत्कारी । गरळ ज्वाळा लागती अंबरी ।
तैसी पसरिली वदन दरी । माजि हे जिव्हा ॥ ३६२ ॥
कादुनि प्रळय विजूंचे जुंबाडे । जैसे पन्नासिले गगनिचे हुडे ।
तैसे आवाळुवे वरि आंकुडे । धगधगित दाढांचे ॥ ३६३ ॥
(दीप्त विशाल नेत्रम्) आणि ललाट कपाळाचिये खोळे ।
कैसे भयाते भेडसाविताति डोळे । हो का जे महामृत्युचे उमाळे ।
कडवसा राहिले ॥ ३६४ ॥
ऐसे वाउनि भयाचे भोज । येथ काय निपजऊ पाहासी काज ।
ते नेणे परि मज । मरण भय आले ॥ ३६५ ॥
देवा विश्वरूप पाहावयाचे डोहळे । केले ते पावलो प्रतिफळे ।
'बा' देखिलासि आतां डोळे । निवावे तैसे निवाले ॥ ३६६ ॥
(प्रव्यथितांतरात्मा) आहा देहो पार्थिव कीर जाये । याची काकुलती कवणा आहे ।
परी आतां चैतन्य माझे विपाये । येथ वाचे कीं न वाचे ॥ ३६७ ॥
येऱ्हवी भयास्तव आंग कांपे । नावेक आगळें तरी मन तापे ।
अथवा बुद्धि हान वाखिपे । अभिमानु विसरिजे ॥ ३६८ ॥
परि येतुलियाहि वेगळा । जो केवळ आनंदैक्य कळा ।
त्या अंतरात्मायाहि निश्चळा । सियारी आली ॥ ३६९ ॥
बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोधु ।
हा गुरुशिष्य संवादु । विपाये नांदे ॥ ३७० ॥
देवा इये तुझे दर्शनी । जे कैवल्य उपजले आहे अंतःकरणी ।
ते सांवरावया लागी गवसणी । धैर्याची करीतसे ॥ ३७१ ॥
(धृतिं न विंदामि शमं च विष्णो)
तंव माझेनि नामे धैर्य हारपले । किं तयाहि नेणो विश्वरूप दर्शन जाले ।
असो परि मन भले आंतुडविले । उपदेशा ईया ॥ ३७२ ॥
जीव विसंवावयाचेया चाडा । सैंघ धांवाधांवी करीतसे वापुडा ।
परि सोयहीकवणि कडा । न लभे येथ ॥ ३७३ ॥
ऐसे विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेले आहे चराचरी ।
जी न बोले तरि काय करी । कैसेनि राहे महाविष्णू ॥ ३७४ ॥

हटतटे ठेली=पैज घेऊन लढत आहेत. स्वर्गही–आकाश. (३५३) त्रिभुवनिचेया–त्रिभुवनिचियाहि. वारेया–वारिया. ययाचिया–ययाचेनि. अग्नि–आगी. ययाचिया वाफा=मुखाच्या वाफेनें अग्निही जळत

आहे; तीं मुखें आपल्या वाफेनें अग्निलाही (आगीलाहि) जाळीत आहेत. (३५४) येक–एक. नव्हे–नोहे. येथ–एथ. वर्णावर्णाचा वाणी भेद के आहे=त्याच्या रंगारूपांत भेद आहे–वर्णा–वर्णाचा वाणी–ठेवणी मध्यें भेद तो म्हणजे जीवित (के) तें कसें आहे. प्रळई–प्रळयी. सावावो=मदत. वन्हिचि या –वन्हि ययांचा. (३५५) कीं–कां. तयाही तोंडे=त्या राखोंडींतही. (३५६) कीं समुद्र महापुरीं पडला –समुद्र की पडिला महापुरी=समुद्रास महापूर आला. (३५७) मरण मारा पेटलें–मरणा मारा प्रवर्तले. जाले–जाहले. वदन–वदनी. (३५८) तुटलेया–तुटलिया. तुटिलेया नभासि–आकाशासि. कव्हाळ–कव्हळ =वेढा, मिठी, ग्रास, नभोमंडळांत उडणारे पक्षी, (त्यांचा कळप जसा तेथीलची ती फिरकीची आंस वेढाच नभास का आकाशास पडला.) ठेले–ठाके. (३५९) काखेसूनि=बगलेंत मारून. निघाला–रिगाला. हाटकेश्वरी=पाताळांतील महादेवाची (नी) आनंद संपत्तीची (कंठ) कुठाररूपी गोपी, गुहाच उघडली. कुहर=भुयार. (३६०) वक्त्रांचा–वक्त्रांचा त्या. जिव्हेचा–जिव्हांचाः आगळा–आगळाचि. ग्रास–घांस (३६१) व्याळाच्या–व्याळाच्यिा. फुत्कारी–स्फूत्कारी. पसरिलीये–पसरलिया. (३६२) जुंबाडे= समुदाय. पल्लासिले=शृंगारिले. गगनिचे–गगनाचे. हुडे=बुरुज. आवाळुवा वरि–आवाळु आवाळे, ओष्टप्रांत, ओठाबाहेर. आंकुडे–आकडे. (३६३) ललहाटा कपटाचियें–लल्लाटपटाचियें. कैसे–जैसे. भेडसावितातिं–भेडवितातिं (पा. भे.) उमाळे–लोट, कवडसाः कडवसा राहिले=आंधारांत राहिले. (३६४) वाउनि–दाउनि=रूपाच्या दर्शनाचें निमित्त घेऊन, स्वीकारून भयाचे–महाभयाचे. पाहसी–पाहातोसि. नेणे–नेणो. (३६५) ते–तिये. प्रतिफळें=अद्दल घडली. बा–बापा. (३६६) याची–ययाची. नावेक =क्षणभर, थोडे बहुत. ही–हान ही वासपे–वासिपे=भय पावते. (३६८) आनंदैक्य कळा–आनंदैक कळा. त्या–तया. निश्वळा–निर्मळा. सियारी आली=हुशारी आली=(शिसारी, शारी, सियारी =कंटाळा, कांटा, कंप) (३६९) संवादु–संबंधु (३७०) इये तुझे–तुझ्या ये. कैवल्य (वैकल्य) (पाहा ८ अ.) (३७१) तयाहि नेणो–तयाहि वरि. जाले–जाहाले. मन–माज आंतुडविले=गुरफटून टाकलें. (३७२) विसंबावयाचेया चाडा=विश्रांतीची आवड धरून, विसावा घेण्याकरितां कवणि–कवणे. (३७३) माहामारी =आडमाप वाढणाऱ्या गवताची वेलवचेनि केलेळी ही. (अ. १५, ५८) जीवित्व–जीवित. बोलो–बोले. (३७४)

महाकाळाबरोबरही पैज घेऊन लढताहेत अशी कित्येक रागीट मुखें तीं, त्यांनीं आकाशापेक्षांही मोटें होऊन वाढून जाऊन स्वर्गासही लहान असें केले आहे. (३५३)

गगनाच्याहि वाढपणानें विस्तृत कां मोठेपणानें [गगन हें केव्हांही एकसारखें वाढतच असणार (असें वाटतें तें वायुमुळें) जे जास्त जास्त असें होत असणार अशा] त्या गगनासहीपण तें तुमचें रूप आकळणारें का मापलें जाणारें नाहीं; तिन्हीं भुवनांचा वारा जरी पुढें झाला तरी ते विश्वरूप वेटाळून घेण्यास का चेष्टविण्यास तो वारा समर्थ होत नाहीं. त्या स्वरूपाची इतकी कांहीं तीव्रता आहे कीं आगी जी किंवा अग्नि जो तोहीपण (जळूं लागतो) जसा कां त्या स्वरुपाच्या वाफेनें का धगीमुळें का दीप्तपणानें, (अग्निहिपण) जळत आहे. तें रूप आगीसही जाळीत आहे (आगीसही अग्निसही त्याची ती जाळण्याची शक्ति देत आहे.) असें कसें विश्वरूप किंवा केवढें तें, जसें का धडाडित असलेलें–ब्रह्मच !! (३५४)

त्याचप्रमाणें मुख का रूप हें एकसारखें एक का दुसरें केव्हांही नसणारच; एकासारखीं मुखें का रूपें दुसरीं कांहीं एक तेथें नाहींत; येथें वर्णाचा (वर्ण=रंग, कांति, सौंदर्य, रूप, ब्राह्मणादि चार जाति, कीर्ति, गुण, स्तुति, आकृति, वस्त्र आच्छादन, गीतक्रम, गाण्यातील राग, उटणे, सोनें कसाला लावणे, व्रत, चित्त, पद्यरचना, अक्षर, रूप, भेद केशर, इत्यादिः रंग=रंग, सभागृह, सभामंडप, आखाडा, नृत्यस्थान, प्रेक्षकगण, रणभूमि, खेळ, क्रिडा, समाज.) वर्णाशीं जात, प्रकार, अक्षर, शब्द, व्रत, व अवरवर्ण म्हणजे

शब्दाचा वाणी भेद तो कसा आहे पाहा ! त्याच्या रंगारूपास भेद आहे, जेथें का प्रळयाचा वेळेसही पण वन्हीही त्यांची (वर्णात्मा = शब्द) अनेक वर्णाची सोबत किंवा मदत मागणारा व साह्य मानणारा होतो. (३५५)

ज्या रूपाच्या आंगची तेजस्विता–दीप्ति–प्रदीप्तता इतकी की हे जे त्रैलोक्य तेथें त्रैलोक्याची राखोंडीच होणारी ते राखोंडीच जशी केली जाणारी होय. त्या उघड्या तोंडाच्या प्रदीप्ततेसही पण कां जबडा पसरलेल्या प्रकाशमानतेस तोंडेंच तोंडें वं त्या तोंडाच्या आंत दांत व दाढा असलेल्या. (३५६)

अहो ! कसा की वायूपचमुळीं धनुर्वात झाला, वायुवरही धनुर्वात चढला, किंवा समुद्रासच महापूर आला, समुद्र हा महापुरानें पूर्ण भरला का महाप्रवाहाच्या भरतीमध्यें पडला–विषाग्नि का विषय विष अग्नि जो का वडवानलासही, वडवाग्निसही वडवामुखासही म्हणजे समुद्रांतील अग्निस मारण्यास प्रवर्तला आहे जसा. (३५७)

हळाहळ विष जें तें अग्नि झालें–अग्नि प्यायलें असें नवलच एक कीं ! मरण हेंच मारास म्हणजे मरण मारण्यास प्रवर्तलें आहे, प्रवृत्त झालें आहे–चढास पेटलें आहे,–त्याप्रमाणें हें जें संहारतेज त्यास वदनच एक आलें आहे कां संहार तेजच त्या वदनाचे का मुखाचे झालें आहे–वदनी संहारतेजास इतकें उग्रपण येऊन आहे. (३५८)

तेथीलच्या विशालपणास परिमाण ते द्यावे कां द्यायचे झाले तर तेथील मान मोजणें प्रमाण का लांबीचे माप तें कशासारखें विशाल म्हणावें तर, ज्याप्रमाणें अंतराळ हें तुटून जाऊन नभच–नभाचा का आकाशच आकाशाचा ग्रास करीत आहे जसें–परा व अपरामधील अंतर तें अंतराळ तुटल्यामुळें तें वदन तर सर्व आकाशच वेष्टन आहे–आकाशास मिठी कां वेढा देऊन आहे (आकाशाच्या वाखाणणीचें होऊन आहे): ('काहाळ' अशौचा जपो नयेः ज्ञा. गा ) (३५९)

किंवा जसें का जेव्हां हिराण्याक्षानें वसुंधरा–पृथ्वी जमीन बगलेंत मारून विवरामध्यें लपण्याचें केलें तेव्हां श्रीशंकरमूर्तीनीं–हाटकेश्वरांनीं – सुवर्णेश्वरांनीं सप्त पाताळापैकीं सातव्या पाताळामधील जलक्रीडा करणारी गोपी रूपी–कान कंठ, कुठाररूपी कुहर, विवर, गुहा, मैथुन, नागभेद, गुहाच उघडिली. (३६०)

त्याप्रमाणें ह्या वक्त्रांचा विकास व त्यामध्यें लळलळणारी जीभ ही अति आवेश घेऊन आहे. त्या आवेशानें घांस घेणें तेथें सर्व विश्वहि थोडकेपणाचें असें तें एका घांसापुरतें सुद्धां नव्हे, म्हणून त्याचा घांस घेण्याचें करीचना–एकदमच्या एकदम कौतुकच केलें जसें कां तसें, विश्व तें वक्त्रांचा विकासावर एका घांसाचें तें करीचना ! (३६१)

येथें पाताळ सर्प (व्याळ) जो, त्याच्या फूत्कारामुळें निघणाऱ्या विषाच्या ज्वाळा त्या तर आकाशासही लागून गेल्या आहेत–त्याप्रमाणें पसरलेल्या वदनदरीमध्येंच जशी का ती जिव्हांची एक ! (३६२)

प्रळयसमयीं चमकणाऱ्या विद्युलतेचे समुदाय काढून गगनाचे बुरूजच जसे शृंगारिले–पजासिले त्याप्रमाणें आवाळुवावर–ओष्ठप्रांताबाहेर दाढांचे आंकडे धगधगीत असे दिसत आहेत. (३६३)

तसेंच ललाटपटाच्या ललटरूपी उत्तम वस्त्र, चित्रें काढण्याकरितां तयार केलेलें त्याच्या खोलीमध्यें असलेले ते डोळे कसे भयासही पण भेडसावीत आहेत पाहा–जसें का महामृत्यूचेहि उमाळे प्रवाह लोट अंधारांतच राहिले–कवडशासारखेच होऊन ते मृत्यूचे उमाळे राहिले आहेत. (कपाट = हृदय. कपट–कर्पट = चित्राचे कपाट,) कपाळचमुळीं कपाळरूपी वरच खोलीमध्यें ते उमाळे राहिले आहेत. (३६४)

असे भयाचें कसचें अहो ! ते तर महाभयाचेच एक सोंग दाखवून आहांत भयाचे (भोज) कौतुक वाहून आहांत तेथें कसले काज तुम्हीं निष्पन्न करूं पाहात आहांत, तें कांहीं जाणतां येईना ! पण मजला मात्र येथें मरणाचें भयच आलें आहे–, मरणभय वाटून आहे. (३६५)

देवा ! हे विश्वरूप पाहाण्याचे डोहळे केले त्याचें प्रतिफळ का प्रायश्चित्तच जसें मला मिळालें आहे. बापा ! अहो बाप्पा ! तुमचें तें रूप मी पाहिलें व माझे डोळे जितके निवावयाचे होते तितके निवाले आहेत. (३६६)

अहो, देह हा पार्थिवच एक; तो तर केव्हांही जाणारच जाणार ! देह जाण्याबद्दलच कसनें काकुलती-पण तें ! ते कोण करीत बसणार ! पण येथें आतां कदाचित् माझें चैतन्यचमुळीं वांचेल कीं न वांचेल असें वाटूं लागलें आहे ! (३६७)

एरव्हीं पाहातां ह्या भयामुळें–भीतीमुळें माझें सर्व आंग (सर्वांग) कांपत आहे; क्षणभर तेथीलच्या आगळेपणामुळें हे मनचमुळीं तापत आहे; तसेंच ही बुद्धीहीपण भय पावून वचकत आहे, येथें मुळीं सर्वेच्या सर्व अभिमान विसरावा असें आहे. (३६८)

ह्या इतक्याहि वेगळा जो केवळ आनंदाचा कळा, तो त्या निश्चळ निर्मळ अशा अंतरात्म्यासहि हुशारीचा झाला आहे हुसियारीचा होऊन आहे. (शिसारी कां कंटाळा तो नाहींसा होऊन हुशियार असा झाला आहे.) (३६९)

बाप ! बाप ! काय तो साक्षात्काराचा वेध म्हणावा कीं जेथें तर गुरु व शिष्य एकरूपच होऊन गेले. बोध हा कसा देशधडी केला गेला असा गुरुशिष्यसंबंध किंवा संवाद कदाचितच नांदणारा मदत करणारा, आनंद देणारा, नद=गर्जणारा, ओरडणारा, वाजविणारा, दुमदुमविणारा. (३७०)

देवा, तुमच्या या दर्शनानें जे कांहीं निःसंगपणाचें केवळ विकलपण, धांदल, असमर्थता, विकलत्व, व्यंग, उणें माझ्या अंतःकरणामध्यें उपजलें आहे, ते सांवरण्याकरितां सर्व धैर्यच एकवटावें लागत आहे.

निखळ ज्ञान, केवळ ज्ञान किंवा कैवल्य हेंच येथें अंतःकरणामध्यें उपजलें आहे. येथें अभिमान व गुरुशिष्यसंबंध हा नांदणारा होतच नाहीं; तेथील केवळपण म्हणजे पृथक्‌पणाचें वैशिष्ट्य सांवरण्याकरितां चोहोंकडून धैर्यच आपलेंसें करावें लागत आहे. (३७१)

तरीपण अहो ! मनुष्यधर्म प्राकृत असा मी; अमुक एका नांवाचा आहें; माझें नांव (अमुक) अमकें आहे असें जेव्हां पुढें होतें, तेव्हां सर्व धैर्यच मुळीं हारपलें होत आहे. येथें कसें तें त्या तेवढ्या कामा-पुरतेंच मुळीं तें ते जाणतांच मुळीं येईना कीं त्या नांवासच मुळीं तें अनेकरूपाचें तें विष्णुचें दर्शन झालें!!! हें असो; पण मन हें आपल्या भलेपणानें ह्या उपदेशांतच गुरफटवून टाकलें गेले आहे. तें उपदेशाचें भलें असें तें मनच आपणास्वतःस ह्या उपदेशासच सांपडवून आहे. (३७२)

तें नांवचमुळीं विश्वरूप झालें; पण त्या माझ्या नांवा एवढ्याच मुळें माझें धैर्यच मुळीं हारपलें पण ह्या उपदेशास मात्र मन हें भलेपणानें बिलगत आहे–हा जीव विश्रांतीची आवड धरून पुष्कळ धांवाधांवी करीत आहे; पण येथें आतां त्यास सोय ही कुठेंच सांपडेना–सांपडत आहे असे होईना. (३७३)

महामारी, उपासमारच जशी–येथें आडमाप वाहाणाऱ्या गवताची केलेली बळवलेली ती, तिजमुळें हे जीवितत्वचमुळीं चराचरामध्यें वांटलें गेलें असें झालें आहे; येथे न बोलूं तर काय बरें करूं ? कारण येथें ते मनच मुळीं उगे राहिना.

अहो, जीवित हें चराचरीं जर गेलें आहे, तर येथें आतां जे मत्स्येंद्रनाथ, ज्यांनीं हें गुह्य ज्ञान ऐकिलें तें कसें काय आपलें जीवित आवरून असतील कोण जाणे ! जीवितच जर चराचरीं गेलें आहे ह्या उपास-मारीमुळें का महामारीमुळें, तर मग अहो ! अहो ! महाविष्णु !!! कसें बरें हें जीवित अहो ! न बोलल्या-शिवायच उगें रहाणारें होईल ?

**श्रीमहाविष्णु—**

(१) मत्स्येंन्द्रास नाथपंथी महाविष्णु म्हणतात. सिद्धनाथ सिद्धांत सारामध्यें ओवी आहे ती— 'मत्स्याच्या उदरा आंत । महाविष्णु मत्स्येन्द्रनाथ । जो आदिनाथांचा सुत । तत्वज्ञान ऐकतसे ॥'

(२) क्षीरसागर ही जागा श्रीविष्णुची; तेथें भगवान नारायण शेषावर निद्रिस्त आहेत–क्षीरसागर हा मूळचा श्रीविष्णूचा व त्यांच्याच परिसरी श्रीशंकरानीं शक्तीस कांहीं सांगितलें ( मत्स्येन्द्रनाथास सांगितलें ) तें मत्स्येन्द्रनाथांस प्राप्त झालें—

क्षीरसिंधु परिसरी । शक्तीच्या कर्णकुहरी । नेणो के श्रीत्रिपुरारी । सांगितले जे ॥ ते क्षीरकल्लोळा आंत । मकरोदरी गुप्त । होत तयाचा हात । पैठे झाले ॥ तो मत्स्येन्द्र ! (३७४)

**श्लोक २५वा**

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंन्निभानि ।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥**

ते मुखानि = आणि तीं तुमचीं मुखें. दंष्ट्राकरालानि = भयंकर दांत का दाढा असलेली. ( दंष्ट्रा = दाढ, सुळा, दंष्ट्राल = मोठ्या दाढा असलेला. कराल = भयंकर, दांत पुढें असलेला.) कालानल संन्निभानि एवं दृष्ट्वा = कालाग्नि ( अनल = अग्नि. जगत् आधार = काल, वायु. ) सारखी (सन्निभ = समासांति = सारखी ) जशी ती पाहून, (दिशोन जाने = )दिशा समजेनात. (न लभे शर्मंच = )सुखच सांपडेना. (शर्मन् = सुखी, शुद्ध, ब्रह्मणाचे उपपद, कल्याण सुख आशिर्वाद.) (हे देवेश प्रसीद ) हे देव! हे इश! हे इंद्र! हे विष्णु! हे शिव! हे ब्रह्मा! प्रसन्न व्हा. (जगन्निवास = ) हे जगन्निवासा! हे विष्णो! हे परम ईश्वरा! परमेश्वर विष्णु.

अन्वय :—

हे देवेश! हे जगन्निवास! ते मुखानि । काल अनल सन्निभानि एव । द्रष्ट्राकरालानिच । तान् दृष्ट्वा दिशः न जाने । शर्मंच न लभे । प्रसीद ॥ २५ ॥

अर्थ :—हे जगन्निवास ! हे परम ईश्वर ! हे विष्णो ! हे देव ! हे ईश ! हे इंद्र ! हे विष्णु हे शिव ! हे ब्रह्मा ! आपण मजवर प्रसन्न व्हा ! मजंवर कृपा करा ! तुमचीं आपलीं मुखें कालाग्निसारखीं –प्रळयकाळच्या अग्निसारखीं प्रज्वलित–विक्राळ दाढांनीं युक्त अशीं–दांत पुढें असल्यामुळें भयंकर अशी ती पाहून मला दिशा समजेनात–दिशा समजेनातशा झाल्या, सुख सांपडेना कीं अहो (याकरितां अहो देवेशा आपण मजवर प्रसन्न व्हा ! मजवर कृपा करा–प्रसीद.) ॥ २५ ॥

(श्लोक २५वा, ओव्या ३७५ ते ३९१)

**(दंष्ट्रा करालानिति)—पैं अखंड डोळियापुढें । जैसे पसरले महाभयाचें भांडे ।**
**तैसी तुझीं वदनें प्रचंडे । देखत असे ॥ ३७५ ॥**
**असो दांत दाढांची दाटी । न झांकवे मा दो दो वोठी ।**
**सैंघ प्रळय शस्त्राची दांटकांठी । लागल्या जैशा ॥ ३७६ ॥**
**जैसे तक्षका विष भरले । हो कां जे कालरात्री भूत संचरले ।**
**की आग्नेयास्त्र प्रेरिले । वज्राग्नि जैसे ॥ ३७७ ॥**
**तैसे वदनें तुझीं प्रचंडे । वरी आवेश हा बाहेरी वोसंडे ।**
**आले मरण रसाचे लोंढे । आम्हांवरी ॥ ३७८ ॥**

संहार समईचा चंडानळ। आणि महाकल्पांत प्रळयानळ।
या दोही जै होये मेळ। तै काय येक न जळे ॥ ३७९ ॥
तैसी संहारके तुझी मुखें। देखोनि धीर का आम्हा पारुखे।
(दिशो न जाने) आता भुललो मी दिशा न देखे। आपणपें नेणे ॥ ३८० ॥
(न लभे च शर्म)
मोटके विश्वरूप डोळा देखिले। आणि मुखासी (सुखाचे) आवर्षण पडिले।
आतां जापाणि जापाणि आपुले। अस्ताव्यस्त हे ॥ ३८१ ॥
येथे ऐसे करिसि (ल) म्हणऊनि जरी जाणे। तरी हे गोष्टी का सांगा जी म्हणे।
आता येक वेळ वाचविजो प्राणे। या स्वरूप प्रळया पासुनि ॥ ३८२ ॥
जरि तूं गोसावी आमुचा श्री अनंता। तरी सूवि वोडण माझिया जीविता।
साटवी पसारा हा मागुता। महामारीचा ॥ ३८३ ॥
(जगन्निवास) आईके सकळ देवांचिये पर देवते। तुवां चैतन्य गा ते विश्ववसते।
(ते) विसरलासि हे उपरते। संहारू आदरिले ॥ ३८४ ॥
(प्रसीद देवेश)
म्हणोनि वेगी प्रसन्न होयी देवराया। संव्हारि संव्हारि आपली माया।
काढी मज महाभया। पासोनिया ॥ ३८५ ॥
हा ठायवरी (हाटावरी) पुढत पुढती। तुज म्हणतसे (म्हणिजे) बहुवा काकुळती।
ऐसा मी विश्वमूर्ति। भेडुका जालो ॥ ३८६ ॥
जै अमरावतिये आला धाडा। तै मिया येकलेनि केला उवेडा।
जो मी काळाचिया तोंडा। वासिपु न धरी ॥ ३८७ ॥
परि तया तुल्य नव्हे देवा। येथ मृत्युसिही करूनि चढवा।
तुवा आमुचाचि घोट भरावा। सकळ विश्वेसी ॥ ३८८ ॥
कैसा नव्हता प्रळयाचा वेळु। गौ रवा गो खा (=नख) हो कां तूचि मिनलासि
काळु। बापुडा हा त्रिभुवन गोळु। अल्पायु जाला ॥ ३८९ ॥
अहा भाग्या विपरिता। विघ्न उठिले शांति करिता।
कटकटा विश्व गेले आतां। तूं लागलासि ग्रासू ॥ ३९० ॥
हे नव्हे मा रोकडे। सैंघ पसरूनिया तोंडे।
कवळितोसि चौंहोकडे। सैन्ये इये ॥ ३९१ ॥

डोळियांपुढें डोळयांपुढें. जैसे पसरले–फुटले जैसे वदने प्रचंडे–मुखे विंतडे (मुखे अकाळविकाळ) देखत असे–पसरली देखे. (३७५) न झांकवे=मावत नाहींत. दो दो–दोहो. वोठी–ओठी शस्त्राचिया–शस्त्राचिये. लागल्या–लागलिया. (३७६) तक्षका–तक्षकासी. प्रेरिले–परजिले. वज्राग्नि–प्रळयाग्नीनें. (३७७) वदनें तुझीं–तुझीं वक्त्रें. (३७८) संहार–संसार. चंडानळ (प्रचंड अग्नि)-चडानिळ=वावटुळी. येक–एकां (३८९) धीर का (की) आम्हां पारुखे=धीर आम्हांस कां बरें सोडून जात आहे, धीर आम्हांस पारखा होत आहे. (३८०) मोटके=थोडके, निमिषभर. मुखासि–मुखासी. जापाणि जापाणि=आटप आटप, आवर, आटोप. अस्ताव्यस्त=अव्यवस्थितपणा, गोंधळलेपणा. (३८१) येथे— — करिसि–करिसील. म्हणऊनि–म्हणोनि. का सांगाजी–सांगावी का मी. येक–एक. वांचविजो–वांचवी जी. स्वरूप प्रळया पासुनी–विश्वरूप प्रळया पासोनि=अस्ताव्यस्तपणापासून—हेवा, मत्सर देऊ हेऊ. (३८२) सुवि–सुई=

आड घाल. वोडण–वोडणें=आडोसा, ढाल. साटवी=आवर. (३८३) परदेवते–परमदेवते. चैतन्य–चैतन्ये विश्ववसते–ते विश्ववसते. उपरते–याहीवर उपरि ते, उलटे, उफराटे उपरते, उ परते. (३८४) होयी–होई. संव्हारि, संहारी=संहरी संहरी=आवरून घ्या, नष्ट करा. मज–मातें. (३८५) ठायवरी–ह्याटावरी. म्हणतसे–म्हणिजे. मी–मी जी, अगा, हे, अहो. भेडुका–भेडका=भेकड. जालो–जाहलों. (३८६) धाडा=छापा. मिया–म्यां. उवेडा–उबेडा=उलगडा, पराभव. काळाचिया–काळाचियाहि. वासिपु=भय, वचक, भीति. (३८७) तुल्य–आंतुल. करुनि–करून. चढावा–न करवे हेवा. —— —— या. (३८८) वेळु–वेळ, गौ खा–गो खा गोख=[हो का (पा. भे.)] कुक्षि, गवाक्ष, मध्य, पोट. काळु–काळ (३८९) पसरूनिया–पसरोनियां. कवळितोसी–कवळितासि. चहुंकडे–चोहोंकडे. (३९१)

माझ्या डोळयांपुढें तर अहो देवा! एकसारखे जसें का एक महाभयाचें भांडेंच पसरलें आहे, फुटलें आहे, त्याप्रमाणें तुमचीं प्रचंड वदनें, वितंड मुखें–अकाळ विकाळ अशीं मी पहात आहें; जी पसरलेली अशीं, तीं मुखें मी पहात आहें. (३७५)

हे असो! यावरही दातांची व दाढांची दाटी ह्या दो दो ओंठीं, दोन्हींही ओठांनीं झाकवत नाहीं. ती दाटी कशी म्हणावी, जशी का प्रळयशस्त्राची कुंपणेंच दाट अशीं, ओठांच्या कांठीं लाविलेली आहेत. (३७६)

जसें कांहीं तक्षकासच विष भरलें किंवा जसें का काळरात्रीं भूतच एक संचरलें का वज्राग्निप्रमाणें आग्नेयास्त्रच एक प्रेरिलें का परजिलेलें. (३७७)

तशी तुमचीं प्रचंड अशीं वदनें, वक्त्रें असून त्यामध्यें भरलेला आवेश बाहेर सांडत आहे तो, जसे का मरणरसाचे लोंढेच आम्हावर येत आहेत. (३७८)

संहारवेळेचा चंड अग्नि व महाकल्पाच्या अंतीं होणारा प्रळयाग्नि ह्या दोहोंचा जेथें मेळ बसला आहे, तेथें काय बरें कांहीं एक न जळणारे! तेथें सर्व कांहीं जळून जाऊन खाक होणारें असेंच. (३७९)

त्याप्रमाणें संहार करणारीं तुमचीं मुखें पाहून तर आम्हांस धीरच सोडून जात आहे. धीर कां धैर्यच आम्हांस पारखें होत आहे व आतां मी भुललों, मला दिशा दिसत नाहींत व आपणास्वतःसही मी कांहीं जाणेना, मी स्वतःसच की नेणून आहे. (३८०)

एक निमिषभरच थोडके का थोडेसेच ह्या डोळयांनीं विश्वरूप पाहिलें आणि आतां तर सुखाचें आवर्षणच जसें पडलें आहे. माझें मुख तर कीं अहो देवा! सुकून गेलें आहे; या कारणास्तव आतां आपलें हें अस्ताव्यस्त असें रूप आवरा, आटोपा, आवरून आटपून घ्या, सांवरून धरा. (३८१)

ह्या विश्वरूप दर्शनानें माझें मुखच मुळीं जर सुकलें व सुखाचें आवर्षणच पडलें. आतां मुखासचमुळीं आवर्षण पडलें आहे. येथें आतां असेंच माझें सुकणें जर का आपण आपलें दर्शन देऊन करणार होता का आहांत असें जर मजला समजतें असें जर मी जाणून असतों तरी काय? तेथेंही पण अशी ही मुखाच्या का सुखाच्या आवर्षणाची गोष्ट तरी कां बरें सांगण्याचें ती मी करीत आहें! येथें होणारें जें कांहीं, तें मुळीं बोलून तर उपयोगच नाहीं; करितां आतां ह्या वेळेस जी आहो, माझे प्राण ह्या स्वरूप प्रळयापासून का विश्वरूप प्रळयापासून—अस्ताव्यस्तपणापासून मजला वांचवा जी कीं अहो! (३८२)

तुम्हीं अहो! हे श्रीअनंता, आमुचे स्वामी–गोसावी आहांत! तरी आतां ह्या माझ्या जीविताच्या आड आडोसा घालून हा पुन्हः पुन्हः येणारा ह्या आडमाप, (गवताचें) घालणाऱ्या महामारीचा पसारा आवरा. (३८३)

अहो! सकळ देवांचें पर परम देवतें–विश्व वसते चैतन्य जे तुम्हीं ते स्वतःस विसरून गेले आहांत व ते विश्व वसते चैतन्यचमुळीं की रक्षण करण्याऐवजीं उलट संहार करण्याचें करीत आहांत, अहो! संहारण्याचें तें मनावर घेत आहांत. [सर्व देवांचेहि जे देव, जें चैतन्य असे तुम्ही आपले विश्व वसते, विश्वीं भरून उरलेले जे तुम्हीं चैतन्य, ते विसरून जाऊन उलटे हे उदासीन व विरक्त उपरते=पराङ्मुख, मृत, समाप्त, थांबलेले असे जे=तेच तुम्ही संहारूं आदरीत आहांत–, संहारण्याचें मनावर घेत आहांत.] (३८४)

म्हणून अहो देवराया! वेगीं प्रसन्न व्हा! आपली माया आवरून घ्या! ती नष्ट करा! ती आपली माया संहारी! जिकडची तिकडेच लयाची करा, पांगवा–व मला ह्या महाभयापासून बाहेर काढा, सोडवा, वांचवा, कीं जी अहो देवराया! (३८५)

आतां असा हा माझा अंतच पाहिला गेला जसा कां! हाटावरच येथें टेकणें झालें, म्हणून पुन्हः पुन्हः अति काकुळति येऊन तुम्हांस विनवीत आहें कीं अहो हे विश्वमूर्ति! अहो! असा कसा मी (भेडुका का) भेंकड झालों आहें कोण जाणे! (३८६)

अहो! जेव्हां का अमरावती नगरींत धाडा पडला होता, तेव्हां ह्या मी एकव्यानेंच कीं तेथचा उबेडा उलगडा करून त्याचा पराभव करून तो परत फिरविला. आहो! असा जो मी तो कांहीं काळाच्याहि मुखास वचकत का भीत नाहीं–मी तर काळाशींहि तोंड देण्यास भीत नाहीं. (३८७)

पण येथें मात्र ती उपमा पुरत नाहीं कां जे येथें मृत्युसीहि हेवा न करणें पण येथें आतां तर सकळ विश्वासहित तुम्हींच आमचा घोंट करावा असें होत आहे. (३८८)

अहो! कांहीं हा प्रळयाचा वेळ नव्हता–, प्रळयाची ही कांहीं वेळा नव्हती तरी पण तुम्हींच जसें का काळच कीं अहो भेटलांत व आतां बापुडा हा त्रिभुवन गोल कीं अहो अल्पायु असा होत आहे, अल्पायु असा झाला आहे कीं. (३८९)

आहा! आहा! एक शांतीकरितां करितांच कीं ह्या भाग्यासच एक विपरीत असें विघ्नच उठिलें (आहे) असें होऊन आहे, कटकटच ती माझी विनवणी ती आतां ऐकण्याची ती कसची! अहो येथें विश्वच जाऊं लागलें आहे कीं, अहो, तुम्हींच की ते ग्रासूं लागलां आहांत. (३९०)

अहो, हें काय उघड असें, रोकडेंच अगदीं धडधडीत समोर स्पष्ट असें नव्हे काय! की पहा पहा कीं तुम्हीं आपलीं तोंडे आवेशानें पसरून चहूंकडे हीं सैन्येंच की कवळीत आहांत कीं. (३९१)

**श्लोक २६ वा**

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः॥ २६॥**

[अर्थ पूरक, प्रथमपाद, श्लोक २७ वा, '**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति**'। ]

अमी (असौ, अमू, अमी)=हे. (ते विशंति=तुजमध्यें शिरत आहेत.) धृतराष्ट्रस्य सर्वे पुत्राः =धृतराष्ट्राचे सर्व पुत्र. अवनिपालः=राजा. संघैः=समुदाय. असौ भीष्म द्रोण सूत पुत्रः तथा= हे भीष्म द्रोण त्याचप्रमाणें सूतपुत्र कर्ण; सह अस्मदीयैः योध–मुख्यैः अपि=आमच्याकडील प्रमुख योध्यांसह–वर्तमान. व वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति=तुमच्या मुखांत अतित्वरेनें शिरत आहेत. (विश्=शिरणें, जाणें. विश्‌अभिनि=शिरणें, वसवणें, अश्रयणें मन लावणें. विश्+आ=स्थितीला जाणें असणें, जवळ जाणें, शिरणें, (१) विश्=वैश्य (२) मनुष्य (३) लोक प्रजा (४) राजा (५) द्रव्यसंपत्ति

(६) मुलगी (७) प्रवेश. विश्+पति=जांवई. विशांपति=राजा, मुख्य व्यापारी. विश्=शिरणारा (समासांती) (२) कमळाच्या दांड्यांतील तंतु.

अन्वय—

अमी धृतराष्ट्रस्य पुत्राः । सहअवनिपालसंघैः च । तथा असौ भीष्म । द्रोण । सूतपुत्रः । अस्मदीय योध मुख्यैःसहवर्तमान त्वां ॥ (त्वां वक्त्राणि त्वरमाणा विशंति)

अर्थ—

धृतराष्ट्राचे हे सर्व पुत्र, साहाय्य करणाऱ्या राजांच्या समुदायासमवेत–त्याचप्रमाणें भीष्म, द्रोण व सूतपुत्र कर्ण, आपल्यामधील प्रमुख योध्यांसहवर्तमान, अतित्वरेनें तुमच्या मुखामध्यें शिरत आहेत. ॥ २६ ॥

(श्लोक २६ वा. ओ. ३९२ ते ४१४)

**रौद्र रस—**

**(अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः)**
**नोहेति हे कौरवकुळिचे वीर। अंध धृतराष्ट्राचे कुमर।**
**हे गेले गेले सपरिवार। तुझेया वदनीं ॥ ३९२ ॥**
**(सर्वै सहैवावनिपालसंघैः)**
**आणि जे जे याचेनि सावाये। आले देशोदेशीचे राये।**
**तयाचे सांगावया जावो न लाहे। ऐसे सरकटितु आहासी ॥ ३९३ ॥**
**मदमुखाचिया संघाटा। घेतु आहासी घटघटा।**
**अरणी हन थाटा। देतासी मिठी ॥ ३९४ ॥**
**यंत्रा वरचिल मार। पदातीचे मोगर।**
**मुखा आंतु भार। हारपताति ॥ ३९५ ॥**
**कृतांताचिया जवळी। जे येकेक विश्वाते गिळी।**
**तिये कोटिवरी सगळी। गिळितासि शस्त्रे ॥ ३९६ ॥**
**चातुरंग परिवारा। संजोदिया रहंवरा।**
**दातु न लविसी मा परमेश्वरा। कैसा तुष्टलासि बरवा ॥ ३९७ ॥**
**(भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ)**
**हां गा भीष्माऐसा कवण। सत्य शौर्य निपुण।**
**तोही आणि ब्राह्मण द्रोण। ग्रासिलासि कटकटा ॥ ३९८ ॥**
**अहा सहस्र-कराचा कुमरू। येथ गेला गेला कर्ण वीरू।**
**(सहास्मदीयैरपि योधमुख्यैः) आणि आमचिया आघवेयाचा कीरू।**
**फेडिला देखे ॥ ३९९ ॥**
**कटकटा धात्रया। कैसे–जाले अनुग्रहा यया।**
**म्यां (मिया) प्रर्थूनि जगा बापुडे या। आणिले मरण ॥ ४०० ॥**
**(अयं अभिप्रायः– हेतु)**
**मागा थोडिया बहुवा उपपत्ती। येणे सांगितलिया विभूति।**
**तैसा नसेचि मा पुढतो पुढती। बैसला (बैसलो) पुसो ॥ ४०१ ॥**
**म्हणउनि भोग्य ते त्रिशुद्धि न चुके। आणि बुद्धि ही होणारा सारिखी ठाके।**
**माझ्या कपाळी पिटावे लोके। ते लोटेल कायसा काह्या ॥ ४०२ ॥**

पूर्वी अमृतही हाता आले। परी देव नसतीचि उगले।
मग काळकूट उठले (उठविले)। सेवटी जैसे ॥ ४०३ ॥
परि ते येकबगि थोडे। केले या प्रतिकारामाजि वेडे।
आणि तिये अवसरीचे ते सांकडे। निस्तरीले (निस्तरविले) शंभू ॥ ४०४ ॥
आता हा जळता वारा के वेटाळे। कोण्हा हे विषे भरले गगन गिळे।
महाकाळेसी के खेळे। आंगवतसे ॥ ४०५ ॥
ऐसा अर्जुन दुःखे सिणतु। शोचितुसे (जीवा आंत) हृदया आंतु।
परि न देखे तो प्रस्तुतु। अभिप्राय देवाचा ॥ ४०६ ॥
जे मी मारिता कौरव मरते। ऐसेनि वेटाळिला मोहे बहुते।
ते फेडावयालागी श्रीअनंते। हे दाविलं निज ॥ ४०७ ॥
अरे कोण्ही कोणाते न मारी। येथ मीचि हो सर्व संहारी।
ते विश्वरूप व्याजे श्रीहरी। प्रगटित असे ॥ ४०८ ॥
परी वायाचि व्याकुळता। तै न चोजवेचि पांडुसुता।
मग अहा कंपु न होता। वाढवितुसे ॥ ४०९ ॥
(वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति)
तेथें म्हणे पहा हो येकेवेळे। सासि कवणेचेसि दोन्ही दळे।
वदनी गेली आभाळे। गगनी जैसी ॥ ४१० ॥
का महा कल्पाच्या सेवटी। जै कृतांत कोपला होय सृष्टी।
तै येकविसाही स्वर्गा मिठी। पाताळ सकट दे ॥ ४११ ॥
नातरी औदासिन्ये दैवे। संचकाची वैभवे।
जेथिचि तेथ स्वभावे। विलया जाती ॥ ४१२ ॥
तैसी सांचली सैन्ये येकवटे। इये मुखी जाली प्रविष्टे।
परि येकही तोंडौनि न सुटे। कैसे कर्म देखा ॥ ४१३ ॥
(आसोकाचे) अशोकाचे आंगवसे। चघळिले कन्हेने जैसे।
लोक वदनामाजीं तैसे। वृथाचि गेले ॥ ४१४ ॥

अंधा – आंधळया – आंधळ्या. स – सह. तुझ्या – तुझेया – तुझिया. (३९२) सावाये = सहाय्य करण्यासाठीं. जावो न – जावा न. सरकटितु = गिळीत. (३९३) मदमुखाचिया संघाव = मदमस्त हत्तींचे समुदाय, माहुतांच्या समुदायांत आधोरणी थाटा = माहुतांच्या टोळयांना. (३९४) यंत्रा–जंत्रा लढण्याची यांत्रिक साधनें. वरिचिल मार = तोफखान्यावरील, (मार = नाश करणारा (बौद्धमत) लोक. पदातीचे मोगर = पायदळाचे मुख्य निवडक समुदाय लोक झुंडी म्होरपे (म्होरके). मुखा आंतु–मुख आंत हारपताति–हारपताति मा. (३९५) जवळी–जावळी = भावंडच एक, बरोबरीचे. येकेके–एकचि. (३९६) चातुरंग–चतुरंग = हत्ती, घोडे, रथ, पायदळ. संजोदिया रहंवरा = घोडे जोडलेल्या संयुक्त रथांत. दातु न लविसि–दात न लाविसी (३९७) ग्रासिलासि कट–ग्रासिला सकट–ग्रासिलासि कटकटा (३९८) सहस्र करांच्या = सूर्याचा. आघवेयाचा–आघवयाचा. कीरु–केर फेडिला देखे = आम्हां सगळयांना तर पाचोळयासारखें उडविलें. (३९९) म्या–मिया. बापडेया–बापुडिया–बापडिया. (४००) थोडिया बहुवा उपपत्ति = थोड्या फार युक्तीनें. सांगितलिया–सांगितल्या. तैसा नसेचि = तेवढ्यावर तृप्त न रहातां पुढतो–पुढतीं (पुन्हः पुन्हः) बैसला–बैसलों. (४०१) म्हणवुनि–म्हणोनि. पिटावे लोके = खापर फोडावें. लोटेल कासया–लोटले का ह्या = कसें चुकेल. (४०२) उठिले–उठविले. (४०३) येकबगि–येक प्रकारें.

केलेया–केलिया. प्रतिकारा माजिवडे–पतिकारा मा जीवडें=निराकरण करण्याजोगें, त्याचा प्रतिकार होऊं शकला, ते विष शंकरांनीं प्राशन केलें व विश्व वांचविलें. सांकडें–ते सांकडे. निस्तरिलें–निस्तरविलें (=निवारिलें) (४०४) के वेटाळे=कोणाला आवरेल. कोण्हा–कोणा. विषे–विष. आंगवतसे आंगवत असें? =आंगबळ शक्ति (४०५) शोचितुसे. शोचित असे हृदयाआंतु–जीवा आंतु; (४०६) मारिता–मारिता हे ऐसे–ऐसेनि. वेटाळिला–होता=वेटाळला असा, गुरफटलेला का आवरिलेला असा. ते–तो. फेडावयालागीं–फेडावें या लागी. दाविलें दाखविलें (४०७) ते–हे. प्रगटिता–प्रकटित (४०८) न होतां–नव्हता. वाढवितुसे–वाढवीत असे. (४०९) तेथें–मग. पाहा–पहा. एके–येके. सासि–स असि. [असि=(१) तरवार (२) पशूंना मारण्याचा सुरा. (३) श्वास. असिकं=हनवटी व खालचा ओंठ यांमधला भाग. असिक्नी, असिक्निका=राज स्त्रियांची तरुण दासी. असिधेनु, असिधेनुका=चाकु, सुरी. असिपत्र =(१) ऊंस (२) तिधारी निवडुंग (३) खड्गमय (नरक वि.) (४) तरवारीची धार. (५) असिवनं=(नरक वि)—या वनातील झाडाचीं पानें तरवारीप्रमाणें असतात. असिपुत्री–असिपुत्रिका=चाकु, सुरी इत्यादि. असिमेद=शेण्याखैर. असिहस्त=उजवे बाजूस तरवार उगारून मारणें.] सासि–कवचेसि= असि व कवच या सकट. जैसी–कां जैसी. (४१०) सेवटी–शेवटीं. जैसा–जैं. (४११) औदासिन्ये–उदासिने (औदासिन्य, औदास्यं=उदासीनपणा, एकांत. विरक्ति. उदासिन्–उदास=उदासीन ओसाड, खिन्न, विरक्त. औदासीन्य; उदासीन=तटस्थ तिऱ्हाईत) संचकाची–संचक. संचत्=फसव्या. (४१२) सांचली–सासिन्नली=सज्ज झालेली. जाली–जाहाली. (४१३) आसोकाचे अशोकाचे आंगवसे=अशोक वृक्षाच्या कोंवळ्या फांद्या, आंगबळ, आंगची शक्ति [अशोक=१ हर्ष २ वृक्षविशेष–हा स्त्रियांच्या लाथेनें फुलतो अशी कविकल्पना ३ बकुल ४ कुटकी (व.) ५ चैत्र ६ पारा. अशोकअरि=कळंब (व.) अशोक अष्टमी=चैत्र शुद्ध ८. अशोक पूर्णिमा=फाल्गुन पौर्णिमा. अशोक वनिका=राजाची क्रीडाबाग] कऱ्हेने–कहेनि (कर्हि, कर्हिच्चित्=केव्हां, केव्हांतरी) वदना–वक्त्रा. वृथाचि–वांयां=सहजपणेंच (वृथाची=व्यर्थ, निष्कारण, चुकीनें, विधिविरुद्ध, मूर्खपणानें.) (४१४)

अहो! नव्हेत काय ते आंधळ्या धृतराष्ट्राचे कुमर ते! पहा पहा, सहपरिवार ते तुमच्या वदना-मध्येंच गेले, गेले असें होत आहेत पहा. (३९२)

तसेंच ह्या धृतराष्ट्रकुमारांच्या सहाय्यार्थ जे जे म्हणून देशोदेशींचे राय–राजे आले होते, त्यांचेहि पण सरसकट तुम्हांकडून गिळणें होत आहे असे हे येथीलचे ते सांगावयासही पण कोणी कोणी उरेल कीं नाहीं अशी शंकाच आहे—, उरणार नाही असें होत आहे! (३९३)

हत्तीचे (समुदायांचे समुदाय) कळपच्या कळप माहुतांच्या टोळ्यांसहितही पण जसे का त्या सिंहानेंच घटघटा घेण्याचें करावें का पिण्याचें करावे तसें अहो! येथें तुम्ही कीं त्या अघोरणी म्हणजे माहुतांच्या टोळ्यांना मिठी देऊन आहांत (मदमुख संघाट=मस्त हत्तीचे समुदाय. आधोरणी थाटा=माहुतांच्या टोळ्या.) (३९४)

जंत्राच्या का यंत्राच्या वरच्या मारानें तर पायदळाचे मोगर घोळकेच्या घोळके (म्होरकेच्या म्होरके) तुमच्या मुखामध्यें हारपत आहेत. (जंत्रावरिचिलमार=तोफखान्यावरील थाट लोक. पदांतीचे मोगर =पायदळाच्या झुंडी समुदाय.) (३९५)

अहो! जवळ जवळ कृतांतच कीं एक जसा कृतांतची बरोबरी करण्यानें एक एक विश्वच गिळण्याचें व्हावें तसें येथें कृतांताच्या उपमेनें का बरोबरीनेंच कीं कोटिच्या कोटि विश्वें, शस्त्रेंच जशीं हस्तासहितपण तुम्हीं गिळित आहांत–(हस्तासहित शस्त्रें का शस्त्रासहित हात अशीं विश्वेंच का शस्त्रेंच तीं तुम्हीं गिळित

आहांत, अहो, कृतांतच एक जसा कां, तसे तुम्हीं कोटिच्या कोटि विश्वें, सशस्त्र हस्तासहितही पण गिळून टाकीत आहांत.) (जावळी=भांवड) (३९६)

अहो, कसे ते तुमचे कृतांतासारखे दुष्टलेपण कीं जेथें चतुरंग परिवारासहित हत्ती, घोडे, रथ, पायदळ, तसेंच घोडे जोडलेल्या रथासकटही हीं सैन्येंच तुम्हीं गिळितच आहांत. (३९७)

अहो काय कटकटच कीं एक ! अहाहा ! कटकटा वोखटे, कसें उरफाटें चालिलें आहे पहा ! तेथें मोठाच त्रास का संकटच एक कीं सत्य वचनी, शौर्यानें अद्वितीय, ज्याच्या निष्णाततेपुढें का निपुणतेपुढें कोणीही टिकणारें नव्हे असें तें अद्वितीय सत्य व शौर्य निपुण भीष्म तेही पण तुम्हीं ग्रासिलेच पहा ! त्याच-प्रमाणें हा ब्राह्मण द्रोणाचार्यही पण ! अहो, अशी ही कटकटच एक, संकटच कीं ओढवलें जात आहे, असें मला दिसत आहे–असें मी पहात आहें. (३९८)

सहस्रकर जो सूर्य त्याचा पुत्र कर्णवीर तोहीपण आतां तुमच्या मुखांमध्यें गेला, गेलाच पहा ! कीं अहो ! आणि आमच्यामधील आम्हींच जे सर्व तेही तर जसे का पाचोळयास वायूनें उडवावें तसे होऊन जात आहोंत–आम्हां सर्वांचा केरच जसा का काढून टाकावा तसें झालें आहे, पहा पहा ! (३९९)

अहो ! येथें तुम्हांस मी जी कांहीं अनुग्रहाकरितां प्रार्थना केली तिनें तर ब्रह्मदेवासही पण जसें त्राहि करून सोडलें आहे असे झालें. आतां काय अहो मी प्रार्थना करावी केली व काय येथें तर त्या प्रार्थनेमुळें जसें सर्व बापुडिया जगासच की मरणच एक आणिले का धाडिलें असें होऊन गेलें आहे. (४००)

अहो ! पूर्वी ज्या कांहीं अनेक विभूतींच्या उपपत्ती त्या तुम्हीं उजवून जशा का आपल्या रंगारूपास आणिल्या, महत्वाच्या केल्या. त्यांना त्यांचेच जें कांहीं सर्व मोठेपण तें दिलें गेलें तसें येथें नाहीं. येथें तर तुम्हीं सर्व कांहीं पुसून टाकीत आहांत–सर्व कांहीं आपल्यांत मिळवून घेऊन, एकरूपतेस आणीत आहांत, विभुतीना जे विभुतिमंततेचें महत्व पोहोंचविलेलें तेवढ्यानें तुम्हीं तृप्त न होतां, आतां तर त्या सर्व जशा कांहीं तुमच्या आपल्या केलेल्या अशा स्वतःत मिळवून घेऊन आहांत–त्या तुमच्या दर्शनानें एकरूपतेस आणिल्या जात आहेत–जसें कां त्या सर्व तुम्हांपासूनच उगवलेल्या आहेत अशा अनुभवास आणीत आहांत. (४०१)

असे असें होत असण्यावरच कीं का अशा ह्या प्रसंगानेंच 'भोग्य ते केव्हांहि चुकत नाहीं' असेंच दर्शवीत आहांत; आणि 'बुद्धि ही होणारा सारखीच होते–'; होणारा प्रमाणेंच बुद्धिही सारे महत्व घेऊन असल्यानें जें कांहीं होणार तेंच होतें; लोकांनीं माझ्याच नांवानें ओरडावें तें कसें बरें चुकेल ? पहा बरें कीं लोकांनीं मजवरच दोषाचें खापर फोडावे ! माझ्याच कपाळीं पिटावें की ! (४०२)

अहो, पूर्वीं तर अमृतही हातीं आलें असतां तेथें देव तर स्वस्थच ! ते मुळीं हालचालच करीनात तेव्हां काय कालकूटच जसें उठलें तेव्हां पहावें तो काय सर्व त्रेधाच एक होऊन गेली. (४०३)

पण येथें ह्या वेळेस तें अमृत तर एकप्रकारें थोडेंच जसें अपुरतें तसें झाल्यानें आतां काय करावें ? अशा अस्वस्थतेनें तर देवच का जीवच वेडे होऊन गेले व ह्या जीविताला सांभाळण्याकरितां तर जेवढा म्हणून प्रतिकार तेवढा त्यांनीं आदरास घेतला; तरी वेडच जसें तें, एक नुसता सर्व प्रतिकारच, असें झाल्यानें आतां ह्या वेळेस, कोणी कांहींच उपयोगी झाला नाहीं; पण ते सांकडे जसें का श्रीशंभूवरच पडावें तेथें श्रीशंकरच पुढें झाले व त्यांनीं ती वेळ सांभाळली, आम्हांस वांचविलें. तें जीवावरचें सांकडें भगवान श्रीशंकरांनीं अहो ! निस्तरविलें व आमचें रक्षण केलें–त्यांनीं तें सर्व विष भक्षण केलें त्यामुळें या विषाचा प्रतिकार होऊं शकला, त्यांनीं तें सर्व विष प्राशन केलें व हें सर्व विश्व वांचविलें. (४०४)

अहो! आतां ह्या अशा दुःख प्रसंगीं सुटलेला हा जळता वारा कोणाला बरें आवरेल? कुणास बरें हे विषानें भरलेलें सर्व गगन गिळवेल? ते अंगावर आलेला महाकाळ त्यास अंगावर घेऊन त्यांशीं कोण बरें खेळेळ? आतां काय करावें? हा प्रसंग तर दुर्घट असा; येथें तर सर्व अंग ह्या वेळच्या काळाचे तो शक्तीच झालेला होत आहे असा हा महाकाळ त्याशीं कोण बरें दोन हात करील? (४०५)

असा तो अर्जुन दु:खानें शिणून गेलेला तो अंतःकरणामध्यें अति शोकच करून राहिला आहे: त्याचा जीव सर्व शोकाचा असा झालेला होऊन दिसत आहे. पण येथें प्रियपणाचा तो अर्जुन (प्रीतीच एक जशी ती) त्याच्या दृष्टीसमोर तो श्रीदेवांचा अभिप्राय (प्रिय विचार) जो तो तर त्याजपुढे मुळींच झाला नाहीं. (४०६)

त्या अर्जुनास जो कांहीं एक विचार कीं अहो! येथें मीच काय तो एकटा ह्या कौरवांना मारणारा व ते कौरव मरणारे असें तें सर्व मरतें असे आहेत–असा कसा मोहच पडला होता–तो अर्जुन मोहानेंच आवरिलेला असा;–त्याच्या भोंवती जसें मोहाचें वेटाळेंच पडावें तसें मोहभ्रमानें गुरफटलेला.

त्याचें तें तसलें सांकडें फेडण्याकरितांच कीं, (ती शंका काढण्याकरितांच) श्री अनंतांनीं आपलें विश्वरूप महत्व निज नारायणस्वरूप त्यास दाखविलें. (४०७)

अर्जुनास पडलेला जो मोह 'मी मारता व हे कौरव मरते होत'–तेथें विश्वरूप दर्शनाचें निमित्त पुढें करून–विश्वरूप पुढें करून श्रीहरीनीं अर्जुनास असें दर्शविलें कीं येथें कोणी कोणास मारीत नाहीं; येथें मीच हे सर्व संहारतों असें स्पष्ट केलें–असें दाखवून दिलें. (४०८)

पण सर्व व्याकुळपणच त्यास आल्यानें त्यास तें समजलें नाहीं; व्यामोह भ्रांति–व्याकुळपणामुळें त्या तत्वास त्यानें पाहिलें नाहीं–कां त्या तत्वास महत्व दिलें नाहीं. वर तो आपली व्याकुळताचमुळीं वाढवीत आहे, असें विश्वरूपांनीं–(देवांनीं–त्यानीं) पाहिलें. (४०९)

तो म्हणूं लागला कीं अहो!! काय पहावे कीं असि व कवचें यांसकट दोन्हींकडचीं सैन्यें एकदमच्या एकदम श्रीविश्वरूपाच्या वदनामध्येंच पडलीं; जशीं का आभाळावर आलेलीं आभाळें तीं सर्व गगनामध्येंच एकदम लय पावलीं. (४१०)

अहो, महाकल्पाच्या अंतीं जसा ह्या सर्व सृष्टीवर कृतांतच कोपावा, तेव्हां पाताळासहित एकविस स्वर्गही तो व्यापून आवरून असतो त्याप्रमाणें. (४११)

अहो! येथें दुसरें तिसरें कांहींच एकादें म्हणणें पुरत नाहीं: तेथें जसें कांहीं दैवच उदास झालें व संचयानें असलेली ती (सांचलेली का सज्ज असलेली अशी) वैभवेंचमुळीं स्वभावेंकरून नाश पाहाणारीं का विलय पावणारीं व्हावींत तसें झालें. (४१२)

अहो, काय काळ विचित्र आहे पहा! येथें तर सज्ज असलेलीं तीं सर्व सैन्यें एकत्रिततेनें जशीं ह्या तुमच्या मुखांतच मुळीं शिरलीं, प्रविष्ट होऊन गेलीं, तेथें एकहीपण त्या तोंडांतून सुटतच मुळीं नाहीं! कसें कर्म आहे पहा! (४१३)

अहो! अशोक वृक्षाच्या कोंवळ्या फांद्या जशा उंटानें चघळून टाकाव्यात, तसें येथें लोक हे त्या विश्वरूपाच्या मुखामध्यें अगदीं सहजपणेंच गेले–आंगबळ, आंगची शक्ति सर्व प्राणच जसें शोषले गेले विश्वरूपानें, तसे लोक हे त्या वदनींच सहज गेले (अशोक; तारण; तार: शूर; शौरि; जनेश्वर). (४१४)

**श्लोक २७ वा**

**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥ २७ ॥**

ते वक्त्राणि=तुमच्या मुखामध्यें; दंष्ट्राकरालानि भयानकानि=भयंकर दाढा असलेल्या. त्वरमाणा विशंति=अति त्वरेनें शिरत आहेत. केचित्=कांहीं. विलग्ना=विलग्नतेमुळें [(ज्यो.) उदय पावलेला, राशि, कंबर,] चिकटल्यामुळें, कृशतेमुळें. दशनांतरेषु=दाढांच्या किंवा दातादातांच्या फटीमध्यें अडकून गेल्यामुळें. चूर्णितैः उत्तम आंगैः=उत्तम आंगे चूर्णित (चूर्ण=चुरा करणें, चिरडणें, (१) चुरा, पीठ, पूड, कापुर का चंदनाचा चुरा (२) खडू, चुना) झाल्यामुळें. संदृश्यन्ते=मला दृष्टीस (दृश्य=दिसणारे, सुंदर) पडत आहेत. उत्तम आंग=सर्व गात्रांमध्यें शिर जें तें प्रधान गात्र होय. अंगाअंगामध्यें जी उत्तम आंगें त्या सर्वांहीमध्यें ही वाचा सरस्वती किंवा अर्धांगी हे उत्तम अंग होय. म्हणून येथें अनुसंधानाकरितां जसें विवाह करून तें प्रेमभावाचें भावबळाचें तें करणें–ती कुल पावन करणारी शक्तीच जशी वाणीची उत्तम अशी का मुख रक्षणानें पातिव्रत्यच एक स्थिर असें केलें जातें तें दर्शविणारी अशी जी ती उत्तम अंगच होय.

अन्वयः—अवनिपाल संघैः ते। भयानकानि, दंष्ट्राकरालानि। मुखानि। त्वरमाणा विशंति। दशन अंतरेषु केचित् विलग्नाः। उत्तम–अंगैः चूर्णितैः। संदृश्यंते ॥ २७ ॥

अर्थः—

मुख्य मुख्य असे ते योध्दे भयानक (दाढा असलेलीं तीं तुमचीं भयानक अशीं) मुखें दाढाच त्या तेथेंच मुळीं ते योद्धे आपण होऊनच मुळीं जात आहेत–ते योद्धे तुमच्या भयानक वक्त्रांनीं परिणाम केलेले असे दिसत आहेत म्हणजेच ते योद्धे तुमच्या मुखामध्यें अतित्वरेनें शिरत आहेत. कांहीं तर दाढा दाढांच्या अंतरामध्यें विलग्न झालेली–चूर्णित झालेली–ती जशीं का उत्तम आंगेंच चूर्णित झालेल्या सारखी होऊन आहेत (तेथें उत्तमांगें ही गद्यतेस (वाक्यःभाषण) पावल्यामुळें रक्षण केली गेली.) ॥ २७ ॥

(श्लोक २७ वा, ओवी ४१५ ते ४२२)

(दंष्ट्राकरालानि) परी सिसाळे मुगुटेसी। पडिली दातांच्या सांडसी।
पीठ होत कैसी। दिसत आहातीं ॥ ४१५ ॥
(केचिद्विलग्ना दशनांतरेषु)
तिये रत्नें दातांचें सवडी। कूट लागले जिव्हे बुडी।
काहि काहि आगरडी। दातांची माखली ॥ ४१६ ॥
हो का जे विश्वरूप काळे। ग्रासिली लोकांची शरिरे बळे।
परि जीवित्व देहीची सिसाळे (साले)। अवश्य कीं राखिली ॥ ४१७ ॥
(संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः)
तैसी शरीरामाजी चोखडी। इये उत्तमांगे होती फुडी।
म्हणौनि महाकाळाच्या तोंडी। परि उरली शेखी ॥ ४१८ ॥
(भयानकानि) मग म्हणे हे काई। जन्मलया आन मोहरचि नाहीं।
जग आपैसेचि वदन डोही। (संचरत आहे) संचारताहे मा ॥ ४१९ ॥
या अवघिया सृष्टी। लागलिया आहाती वदनाच्या वाटी।
आणि हा जेथिच्या तेथ मिठी। देतसे उगला ॥ ४२० ॥
ब्रह्मादिक समस्त। उंचा मुखामाजी धांवत।
येर सामान्ये (सामान्य) हे भरत। ऐलीच्या वदनी ॥ ४२१ ॥
(स्पष्ट भावार्थ गद्य)
आणिकही भूतजात। ते उपजलियेचि (उपजलेचि) ठायी ग्रासित।
परि याचिया मुखा (माजि) निभ्रांत। सुटेचि कांहीं ॥ ४२२ ॥

सिसाळे=शीर्षं, मस्तकें, अग्रें, टोक. दांताच्या–दाढांचे. सांडसी=चिमट्यांत. (४१५) रत्नें–रत्नि दाढांमधील फटी जशा–मुंढा–हात लांबीची कोपरेंच.•दातांचे–दांतांतिचे. कूट–पीठ. जिव्हे–जिभेच्या. आगरडी=अग्रें टोकें. दातांची=दंष्ट्राची, दाढांची. (४१६) विश्वरूपें–विश्वरू. शरीरे बळे–शरिर बळें. जीवित्व–जीव (पा. भेद) जीवित्व देहीची–जीवित–जीव देहीची=जीवात्म्याचीं. सिसाळे–सालें=टोंक, आंगें, शब्द करणारी आभरणें. शाल–शाले=शब्द करणारीं कुंपणें किंवा तट (४१७) चोखडी=चांगली. उत्तमांगें–उत्तम आंगें=अनुसंधानाकरिता अनुकारें तीं शक्तीचीं, वाणीचीं उत्तमांगें प्रेमभावाची! भावबळाची ती महाकाळाच्या–महाकाळाच्याहि. उरली–परि उरली. (४१८) जन्मलेया–जन्मलया आन मोहरचि नाही=काय जन्मलेल्या प्राण्यास (प्रेमभाव तरच उत्तम आंगच व्हावें असें आहे नाहीं तर) मृत्युमुखीं पडल्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं. जग–मग (झगमग–तोंडामधील ती तेथेंच जग संचरते कीं) संचरत आहे–संचारताहे मा–संचरत आहे मा. (४१९) या अवधिया–यया आपेआप अवघिया. वदनाच्या–वदनाचिया. वाटी–पाठीं=शेवटीं. उगला=तटस्थ राहून, उदासीन असून. (४२०) सामान्ये–सामान्य (=सर्व साधारण, मध्यम (स्त्री) वेश्या; सार्वत्रिक नियम, साधारण धर्म, जाति, वर्ग, तुल्यता (साहित्य) अलंकारविशेष) [सामान्याधिकरण्य=(न्या.) एकदेशीयत्व, एककाळीकत्व, एकार्थता. विशेष=महाभूत, स्थूल कार्य दृश्य वस्तु, उत्तम, पृथ्वी, श्रेष्ठता, प्रेक्षणीय, गोष्टी, पदार्थ, गुणाधिक्य, विशेष गुण, असामान्य, विपुल, विभाग, व्यक्ति, टिळा.] ऐलीच्या–ऐलीच. (४२१) उपजलियेचि–उपजलेचि. मुखामाजी–मुखा. (४२२)

पण सिसाळे साले का चमत्कृति–मस्तकें किंवा शीर्षें मुकुटासहित दातांच्या का दाढांच्या सांडसामध्यें पडल्यानें जशीं का पीठच होऊन आहेत अशीं दिसत आहेत. (४१५)

ती पीठें, कूटें, मुंढा हात लांबीचीं कोपरें, रत्नेंच ज्योतीच जशा दिसत आहेत. दातांच्या सापटीमध्यें व जिव्हेच्या बुडाशीं असलेल्या सवडी–फटीमुळें (फट–पिट्टकं=दातांवरची बुरशी) असें दिसत आहे–कीं, दातांची कोपरें टोंकें, अग्रेंच जशीं रत्नांनीं माखलीं आहेतः तीं शीर्षें मुकुटासहित जशीं पीठच होऊन दातांच्या अग्रभागीं रत्नाप्रमाणें दिसत आहेत. (रत्नि रत्नें दातांच्या सवडी–फटी कोपरेच का मुंढा हात लांबीची त्या दांतामधील फटी तेथें लागलेले ते पीठ कूटच.) (४१६)

अहो! विश्वरूपरूपी काळानें तर लोकांचीं शरीरें बळासहित ग्रासून टाकिलीं; परंतु तेथें ह्या जीवात्म्याची जीं सालें–शब्द करणारा तट सिसाळें तीं मात्र अवश्य राखिलीं. (४१७)

त्याचप्रमाणें ह्या शरीरामध्यें उत्तमतेचीं जीं आंगें होतीं उत्तमांग, अनुसंधानाकरितां लागणारीं अनुकारें तीं शक्तीची वाणीची उत्तम भाव प्रभाव सौंदर्याची प्रेमभावाची का भाव बळाची ती खरेपणानें असलेलीं तीं मात्र त्याचा उत्तमत्वामुळेंच कीं जरी महाकाळाच्या तोंडी पडलेलीं तरीही पण उरविलीं गेलीं वांचलीं–जगलीं–उरलीं–उरून राहिलीं. (४१८)

तेथें काय हो! असें म्हणणेंच का विनवणेंच जसें तें कीं अहो ह्या जन्मलेल्या प्राण्यास कांहीं एकादें मोहरणें प्रेमाचें का भावाचें पुढें नसावें हें काय नच जर तर मग मृत्युमुखीं पडण्याशिवाय दुसरा कांहीं मार्गच काय नाहीं असें असणें तें! दुसरा मार्गच मुळीं कां मोहरच तेथें नसल्यानें ह्या जगानें तर मग आपोआप कीं ह्या वदन डोहामध्येंच संचरणें एक होत आहेः अहो, जग तेथें त्या वदन डोहामध्येंच आपोआपच संचरूं लागत आहे मग कीं! (४१९)

अहो! येथें तर सर्व कांहीं आपोआपच होत आहे असें येथें ह्या सर्वच्या सर्व सृष्टी, वदनाच्या पाठीमागेंच, अथवा वाटेसच लागल्या आहेत आणि हा काळरूपी विश्वरूप देवहीपण तेथेंच तटस्थपणें उदासीन राहून मिठी देऊन आहे. (४२०)

ब्रह्मदेव आदिकरून जे देव ते सर्व त्या विश्वरूपाच्या ऊर्ध्वमुखामध्येंच पडत आहेत-एरव्हीं दुसरे जे सामान्य म्हणजे सर्व साधारण मध्यम ते तर सामान्यतेकरून जाति वर्गामुळें अलीकडेच म्हणजे त्या संसार श्रमाच्याचमुळीं मुखांत भरून आहेत. (४२१)

दुसरें जें भूतजात तें तर उपजल्या उपजल्यांच मुळीं उपजल्या ठायींच ग्रासिलें जात आहे. अहो, असें हें सर्व भूत-जात त्या विश्वरूपाच्या मुखांत निभ्रांतपणेंच पडत आहे. त्याच्या मुखांतून का मुखापासून कांहींच सुटत नाहीं. (४२२)

**श्लोक २८ वा**

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥**

नदीनां अंबु वेगाः बहुवः=वेगवान असे नद्यांचे मोठमोठे प्रवाह, नद्यांचे असंख्य जलप्रवाह. समुद्रम् अभिमुखाः द्रवंति=धांव घेऊन, समुद्राभिमुख होऊन वाहात असणारे ते समुद्रासच मिळतात. तथा तव अभि (चहुंबाजूंनीं) विज्वलंति (प्रकाशित असलेल्या) वक्त्राणि नरलोक वीरा विशंति=त्याप्रमाणें हे नरलोकींचे वीरसमुदाय-त्या मृत्युलोकामधील पराक्रमी योध्दे, तुमच्या त्या चहूंकडून पेटलेल्या, सर्वतः प्रज्वलंति अशा विशाळ मुखांत शिरत आहेत-प्रवेश करीत आहेत.

अन्वयः—

यथा । नदीनां बहवा अम्बु वेगाः । समुद्रं एव । अभिमुखाः (होत्साता) द्रवंति । तथा । अमी नरलोक वीरा । तव । अभिविज्वलंति वक्त्राणि । विशंति ॥ २८ ॥

अर्थः—

ज्याप्रमाणें नद्यांचे असंख्य वेगवान जल-प्रवाह समुद्राभिमुख होऊन समुद्राकडेसच धांव घेऊन वाहात असतात त्याप्रमाणें हे मृत्युलोकामधील पराक्रमी योद्धे तुमच्या चहूंकडून पेटलेल्या (प्रज्वलित) अशा विक्राळ मुखामध्येंच (धांव घेऊन) प्रवेश करीत आहेत ॥ २८ ॥

(श्लोक २८ वा, ओ. ४२३–४२४)

**(यथा नदीनामिति) जैसे महानदीचे वोघ । वहिले ठाकती सिंधूचे आंग ।**
**(तथा तवामी नरलोक वीरा विशंति) तैसे आघवाची कडुनि जग । प्रवेशत मुखीं ॥ ४२३ ॥**
**आयुष्यपंथे प्राणि गणी । करूनी अहो रात्रांची गणणी ।**
**(वक्त्राण्यभिविज्वलंति) वेगे वक्त्र मिळणी । साधिजत आहाती ॥ ४२४ ॥**

महानदी=समुद्रास मिळणारी नदी. वोघ, ओघ=प्रवाह. वहिले=सहज, सत्वर. (४२३)
गणणी–सोवाणी–गणणी=पायऱ्या, सोवणे, सोपान. साधिजत=मिळविणें सिद्धीस नेणें. (४२४)

ज्याप्रमाणें महानदीचे म्हणजे मोठाल्या नदीचे अनेक वेगवान ओघ सहजपणेंच का सत्वरतेनें धावून वाहात जाऊन सिंधूचे आंगास मिळतात, त्याप्रमाणें चौहोंकडून हें जग धांव घेऊन तुमच्या विश्वरूपाच्या जबड्यांत, मुखांत शिरत आहे. (४२३)

प्राणिगणांनीं आयुष्य (प्राणिगणांमध्यें वसणारा अग्नि मुखांतील अग्नि) पंथानें चालता चालता जशी का अहोरात्राची गणणी (गणती) केली व आतां त्या सोपानांनीं पायऱ्यांनीं जाऊन तुमच्या मुखाची मिळणी ते (मिळवित आहेस) करीत आहेत, तुमच्या मुखांशीं मिळणें हें एकच ते साधीत आहेत असें होऊन आहे. (४२४)

**श्लोक २९ वा**

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥**

प्रदीप्त ज्वलनं = झगमगीत, चकचकीत प्रकाशानें दिपून जाऊन पेटलेल्या अग्नीमध्यें म्हणजे दिव्यावर; समृद्धवेगाः पतंगाः नाशाय विशंति = मोठ्या वेगानें युक्त झालेले, केवळ स्वतःचा नाश करून घेण्यासाठीं झडप घालतात. लोका अपि समृद्ध वेगाः = हे सर्व लोक देखील वेगास येऊन मोठ्या त्वरेनें. नाशाय वक्त्राणि विशंति = स्वतःचा नाश करण्यासाठींच तुमच्या भयंकर जबड्यामध्यें प्रवेश करीत आहेत.

अन्वय :—यथा । समृद्धवेगाः पतंगाः । प्रदीप्तं ज्वलनं । नाशाय विशंति । तथा एव । लोकाः अपि । समृद्धवेगाः । तव वक्त्राणि । नाशाय । विशंति ॥ २९ ॥

अर्थ :—ज्याप्रमाणें प्रकाशानें दिपून जाऊन मोठ्या वेगास येऊन पतंग (पक्षी) केवळ स्वतःचा नाश करून घेण्यासाठीं दिव्यावर झडप घालतात, अगदीं त्याप्रमाणें हे सर्व लोकदेखील मोठ्या (त्वरेस येऊन) वेगाचे होऊन, (सर्व भरमसाट वेगानें वृद्धिंगत वेगाचे होऊन) स्वतःचा नाश करण्यासाठींच तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहेत, शिरत आहेत. ॥ २९ ॥ (श्लोक २९ वा, ओव्या ४२५–४२६)

**(यथेति) जळतया गिरीच्या आंगवखा (गवाखा) । माजी घापति पतंगाचिया झोका ।**
**(तथैवेति) तैसे समग्रलोक देखा । इये वदनी पडती ॥ ४२५ ॥**
**(समृद्ध वेगाः)**
**परि जेतुले येथें प्रवेशले । तेतुलेनें तांतलिया लोहेचि पाणि गिळिले ।**
**वहिवटीही पुसिले । नांवरूप तयांचें ॥ ४२६ ॥**

आंगवखा–गवांखां = अगावर, गुहेंत, गवाक्षामध्यें, दरीत. झोंका–झुंडी, उड्या. (झांका–पाठभेद) = झुकांडी. (४२५) येथें–येथ. तेतुले–ते तांतुले–ने तांतलेनेः लोहे–लोहेचि. पाणि–पां. वहिवटीही– = वहिवाटीही वहिवाटीमधूनही. नांवरूप–नामरूप. (४२६)

ज्याप्रमाणें जळत्या गिरीच्या अंगकक्षेमध्यें गवाक्षामध्यें का गुहेंत–दरीमध्यें [विष्णु–अवाक्पुष्पी (व.) गोजिव्हा (व.) अधोखा–अधोवदन, अधोमुख] चहूंकडून वणव्यानें पेटलेल्या पर्वताच्या दरीमध्यें पेटलेल्या अग्नीच्या प्रकाशानें दिपून जाऊन पतंगांच्या (म्हणजे पक्ष्यांच्या) झुंडीच्या झुंडी आंत उड्या टाकणाऱ्या होतात, आंतच झुकांडी देऊन असतात जशा का त्यांना झोकाच दिला जावाः पक्ष्याचा झंकार जसा, झांकच तो जसा तशा होतात, त्याप्रमाणें हे सर्व लोक पहा ते तुमच्या वदनामध्येंच पडत आहेत. (४२५)

पण जे येथें विश्वरूपांत (चित्तामध्यें) प्रवेशले ते जसे का तापलेल्या तव्यावरच्या पाण्यासारखें लोखंडानें लोहाचे ते पाणी गिळावें, तसे ते गिळिले जात आहेत. त्यांचे ते वहिवाटीस घेतलेले नांवरूपहीपण पुसिलें जात आहे जें नांव का रूप वहिवाटीस असलेलें तेंहीपण आतां तेथून वहिवाटीमधून तें पुसिलें जात आहे कीं. (४२६)

**श्लोक ३० वा**

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥**

विष्णो = हे विश्वव्यापका. ज्वलद्भिर्वदनैः = प्रदीप्त झालेल्या आपल्या मुखांनीं. समग्रान् लोकान् = सर्व लोकांना. ग्रसमानः = गिळण्यास आतुर (असे तुम्हीं होतसाता गिळितां. प्रियमाणाः त्वरमाणाः

प्रसमाणः) समन्तात लेलिह्यसे=चोहोंबाजूंनीं जिभा चाटून आहांत, जणुं त्यांचा आस्वाद घेत आहांत, जिभाळ्या चाटणें जे कां जीवच मुळीं तेथें ललचावलेला तो ह्या जिव्हेच्या लळलळण्यानेंच कीं असणारा. तव उग्र भासः=तुमची ती प्रखर उग्र दीप्त स्वरूपें (भा=प्रकाश, तेज. भास:=कांति, तेज) तेजोभि: आपूर्य जगत् समग्रम्=आपल्या असह्य तेजांनीं सर्व जगताला व्यापून. प्रतपन्ति=उग्र भासतां, ताप देत आहांत, तापवीत आहांत.

अन्वय :—

विष्णो । समग्रं जगत् । तेजोभिः आपूर्य । ज्वलद्भिःवदनैः । समग्रान् लोकान् ग्रसमानः । समंतात् लेलिह्यसे । तव उग्राः भासः प्रतपन्ति ॥ ३० ॥

अर्थ :—

(१) हे विश्वव्यापक विष्णो! प्रदीप्त असलेल्या आपल्या मुखांनीं सर्व लोकांस गिळण्यास आतुर असें तुम्हीं चोहोंबाजूंनीं जिभा चाटून आहांत: तुमची ही दीप्त–प्रखर उग्र स्वरूपें आपल्या असह्य तेजांनीं सर्व जगताला व्यापून संताप ताप देत आहेत–तापवीत आहेत.

(२) समग्र जगाला आपल्या तेजांनीं तेजोमय करून (शुक्लपक्ष देवतेनें पूर्ण करून) तुम्हीं आपल्या प्रदीप्त अशा ज्वलत्वत् वदनांनीं ह्या समग्र लोकांना गिळण्यास आतुर असे चोहोंबाजूंनीं जिभा चाटीत आहांत; तुमचें तेज उग्र आहे, असह्य आहे तें ताप देत आहे. ॥ ३० ॥

(श्लोक ३० वा, ओव्या ४२७ ते ४४३)

"बीभत्स रस"—

**(ग्रसमानः) आणि येतुलाही आरोगण। करितां क्षुधे नाहीं उणेपण।**
**कैसे दीपन असाधारण। उदैले ययां ॥ ४२७ ॥**
**(लेलिह्यसे)**
**जैसा रोगिया ज्वराहुनि उठिला। कीं भणगा दुष्काळ पाहाला।**
**तैसा जिभांचा लळलळाटु देखिला। आवाळुवें चाटितां ॥ ४२८ ॥**
**(समंतात्) जैसें आहाराचें नांवें कांहीं। मुखापासोनि गेलेंचि नाहीं।**
**कैसी मसमसित नवाई। भुकेलेपणाची ॥ ४२९ ॥**
**काई सागराचा घोंटु भरावा। कीं पर्वताचा घासु करावा।**
**ब्रह्म कटाह घालावा। आघवाचि दाढे ॥ ४३० ॥**
**दिशा सगळ्याचि गिळावया (गिळावया)। चांदणिया चाटुनि घ्यावया।**
**ऐसे वदनी वर्तत आहे साविया। लोलुप्य वा तुज ॥ ४३१ ॥**
**(वदनैर्ज्वलद्भिः)**
**जैसी भोगीं कामु वाढे। कां इंधनें हकाक चढे।**
**तैसी खात खातचि तोंडें। हसासित ठेलीं ॥ ४३२ ॥**
**कैसें येकचि केवढें पसरलें। त्रिभुवन जिव्हाग्रीं असें टेकलें।**
**जैसें का कवीठ घातलें। वडवानळीं ॥ ४३३ ॥**
**ऐसी अपार वदनें। आतां इतुलीं कैचीं त्रिभुवनें।**
**का आहार न मिळतां येणें मानें। वाढविलीं सैंघ ॥ ४३४ ॥**
**अगा लोक हा बापुडा। जाला वदन ज्वाला वरपडा।**
**जैसी वणवेयाचिया वेढां। सांपडलीं मृगें ४३५ ॥**

(तेजोभिरापूर्य जगत्समग्रम्)
आहा तैसे या विश्वासी जाले। देव नव्हे हे कर्म आले।
कां जगज चरा पांगिले। जाळं काळे ॥ ४३६ ॥
(भासस्तवोग्राः प्रतपन्ति)
आतां इये आंग प्रभेचिये वागुरे। कोणिकडे रिघिजेल चरांचरे।
वदनेही नव्हती जोहरे। वोढवली आम्हां (जगा) ॥ ४३७ ॥
आगी आपुलेनि दाहकपणें। कैसेनि पोळिजे ते नेणे।
परि जया लागे तया प्राणे। सुटिका नाहीं ॥ ४३८ ॥
(नातरि) माझेनि तिखटपणें। कैसे निवटे हे शस्त्र काई जाणे।
का आपुलिया मरणा (मारा) नेणे। विष जैसे ॥ ४३९ ॥
तैसी तुज कांहीं। आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं।
अलिकडिले मुखीं खाई। हो सरली जगाची ॥ ४४० ॥
(विष्णो) अगा आत्मा तूं येक। सकळ विश्व व्यापका।
तरी का आम्हां अंतक। तैसा वोडवलासी ॥ ४४१ ॥
तरी म्यां सांडिली जीवित्वाची चाड। आणि तुवांही न धरावी भीड।
मनि (मनीं) आहे ते उघड। बोल पां सुखें। ४४२ ॥
किती वाढविसी उग्ररूपा। आंगीचे भगवंतपण आठवी बापा।
नाही तरी कृपा। मजपुरती पाही ॥ ४४३ ॥

येतुलाहि–येतुलियाहि आरोगण = माजणं चढविणे जे, मावणं, भक्षण, रोगण. क्षुधे–भुके. उदैले–उदयले (४२७) कीं–कां. पाहाला–पाहला. आवाळुवे = ओठांचीं अग्रें. लळलळाटु = खेळणारा तो खेळण्या खेळण्यानेंच आटला–रानींवनींचा झाला; पण तेथें जसें वासराचें उड्या मारणेंच एक. लल = खेळणारा, हालणारें, इच्छिणारा. लल+आटु = खेळण्यानेंच उड्या मारणें जें. ललाट = कपाळ. ललाटिका = कपाळावरील गंध, भूषण. दुष्काळ = दुकाळ. (४२८) जैसे–तैसे. आहाराचेनि = आहाराचे. मुखा–तोंडा. मुखापासोनि गेलेचि–तोंडापासूनि उरलेचि. मसमसित–समसमित = कडक, तीव्र. (४२९) सगळयाचि–सगळियाचि. चांदणिया–चांदिणिया. ऐसे–ऐसे वदनीं. लोलुप्य = असह्य, लौल्य, हांव, लोलुपता. तुज–तुझें. (४३१) इंधनी आगीसी–इंधने अग्नीसी. हकाक = भडका (भडाका). खात खातचि–खात खात. हसासित–खाखातें = खा खा करीत उठली. [हासिका = हास्य, मौज, आनंद. हांस = हांसणे, आनंद, उपहास, उमलणें, गर्व. हसित = विकसित, हंसणे, थट्टा, उपहास, मदन धनुष्य] (४३२) असे–आहे. (४३३) ऐसी–तेवीचि. इतुली–येतुली. (४३४) लोक हा–हा लोक. बापडा–बापुडा. जाला–जाहला. वरपडा = स्वाधीन. सांपडली–सांपडती. (४३५) आहा–आतां. विश्वासी–विश्वा. जाले–जाहाले. जाळं–जाळे (काळे) = काळरूप जाळेंच लाविलें आहे. (४३६) कोणीकडे रिघिजेल–कोणीकडूनि निघिजेल = कोणीकडून बाहेर पडतां येईल! वदनें–हीं वस्त्रें. जोहरे–जोहारे = लाक्षागृहे. आम्हा–जगा. (४३७) माझेनि–नातरि माझेनि. मरणा–मारा (मरण मारा) (४३९) अलिकडिले–परि ऐलिकडिले. मुखीं खाई हो सरली जगाची = मुखरूपी पेटलेल्या खंदकांत जगाची होळी होऊन राहिली आहे. (४४०) आम्हा–आहा. वोडवलासि = प्रवृत्त झालास. (४४१) म्यां–मिया. (४४२)

आणि इतके भक्षण झाल्यानें तर ते येथें क्षुधेस उणेपण यावें की नाहीं? पण तेथें तर उलटे कीं, त्या क्षुधेसच एक माजणेंच चढलें आहे. जसें पहा की कसें तें विलक्षणतेनें अग्नीचें दीपन होऊन आहे. तेथें क्षुधा का भूकही पण प्रदीप्त होऊन आहे. (४२७)

एकादा कोणी 'ज्वर रोगामधून बरा झालेला त्याची भूक जशी प्रदीप्त होऊन असते, किंवा एकादा भणंग दुष्काळांतून–दुकाळामधून उठला वांचलेला जसा हांवऱ्या भुकेचा त्याप्रमाणें ह्या विश्वरूपाच्या जिभांचा लळलळाट, ओठांचीं अग्रें ओंठ चाटतांना देखिला होत आहे. (४२८)

तुमच्या आहाराचें नांव घेतलें तर तुमच्या मुखापासून कांहीं सुटलें नाहीं–कांहीच उरलें नाहीं. तेथें भुकेलेपणाची तीव्र अशी मसमसीत–समसमित नवाईच–बाळसें का शाईच जशी सर्व तारुण्यभार नवीनपणानें उभवून आहे–असें दिसत आहे–अथवा कामरूपच ते गालावर लालरंगाची छटा उभारून (घेऊन) आहे. (४२९)

तहान तर इतकी लागली आहे कीं, सगळा सागरच पिऊन टाकावा अशी, का भूक ही तर अशी (लागली आहे) कीं, सर्व पर्वतच जसा का एकाच घांसाचा करावा का ब्रह्म कटाहच मुळीं दाढेखालीं घालावा. (४३०)

दाहीच्या दाही दिशा गिळून टाकाव्यांत. आकाशातील सर्व चांदण्या चाटून घ्याव्यांत, अशी तुमच्या तोंडामध्यें सहजपणेंच वर्तणूक होत आहे: तेथें हांवच एक जशी का लोलुप्यताच एक तुमच्याठायीं दिसत आहे. (४३१)

अहो, ज्याप्रमाणें भोगच एक सर्व घेत राहिले तर तेथें काम हा केव्हांही वाढतच असतो किंवा अग्नीमध्यें जर इंधन घातलें तर तो अग्नि केव्हांहि भडाडून असणारच, त्याप्रमाणें खात खातच आहेत नेहमीं, अशी तोंडें खा खातच राहिली आहेत, खा खा करीत उठली आहेत, हसासितच आहेत जशीं, तीं अशी दिसत आहेत. (४३२)

एकच मुख पण तें केवढें पसरलेलें आहे पाहा: सर्व त्रिभुवन विश्वरूपाच्या जिव्हेच्या टोंकावर टेकलें आहे असें, जसें का कवठच समुद्रामधील वडवानळांत घातलें आहे–(वडवानल आंतील आनखाग्र सर्व वीर-रस, अमृत, पियुष धार शोषून घेतो जसें का पण तें कवठमात्र पाहिलें तर जसेंच्या तसेंच असें शाबूत असतें –त्याच्या आकारास कसलाहि बाध आलेला नसतो का नाहीं जसा पण ते पोकळ असतें त्यांत गीर वगैरे काहींही नसतो.) (४३३)

अशी अपार मुखें किंवा मुख पण अनेकशः वदनांनीं दिसत असलेलें; तेव्हां आतां इतुकीं त्रिभुवनें कोठून आणावींत! कारण आहार न मिळतां एकच जरी तरी अपारपणानेंच मुळीं पुष्कळच तीं अशीं वाढून जाऊन अनेकपणाची होऊन दिसत आहेत. (४३४)

अहो! हा लोक तर बापुडवाणा असा दीन कीं ह्या वदनांच्या स्वाधीन झाला आहेसा दिसत आहे; जसा का मृगाचा कळप चोहोंकडून वणवा पेटला आहे अशा जागेमध्यें सांपडून आहे. (४३५)

आहा! आहा! अहो! आतां तर ह्या विश्वास अगदीं तसेंच होऊन आहे! हें विश्वच वणव्यामध्यें सांपडल्यासारखे झालें आहे. अहो! येथें हा कांहीं विश्वरूपरूपी देव येथें रक्षण करणाऱ्या देवपणानें कांहीं दिसत नाहीं. तर जगामधील देहरूपी पाण्यामधील जलचरांना देहरूपी उदकांत फिरणाऱ्यांना धरण्या-करितां तर एक मोठें थोरलें जाळेंच कीं ह्या काळानें पांगिलें, पसरलें आहे. (४३६)

अशा त्या तुमच्या अंगापासून निघालेल्या ज्या प्रकाशलाका का दिप्ती तेज–शलाका लहान काड्या सळयाच खुंट्या का खीळ त्या जशा वागुराच ह्या जीवरूपी हरिणांना आंत सांपडवून आहेत तेव्हां आतां ह्या चराचरांस त्यामधून कसें बाहेर पडतां येईल असें ही चराचर सृष्टि पहात आहे! अहो! हीं वक्त्रें का वदनें नव्हत तर लाक्षागृहेंच–लाखेची घरें तीं जशीं जोहरेच तीं आम्हां जगास संकटांत वोढवून आहेत. [लाक्षातरूः लाखातरू इ० =पळस. लाखापुष्प=तांबडा, गुलाल. लाक्षाप्रसाद, लाक्षाप्रसादन= रक्तलोध्र.] (४३७)

ही आग तर आपल्या दाहकपणामुळें कशी पोळणें करीत आहे, पोळत आहे का पोळवीत आहे तें कांहीं समजतच नाहीं; पण ज्यास ती लागते त्याचें वांचणेंच होत नाहीं—ज्यास लागते त्याच्या प्राणाची सुटकाच मुळीं त्या आगीपासून होतच नाहीं, होईना! (४३८)

तेथें शस्त्र हें तिखटपणानें कसें निवटतें तें, तें शस्त्र कसें बरें जाणील? तें केव्हांही तें निवटणें जाणतच नाहीं. अहो! विष आपल्या मरणासारख्या मारास केव्हांहि जाणतच नाहीं. (४३९)

त्याप्रमाणें तुम्हांला कांहीं थोडीबहुत आपल्या उग्रपणाची आठवणच नाहीं; पण ह्या अलीकडील का अलीकडच्या मुखांमध्यें खाईच जशी ती, का पेटलेला खंदकच एक, तीजमध्यें तर जगाची होळीच होऊन राहिली आहे. (४४०)

अगा हे विश्वरूपा! तुम्हीं आत्माच एक! अहो तुम्हीं जगाचे जीव आहांत! जगाचा आत्मा असे आहांत! सकळ विश्वव्यापक आहांत! मग आम्हांस कां बरें जसें का वृत्तांतच एक असें वोढ़वले आहांत—अहो, मृत्युसारखें वर्तन तुम्ही करीत आहांत, कृतांतासारखी प्रवृत्ति आम्हाविषयीं तुमच्यामध्यें येऊन आहे ती बरें! (४४१)

आतां येथें मी तर ह्या जीवित्वाची चाड ती जीवपणानें असण्याची जी इच्छा तीच मुळीं सांडिली आहे—ती मजकडून टाकून दिली गेली आहे—म्हणून तुम्हीं आतां कांहींही भीड वगैरे न धरितां आपल्या मनामध्यें असेल तें उघडपणें सहजपणें—स्पष्टपणें बोलण्याचें करावें हें बरें! (४४२)

अहो! तुम्हीं असल्या ह्या आपल्या उग्रपणास किती तरी वाढविणार आहांत! अहो! कांहीं थोडीबहुत तरी तुम्हीं आपल्या भगवंतपणाची ती कृपा आठवा, तरी!! नाहीं तर मजपुरती तरी ती कृपा—कृपाळुपणास यावी, असें तरी निदान करा, मजवर आपली कृपा व्हावी असें तरी करा. (४४३)

**श्लोक ३१वा :—**

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं नहि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥**

आख्याहि (नांव, कीर्ति, शोभा, महत्व, कथा) मे=मला आपलें सुशोभनीयत्व का शोभनीयत्व तें सांगा. को भवान् उग्ररूपः=उग्ररूप धारण केलेले तुम्हीं कोण आहांत तें. नमोऽस्तु ते देववर प्रसीद=हे देवश्रेष्ठा! मी तुम्हांस नमस्कार करतों. तुम्ही मजवर प्रसन्न व्हा. भवंतं आद्यम् विज्ञातुं इच्छामि=तुमचें सर्व कांहीं कारण जाणावें अशी इच्छा मजमध्यें येऊन आहे. भवंतम् आद्यम्=तुमचें श्रेष्ठत्व, प्रथमत्व. न तव प्रवृत्तिम् प्रजानामि=कारण तुमच्या ह्या प्रवृत्तीस (संसार—करणी, क्रिया, लीला, व्यवहार, हेतूस) मी परीक्षूं शकत नाहीं, मला ती माहीत होत नाहीं—कांहीं उमगूं शकत नाहीं, जाणत नाहीं,—माझ्यानें तें जाणवत नाहीं. प्रवृत्ति=ईश्वरी लीलेचा विश्वसंहारात्मक हेतु.

**अन्वयः—**

देववर प्रसीद!। नमोऽस्तु ते। भवान् उग्ररूपः को! आख्याहि मे। अहम् भवंतम् आद्यम् विज्ञातुम् इच्छामि। अहं तव प्रवृत्तिम् न प्रजानामि हे देववर। भवान् उग्ररूपः। को। मे आख्याहि। प्रसीद। भवंतम् आद्यम्। नमोऽस्तु ते। विज्ञातुम्। इच्छामि। तव प्रवृत्तिम्। प्रजानामि नहि ॥ ३१ ॥

**अर्थ :—**

हे उग्ररूपा! हे भगवन्! उग्ररूप धारण करणारे असे आपण कोण आहांत तें मजला सांगा. हे देवाधिदेवा! देवश्रेष्ठा! मी तुम्हांस नमस्कार करतों. मजवर प्रसन्न व्हा. हे भगवन्! आपण आदिकारण जे त्या आपणा आदि पुरुषांस तत्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे. आपण आपलें हें उग्ररूप

कां धारण केलें आहे, हें कांहीं माहीत होत नाहीं, समजत नाहीं. तें आपण सांगावें. तें कारण जाणण्याची माझी इच्छा आहे. ॥ ३१ ॥ (श्लोक ३१वा, ओवी ४४४ ते ४५०)

**(आद्य) परी येक वेळ वेदवेद्या। जी त्रिभुवनैक आद्या।**
**विनवणी विश्ववंद्या। आईक माझी ॥ ४४४ ॥**
**(नमोऽस्तुते देववर प्रसीद)**
**ऐसे बोलोनि वीरे। चरण नमस्कारिले शिरे।**
**(भवंतम् विज्ञातुम् इच्छामि) मग म्हणे तरी सर्वेश्वरे। अवधारिजो ॥ ४४५ ॥**
**म्या होआवया समाधान। जी पुसिले विश्वरूप ध्यान।**
**आणि येकसरे त्रिभुवन। गिळितचि उठिलासी ॥ ४४६ ॥**
**(को भवानुग्ररूपः)**
**तरी तूं कोण का येतुली। भयानके वदने का मेळविली।**
**आघवाचि करी परिजिली। कां पां शस्त्रे ॥ ४४७ ॥**
**जी जंव तंव रागीटपणें। वाढोनि गगना आणितोसि उणे।**
**कां डोळे करूनि भिंगुळवाणे। भेडसावितु आहासी ॥ ४४८ ॥**
**(नहि प्रजानामि तव प्रवृत्तिम्)**
**येथ कृतांतेसी देवा। काईसया कीजतसे हेवा।**
**(आख्याहि मे) हा आपुला तुवा सांगावा। अभिप्राय मज ॥ ४४९ ॥**
**यया बोला म्हणे श्रीअनंत। मी कोण हे आहासी पुसत।**
**आणि काइसया लागी असे वाढत। उग्रतेसी ॥ ४५० ॥**

परी–तरी. आईक–आईके. (४४४) अवधारीजो–विनंति अवधारिजो. (४४५) म्यां–मिया. पुशिले–पुसिले. एकसरे=एकेचि काळे. (४४६) भयानक वदने–इये भ्यासुरे मुखें. आघवाचि–अवघियाचि. परजिली–परजणे–परिजिली (परजात=परान्नजीवी. परंज, परांज=सुरीचें पातें, फेंस, तेलाचा घाणा.) का पां शस्त्रे–शस्त्र का ह्या=कशासाठीं धारेचीं परजिलेलीं अशीं शस्त्रें हातीं घेतलीं आहेस. (४४७) भिंगुळवाणें=लाल, भयप्रद. (४४८) अभिप्रावो–अभिप्राय=हेतु, इच्छा, आशय, उल्लेख, संबंध. (४४९) यया–या. कायसया–काथिसया–कासया लागीं. वाढत–वाढत हे. (४५०)

अहो वेदवेद्या! त्रिभुवनीं एकच एक असे आपण आद्य आहांत. अहो विश्ववंद्या! एक वेळ तरी तुम्हीं माझी ही कनवाळूपणाची विनवणी ऐकून घ्यावी, ऐकावीच ऐकावी. (४४४)

याप्रमाणें त्या वीरानें बोलून, विश्वरूपापुढें तर साष्टांग नमस्कार घातला–त्यांच्या चरणावर आपलें मस्तक ठेविलें व हात जोडून म्हणू आदरिलें, म्हटलें कीं, अहो जी! हे सर्वेश्वरा! आपण माझी एवढी विनंती! विनवणी! ऐकावी कीं! अहो जी! (४४५)

देवदर्शनानें–तुमच्या देवपणाच्या दर्शनानें समाधान पावण्याकरितां–ह्या जीवपणाचें समाधान व्हावें म्हणून मी आपणास विश्वरूपाचें ध्यान विचारलें; वर पहावें तो काय आपण तर एकदमच्या एकदम, एकाच वेळेस, सरसकट, त्रिभुवनच गिळूं लागलांत. असें आपलें स्पष्टपणांस येणें उभें होणें–उठणें झालें. काय हें दर्शन म्हणावें का काय म्हणावें तरी! (४४६)

तरी आपण आहांत कोण! इतकीं अशीं हीं उग्रमुखें कां मेळविलीं आहेत? पुरुष प्रकार पुढें करून आहांत व सर्व हातांत आपण तिखट (तीक्ष्ण) अशीं शस्त्रें परजून आहांत तें कां? (४४७)

अहो ! जेव्हां तेव्हां एकसारखे आपण रागीटपणानें मोठे होण्याचें होत आहांत तें कां ! अहो ! हे तुमच्या मोठेपणापुढें हें गगनही पण तेथें लहानच, असे आपण वाढत आहांत, दाखवीत आहांत व डोळे तर भयप्रद असे लाल करून मजला मेडसावीत आहांत, तें कां बरें ! (४४८)

देवा ! येथें कृतांताबरोबरच जशी कांहीं आपली चढाओढ लागली आहे, असे आपण दिसत आहांत; कृतांताशींच आपण हेवा–तेढ बांधून आहांत म्हणून आतां येथें असें हें उग्ररूप धारण करण्याचा आपला हेतु, अभिप्राय तो काय तो मजला सांगावा जी. (४४९)

या अर्जुनाच्या विचारण्यावर श्रीअनंतांनीं असें बोलणें केलें कीं हे अर्जुना ! तूं, मी कोण आहें तसेंच मी उग्रतेनें वाढत आहे तें कां ? असें रूप मी कशाकरितां धारण केलें आहे ? असें विचारीत आहेस; (तर आतां तें ऐक). (४५०)

श्रीभगवानुवाचः—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥**

लोकक्षय कृत प्रवृद्धः कालः अस्मि = लोकक्षय करण्यासाठीं मी वाढलेला, महाकाळ आहें (प्रवृद्धः = इंद्रियें ही कर्माच्या ठिकाणीं अति वाढ घेऊन आहेत–वाढलीं आहेत–आतां येथें आत्माच मुळीं प्रवृद्ध असा होऊन आहे.) लोकान् समाहर्तुं प्रवृत्तः इह = आतां ह्या वेळेस ह्या लोकांचे एकीकृत करण्यास्तव ह्या लोकांचा संग्रह का संहार करण्यास्तव मी येथें प्रवृत्त झालों आहें–समाहर्तुम् प्रवृत्तः = संग्रह करण्यास प्रवृत्त झालेला. ये अवस्थिताः प्रति अनिकेषु योद्धाः = (अनिका = सैन्य) ह्या सैन्यांत उभे असलेले, युद्धास सज्ज होऊन असलेले सर्व योद्धे. ऋते अपित्वां सर्वे न भविष्यंति = तुजशिवाय सर्व–तूं जरी युद्ध केलें नाहींस तरी सर्व योद्धे जिवंत उरणार नाहींत.

अन्वय :—लोकक्षयकृत प्रवृद्धः । लोकान् समाहर्तुम् प्रवृत्तः । कालः अस्मि । त्वां ऋते । अपि । प्रति अनिकेषु ये अवस्थिताः योद्धाः । ते न भविष्यंति ॥ ३२ ॥

अर्थ :—लोकक्षय (ऱ्हास, कमी होणें, प्रळय, रोग, घर, स्थान, सामर्थ्य.) करण्याकरितां वाढलेला काळ असा मी, लोकांचा संहार करण्यास प्रवृत्त झालों आहें–तुजशिवाय, तूं जरी युद्ध केलें नाहींस तरीही प्रतिपक्षाच्या उभयही सैन्यामध्यें उभे असलेले सर्व योध्दे उरणार नाहींत. (सं + हृन् = एकत्र करणें, होणें, जोडणें, भिडणें, वळणें, मूठ आकुंचन करणें.) ॥ ३२ ॥ (श्लोक ३२ वा ओव्या ४५१ ते ४६८)

श्रीभगवानुवाचः—

**(कालोस्मि इति)**
**तरी मी काळ हे गा फुडे । लोक संहारावयालागी वाढें ।**
**सैंघ पसरली आहेत तोंडे । आतां ग्रासीन हे आघवे ॥ ४५१ ॥**
**(ऋतेऽपि त्वाम्) तेथ अर्जुन म्हणे कटकटा । उबगलो मागील संकटा ।**
**म्हणोनि आळविला तंव वोखटा । उधवला हा ॥ ४५२ ॥**
**तेवीचि कठिण बोल आसतुटी । तेणे अर्जुन होईल हिंपुटी ।**
**म्हणोनि म्हणें सवेंचि किरीटी । परी आन येक (कांहीं) असें ॥ ४५३ ॥**
**तरी आताचि ये संव्हार वाहारे । तुम्ही पांडव असा बाहिरे ।**
**तेथ जातां जातां धनुर्धरे । सांवरिले प्राण ॥ ४५४ ॥**

होता मरण महामारी गेला। तो मागुता सावध जाला।
मग लागला बोला। चित्त देवो ॥ ४५५ ॥
तव ऐसे म्हणिजत आहे देवे। अर्जुना हे तुम्ही माझे जाणावे।
(न भविष्यंति सर्वे) येर जाण मी आघवे। सरलो ग्रासूं ॥ ४५६ ॥
थोर वज्रानळी प्रचंडी। जैसी घांपे लोणियाची उंडी।
तैसे जग हे माझ्या तोंडी। देखिले तुवां ॥ ४५७ ॥
(येऽवस्थिताः) तरी त्या माझारी कांहीं। भरवसेचि उरणे नाहीं।
इये वायाचि सैन्ये पाहि। मिरवताति ॥ ४५८ ॥
हे जे मिळोनिया मेळे। कुंथती वीर वृत्तीचेनि बळे।
जयावरी जगदळें। वाखाणिताती ॥ ४५९ ॥
म्हणत सृष्टीवरी सृष्टी करूं। आण वाहुनि मृत्यूसि मारूं।
आणि जगाचा भरू। घोट यया ॥ ४६० ॥
पृथ्वी सगळीच गिळूं। आकाश वरच्यावर (वरीचियावरी) जाळूं।
काई बाणवरी खिळु। वारियाते ॥ ४६१ ॥
ऐसिया चतुरंगाचिया संपदा। करीत महाकाळेसी स्पर्धा।
वाटवेचिया मदा। वळंघले जे ॥ ४६२ ॥
बोल हातियेरा परिस तिखट। दिसती अग्नि परीस दासट।
मारकपणें काळकूट। मधुर (महुर म्हण) म्हणत ॥ ४६३ ॥
तरी हे गंधर्व नगरीचे उमाळे। हे जाण पोंकळीचें पेंडवळे।
आगा चित्रिचे पुतळे। वीर हे देखे ॥ ४६४ ॥
जैसे लेपाचे रूप केले। तया हाती शस्त्र दिधले।
चैतन्येविण मांडले। उग्र रूप (=शंकर वीर वृत्तिरूप) ॥ ४६५ ॥
हा मृगजळाचा पूर आला। दळ नव्हे वस्त्राचा सर्प केला।
या शृंगारूनिया खाला। मांडिलिया पैं (मांडिल्या की) ॥ ४६६ ॥
(मयैवेते निहिताः पूर्वमेव)
येर चेष्टविते जे बळ। ते म्या मागेचि ग्रासिले सकळ।
हे कोल्हेरीचे वेताळ। तैसे निर्जिव आहाति ॥ ४६७ ॥
हालविती दोरी तुटली। तरी तिये स्तंभावरीली बाहुली।
भलतेणे लोटिली। उलथोनि पडती ॥ ४६८ ॥

हे गा–गा हे. फुडे–पुढें. आहेत–आहाती. (४५१) तेथ–एथ. उबगलो=त्रासलों. मागिल–मागिल्या. उवाइला–उधाइला–उधवला–उवाइला=भयंकरच झाला, पसरला. (४५२) बोले=बोलांनीं. आसतुटि=खिन्न, निराश, आशा तुटलेला. हिंपुटी=कष्टी. म्हणे सर्वेचि–सर्वेचि म्हणे. येक–येक कांहीं. (४५३) संहारवाहारे–एक बाहिरे=संहाररूप संकटांतून. जाता–जात. सांवरिले–राखिले. (४५४) जाला–जाहला. देवो–देऊ. (४५५) हे तुम्ही माझे–माझे तुम्हीं हे (४५६) प्रचंडी–चंडी. माझ्या–माझिया. (४५७) त्या–तया. उरणे–उणे. मिरविताति–वल्गिजत आहाती–(व र व ज त–व र व त–आहाती=बडबडत आहेत)=जग तोंडीं देखिलें, तेथें वल्गनाच होत आहे त्या जगाकडून : उरणें नाहीं–उणें नाहीं=जग भरंवसेनि उरणेंच नाहीं, तेथें कमी अधिक असें बोलणेंच नाहीं–का नको. भरंवसेचि–भरंवसेनि. (४५८) बळे वीर वृत्तीचेनि कुंथती=वीरश्रीच्या डौलानें बोलत आहेत. जग दळे–गज दळे.

(४५९) म्हणत–म्हणती. मृत्यूसी–मृत्यूतें. (४६०) आकाश–कीं आकाश. वरच्यावर–वरिच्चियावरी. वारियासि–वारयातें=वाऱ्याला अथवा आपास म्हणजे पाण्यास. (४६१) ऐसिया–ऐशा. वाटिवेच्चिया मदा वळंघलें जें=आपापल्या पराक्रमाच्या मदानें उन्मत्त झाले जे. (४६२) हातियेरा परिस–हातियेराहूनि=हत्यारापेक्षां, शस्त्रापेक्षां. अग्निपरिस दासट=अग्निपेक्षां दाहक. मधुर म्हण–महुर म्हणत. (४६३) पेंडवळे–भेंडोळे. आगा–अगा. (४६४) उग्ररूप=लेपरूप, वीररूप, वीरवृत्तिरूप. (४६५) हा–हा गा. वस्त्राचा सर्प=कापडाचा साप. या–इया. खाला=खेळणीं, बाहुलीं : मांडिलिया पैं–मांडियेल्या कीं. (४६६) म्यां–मियां. मागेच्चि–मागाच्चि=ते मागाच्चि मिया. हे आतां–हे. कोल्हेरीचे–काल्हेरीचे=कुंभाराच्या कारखान्यांतले : वेताळ=मातीचे पुतळे. ते आहातीं–आहाती. (४६७) स्तंभावरिलि=खांबावरील (४६८)

तरी आतां मी काळ आहें हें स्पष्टच आहे व मी हा लोकसंहार करण्याकरितां वाढत आहें. पुष्कळशीं तोंडे पसरिलीं आहेत असा मी ग्रासच ह्या सर्वांचा करीत आहें. (४५१)

येथें आतां अर्जुन हा तर म्हणूं लागला कीं अहो! हें काय! काय कटकट म्हणावी ही! अहो, पूर्वीच्या संकटाला त्रासून जाऊन आपणांस आळविणें केलें, तों आतां पहावें तों तिसरेंच एक संकट तें म्हणजे आपलें असें जें भयंकर होणें तें. (४५२)

यावर श्रीविश्वरूपांनीं विचारांत घेतलें कीं, जर का अर्जुनाशीं बोलण्यामध्यें कठीण बोल करूं तर अर्जुन खिन्न होईल, हिंपुटा होईल, निराश होईल, करितां आतां असा विचार येतो न येतो तोंच त्यांनीं असें म्हटलें कीं हे अर्जुना! येथें दुसरीच एक गोष्ट आहे, ती ऐक. (४५३)

तरी हे पांडवा आतांच ह्या संहाररूप संकटातून तुम्ही पांडव बाहेर असा. तेथें आतां जसें का ते पांडव त्या संकटातून बाहेर झाले व तेथें जातां जातांच मुळीं त्या धनुधरनें अर्जुनानें आपले प्राण सांवरिले धैर्याचे केले; त्यानें आपले प्राण सरसावून धरिले, राखिले, संरक्षिले. (४५४)

अहो, ह्या आडमाप घालणाऱ्या गवताच्या मरण महामारीनें अगदीं मेलाच होता तो अर्जुन; पण त्यानें आतां सावध होऊन ह्या देवाच्या बोलण्याकडे आपलें चित्त वळविलें, लाविलें–चित्त देऊन देवाचे बोल तो ऐकूं लागला. (४५५)

देवांनीं तेथें असें म्हणूं केलें कीं, हे अर्जुना, तुम्हीं पांडव माझे आहांत–माझे तुम्हीं पांडव आहांत! असेच जाण बाकी दुसरें जें कांहीं एक तें सर्व मी ग्रासूंच जसा लागलों आहें, त्याचा ग्रास करण्यासच मी बसलों आहें. (सरलों ग्रासूं.) (४५६)

प्रचंड असा वज्रानळ पेटला म्हणजे थोर अशी चंड अनलांची प्रदीप्तता तेथें चंडीच ती जशी का. तेथें तर लोण्याची उंडी लोणियाचा गोळाच्या गोळाचमुळीं आंत पडला आहे, अशी दीप्त वन्हीची ज्वाला उठते, तसें जग हें माझ्या तोंडामध्यें तुवां पाहिलेंस! सर्व जगच मुळीं माझ्या तोंडामध्यें तुवां देखिलेंस की! (४५७)

अशा त्या तोंडामध्यें तर अगदीं भरंवशावरच जसें का कांहीं उरेल असें नाहींच. खरोखरीनें पाहातां तेथें कांहीं तरी पण उरेल का? कांहींच उरणार नाहीं; म्हणून हीं सैन्यें जीं तीं कशीं आहेत म्हणशील, तर तीं वांयांपणेंच मिरवत आहेत अशीं होत. त्यांचें मिरवणें--वल्गना करणें–बडबडणें वर वर वाजणेंच तें जसें तेथें असें दिसत आहे कीं, तीं सैन्यें आपलें सैन्यपणच (तेथील डोलच मुळीं नुसतें) वरवरच मिरवीत असलेलीं अशीं होत. कमी अधिक असें कांहीं आहे का कसें, असें तेथें बोलणेंच नाहीं; म्हणजे उरणें (नाहींच) जें तें कांहीं कमीपणामध्यें असेल नसेल असें नाहीं–तर उरणें नाहीं. हेंच सर्वतोपरी होणारें. (४५८)

मेळेच्या मेळे, थवेच्या थवे एक मेळाव्यानें असलेले असें ते मिळलेले मेळे ते तर शूरत्वाच्या वृत्तीचें बळ घेऊन कुंथतच आहेत–वीरश्रीच्या डौलानें बोलत आहेत व ह्या मुळेंच तर हीं जगदळें का गजदळें ही वाखाणली जाणारी, त्याच बळावर मुळीं ती जगदळें म्हटलीं जाणारीं,–मोठेपणास पावलेलीं तीं वीरवृत्तीच-मुळें तेथें जगदळच एक असें व्यक्ति व्यक्तित्वानें मिळणी मेळयास आलेली, तेथें ती वीरपणानें मिरवणारी वृत्तिचमुळीं तें जगदळ होय. तेथें वाखाणणीच नेहमी. (४५९)

त्याचें तें वीरवृत्तीचें कसें तें बोलणें पाहा कीं, अहो, येथें तर आम्हीं सृष्टीवरही दुसरी सृष्टि उभी करूं–घडूं! अहो, त्या मृत्यूची तर कथा ती काय? त्यास तर आम्हीं पैजेनें का पैजेवर मारूं! असें हें सर्व जग तरी आमचा एक घोटच जसा! तें केव्हांच घशाखालीं घालूं! (४६०)

पृथ्वी सगळीच्या सगळीच मुळीं गिळून टाकूं; आकाश जें वर आहे तें तर वरच्या वरचमुळीं जाळून टाकूं! अहो! ह्या वाऱ्यास तर ह्या बाणावरच लोंबवून ठेऊं! खिळून ठेवूं–खिळवूं!!! (४६१)

अशा तेथीलच्या त्या वृत्ति, हत्ती, रथ, घोडे, पायदळांनीं विभूषित असलेल्या संपदाच त्या त्या तर आतां काळच होऊन आहेत असें म्हणूं करून, त्यांनीं तर महाकाळाबरोबरच कीं स्पर्धाच एक जशी बांधिली आहे–आपापल्या पराक्रमाच्या मदानें उन्मत्त झालेले असे ते होऊन आहेत–चतुरंग संपदा मदाच्या वाटिवेनें, बांध्यास आलेल्या कामकाजाच्या मदानें तर काळाशीं स्पर्धा करून आहेत. (४६२)

बोल हे हत्यारापेक्षांही तीक्ष्ण होत, तिखट धारेचे असे ते होत. मारकपणें तर–तीक्ष्णपणें तर अग्नि-पेक्षांही दासट–दाहक दिसत आहेत. मारकपणें कडू इतके कीं, त्यापुढें कालकूटही एकवार मधुर म्हणतां येईल! (४६३)

पण ह्या तर अहो आकाशांतील लुटुपुटीच्या अशा गंधर्व नगरींतील उसाळ्या होत,–हें तर पोकळीमधील पोकळ असें बांधलेलें तें भेंडोळेंच एक जसें, भेंडेंच एक जसें, हें चित्ताचे भिंतीवर काढलेलीं चित्रेंच जशीं का, तसे ते वीर होत. तीं नुसतीं चित्रेंच–मातीचें भेंडेच जसे असे ते वीर पहा! (४६४)

रंगाच्या लेपानें पुतळाच एक चित्रित केला. अशा त्या लेपाचे रूपच एक केलें व त्या हातीं शस्त्र दिलें तर हें जसें कल्पिततेचें एक पुतळेपण तेथें त्या पुतळ्यांत तर चैतन्यच मुळीं नाहीं व अशा त्या बिनचैतन्याच्या रूपांनां उग्रपणानें–रागीटपणानें जसें पुढें केलें तें लेपरूपच एक वीरवृत्तिरूपाचें म्हटलेलें. (४६५)

हा जसा मृगजळासच आलेला पूर होय, तेथें दळ–सैन्य तें कसचें! तें जसें का एक वस्त्रांचा सर्प केलेला असा सर्पच होय. कापडचमुळीं साप करण्यांत आटविलें–कापडाचा सर्वथैव असा एक सापच केलेला अशा त्या, खाला म्हणजे खेळणीच का खिळणीच जशी किंवा बाहुल्याच माडलेल्या–मांडल्या, उभ्या केल्या जशा. (४६६)

तेथीलचें जें दुर्णे हालचाल करणारें बळ तें तर म्यां अगोदरच खिळून टाकिलें आहे; म्हणून आतां तर नुसतें तें कुंभाराच्या कारखान्यांतील मातीचे पुतळे जसे, तसे निर्जिव आहेत–कोल्हेरीचे वेताळ म्हणजे मातीचे पुतळे 'एक कोलं लाटणारे' ते, असे निर्जिवतेचे असे फसवणुकीचे होत. (४६७)

खांबावरील बाहुलीच्या हालचालीस आधार असलेली दोरी जर हालविली व ती जर का तुटली तर ती बाहुली केव्हांही उलथून पडणारच! बाहुली कोणीही जरी ओढली, ढकलली, लोटली, हालविली तर ती बाहुली उलथून पडतेच पडते. (४६८)

**श्लोक ३३वा :—**

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥**

तस्मात् त्वम् उत्तिष्ठ=म्हणून तूं जागा हो, उभा रहा, कामास लाग. यशो लभस्व=यश मिळव, मिळवून घे. शत्रून् जित्वा समृद्धम् राज्यं भुङ्क्ष्व=शत्रूंना जिंकून सर्व तऱ्हेनें विशालतेनें समृद्ध असें राज्य मिळव, भोग. पूर्वम् एव मया एते निहताः = पूर्वींच का अगोदरच मुळीं ते मीच कीं अहो निहत म्हणजे निर्जिव केलेले आहेत. सव्यसाचिन्! निमित्त मात्र भव=हें अर्जुना, तूं निमित्तमात्र हो!

अन्वयः—सव्यसाचिन्। तस्मात् त्वम् उत्तिष्ठ। यशः लभस्व। शत्रून् जित्वा समृद्धम् राज्यम् भुङ्क्ष्व। मया एव ते पूर्वम् एव निहताः। सव्यसाचिन् निमित्तमात्रं भव ॥ ३३ ॥

अर्थः—म्हणून हे अर्जुना, तूं युद्ध कर व यश मिळव. शत्रूंना जिंकून समृद्धतेचें असें राज्य मिळव; व त्याचा उपभोग घे! तुझ्या शत्रूनां अगोदरच मुळीं मी निर्जीव केलें आहे; त्यांना तूं जिंक. ॥ ३३ ॥

(श्लोक ३३वा, ओ. ४६९-४७२)

**तैसा सैन्याच्या इया बगा। मोडता वेळ न लगे पै गा।**
**(तस्मात्त्वमुत्तिष्ठ) म्हणोनि उठि उठि वेगा। शहाणा होई ॥ ४६९ ॥**
**(जित्वा शत्रून्) तुवा गोग्रहणाचेनि अवसरे। घातले मोहनास्त्र येकसरे।**
**मग विराटाचेनि महाभेडे उत्तरे। आसुडोनि नागविले ॥ ४७० ॥**
**आतां हे तया निपटारे झाले। निवटी हे आइते रण पडिले।**
**(यशो लभस्व) घेई येश रिपू जिंतिले। एकलेनि अर्जुने ॥ ४७१ ॥**
**(भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्)**
**आणि येशचि नव्हे। समग्र राज्यही आले आहे।**
**(निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्) निमित्तमात्रचि होये। सव्यसाची ॥ ४७२ ॥**

(तैसा सैन्याचा इया) बगा=आकार, देखावा. (४६९) मग-मग त्या. महाभेडे=अत्यंत भित्र्या. आसुडोनि-आसडुनि=(वस्त्रें) हिसकावून घेतलीं गेल्यानें. (४७०) तया-तयाहूनि. निपटारे=निकृष्ट, हीन जाले-जाहाले: निवटी (हे) संहार कर. आईते पडिले-आईते रण पडिले-रण म्यां पाडिले. येश-यश. (४७१) येशचि-यशचि. नव्हे-नोहे. (४७२)

अशा त्या सैन्याचा आकार का देखावा, मोडण्यास वेळ तर मुळींच लागणार नाहीं, म्हणून तूं त्वरिततेनें उभा हो, युद्ध करण्यास तयार हो-शहाणा हो व युद्ध करण्याच्या आपल्या कामास लाग. (४६९)

गोग्रहणाच्या वेळेस तुवां तर सरसकट मोहनास्त्र प्रेरिलें व तेव्हां त्या विराट राजाच्या अत्यंत भित्र्या मुलानें उत्तरानें तर त्यांची तीं वस्त्रेंच हिसकावून घेतलीं गेल्यामुळें हारच खाल्ली तेव्हां व अशा दुर्धर प्रसंगींही तूं मोहनास्त्र प्रेरून गंधर्वांना जिंकलेंस. (४७०)

आतां हे तर त्याहून अधिक लंपटपणाचे हीन व निकृष्ट झाले आहेत; म्हणून आईतेंच येथें रण हें म्यां पाडिलेलें असें तें तूं जिंक व शत्रूंना नाहींसे कर, यश घे; व ह्या एकट्या अर्जुनानें कीं अहो सर्व शत्रूंना जिंकून शत्रूवर जय मिळविला अशी वाहवा तूं मिळव. (४७१)

येथें तर कोरडें असें नुसतें यशच नव्हे तर त्या यशावर सर्व राज्यही पण येत आहे-येऊन आहे, आलें आहे-म्हणून तूं हे सव्यसाची अर्जुना, मिळालेल्या यशावरच मुळीं नुसता निमित्तमात्र तरी होच हो. कोरडें यश नव्हे तर येथें यश हें श्रीदेवाचें सर्व तें झालेलें, तेथें कीर्ति, पराक्रम व संपत्ति हीं सर्वथैव तृप्ति व समाधान बरोबर घेऊन येत आहेत. (४७२)

**श्लोक ३४वा :—**

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्॥ ३४॥**

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं च=द्रोण, भीष्म, जयद्रथ व कर्ण इत्यादि वीरांना. तथा अन्यान् अपि मया हतान् योधवीरान=त्याचप्रमाणें दुसऱ्याही अनेक अशा युद्ध करणाऱ्या, व पूर्वींच नाहींशा केलेल्या वीरांना. त्वं जहि=(मी निवटिले आहे व आतां) तूं जिंक. मा व्यथिष्ठा=भिऊं नको, भ्रांत होऊं नको, हताश होऊं नकोस. युध्यस्व, रणे सपत्नान् जेतासि=युद्ध कर, रणामध्यें मत्सर करणाऱ्यासहित जेता आहेस, तुझा मत्सर करणारा शत्रु आतां कोणीही नाहीं. सपत्नान्=शत्रूंना, वैऱ्यांना. (सपत्नः अरिः=बांबू वि. सापत्न=सवतीचा : सापत्न्य=सावत्र भाऊ, शत्रु : सापत्न्यक=सवतपणा)

अन्वय :—द्रोणं। च। भीष्मं। च। जयद्रथं। च। कर्णं। तथा अन्यान् अपि योधवीरान्। मया हतान्। त्वं जहि। मा व्यथिष्ठा। युध्यस्व। सपत्नान् रणे जेतासि॥ ३४॥

अर्थ :—द्रोणाचार्य व भीष्माचार्य तसेंच जयद्रथ व वीर कर्ण तसेंच आणीक दुसरे अनेक जे शूर व लढणारे योध्दे त्यांना मी पूर्वीच निर्माल्यवत्, नाहींसे केलें आहे व आतां त्यांना तूं जिंक, भिऊं नको, हताश होऊं नको, लढाई कर, ह्या रणसंग्रामामध्यें खरोखर मत्सर बुद्धीचे जे ज्यांनां तूं पाहवत नाहींस असे तेहीपण जिंकीले गेले आहेत. तूं विजयी आहेस, विजयी होशील. शत्रूना तूं जिंकशील. ॥ ३४॥

(श्लोक ३४वा, ओव्या ४७३–४८२)

**(द्रोणमिति) द्रोणाचा पाडु न करी। भीष्माचे भय न धरी।**
**कैसेनि कर्णावरी। परजू हे न म्हणे॥ ४७३॥**
**कोण उपाय जयद्रथा कीजे। हे न चिंतू चित्त तुझे।**
**आणीकही नावाणिगे जे। वीर आहाती॥ ४७४॥**
**(मया हतान्) तेही येकेक आघवे। चित्रिचे सिंहाडे मानावे।**
**उजूं वोलेनि हाति घ्यावे। पुसुनिया॥ ४७५॥**
**ययावरी पांडवा। काईसा जुंझाचा मेळावा।**
**हा आभासु गा आघवा। येर ग्रासिले म्यां॥ ४७६॥**
**जेव्हां तुवां देखिले। हे माझ्या वदनी पडिले।**
**तेव्हांचि यांचे आयुष्य सरले। आतां रीती सोपे॥ ४७७॥**
**(त्वां जहि) म्हणोनी वहिला उठि। म्यां मारिले तूं निवटी।**
**(मा व्यथिष्ठा) न रिघे शोक संकटी। नाथिलेया॥ ४७८॥**
**(युद्धस्व) आपचि आडखिळ करिजे। ते कौतुके कैसी विंधोनि पाडिजे।**
**तैसे देखे गा तुझे। निमित्त आहे॥ ४७९॥**
**बापाविरुद्ध जे जाले। ते उपजताचि वाघे नेले।**
**आता राज्येसी संचले। यश तूं भोगी॥ ४८०॥**
**(रणे सपत्नान्) सावियाचि उतत होते दायाहा। आणि बळिये जगी दुर्मद।**
**ते वधिले विशाद (मनोभंग, खेद=विषाद)। सायास न लगता॥ ४८१॥**
**(जेतासि) ऐसिया ईया गोष्टी। विश्वाच्या वाक्यपटी।**
**लिहूनि घाली कीरीटी। विजयी होई॥ ४८२॥**

पाड्-पाड. परजू=शस्त्र उचलूं, बाण चालवूं. (४७३) नावाणिगे जे-नावणिगे जेआथि जे जे=नामांकित प्रख्यात, नांवाजलेले; आणिकही आथि जे जे—नावाणिगे वीर (पा. मे.) (४७४) येकेक-एक एक. उजू-उजू जैसे. वोलेनि हाते=पोतेऱ्यानें. पुसुनिया-पुसोनिया. (४७५). यथावरी-यावरी. काइसा-कायसा. जुंझाचा-युद्धाचा. अभासू-आभास=प्रतिच्छा-या, भ्रम. म्यां-मिया (४७६) माझा-माझ्या-माझिया. रीती सोपे=कणेवीण रीती रिकामी सोपटेंच जशीं असे ते होत. कालाचें गमन तेथें वाहाणें होणारे जे प्रकाराने तेथें सोपे असे सहज जिंकले जाणारे. (४७७) म्हणोनि-म्हणौनि. वहिला=एकदम म्यां मिया. नाथिलेया-नाथिलिया=मिथ्या. (४७८) आपचि-आपणाचि. आडखिळ-आडखिळ=निशाण. करिजे-कीजे. ते-तो. कैसि-कैसि जैसा. (एकवार एक दगड रचून मुलें लगोरीचा खेळ खेळतात व मग नेम धरून चेंडूनें पाडतात. याला चेंडू-लगोरीचा खेळ म्हणतात; तोच कीं येथें जसा.) आपचि आडखिळ करिजे। ते कौतुके कैसि विंधोनि पाडिजे—आपणचि आडखिळा कीजे तो कौतुके जैसा विंधोनि पाडिजे. (४७९) विरुद्ध=शत्रु. प्रतिकूल, अटकावलेले. येश-यश तूं भोगीं-भोगीं यश तूं. (४८०) उतत होते=मत्त झाले होते. दायाद=भाऊबंद, वारसदार. (दायिन्=जबाबदार.) विशद-बाप विशद (विशाद) विषाद=मनोभंग, खेद. लगता-लागता (४८१) वाक्यपटी-वाक्‌पटी=वाणीरूप पटावर [**पटुत्व**=वाक्‌चातुर्य, हुशारी, पटुत्व, चपलत्व; **पट**=जाणें, गुंफणें, वेष्टणें, बोलणें. **उत्पट**=उपटणें, नाश करणें. **विपट**=पळून जाणें; पट=उत्तम वस्त्र, चित्रें वगैरे काढण्याकरितां तयार केलेलें वस्त्र; **पटच्चर**=जीर्णवस्त्र, चोर; **पटमंडप**=तंबू ; पटल=झांकण छत, पडदा, परिवार, स्थान, टिळा; पटवास=तंबू; पटह=नगारा; पटी=पडदा, कनात; पटिमन्=पटुत्व; पटीयस्=अतिशय पटु, चपल; पटु=चतुर, चपल; पट्ट=वस्त्र, शिरोभूषण, पांघरूण, सनद, राज्यासन] विजई-विजयी. (४८२)

द्रोणाचार्यांबद्दल महत्व पाहून स्वतःला भीतीचें करूं नकोस. भीष्माचार्य जे त्यांचेंही भय धरूं नकोस व त्या वीर कर्णावरही पण. परजणें (=वाढविणें सरसी) तिखट धारेचें तें कां बरें वापरूं का तीक्ष्ण शस्त्र कसें परजूं (चालवूं) का त्याजवर (धनुष्यास) बाण (लावून) कसें सोडूं? असेंही पण म्हणूं नकोस. (४७३)

जयद्रथावर कोणते उपाय योजावेत व आणिकही जे प्रख्यात नामांकित असे नांवाजलेले योद्धे आहेत त्यांनां जिंकण्यास काय करावें, कोणते उपाय योजावेत याबद्दल तूं चिंता करीत बसूं नकोस-तुझ्या चित्तानें याबाबत कांहींच चिंतूं नये. (४७४)

ते एक एक का ते सर्व जसे का चित्रामधील रिकामे सांपळेच (=सिंहाडे) तसे मानावेत; व उजू बोलांनीं ते पुसून घ्यावेत. चित्र जसें ओल्या पोतेऱ्यानें पुसून घ्यावें तसें. (हाडाचे सांपळे दरीमध्यें वाजणारे, तेथें भूतनाथ हाच स्वामी तेथीलचें भय घेऊं नकोस.) (४७५)

व आतां यावर हे पांडवा! कशाचा तो बरें! युद्धाचा, जुंझाचा मेळावा का शत्रूचीं सैन्यें ती! हा सर्व आभासच आहे असें जाण व तो सर्व तुला सांगितल्याप्रमाणें पुसून घे. बाकी सर्व कांहीं म्या आवरिलेलें, ग्रासिलेलें आहेच आहे. (४७६)

जेव्हां तूं त्यांना पाहिलेस तेव्हांच ते माझ्या वदनामध्यें पडते झाले व तेव्हांच त्यांचें आयुष्य सरलें; आतां रीतसर चालणें म्हणजे युद्धास उभें होऊन त्यांना जिंकणें तें सोपेंच आहे. कणाशिवाय सोपटें जशीं रिकामीच तसें आतां हे वीर आहेत. (तूं पाहिलेस तेव्हांच ते माझ्या वदनामध्यें पडलेले होते व तेव्हांच कीं मुळी त्यांचें आयुष्य संपलेलें तें.) (४७७)

म्हणून (तूं) आतां पुढें हो, तयार हो, सज्ज हो: तुझ्या शत्रूंनां तर मी नाहींसें केलें आहे व आतां तूं त्यांचा निःपात कर–अरे! नाथिलिया म्हणजे उगीच लटक्या श्रमानेंच कीं जसे शोक करीत बसणें तें आतां करूं नकोस. व्यर्थतेच्या अशा मिथ्यत्वाच्या शोकांत फसूं नकोस. (४७८)

स्वतःच, स्वयं जें तेंचमुळीं नेम मारण्याचें निशाण केलें, तो आडखिळा जसा का कौतुकानेंच (जसा) बाणानें विंधून पाडावा–एक आडखिळ करावी ती जशी विंधून पाडण्याचें कौतुकच एक त्याप्रमाणें हे अर्जुना! तुझें ह्या वेळेस निमित्तच एक जसें, तसें असणें आहे. चेंडू लगोरीच्या खेळामध्यें एकावर एक दगड वगैरे रचून लगोरी मांडावी, असा जो कांहीं खेळ मुलें खेळतात व मग चेंडूनें नेम धरून ती पाडावी त्याप्रमाणें येथें तुझें तें तसें निमित्तरूपच एक होय; एरव्हीं हा सारा माझाच खेळ व तेथें तूं निमित्तच एक तो खेळ पुरता होण्यास कीं. (४७९)

हे बाप्पा अर्जुना, जे कोणी म्हणून विरुद्ध झाले–शत्रुपण घेऊन बसले, ते तर उपजल्या उपजल्याच वाघानें (नेले गेले) नेल्याप्रमाणें झाले; तेथें यज्ञ, दान, तप यांचाच मुळीं त्यांनीं त्याग समजून उमजून पुरुषच हरविला म्हणून आतां येथें भोगैश्वर्य संपत्ति हीच राज्य करूं लागत आहे व हेंच यश तूं भोगणारा हो! (४८०)

अगदीं बरोबरीचे करून जे दायाद, भाऊबंद जबाबदार का वारसदार मत्त झाले होते, ते तर ह्या जगामध्यें अति बलवान होऊन होते; त्याचप्रमाणें जे दुर्मद म्हणजे अति दुष्टपणाचा का मत्तपणाचा असाच एक हट्ट किंवा बाणा घेऊन चालत असलेले ते, हे बापा! स्पष्टपणें हातखंडा, असें सर्व आतां अगदीं सहजच (कांहीं सायास कष्ट न पडतां) सहजासहजींच ते सर्व वधिले गेले आहेत. (४८१)

असल्या ह्या गोष्टी हे किरीटी! ह्या विश्वाच्या (वाक्पटु म्हणजे बोलण्यांत कुशल अशांच्या ठायीं) वाक्यरूपी (म्हणजे संपूर्ण अर्थवाहक पदसमूह, पटावर वाणीरूपी) पटावर (वाक्रूपी, भाषणरूपी का वेदभाग रूपी पटावर) लिहून घाल व विजयी होच हो–विजयी होईं!!! (४८२)

**संजय उवाच :—**

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥**

केशवस्य एतद् वचनं श्रुत्वा = श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून. कृतांजलिर्वेपमानः किरीटी = हात जोडून असलेला असा, (सर्व देह अगदीं कांपत आहे. कंपित होत आहे) कापरेंच भरलें आहे ज्याच्या अंगांत, असा अर्जुन : भूयः नमस्कृत्य = पुन्हः पुन्हःच मुळीं श्रीकृष्णास नमस्कार करीत करीत : सगद्गद भीतभीतः प्रणम्य = सगद्गदित अंतःकरणाचा असा तो त्यानें भीत भीत श्रीकृष्णास नमस्कार केला. कृष्णं एव आह = व पुढें दिल्याप्रमाणें बोलूं लागला. तो श्रीकृष्णास म्हणाला कीं—

अन्वय :—एतद् । केशवस्य वचनं श्रुत्वा । कृतांजलिः (बद्धांजलिः) । वेपमानः । किरीटी । भूयः नमस्कृत्य । सगद्गदं । भीत भीतः प्रणम्य । कृष्णं एव आह ॥ ३५ ॥

अर्थ :—ह्या प्रमाणें श्रीकृष्णाचें बोलणें ऐकल्यावर तो किरीटी, हात जोडून असलेला असा, सर्व अंग कांपत असलेला त्यानें भगवान श्रीकृष्णाला पुन्हः पुन्हः नमस्कार केला व अपूर्व अशा सगद्गदीत अंतःकरणाचा होऊन त्यानें असें म्हटलें कीं,

**संजय उवाच :—**

**(एतद्) ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्णा मनोरथा ।**
**संजयो सांगे कुरुनाथा । ज्ञानदेव म्हणे ॥ ४८३ ॥**

(वचनं) मग सत्य लोकौनि गंगाजळ । सुटलेया वाजत खळाळ ।
तैशी वाचा विशाळ । बोलता तया ॥ ४८४ ॥
नातरि महामेघाचे उमाळें । घडघडिती येकेवेळें ।
का घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धी जैसा ॥ ४८५ ॥
(केशवस्य) तैसे गभिरे महानदे । हे वाक्य श्रीविश्वकंदे ।
बोलिले अगाधे । श्रीविश्वरूपे ॥ ४८६ ॥
(किरीटी) ते अर्जुनाचे मोटके (श्रुत्वा) आईकिले । (वेपमानः) आणि सुख कीं भय दुणावले ।
हे नेणो परि कांपिन्नले । सर्वांग तयाचे ॥ ४८७ ॥
सखोलपणें वळली मोट । (कृतांजलि) आणि तैसेचि जोडले करसंपुट ।
(नमस्कृत्वा) वेळोवेळा ललाट । चरणीं ठेवी ॥ ४८८ ॥
(सगद्गदं) तेवीचि कांहीं बोलों जाये । तंव गळा कोंदाटला आहे ।
हे सुख कीं भय होये । हे विचारा तुम्हीं ॥ ४८९ ॥
परी तेव्हां देवाचेनि बोले । अर्जुना ऐसे हे जाले ।
म्यां (मी, मिया) पदावरूनि देखिलें । श्लोकाचिया ॥ ४९० ॥
(भीत भीत) मग तैसेचि भेणं भेणं । (प्रणम्य) पुढती नमस्कारुनि चरण ।
(भूय एवाह कृष्णं) मग म्हणें जी आपण । ऐसे बोलिलेति ॥ ४९१ ॥

अपूर्णा–अपूर्ण=विफल, मोकळा, निराशतेचा, निरर्थक, निरुपयोगी. मनोरथ=इच्छा. संजयो–संजय. ज्ञानदेव–ज्ञानदेवो. (४८३) सुटलेया–सुटलिया. वाजत–वाजति–वाजती. विशाळ=गंभीर. (४८४) घडघडिती–घडघडित=घडघडाट. घुमघुमिला=दणाणला. क्षीराब्धी–क्षीरार्णव. (४८५) हे वाक्य–तये वाक्यें. महानादें=उत्साहयुक्त शब्द जो का तेज गर्जनाच एक असें वाक्य जें कां वाक्यें जीं : बोलिले–बोलिली. श्रीविश्वरूपे–श्रीअनंतरूपें. (४८६) मोटके=थोडेंसें. नेणो–नेणिजे. (४८७) कोंदाटला आहे–बुझलाचि ठाये=भरभरून आहे (गळा) दाटून आला आहे. ते–हे. (४८९) देवाचेनि–देवाचिये. ऐसे हे जाले–हे ऐसे जाले. म्यां–मिया, मी. (४९०) तैसेचि–तैसाचि. भेणं भेणं–भेणे भेणे. नमस्कारूनि–जोहारोनि–जोहारूनि. चरण–चरणें. आपण–आपणे. (४९१)

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं अशी ही सर्व कथा त्या अपूर्ण मनोरथ–निरर्थक का विफल इच्छा ज्याची झाली आहे अशा कुरुनाथास–राजा धृतराष्ट्रास संजय सांगत आहे. (४८३)

तेव्हां कसें झालें म्हणावें तर ज्याप्रमाणें सत्यलोकीहून गंगेचें पाणी सुटावें व तें आपला खळाळ बरोबर घेऊन आलेलें असावें त्याप्रमाणें श्रीकृष्णाचें बोलणें होत असतांनां वाचा ही आपलें महत् विशालपण–गंभीरपण घेऊन होती. (४८४)

याहीवर तेथें कसें झालें–त्या दृष्टांताचें का उपमेचें कौतुक तें कसें म्हणावें तर जसें (का मेघाचा घडघडाट) महा मेघाचे उमाळे अगदीं एकाच वेळेस घडघडून यावेत किंवा जसा का क्षीरसमुद्र मंदराचळानें घुमघुमिला व्हावा, का दणाणला जावा, तसें तेथें श्रीकृष्णाचें बोलणें होत असतांनां वाचा ही महत् विशालपण घेऊन होती. (४८५)

अहो! त्या वेळेस त्याप्रमाणें गंभीर अशा महानादानें तीं वाक्यें किंवा तें वाक्य त्या (विश्वकंदानें) अगाध अशा श्रीविश्वरूपानें बोलिले– [ त्या अगाधतेच्या श्रीअनंतरूपांनीं–, विश्वकंदच ते त्यांनी, तें वाक्य किंवा तीं वाक्यें बोलिलीं; तेथें ते गंभीरपण किंवा महानादाचें तें वाक्य (का तीं वाक्यें) तेंच जसें क,

अगाधतेनें असलेलें (विश्वकंदच असें अगाध) विश्वरूपच एक, अहो! 'वाक्य कसें तर–गंभीर पण महानाद, वाक्य विश्वकंद, अगाध, विश्वरूप, अनंतरूप हीं सर्व पदें जशीं एकत्रित असलेलीं तेथें त्यांनां निराळेपणाचें करतांच मुळीं येत नाहीं, असें तें वाक्य' ] (४८६)

तें अर्जुनानें उगीच थोडेसें ऐकिलें, तेथें त्यास सुख झालें का भयच एक उभें झालें; तें दुपटीचें झालें का भीती सोसावी लागली कां ठकासि ठक पडले, तें कांहीही आम्ही जाणत नाहीं; तें तुमचें तुम्हींच जाणा. पण एवढें मात्र खरें कीं, त्याचें सर्व आंग (कंपिन्नले) कंपित होत होतें–कांपत होतें. (४८७)

सखोलपणामुळें तर तेथें त्याच्या आंगची तर मोटच वळली गेली–त्याचें करसंपूट जोडलेलेंच होते व तो वेळोवेळीं आपलें डोकें त्या विश्वरूपाच्या चरणीं ठेवीत आहे असें तेथें होत होतें. (४८८)

तसेंच अहो तेथें त्यानें कांहीं बोलूं जावें तर त्याचा गळाचमुळीं भरून–दाटून आलेला व्हावा. तेथें मग त्यास काय होत होतें,–त्यास सुख वाटत होतें का भयच एक दुपटीचें तें त्यास वाटत होतें हें आपणच आतां विचारास घेऊन पहावें, कसें तें–सुखाचें असें का भयाचें असें, तें तुम्हींच मुळीं त्या विचारावरून पाहा का ठरविण्याचें करा कीं अहो! (४८९)

परंतु तेव्हां, श्रीदेवांच्या बोलण्यानें अर्जुनास असें हें झालें, हें श्लोकांच्या पदावरून कीं अहो! पाहाण्यास मिळालें, कसें तें 'कृतांजलिर्वेपमानः, भूय एव, नमस्कृत्वा, सगद्गद्, भीत भीतः, प्रणम्य',– (४९०)

मग तसेंच भीत भीत तो तसाच भेणं भेणं –पुन्हः पुन्हः त्यांचे चरणास नमस्कारून बोलिला, अहो! जी तुम्ही आपण स्वतः असें बोलिलेती–बोलिले आहांत कीं श्रीदेवांचे चरण त्यानें जौहारिले म्हणजे वंदन केले, चरणाचें दर्शन घेतलें व म्हणूं लागला कीं, अहो देवा! तुम्ही आपले आपणच स्वतः (आपण होऊन) असें बोलिलेत–बोलते झालांत (बोलिले आहांत) कीं—, आपण बोलिलेत; सांगणें केलें; म्हटलेंत, व्यक्त केलें, स्तविलें, वर्णिलें–अर्थतः दर्शविलें कीं— (४९१)

**अर्जुन उवाच :—**

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥**

स्थाने=अहो, हें योग्यच आहे कीं, तवप्रकीर्त्या जगत् प्रहृष्यते अनुरज्यते च=तुमचा लाभ, गुण, प्रभाव, कीर्तन, तुमची कीर्ति ऐकून जग आनंदावर आनंदतें व तें त्या तुमच्या स्वरूपावर लुब्ध होऊन पुन्हः पुन्हः अनुरंजनाचें, करमणुकीचे होऊन आहे, करमत नाही असे जे कांहीं तेंच आतां रंजनात्मक असें तें देवस्वरूपावर अनुरक्त होऊन राहिलें आहे. रक्षांसि भितानि दिशोद्रवंति=भ्यायलेले रक्षोगण देशोधडी होऊन जात आहेत, ते प्रवाही होऊन दशदिशांना पळत आहेत (–ते वेगास येऊन पाझरत आहेत, प्रवाही होत आहेत) सर्वे सिद्धसंघाः नमस्यंति=सिद्ध संघ ते सर्व तुम्हांस नमस्कार करून आहेत.

अन्वय :—स्थाने। हृषीकेश। तव प्रकीर्त्या। जगत्प्रहृष्यति। अनुरंजते च। स्थाने। रक्षांसि-भीतानि। द्रवन्ति दिशः। सर्वे सिद्धसंघाः नमस्यंति च ॥ ३६ ॥

अर्थ :—हें योग्यच आहे कीं तुमच्या कीर्तीनें गुणानुवादानें हें जग नाम, यश, गुण, गायनाचें होऊन तें आनंदाचें होत आहे तें तुमच्या स्वरूपावर लुब्ध होऊन आहे–भ्यायलेले रक्षोगण ते वेगास येऊन दशदिशांना प्रवाही होऊन जसे का पळतच आहेत. सर्व सिद्धसंघ तुम्हांस नमस्कार करीत आहेत ॥ ३६ ॥

अर्जुन उवाचः—

(स्थाने हृषीकेश) नातरि अर्जुना मी काळ। आणि ग्रासिजो तो माझा खेळ।
हा बोल तुझा कीर अढळ। मानूं जी आम्ही ॥ ४९२ ॥
परि जी तुवांचिजी काळे। आजि स्थितिचिये वेळे।
ग्रासिजे ते न मिळे। विचारासी ॥ ४९३ ॥
कैसेनि आंगिचे तारुण्य काढावे। कैचे नव्हे ते वृद्धाप्य आणावे।
म्हणोनि करूं म्हणसी ते नव्हे। बहुती परी ॥ ४९४ ॥
हां जी चारी प्रहर न भरता। कोणेही वेळे श्रीअनंता।
काई मध्यान्ही सविता। मावळतु आहे ॥ ४९५ ॥
(तव प्रकीर्त्या) पै तुज अखंडिता काळा। तिन्ही आहाती (जी) वेळा
त्या तिन्ही सबळा। आपुलालिया समई ॥ ४९६ ॥
ज्यावेळी होऊ (हो) लागे उत्पत्ति। ते वेळी स्थिति प्रळय हारपती।
आणि स्थिति काळी न मिरविती। उत्पत्ति प्रळय ॥ ४९७ ॥
पाठि प्रळयाचिये वेळे। उत्पत्ति स्थिति मावळे।
हे काईसेनिहि न ढळे। अनादि ऐसे ॥ ४९८ ॥
म्हणौनि आजी तरी भरे भोगे। स्थिति वर्तिजत असें जगे।
येथ ग्रासिसी (तूं) हे न लगे। माझ्या जीवी ॥ ४९९ ॥
तंव संकेते देव बोले। अगा दोन्ही सैन्यासीचि भरण पुरले।
ते प्रत्यक्षचि तुज दाविले। येर यथा काळे ॥ ५०० ॥
हा संकेत जंव श्रीअनंता। वेळ लागला बोलता।
तंव लोक अर्जुने मागुता। देखिला यथास्थित ॥ ५०१ ॥
(जगत् प्रहृष्यति)—मग म्हणतसे देवा। तूं सूत्री विश्व लाघवा।
जग आला मा आघवा। पूर्व स्थिती (पुढती) ॥ ५०२ ॥
परि पडिलिया दुःख सागरी। तूं काढिसी का जियावरी।
ते कीर्ती तुझी श्रीहरी। आठवितसे ॥ ५०३ ॥
कीर्ती आठविता वेळोवेळां। भोगीतसे महासुखाचा सोहळा।
तेथ हर्षामृत कल्लोळा। —वरी लोळतसे ॥ ५०४ ॥
(अनुरज्यते च) —देवा जियालेपणें जगु। धरी तुझ्या ठायीं अनुरागु।
आणि दुष्टा तया भंगु। अधिका अधिक ॥ ५०५ ॥
(रक्षांसि भीतानी दिशो द्रवंति)—
पै त्रिभुवनीचिया राक्षसा। महाभय तूं श्रीहृषीकेशा।
म्हणोनि पळताति दाही दिशा। पैलीकडे ॥ ५०६ ॥
(सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः)—
येर सुर नर सिद्ध किन्नर। किंबहुना चराचर।
ते तुज देखोनि हर्ष निर्भर। नमस्कारी असती ॥ ५०७ ॥

ना—नातरी. बोल=बोलणें, ईश्वरी लीलेचें अद्भुतपण. कीरे—कीर, (देवदिव्य). आढळ—अढळ= स्थिर, निश्चित, अढळ सौभाग्याचे जसें. मानू—मानूं जी. (४९२) जी तुवांचि—तुवांचि जी. स्थितीचिये

वेळे=प्रळयाचा समय नसतांना. ते–ते हे न मिळे=पटत नाहीं. (४९३) कैसेनि–कसेनि. कैचे नव्हे ते–कैसेनि नव्हते. वृद्धाप्य=वार्धक्य. बहुतीपरी–बहुतकरूनि (४९४) चारी प्रहर–चौपाहारी=दिवसाचे चार प्रहर. काई–काय. मध्यानीं–माध्यान्हीं. मावळतु–मावळुतु. (४९५) वेळा–जी वेळा. तिन्ही–तिन्ही परी. आपुलाला–आपुलालिया. (४९६) होऊ–हो. (४९७) काईसेनिहि–कायसेनही. (४९८) तरी–तरी तंव. असे–आहे. हे तूं हे (४९९) देव बोले–देव म्हणे भले. अगा–अगा या. सैन्यासीची भरण पुरले–सैन्याचें मरण पुरलें (भरण, पोषण आयुष्य संपलें) काळे–काळे जाण. (५००) लोक अर्जुने–अर्जुने लोक. यथास्थित–यथास्थिति. (५०१) जग–देव जग, जग देव, देव दिव्य, दिव्य देव (जगदळे–गजदळे–पुल्लिंग जगदेव) पूर्वस्थिति–पूर्वस्थिति पुढती. (५०२) जियापरी–जयापरी. आठवितसे–आठवित असे. (५०३) लोळतसे–लोळत आहे. (५०४) जगु–जग. धरी–धरितु. तुझ्या–तुझिया. दृष्टांतया–दुष्टातया. भंगु–भंग. अधिका–अधिक–अधिकाधिक. (५०५) येर–येथ येर. चराचर–हे चराचर. नमस्कारी–नमस्कारित. (५०७)

(अर्जुनाच्या मुखानेंच देव म्हणाले कीं— )

मी काळ आहें व ग्रासणें हा माझा खेळ आहे : असें तें ईश्वरी लीलेचें अद्‌भुतपण–त्याबद्दल आपण बोलिलांत, तें दिव्य देवतांतरी पण मानत आहे–असे ते देव–लीलेचे अद्‌भुत रहस्य हें स्थिर असें निश्चित-पणाचें होय तेथें जसें ती लीलाच मुळीं आपल्या अद्‌भुतपणानें नटलेली व त्या बोलास अढळ सौभाग्याचे केलें जसें, ते बोल देवहीपण मानतात आम्हींही देव तसेंच तें आहे, असें मानतों. (४९२)

ईश्वरी लीलेच्या अद्‌भुतपणावरच अर्जुन विचारतो आहे कीं,

परंतु तुम्हीं विश्वरूपांतर्गत जे सर्व काळ त्याची, अशा स्थितीचे वेळेस, म्हणजे कांहीं एक प्रळयाचा समय नसतांना, तेथें स्थितीच मुळीं—विश्वस्थैर्य आहे–विश्व हें स्थितीनें आहे.—यावयास पाहिजे होती ती न होतां प्रवृत्ति जे का विश्वाचा का जगताचा ग्रासच एक सर्व करावा, हें कांहीं विचारासच मुळीं पटत नाहीं, अशा ह्या विचाराची, व 'स्थितीच्या वेळे ग्रासिजे' ह्याची मिळणी कांहीं बरोबर होत नाहीं ती विचारास पटत नाहीं. (४९३)

अहो! कसें तें अंगचें तारुण्य काढावें–कसास लावून जसें कां तें अंगचें तरुणपण काढून टाकावें, अथवा नव्हतेंच असें तें, का नव्हे असें तें वृद्धाप्य कैसें आणावें ? या कारणास्तव जें कांहीं करूं म्हणावें तें परोपरीनें पुष्कळदां (बहुवस करून अनेक तऱ्हांवरही–का तऱ्हांनींही) होतच नाहीं. (४९४)

अहो, दिवसाचे चार प्रहर न भरतां हे श्री अनंता केव्हांही सूर्य तो कांहीं माध्यान्हींच मावळणारा केव्हांहीं नाहीं (रात्र नच होणारी कीं,) अहो! मध्यान्हींच काय दिवसाचें चार प्रहर न भरतां सूर्य मावळतो ? (४९५)

परंतु अखंडित काळ असे जे तुम्ही त्या तुम्हांस तिन्हीं वेळा आहेतच; त्या वेळा आपापल्यापरीनें समयाच्या सबळ अशा आहेत–, आपापल्या समयीं आपापल्या सबळपणानें असतातच–आहेतच. (४९६)

ज्या वेळेला उत्पत्ति होऊं लागते, तेव्हां उत्पत्ति व प्रळय हे मिरवत नाहींत म्हणजे आपणास्वतःस पुढें करीत नाहींत. (४९७)

पुन्हां प्रळयाच्या वेळेस उत्पत्ति व स्थिति ह्या दोन्हीं मावळून असतात (जातात) असें हें अनादि-पणाचें होत असलेलें तें कशानेंहीं पण बदलणारें म्हणजे चळणारें होतच नाहीं. (४९८)

म्हणून आज काल ह्या वेळेस तरी निदान तुमच्यावर अनुरक्त झाल्यामुळें हें जग भोगानें भरून जाऊन आहे. तेथें ह्या जगामध्यें स्थितीच एक वर्तत आहे : ह्या जगानें, स्थितीच एक वर्तविली का वागविली जात

आहे व आतां अशा वेळेस तुम्ही ग्रासावें हें कांहीं माझ्या जिवास पटत नाहीं, हे माझ्या जीवीं लागत नाहीं, तें कांहीं मला माझ्या अंगीं लागत आहे का मानवत आहे, असे होईचना!!! (४९९)

आतां यावर एका संकेतानें देव म्हणाले कीं, अथवा देवांनीं एक संकेत का बोली करून (का एका संकेतानें करारानें) बोलावें तसें त्यांनीं बोलिले कीं हें तुझें म्हणणें भलेपणाचें तर खरेंच पण एवढें मात्र जाणून ऐस कीं ह्या दोन्ही सैन्याचें आयुष्यभरण हें संपलेंच आहे. तें तुला प्रत्यक्ष दाखविलें व आतां बाकीचें जें कांहीं होणें जाणें आहे तें यथाकाळें होईलच असें समज! [संकेत करून=पुढें जें कांहीं होणारें आहे त्याचा संकेत चिन्ह-खूण ते पूर्वीं बोलिलेले (व आतां सांगितलेले) त्यामधीलचें अंतर; प्रियकराच्या भेटीसाठीं ठरविलेले स्थळ, असा इशारा का बोलीच ती. सांकेतिक=ठरलेले, खुणेचे, ठरविलेले, मानलेले. संकेत=करार, बोली, प्रियकराच्या भेटीसाठीं ठरविलेलें स्थळ; अट, शर्त, ठराव, नियम, खूण, इशारा.] (५००)

असा हा संकेत बोलतां बोलतां त्या श्रीअनंतांनां वेळच लागला व आतां तर अर्जुनानें ह्या लोक जसा होता तसाच-, (ज्या स्थितींत होता त्याच स्थितींत योग्यरीतीनें आहे-) यथास्थित आहे, असा पाहिला. (५०१)

अर्जुन म्हणाला कीं, अहो देवा! तुम्हीं ह्या जीवन, सूत्र, नियम, कळा मध्यें असून ह्या विश्वांत ह्या विश्वसूत्र सर्वस्वामध्यें लाघवीपणानें असल्याकारणानें हें सर्व जग आपल्या पूर्व स्थितीसच येऊन आहे-जसें होतें तसेंच आहे. विश्वलाघवीपण हेंच ह्या जगास सर्वतोपरी लाघवीपणाचें असेंच तें सूत्र आपले हातांत असल्यानें आतां पहावें तों काय तेथें सूत्रधार असे तुम्ही विश्वलाघव अघवेपणानें हें जग, पुन्हां पूर्व स्थितीस आणूं आलांत कीं, [जसें का गजगजित अन्नाचा खुराकच ह्या जगास मिळाला आहे व त्यामुळें ह्या जगाचें पोटच कीं गजगजित असें भरलें आहे, जग-देवच समाधान अन्नानें लाभला. मग म्हणतसे देवा। तूं सूत्री विश्व लाघवा। जग आला मां अघवा। पूर्वस्थिति पुढती॥ (जग=आकार, गज,)

न्याहाळी पा केवढा। पसरो लागतसे जबडा।
पोकरूनियां माजिवडा। आकार जगा॥ अ. १३/६४
कैसे एकचि केवढे पसरले। त्रिभुवन जिव्हाग्री असे टेकले।
जैसे कां कविठ घातले। वडवानळी॥ ४३३ अध्या. ११वा.] (५०२)

पण दुःखसागरामध्यें पडल्यावर तुम्हीं ज्या कांहीं आकारानें ह्या जगास दुःखाबाहेर काढतां ती तुमची (नाम गुण प्रभात कीर्तन) कीर्ति हे श्रीहरी! मी आठवीत आहें. (५०३)

अशी ती कीर्ति नामावरच आठविली जाणारी किंवा तुमच्या गुणांवर लुब्ध झालेली का नाम प्रभावानें स्थितीस येणारी अथवा कीर्तनानें आनंदास पाहाणारी ती वरचेवर आठविली असतां महासुखाचा सोहळाच तेथें भोगण्यास मिळत असून हर्ष का आनंदरूपी अमृत उसळया घेत असणारे अशा त्या अमृतानंदाच्या लाटांमध्यें मी लोळत आहें असा तेथील सोहळ्याचा प्रभाव वर्णन करणें ही अशक्य कोटीच एक. कारण ह्या भक्तिबीजानें ते देवपण अनंतरूपांनीं नटलें असल्यानें तेथें सोहळा तो अति उच्च अशा प्रभावाचा होय. (५०४)

देवा! जीवित्वास आलेले का जीवन प्रेमास आलेलें हें जीवित (जीवित्व-हे) जग तुमच्या ठिकाणीं अतिशयतेनें अनुरक्त होऊन आहे- (असतें) आणि हें पाहाणारा जो द्रष्टा त्याचा भंगच एक अधिकअधिकतेनें होत असलेला असतो. येथें भंगु तो म्हणजे ह्या व्यापकत्वानें जसें कांहीं एकाद्या वृक्षाच्या आकारासच येणें जसें. तेथें अनुराग हा अधिकतेनें ह्या जीवन कलेसच जीवन देणारा किंवा जे दुष्ट असे रिपू त्यांचा मानभंग अधिकाधिक असाच होत असणारा होतो. (५०५)

परंतु त्रिभुवनामधील ही राक्षसांना अहो ! हीं पंचमहाभूतें मोठींच मोठीं कामें करणारीं रक्षोगण म्हटलेलीं तीं अशीं हें ह्या पंच प्रभावावरून समजणारें असें जरी तरी पण येथें (तुमच्या ठिकाणीं त्यांचें प्रेम नसल्यानें) तुमच्या भयामुळें त्यांनां पळतां पळतां भुई थोडी होऊन असते असें अहो ! हे श्रीहृषीकेशा ! तुम्ही त्यानां महाभयच होऊन आहांत आणि म्हणूनच तर ते दाही दिशांच्या बाहेरच मुळीं पळूं लागतात–पळून जातात; रक्षोगण हे भीतीनें पघळपण घेऊन प्रवाही होऊन ते दिशांच्याही पलीकडे पळत सुटतात प्रवाही होऊन चार चोहोंकडे पळून जात आहेत. (५०६)

दुसरे जे देवयोनी भेदांमधील सुर व नर सिद्ध व किन्नर एवढेच नव्हे तर हे सर्व चराचरही तुम्हांस पाहून अतिहर्षित, मुदित का आनंदित होऊन तुमच्यापुढें हात जोडून उभे आहेत व किंबहुना चराचरासहित देव भेद योनी–देवयोनी भेदाचे जे ते तुम्हांस नमस्कार करीत आहेत. (५०७)

**श्लोक ३७ वा**

**कस्माच्च ते न नमेरन् महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादि कर्त्रे ।**
**अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

महात्मन् = (महत् + आत्मा यस्य महा आत्मा यस्य–आत्म महत्तत्व महति–आत्म महा–हे महात्मन् = हे थोर पुरुषा. गरीयसे ब्रह्मणोऽप्यादि कर्त्रे कस्माच्च ते न नमेरन् = ब्रह्मणः ब्रह्मदेवापेक्षांही आदिकर्ता अशा श्रेष्ठत्वानें असलेले जे तुम्हीं त्या तुम्हांस कां बरें नमस्कार करणार नाहींत–ते तुम्हांस कां बरे ते नमून असणार नाहींत, त्यांनीं नमून असावेंच असावें, हें बरें असें तुमचें श्रेष्ठत्व आहे, असा तुमचा प्रभाव आहे. हे अनंत ! हे देवते ! हे जगन्निवास ! हे श्री अनंता हे श्री नारायणा ! हे देवेशा ! देवाधिदेवा ! हे श्रेयच जें एक ह्या सतां गतीचे. (सद्सत् तत्परं अक्षरम् यत् =) सत् व असत् ह्या दोहींच्याहि पलीकडील जें पर म्हणजे श्रेष्ठ असें अक्षर ते तुम्हीं आहांत.

अन्वय —(१) महात्मन् । देवेश । जगन्निवास । त्वम् । सत् असत् परं अक्षरम् । त्वम् ब्रह्मणः अपि गरीयसे आदिकर्त्रे कस्मात् च । न नमेरन् ॥

१२) महात्मन् कस्मात च न नमेरन् ते । ब्रह्मणः अपि आदि कर्त्रे । गरीयसे । अनंत । देवेश । जगन्निवास । यत् त्वम् । सत् असत् परं । अक्षरम् ॥ ३७ ॥

अर्थ :—

हे कृपावत्सला उदारा, सर्वापेक्षां ज्ञान, बल, ऐश्वर्य, यांनीं परम श्रेष्ठ आणि सृष्टीचा आदिकर्ता असे जे ब्रह्मदेव त्यांपेक्षांहि श्रेष्ठ म्हणजे त्या ब्रह्मदेवालाहि उत्पन्न करणारे असे आपण श्रेष्ठ, महान् आत्मा जे तुम्हीं त्या तुम्हांला ते सिद्धादिक सर्व ते तर केव्हांहि तुम्हांला नमस्कार करणारे होत; ते कां बरें तुम्हांला नमस्कारच करणार नाहींत? अहो ! त्यांनीं तुम्हांस नमस्कारून असावेंच असावें. हे आदिमध्यांतरहिता ! श्रीअनंता ! हे श्रीदेवाधिदेवा ! हे जगन्निवासा ! तुम्हीं तर सत् व असत् जें अविनाशी तत्व त्यांहि पलीकडचे श्रेष्ठ असे अक्षर आहांत, ब्रह्म आहांत ॥ ३७ ॥

(श्लोक ३७ वा ओ. ५०८–५१४)

**(कस्मात् च ते न नमेरन्)**
**येथ गा कवणा कारणा । राक्षस हे तुज श्रीनारायणा ।**
**न लगतीचि चरणा । पळते जाले ॥ ५०८ ॥**
**आणि हे तूंते काय पुसावें । येतुले आम्हासिही जाणवे ।**
**तरी सूर्योदयी राहवे । कैसेनि तमे ॥ ५०९ ॥**

**(महात्मन्) जी तूं स्वप्रकाशाचा आगर। आणि जाला आहेसी गोचर।**
**म्हणोनी निशाचर केर ॥ फिटला सहजे ॥ ५१० ॥**
**(गरीयसे) हे इतुके दिवस आम्हां। नेणवेचि कांहीं श्रीरामा।**
**आतां देखतसो महिमा। गांभिर्य (गंभीर) तुझा ॥ ५११ ॥**
**(ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे)**
**जेथुनि नाना सृष्टीचिया वोळी। पसरती भूतग्रामाचिया वेली।**
**तया महत् ब्रह्माते प्रसवली। दैवकी इच्छा ॥ ५१२ ॥**
**(अनंत देवेश) देव निस्सीम गुण अनंत। देव निस्सीम सत्व सदोदित।**
**देव निस्सीम सम साम्य सतत। नरेंद्र देवाचा ॥ ५१३ ॥**
**(जगन्निवास)**
**जी तूं त्रिजगतिये वोलावा। (त्वमाक्षरंसदसत्तत्परंयत्) तूं अक्षर सदाशिवा।**
**तूंचि संतासंत देवा। तयाही अतीत तूं ॥ ५१४ ॥**

तुज–तुझिया. कवणा कारणा=(पंचकारणा) देवता, यातना, शरीर, अविद्या, प्रेरणा. [(कवण, कवणाः) कवर=मिश्रित, जडीव, चित्रवर्ण, बुचडा, वेणी, आख्याता, मीठ, आंबटपणा, तिळवण, हिंगुपत्री, वेणी, साळुंकी. कारणं=(१) कारण (२) हेतु, फल. (३) साधन (४) उत्पादक (५) मूलतत्व (६) (सा०) संविधानक. (७) इंद्रिय (८) शरीर (९) पुरावा, प्रमाण, (१०) क्रिया (११) पूर्ववासना (१२) संकरजाति वि. (१३) देवता (१४) वध (१५) वाद्यविशेष (१६) लेखक समुदाय (१७) प्रतिवादीचें उत्तर. (स्त्री.) (१) क्रिया (२) प्रेरणा (३) यातना, नरकपीडा. कारणं=सूक्ष्मभूतें किंवा परमाणु.] यक्षरक्षोगण–राक्षस=पंचमहाभूतें–पंचदेव (अचाट कर्मदंडिलें). राक्षस=राक्षसाचे (१) पिशाच, (२) विवाहभेद (बळेंच कन्या पळविणें) (१) राक्षसी (२) मोठा दांत, मोठा दाढा (३) रात्र (४) चंडिका (५) चोर ओंवा. तुज–तुझिया=त्वदीय, युष्मद, तुझा. त्वत्=निराळे. त्वंकार=एकेरी अरे तुरे बोलणें. तुज न लगतीचि चरणा=तुजला न नमस्कारितां, तुझिया चरणास न लागतां, तुजला वंदन न करतां. ( तुज=हिंसा करणारे, (१) हिंसा करणें, (२) समर्थ होणें (३) प्रकाशणें (४) घेणें (५) वास करणें. ) जाले–जहाले. (५०८) तूंतें काय–काय तूं तें. राहवें–राहावें. (५०९) जाला–जाहाला. आहेसी–आहासी–आम्हांसी. म्हणोनि–म्हणोनियां. निशाचर–निशाचरां. केर–केरू. (५१०) इतुके–येतुले.. नेणवेचि कांहीं–कांहीं नेणवेचि. श्रीरामा=विष्णूचा सातवा अवतार, धनुर्धारी, दशरथ व कौसल्या यांचा पुत्र. यांनीं शिळारूप झालेल्या अयोध्येचा उद्धार केला. एक वाणी, एक पत्नी म्हणून प्रसिद्ध, अत्यंत नीतीमत्तेनें राज्य केलें, ह्यांचे राज्यांत अकालीं मरण, स्त्रियांना वैधव्य, चोर, अग्नि इत्यादींची भीती नव्हती. दुष्काळ, महापूर इत्यादि अनर्थ यांच्या राज्यांत अगदीं बंद होते–यांनीं अश्वमेधादि अनेक यज्ञ केले. देखतसो–देखतसे. गांभिर्य–गंभीर=गांभिर्य=खोली, गंभीरपणा, महिमा प्रभाव, रूप, विभूति अश्वमेधांतील उखळीसारखे सुवर्ण व रुप्याचें पात्र, अष्टसिद्धितील एक सिद्धि–हवें तितकें मोठें होतां येतें. गंभीर=खोल बुद्धीचा, गंभीर, गुप्त, गच्च, निबिड, गहन, खोल. उचकी (गंभीरवेदिन्=अडेल हत्ती) : गभीरिका=नगारा : तास वाद्य, वोली=पंक्ती , ओळी. वेली–वेळी. महत् ब्रह्मातें=मायेस, महत्तत्वास, महत् ब्रह्मातें. प्रसवली=व्याली. दैवकी–दैविकी. (५१२) देव–दैविक, तेजस्वी, देव, पर्जन्य, देवता, इंद्र, राजा, परमात्मा धर्म, पति, पारा, इंद्रिय, ब्राह्मणाच्या नांवांतील उत्तरपद जसें ज्ञान+देव=ज्ञानदेव. देव निस्सीम गुण अनंत=देव पूर्णपणें अनंताच्या गुणाचा. –विष्णु, शेषनाग, शंकर, कृष्ण, बलराम; देव निस्सीम सत्व सदोदित=देव सत्वच एक पूर्णपणें उदित, असा. देव निस्सीम साम्य सतत=देव देव

साम्यच-देवतुल्यता, बरोबरी, देवसदृश, एकोपा, समवृत्ति-देवच एक नेहमीचे. सतत गति = वायु. सतत = कफ, नेहमींचें. सतत् यायिन् = विनाशी. सतत्त्व = स्वभाव, स्वरूप. नरेंद्र = नरश्रेष्ठ. नर + इंद्र इंद्र = आत्मा, जीव, ज्योत, शब्दादि पंचेंद्रियविषय, दक्षिणनेत्रस्थ देवता, आदित्यविशेष, ज्येष्ठा, अधिपति, श्रेष्ठ, परमेश्वर, देवांचा राजा इत्यादि) अनंत = अंतरहित, विष्णु, शेषनाग, शंकर, वासुकी सर्प, कृष्ण, बलराम, अभ्रक, श्रवण नक्षत्र, चौदा गांठीचा रेशमी दोरा (अनंत चतुर्दशीस हाताला बांधतात.) 'आ' हे अक्षर पृथ्वी, एक ही संख्या, खालील वनस्पति दुर्वा, आमलकी गुडुची, अग्निमंथ, श्यामलता, पिप्पली. अनंती = स्त्रियांचे डावे हातास बांधण्याचा रेशमी दोरा, आकाश, अनंतत्त्व, मोक्ष, परब्रह्म. (५१३) त्रिजगतिये-त्रिजगतीय. अक्षर = नाशरहित संतासंत-सदसत्. अतीत = मुक्त, होऊन गेलेला, त्यासही-बोलण्यास, अक्षरासही, संतासंतासही-मागें टाकणारा. (५१४)

अहो! हे श्रीनारायणा! येथ कवण तें कारण कीं, ज्यायोगें हे राक्षस तुम्हांस नच नमस्कारितां ते तुमच्या चरणांस **न लागतां** (चरणीं वास करणें, चरणीं लागल्यानें प्रकाशणें, समर्थ होणें तें न करितां) पळूनच कीं गेले? ते प्रवाहाप्रमाणें प्रवाहवाहीच होऊन वितळून म्हणजे पळून जात आहेत, गेले आहेत कीं. (५०८)

आणि हे तुम्हांस पुसायचें तें काय कीं, सूर्योदय झाल्यावर तम हें तर नांवासही उरत नाहीं, (तमानें कसचें तें मुळीं राहाणें नाहीं). असें हें एवढें आम्हींही पण जाणतोंच कीं. (५०९)

अहो जी! तुम्हीं स्वतःच्या आपल्या प्रकाशाचें माहेरघर असे ते, तुम्हीं आज मला गोचर रूपादि पंचविषय, आटोक्यांतले दृश्य, असें सुलभ स्थान झाले आहांत आणि म्हणूनच तर निशाचर केर कचरा (वोसाण) आतां सहजच नाहींसा झाला. (५१०)

इतके दिवस आम्हांस हें तर कांहींच जाणवत नव्हतेंः अहो, हे श्रीरामा! आतांच मुळीं आम्ही तो तुमचा गंभीर असा खोल बुद्धीचा गहनपणाचा महिमा, गांभिर्य अर्थपूर्ण कमल महिमा पाहात आहोंत. (इतके दिवस आम्ही नेणिवेनेंच होतों, पण आतां मात्र तो तुमचा गंभीर असा महिमा-गांभीर्य महिमा पाहत आहोत.) (५११)

तो तुमचा गांभिर्य महिमा कसा तर अनेकी-अनेक सृष्टीच्या का भूतग्रामाच्या वेलीच्या वेलीच पसरल्या आहेत. त्या महत् ब्रह्माला ती दैवकी इच्छा प्रसवलेली व्यायलेली. (५१२)

अहो! देव! निस्सीम गुण अनंत! अहो! देव! निस्सीम सत्वच एक! सदोदिततेचे! अहो! देव! निस्सीम सम! साम्यच एक! सामावलेले सततचे असे! नरांचा इंद्र म्हणजे राजा जो तोहीपण देवांचाच कीं! अहो! (नरेंद्र देवाचा = नरश्रेष्ठ तो देवाचा आपला म्हणावा कीं-देवाचा विष वैद्य, गारुडी, देवांचा राजाच कीं एक अहो!!! नर = अर्जुन, मनुष्य, पुल्लिंगी, विष्णु, जीवात्मा, घोडा, परमात्मा, शंकु, खिळा. नरअंग = शिस्न, मुरमाची पुळी.) (५१३)

अहो! जी स्वामीन्! तुम्हीं ह्या तिन्हीं जगतांना प्रेमाचा ओलावा आहांत. तुम्ही हे सदाशिवा! हे श्रीशंकरा, अक्षर म्हणजे अविनाशी आहांत! तुम्हीच कीं संत का असंत, सत् का असत् असें जे, त्याहि-पलीकडचे त्याहि अतीत, त्याहिपेक्षां श्रेष्ठ, असे तुम्हीं आहांत! (५१४)

**श्लोक ३८वा :—**

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्व परं निधानम्।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप॥ ३८॥**

आदिदेवस्त्वम्=देवांचेहि जे आदि ते तुम्ही अहांत पुरुषः पुराणः: त्वम्=तुम्ही पुराणपुरुष आहांत. अस्य विश्वस्य परं निधानं त्वम्=ह्या विश्वाची श्रेष्ठ अशी संपत्तीच तुम्ही आहांत. वेत्तासि वेद्यं च परं च धाम =तुम्हीच वेत्ता आहांत, तुम्हीच वेद्य आहांत-परं म्हणजे श्रेष्ठ असें धाम तुम्हीच आहांत. त्वया हे अनंतरूपा विश्वमनंतरूप=तुम्ही हे श्रीअनंतरूपा, हें विश्व व्यापलें आहे. तुम्ही विश्वरूपानें प्रसरण पावून आहांत, नित्य ब्रह्म असे होऊन आहांत.

अन्वय :—

हे अनंतरूप! त्वम् आदि देवः। त्वम् पुराणः पुरुषः त्वम् अस्य विश्वस्य परं निधानम्। त्वम् वेत्तासि। त्वं वेद्यं च असि। त्वं परं धामं च। त्वया विश्वं ततम् ॥ ३८ ॥

अर्थ :—

हे अनंतरूपा! तुम्ही देवांचेही आदि म्हणजे सर्व देवांहूनही श्रेष्ठ आहांतः तुम्हींच चिरंतन असणारे पुराण पुरुष आहांत. तुम्हीच ह्या विश्वाची श्रेष्ठ अशी संपत्ति-म्हणजे आधार आहांत. तुम्हीच कीं, अहो! वेत्ता (ज्ञाता) म्हणजे सर्वांनां जाणणारे आहांत. तुम्हींच वेद्य (ज्ञेय) म्हणजे जाणून घेण्याची वस्तु आहांत, श्रेष्ठ असें धाम सर्वोत्तम परम पद तुम्हींच आहांत; तुम्हींच हे श्रीअनंतरूपा, आदिमध्यांतरहित अशा रूपानें हें विश्व व्यापिलें आहे. ॥ ३८ ॥

(श्लोक ३८ वा, ओव्या ५१५–५१९)

**(त्वमादिदेवः पुरुषः पुराणः)**
**तूं प्रकृति पुरुषाचीया आदी। जी महत्तत्वाची अवधि।**
**स्वये तूं अनादि। पुरातन ॥ ५१५ ॥**
**(त्वमस्य विश्वस्य परं निधानम्)**
**तूं सकळ विश्वासी जीवन। जीवासी तूंचि निधान।**
**(वेत्तासि) भूत भविष्याचे ज्ञान। तुझियाचि हाती ॥ ५१६ ॥**
**(वेद्यं च) जी श्रुतीचिया लोचना। स्वरूप सुख तूं अभिन्ना।**
**(परं च) त्रिभुवनाचिया आयतना। आयतन तूं ॥ ५१७ ॥**
**म्हणऊनि जी परम। (धाम) तूंते म्हणिजे महाधाम।**
**कल्पांती महत् ब्रह्म। तुझिया आंगी रिघे ॥ ५१८ ॥**
**(त्वया ततमनंतरूप) किंबहुना तुवां देवे। विश्व विस्तारले आघवे।**
**तरी अनंतरूपा वर्णावे। कवणे तुज ॥ ५१९ ॥**

या– इया शिवशक्तीची, जी महत्तत्वाची–महत्तत्वातूंचि. अवधि=शेवट. पुरातन=जुना, जीर्ण जुनी गोष्ट, पूर्वीचा, आधींचा, प्रथमचा, लवकरचा, (भविष्यार्थी) (५१५) सकळ विश्वासी–विश्वां– (सकळ) विश्वजीवन. (पा. भे.) (५१६) तूं–तूंचि. आयतना=आश्रयाला. आयतन=आश्रय अभिन्ना=तोच, पूर्ण अंक, अखंड, सगळा, दाट, न बदललेला, न फोडलेला, न परीणाम झालेला (५१७) म्हणऊनि–म्हणोनि. महत् ब्रह्म=महत् तत्व, माया तुझां आंगी रिघे–तुझिया अंकी (=अभिन्नाच्या ठायीं:) रिगे–तुजमाजी रिगे (५१८) तुवां– तुवा जी. विश्व–हें विश्व. विस्तारलें–विस्तारलें आहे. वर्णावें (वागावें, वाणावें) तुज–तूंतें. (५१९)

हे श्रीअनंतरूपा, तुहींच त्या प्रकृतिपुरुषाची का शिवशक्तीचें आदि म्हणजे मूळ कारण आहांत. अहो! ह्या महत्तत्वाची अवधि किंवा सीमा, ह्या महत्तत्वास शेवट तुम्हीं आहांत. तुम्हीं स्वयें स्वतः अनादि असे पुरातन आहांत. (५१५)

अहो! हे श्रीअनंतरूपा! तुम्हीं सकळ विश्वाला जीवित आहांत. तुम्हीं सकळ विश्वजीव आहांत. त्या जीवांना तुम्हींच भूमिगत द्रव्यासारखे भांडार आहांत–ठेवा आहांत; अहो! तुमच्या अगदीं हातीचें असे तें भूत व भविष्य ज्ञान आहे. (५१६)

अहो! श्रीअनंता! श्रुतींनां जें दिसतें तें तुमचेंच मुळीं अभिन्न असें स्वरूप–सुख होय. त्या त्रिभुवनांमधील प्रसरांना, राहाण्याच्या स्थळांना, का मंदिरांना, आश्रयांनां, आयतनांस आश्रय ते तुम्हीं आहांत. (५१७)

आणि म्हणूनच हे श्रीअनंता, अहो! तुम्हांसच दृढ आश्रयाचें स्थान म्हणजे महाधाम म्हणावेंच कीं, अहो! कल्पांतीही महत् तत्वरूपी माया ती तुमच्या अंगींच पहुडते रिघते, लीन होते, सामावते ती तुमच्या अंकीच विश्रांति घेते, रीघ करून असते. (५१८)

एवढेंच नव्हे तर अहो! श्रीअनंता! तुम्हींच देवरूपानें हें सर्व विश्व विस्तारिलें आहे: अशा या विस्ताराचें तें कुणीं बरें वर्णन करावें! असें तुम्हीं विश्वीं विस्तारलेले–त्या तुम्हांस अगदीं समतोलपणाचें तें कोणी कसें वानावें, वर्णावें, तुमची स्तुति करावी, तुम्हांस विवरावें, तुम्हांस रंगवावें तें! (५१९)

श्लोक ३९ वा

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**

वायु, यम, अग्नि, वरुण, शशांक प्रजापति, प्रपितामह = मारुत, यम, अग्नि, वरुण, चंद्र, प्रजापति, पणजा :—

सहस्रकृत्वा ते नमो नमस्तेऽस्तु = सहस्र वेळां तुम्हांस नमस्कार असो, नमो, नमस्ते–नमस्कार असो. (अग्निमुख = देव, धुर, ब्राह्मण. शशिपाद = चंद्र किरण. शशिलेखा = चंद्रकोर. शशिशेखर = महादेव. शशिन् = चंद्र, कापूर. शश, शशक = ससा. शशधर, शशभृत, शशलांछन = चंद्र. शशविषण = अश्रुत पदार्थ). पुनश्चभूयः अपि नमो नमस्ते = पुन्हः पुन्हः वारंवार तुम्हांस नमस्कार असो. त्रिवार नमस्कार असो = सहस्रवार नमस्कार असो.

अन्वय :—

हे विश्वरूप! त्वं वायुः नमो नमस्ते पुन्हः भूयः अपि नमो नमस्ते । त्वं यमः नमो नमस्ते पुन्हः भूयः अपि नमो नमस्तेः । त्वं अग्निः नमो नमस्ते पुन्हः भूयः अपि नमो नमस्ते । त्वं वरुणः नमो नमस्ते पुन्हः भूयः अपि नमो नमस्ते । त्वं चंद्रः नमो नमस्ते पुन्हः भूयः अपि नमो नमस्ते । त्वं प्रजापति नमो नमस्ते पुन्हाः भूयः अपि नमो नमस्ते । त्वं प्रपितामह, सहस्रकृत्वा नमो नमस्ते अस्तु पुनः च भूयः अपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

अर्थ :—

अहो हे विश्वरूपा! तुम्हीच 'वायु' आहांत त्या तुम्हांस नमो नमो! नमस्ते–, अनेक नमस्कार असोत; सहस्र वेळां पुन्हः पुन्हः वारंवार नमस्कार असो. अहो! हे विश्वरूपा तुम्हींच कीं, 'यम' दण्डधर धर्मराज (विरक्ति, योग, अहिंसा, सत्य भाषण इत्यादि नित्यकर्मे) आहांत त्या तुम्हांस नमो नमो! नमस्ते! अनेक नमस्कार असो! सहस्र असे पुन्हः पुन्हः वारंवार नमस्कार असो तुम्हीच 'अग्नि' (विस्तव, सोनें, पित्त) आहांत, त्या तुम्हांस नमो नमस्ते! अनेक नमस्कार असोत सहस्रपणें पुन्हः पुन्हः वारंवार नमस्कार असो! तुम्हींच 'वरुण' जलाची देवता आहांत, समुद्र आहांत, त्या तुम्हांस नमो नमस्ते, अनेक नमस्कार असोत : सहस्र वेळां नमस्कार असो वारंवार नमस्कार असो! तुम्हींच कीं अहो, हे विश्वरूपा 'शशांक'

(चंद्र, कापुर) आहांत; त्या तुम्हांस नमो नमस्ते, अनेक नमस्कार असोत; सहस्रवेळां नमस्कार असो: वारंवार नमस्कार असो. अहो! हे विश्वरूप कश्यपापासून तों तहत ब्रह्मदेवापर्यंत तुम्हींच सर्व 'प्रजापति' आहांत; त्या तुम्हांस नमो नमस्ते, अनेक नमस्कार असोत, सहस्रवेळां नमस्कार असो, वारंवार नमस्कार असो. अहो! हे विश्वरूपा! सृष्टिमार्गे जो तुम्हीं व त्याचाही पिता जो सूत्रात्मा-जो पितामह तेही तुम्हींच आहांत; त्या तुम्हांस नमो नमस्ते, वारंवार नमस्कार असो, सहस्र वेळां नमस्कार असो, वारंवार नमस्कार असो. ह्या सर्व देवतांचीं रूपें तीं तुम्हींच आहांत, तुम्हांला सर्वरूप परमेश्वराला सहस्रवेळां नमस्कार असो, सहस्र नमस्कार असो. पुन्हः पुन्हः वारंवार नमस्कार असोत. (पराकाष्ठेच्या भक्तीमुळें कितीही नमस्कार केले तरी अर्जुनाची तृप्ति होईना; हें दाखवण्याकरितां येथें त्याच्या नमस्कारांची ती पुन्हः पुन्हः नमस्काराच्या पुनरावृत्तीची ती पुनरुक्ति केलेली आहे.) ॥ ३९ ॥

**श्लोक ४० वा**

**नमः पुरस्तात् अथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥**

नमः पुरस्तात्=पुढें का पुढून तुम्हांस नमस्कार. पृष्ठतः ते=तुम्हांस पाठीमागेंही नमस्कार सर्वतः सर्व एव, नमोऽस्तुते=चहूंबाजूंनी तुम्हींच सर्व कांहीं आहांत, अशा तुम्हांस नमो नमस्ते, वारंवार नमस्कार असोः अनंतवीर्य=अमित विक्रमं=अपरिमित वीर्याचे, पराक्रमाचे, तेजाचे, मिती नाहीं अशा बळाचें तुम्हीं आहांत.=सर्वंसमाप्नोषिततोऽसिसर्वः=सर्व कांहीं समतोलपणाचें एक, जेथें गुणमयीच जशी तुम्हीं व्यापून आहांत, म्हणून सर्व कांहीं तुम्हींच आहांत.

अन्वय :—ते तमः पुरस्तात्। ते नमः पृष्ठतः। सर्वतः एव सर्व। ते नमोस्तु। अनंतवीर्य त्वं नमोऽस्तु। अमित विक्रम त्वं नमोऽस्तु। सर्व सम आप्नोषि ततः सर्वः असि। त्वं। नमोऽस्तु ॥ ४० ॥

अर्थ :—तुम्हांस पुढून नमस्कार असो, तुमच्या पुढें उभें राहून नमस्कार, तुमच्या पृष्ठीं उभें राहून नमस्कार, तुम्हांस पाठीमागून नमस्कार, तुमच्या पाठीमागें नमस्कार, हे सर्वरूप! अशा तुम्हांस नमस्कार, सर्व ठिकाणीं तुम्हींच आहात त्या तुम्हांस नमस्कार – सर्वाठायीं नमस्कार! सर्व बाजूंनीं नमस्कार! हे विश्वरूप, अनंतवीर्य असे तुम्हीं त्या तुम्हांस नमस्कार! तुमच्या सामर्थ्याचा अंत नाहीं अशा तुम्हांस नमस्कार! तुमचें सामर्थ्य अमर्याद आहे नमस्कार! अमित विक्रम नमस्कार! तुमचा पराक्रम शब्दांनी सांगतां येत नाहीं—नमस्कार—असे तुम्हीं अतुल पराक्रमी आहांत—नमस्कार—सर्व कांहीं तुम्हीं आहांत नमस्कार! सर्वाठायीं तुम्हीं व्यापून आहांत—नमस्कार! सर्वत्र सर्व तुम्हींच आहांत —नमस्कार! त्या तुम्हांस पुढें मागें सर्वाठायीं सर्वपणे नमस्कार! अतुल पराक्रमी अपरिमित बळाचे नमस्कार! सर्व कांहीं व्यापून आहांत नमस्कार! म्हणून सर्व कांहीं तुम्हींच होत, अशा तुम्हांस नमो नमस्ते, नमो नमस्ते, नमो नमस्ते, वारंवार फिरफिरून नमस्कार असो, नमस्कार असो. ॥ ४० ॥

(श्लोक ३९ व ४०, ओव्या ५२०–५३७)

**(नमः) जी काय तूं येक नव्हसी। तूं कोणे ठायीं नससी।**
**हे असो जैसा आहासी। तैसया नमो ॥ ५२० ॥**
**(वायुर्यमोग्निर्वरुणः शशांकः) वायु तूं श्रीअनंता। यम तूं नियंता।**
**प्राणिगणी वसतां। अग्नि तो तूं ॥ ५२१ ॥**
**वरुण तूं सोम। स्रष्टा तूं ब्रह्म।**
**पितामहाचाहि परम। आद्य जनक तो तूं ॥ ५२२ ॥**

(नमोऽस्तुते) आणीकही जें जें कांहीं। रूप आथीं अथवा नाहीं।
तया नमो तुज ऐसियाही। श्रीजगन्नाथा ॥ ५२३ ॥
ऐसे सानुरागे चित्ते। स्तवन (नमन) केले पांडुसुते।
मग पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभु ॥ ५२४ ॥
पाठि तिये साद्यंते। न्याहाळी श्रीमूर्तीते।
(भूयोऽपि नमो नमस्ते) मग पुढति म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभु ॥ ५२५ ॥
पाहात पाहात प्रांते। समाधान पावे चित्ते।
आणि पुढति म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभु ॥ ५२६ ॥
इये चराचरी जी समस्ते (जे भूते)। सर्वत्र (अखंडित) देखे तयाते।
(पुनश्च) आणि पुन्हः पुन्हः म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभु ॥ ५२७ ॥
ऐसी रूपे तिये अद्‌भुते। आश्चर्ये स्फुरती अनंते।
तंव तंव नमस्ते। नमस्तेचि म्हणे ॥ ५२८ ॥
आणिक स्तुतीही नाठवे। आणि निवांतही न सवे (राहवे)।
नेणो कैसा प्रेमभावे। गर्जोंचि लागे ॥ ५२९ ॥
(सहस्रकृत्वः) किंबहुना ययापरी। नमन केले सहस्रवरी।
(नमः पुरस्तात्) कीं पुढती म्हणे श्रीहरी। तुज सन्मुख नमी ॥ ५३० ॥
(नमः अथ पृष्ठतः ते)
देवासी पाठी पोट आथी की नाहीं। येणे उपयोग आम्हासि काई।
परि तुज पाठिमोरेयाही। नमो स्वामी ॥ ५३१ ॥
उभा माझीये पाठीसी। म्हणोनि पाठिमोरे (पाठमोरे) म्हणावे तुम्हांसी।
सन्मुख विन्मुख (विमुख) जगेसी। न घडे तुज ॥ ५३२ ॥
(नमोऽस्तुते सर्वत एव सर्व)
आतां वेगळालेया आवेवा। नेणे रूप करूं देवा।
म्हणोनि नमो तुज सर्वा। जी सर्वात्मका ॥ ५३३ ॥
(अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं)
जी अनंत बळ संभ्रमा। तुज नमो जी अमित विक्रमा।
(सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः) सकळ काळी समा। सर्व देवा ॥ ५३४ ॥
अघवा अवकाशी (आकाशीं) जैसे। अवकाशचि होऊनि आकाश असे।
तूं सर्वपणें तैसे। पातलासी सर्व ॥ ५३५ ॥
किंबहुना केवळ। सर्व हे तूंचि निखळ।
परी क्षीरार्णवी कल्लोल। पयाचे जैसे ॥ ५३६ ॥
म्हणोनियां देवा। तूं वेगळा नव्हेसि या सर्वा।
हे आले मज सद्‌भावा। म्हणोनि (आतां) तूंचि सर्व ॥ ५३७ ॥

तूं येक काय नव्हसी = तुम्हीं एकत्वें सर्व कांहीं होऊन आहांत; तूं कोणेठायीं नससी = तुम्ही सर्वठायीं आहांत. काय–काय काय. येक–एक. कोणे–कवणे. तैसया–तैसिया. (५२०) नियंता–नियमिता = शासन कर्ता 'यमोनियंता', सारथी, स्वामी. प्राणि (प्राणिन्) गणी = भूतमात्र, जीव समुदाय, शरीरधारी गणसमूह. अग्नि = विस्तव, सोनें, पित्त, चेतना. (चेतस् = प्राणी जीव, बुद्धि, आठवण, सजीवपणा, मन, ज्ञान.) (५२१)

ऐसियाही–तैसयाही. (५२३) स्तवन–(स्तुति करणें) नमन (नम्र होणें, नमस्कार करणें.) प्रभु=प्रभो. (५२४) साद्यंते=आरंभापासून शेवटपर्यंतचा. (५२५) प्रांत=प्रत्येक भाग. (५२६) जी समस्त–भूते, जे भूते, जी भूतें. सर्वत्र–अखंडित, सर्वकाळ सर्व जागीं. (५२७) आश्चर्य–आश्चर्ये. (५२८) सवे राहवे–बैसवे= बसावे, असावे. नेणे–नेणे. गर्जोंचि–गाजोचि. (५२९) ययापरी–इयापरी. सहस्रवरी–सहस्रावरी. सन्मुख–सन्मुखा=समोर भागी असणाऱ्यास. (५३०) आम्हांसि–आम्हां. (५३१) माझिये–माझेया. पाठिमोरे–पाठमोरे. विन्मुख–विमुख=पराङ्मुख, विरुद्ध. (५३२) वेगळालेया–वेगळालिया. आवेवा–अवयवा. रूप करूं=वर्णन करूं; रूप करणें, निरूपण करणें तें कसें तें समजत नाहीं. (५३३) अनंत=अपार. संभ्रम=गौरव, समृद्धि, त्वरा, भ्रांति. अमित=अपरिमित. सर्वदेवा–सर्वदेशा, सर्वरूपा. (५३४) अघवा–अघविया. अवकाशी–आकाशीं. (५३५) निखळ–निष्कळ, शुद्ध. (५३६) नव्हेसि–नव्हसि. सद्भावा= अनुभवास. तूंचि–आतां तूंचि. (५३७)

हे अनंतरूपा ! तुम्हीं सर्व कांहीं आहांत; तुम्हीं सर्वाठायीं जसे आहांत तशा तुम्हांला नमो नमस्ते (म्हणजे) नमस्कार असो. (५२०)

हे श्रीअनंता ! तुम्हीं वायुदेव आहांत ! त्या तुम्हांस मी नमस्कार करतों. तुम्हीं शासनकर्ता, नियंता, नियमित (नियमबद्ध नियंत्रित) असे यम आहांत; तशा तुम्हांस नमस्कार असो ! सर्व प्राणीगणां-मध्यें वसणारा, देवता स्थापणारा, वास करणारा अग्नि तुम्हीं आहांत; त्या तुम्हांस नमस्कार असो. (५२१)

तुम्हीं वरुण म्हणजे जलदेवता आहांत, त्या तुम्हांस नमस्कार असो; तुम्हीं सोम म्हणजे वनस्पतीचे पोषण करणारे आहांत, त्या तुम्हांस नमस्कार असो; तुम्हीं सृष्टि उत्पन्न करणारे ब्रह्मा आहांत, त्या तुम्हांस नमस्कार असो, आजाहून श्रेष्ठ असे आद्यजनक ते तुम्हीं आहांत, त्या तुम्हांला नमस्कार असो. (५२२)

आणीकही जे जे कांहीं रूपाचें आहे नाहीं त्या तुम्हां अशांसही हे श्रीजगन्नाथा, नमो नमो–नमस्कार–प्रणिपात असो. (५२३)

अर्जुनानें प्रीतियुक्त चित्तानें प्रेमानें निष्ठावंत होऊन नमन केलें व पुन्हः पुन्हः नमस्ते प्रभु म्हणत आहे. (५२४)

नंतर त्यानें त्या 'मूर्तीं'च्या साद्यंततेस आरंभापासून शेवटपर्यंत असें न्याहाळून पाहिलें व पुन्हः पुन्हः तसेंच नमो नमस्ते ! हे प्रभु ! म्हणत आहे. (५२५)

विश्वरूपाच्या प्रत्येक प्रांत–अवयव–भागाकडे पाहातां पाहातां त्याचे चित्तास ईश्वरपरायणतेचा संतोष व समाधान होत होतें व तो नमो नमस्ते हे प्रभु ! असें म्हणत होता. (५२६)

चराचरीं भूतें तीं तेथें अखंडित विश्वरूपच एक तो पाहात आहे व पुन्हः पुन्हः नमो नमस्ते ! प्रभु ! म्हणत आहे. (५२७)

अशीं तीं आश्चर्याचीं अशीं भूतें अदभुत रूपें तीं अनेक अशीं आश्चर्येच कीं त्या विश्वरूपामध्यें असणारीं ! तेथें नमो नमस्ते ! हे प्रभो ! असेंच तो म्हणत आहे. (५२८)

आणिक दुसरी कांहीं स्तुति, ध्वनि, प्रशंसा, स्तव त्यास आठवेना व उगाचही पण बसवेना. तो तर प्रेमभावास येऊन नमो नमस्ते ! हे प्रभो ! असें गर्जतच होता. असा वाजत होता. (५२९)

बहुत काय, पण याप्रमाणें त्यानें हजारही वेळा नमस्कार केला व पुन्हः म्हणत आहे कीं हे श्रीहरी तुम्हां सन्मुखास, समोर असलेल्यास, अनुकूलास (श्रीहरी तुम्हांस सन्मुख–अनुकूल नमन !) नमो ! नमो ! नमस्कार असो. (५३०)

देवास पाठपोट आहे किंवा नाहीं असा विचार काय कामाचा? अशा विचारानें कांहीं कामाचें येणें नाहीं म्हणून हे स्वामिन्, पाठीमोरे अशा तुम्हांस नमस्कार असो! (५३१)

माझ्या पाठीशीं उभें म्हणून तुम्हांस पाठीमोरे म्हणावें तर जग हें सन्मुख का विन्मुख म्हणजे अनुकूल का पराङ्मुख असे नव्हे, ते अहो! तर सर्व व्यापक असेंच केव्हांहि! (५३२)

अहो देवा! वेगळाल्या अवयवांना देखण्यानें का प्रत्येक भाग, प्रांत पहाण्यानें संतोष समाधान जोडत आहे असें जें तेथें वर्णन करूं कसें तें कांहीं मला समजत नाहीं; म्हणून अहो हे विश्वरूपा, रूप करूं का तुज सर्वात्मका सर्वा नमो! नमो! असेंच तो म्हणत आहे. (५३३)

तुम्हांस बळाची समृद्धि आहे. ज्याचे ठायीं अशा बळसमुद्रास अनंत बळ संभ्रमास व अमित विक्रमास नमस्कार असो. तुम्ही सर्वकाळीं सर्व सम असे समसमा अशा सर्वदेवा, सर्वसमा, सर्वरूपा, सर्वदेशा तुम्हांस नमस्कार असो! (५३४)

अवघ्या सर्व आकाशामध्यें अवकाश होऊन, आकाश तें आहे तसें सर्वपणें तुम्हींच सर्वपणास आले आहांत. अशा तुम्हांस नमस्कार असो. (५३५)

बहुत काय, पण हे सर्व कांहीं निखळपणें तुम्हींच आहांत जसें का क्षीरार्णवामध्यें क्षीराचें कल्लोळ जसें. (५३६)

म्हणून अहो, हे देवा! तुम्हीं ह्या सर्वांहून वेगळे असे नाहींतच! असें हे मजला माझ्या सद्भावास म्हणजे अनुभवास का प्रत्ययास आलें आहे आणि म्हणून कीं तुम्हींच हें सर्व कांहीं आहांत. (५३७)

श्लोक ४१ वा:—

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४१ ॥**

सखेति मत्वा=मित्र असें समजून. यत् प्रसभं उक्तं=जें जुलमाचें, बलात्काराचें असें आग्रहानें, जोरानें अमर्याद बोलणें बोललों असेन; हे कृष्ण! = हे कृष्णा! हे यादवा! हे सख्या! हे सख असें जे कांहीं. इंद्र महिमान तव अजानता=तुमचे हे महात्म्य, महिमान, महत्व उत्कर्ष न जाणतां (लहान मुलासारखें अजाणपण मजमध्यें असल्यामुळें अजाण असा मी) मया प्रमादात प्रणयेन वा अपि=प्रमादानें गैरसावधपणानें का प्रणयानें प्रेमानें का याचनेनें, प्रेम याचनेनें जें कांहीं तुम्हांस बोललों असेन.

अन्वय:—तव इदं महिमानं अजानता। यत् प्रसभं उक्तं मया प्रमादात प्रणयेन वा अपि। सखा इति मत्वा। हे कृष्ण! हे यादव! हे सख इति। तत् क्षामये ॥ ४१ ॥

अर्थ:—तुमचें महात्म्य महिमान उत्कर्ष मजला जाणवलें नाहीं म्हणून प्रमादानें, गैरसावधपणामुळें म्हणा अथवा प्रणयानें–, प्रेमयाचनेनें म्हणा, मित्र असें समजून जें कांहीं आग्रहाच्या जोराचे असे अमर्याद, मर्यादा न ठेवितां बोलणे झालें असेल–हे कृष्णा! हे यादवा! हे सखया! असें (तेथें लहान मुलाचें अजाणपण मजमध्यें असल्यानें अजाण असा मी त्या माझें तुमची मर्यादा न राखतां बोलणें झालें असेल) तें मजला क्षमावें ॥ ४१ ॥ (श्लोक ४१ वा. ओ. ५३८ ते ५४४)

**'(सखेति मत्वा) परि ऐसिया तुज स्वामी। कांहीं नेणावे जी आम्ही।**
**म्हणोनि सोइरे संबंध धर्मी। राहाटलो तुजसी ॥ ५३८ ॥**
**आहा थोर वाउर जाले। अमृते संमार्जन केलें।**
**वारिके घेऊनि दिधले। कामधेनूते ॥ ५३९ ॥**

**परिसाचा खडुवा जी जोडला। कीं तो फोडुनि गाडोरा घातला।**
**कल्पतरु तोडुनि केला। कूप शेता ॥ ५४० ॥**
**चिंतामणीची खाणी लागली। पवितिये वरूनि वोढाळुवे ओडाळिली।**
**(परिनोळखेचि म्हणुन अव्हेरिली) तैसी तुझी जवळिक धाडिली। संगातीपणें ॥५४१॥**
**(प्रसभं यदुक्तं) हे आजिचेनि पहा रोकडे। कवण झुंज हे केव्हडे।**
**येथ परब्रह्म तूं उघडे। की सारथी केलासी ॥ ५४२ ॥**
**या (यया) कौरवाचिया घरा। शिष्टाई धाडिलासि जी दातारा।**
**ऐसा थोडियासाठीं श्रीसर्वेश्वरा। विकिलासि आम्हां ॥ ५४३ ॥**
**(अजानता महिमानं तवेदं)**
**तूं योगियाचे समाधिसुख। कैसे जाणेचि ना मी मूर्ख।**
**उपरोधु जी सन्मुख। तुजसी करूं ॥ ५४४ ॥**

ऐसिया–ऐसेया. तुज–तूंते. कंही–कहींच. नेणे–नेणोचि. सोइरे–सोयरे संबंधधर्मी–समधर्मी = सोयरेपणाच्या नात्यानें वागलों, व्यवहारलों. (५३८) वाउर = वाईट. जाले–जाहाले. संमार्जन = झाडण सडा, सारवण. म्यां–मिया. वारिके = सामान्य शिंगरू. (५३९) खडुवा–खडवा = पर्वत. जी–ची. तो– – आम्ही गाडोरा घातला = घराच्या पायाच्या भरींत घातला, घराच्या पायांत घातला. कूप–कुंपण = विहीर, खांच, डोलकाठी. (कूपी = बेंबी, कांचेची शिशी) पवितिये–पवि तिये : तेणे करूनि इत्यादि = ओढाळ गुरें–आडोळिली, वोल्हांटिली–हांकून लाविली–नोळखे म्हणून अव्हेरिलीं. धाडिली = व्यर्थ घालविली, गमाविली, दूर केली. सांगातीपणे = सोबती–साथी कां बरोबर असण्यानें. (५४१) पाहा–पाहे पां. केव्हडे–केवढें. (५४२) या–यया. दातारा–जी दातारा. थोडियासाठीं = क्षुद्र व्यवहारासाठीं. वणिजे साठीं (वणिज् = वाणी, व्यापार.) श्रीसर्वेश्वरा–श्रीजागेश्वरा (= लोक ईश्वर, जगईश्वर, जग–जगत्. जागृ = जागणें. जग–गज, सर्वेश्वर, सर्वात्मक. आत्मा = जीव, ब्रह्म, मूळ स्वभाव, मन, बुद्धि, स्वतः. ईश्वरा = स्वामी, महादेव, परमेश्वर, शक्तिमान.) विकिलासि आम्हां–विकिलासि आम्हां = पारखा झालास, आम्हा विकलासि तूं कीं, शिष्टाई–शिष्ट संप्रदाय (शिष्ट = शिक्षित, उच्च, शिल्लक, उरलेला) शिष्टता. शिष्टत्व–भलेपणा, सभ्यता. शिष्टाचार – उत्तम आचार. शिष्ट = शिल्लक ठेवणें (विशिष्ट = अतिशय होणे.) शिक्ष = शिकणें, शिक्षा = एक वेदांग, अभ्यास, शिकवणी, नम्रता, पारिपत्य. शी = निजणें (अति शी = अमर्याद होणें. अधिशी = राहाणे. संशी = संशय घेणें, धार लावणें.) शीकर = बारीक पाऊस, तुषार. (५४३) कैसें = कैसा. उपरोधु–उपरोध = थट्टामस्करी, विरोध. (५४४)

परंतु अशा तुम्हांला हे स्वामिन्! आम्ही केव्हांही जाणणारे नव्हतच; त्याबाबत आम्हीं केव्हांही नेणतेच राहिलों; आणि म्हणूनच तर, सोयरेपणाच्या नात्यानें सोयरेसंबंध धर्मी, समधर्मी तुम्हांबरोबर वागलों, व्यवहारलों. (५३८)

अहो! अशा त्या सोयरेसंबंधाच्या स्वभावधर्मी वागल्यानें का समसमानधर्मी राहाटल्यानें, आहोहो! केवढें बरें तेथें वाईटपण–का वावडेपण पदरांत आलें आहे तें! तें कांहीं सांगतां येत नाहीं. अहो! प्रत्यक्ष अमृतच माझ्या हातीं लागलेलें तें तर, म्यां झाडसारवणासारख्या, सडा संमार्जन करण्याकडे उपयोगिलें आहे, खर्च केलें आहे. अहो! काय सांगावें कीं, एकादें सामान्य शिंगरू घेऊन, का लहानसें करडूं का कोंकरूं घेऊन, मी तर त्याबदली कामधेनूच देऊन टाकिली कीं! (५३९)

अहो! परिसाचा पर्वत मिळालेला, तो फोडून मी घराच्या पायाच्या भरींत घातला, घराचा पाया

भरण्याकडे–भरण्यांतच घातला! कल्पवृक्ष तोडून, अहो, तो शेतास कुंपण करण्याकडे उपयोजिला कीं! तसे येथें होऊन आहे! (५४०)

चिंतामणी मण्याची खाणच लागली, पण तेथें ओळख, मुळींच येईना, म्हणून त्या मण्याचा अव्हेर केला गेला! त्याप्रमाणें तुम्हीं अगदीं जवळचे असे झालेले, ते सांगातीं, सोबती, सांथीच जसे दवडिले गेलांत; तुमची जवळीक व्यर्थ घालविली; जवळीक दूरच धाडिली गेली जशी! (५४१)

आजच्या ह्या प्रसंगानें तर हें अगदीं रोकडेंच असें पाहाण्यास मिळत आहे कीं! अहो! काय तें झुंज कसचे तें झुंज! पण त्याचें येथें केवढें महत्व येऊन आहे, कीं जें तुम्हीं उघडें असें परब्रह्म तेच मुळीं सारथी केले गेले आहांत कीं अहो! (५४२)

अहो जी दातारा! तुम्हीं या कौरवांच्या घरास शिष्टाईकरितां धाडिले गेलांत. येणेप्रमाणें थोड्यासाठीं, क्षुद्र व्यंवहारासाठीं, का वणिजे (=व्यापारा)साठीं कीं, हे श्री सर्वेश्वरा–श्री जागेश्वरा–आम्हांस तुम्हीं विकिला गेलांत, पारखे झालांत. आम्हींही पण तेथें आम्हां विकिलों गेलों असें! आतां तर हा जीव थोडाथोडा होऊन आहे कीं, जी अहो! (५४३)

तुम्हीं योगियाचे समाधि–संजीवन सुख आहांत! काय अहो, मला मूर्खाला हें जाणवेच ना! तेथील जाणणें मी मनावरच घेईना! तेथील कांहीं जाणण्याचें मी करीचना! अहो! तुमचे सन्मुखपण जेव्हां का तेव्हां तर तेथें तुमचें असणें, तें तर थट्टा मस्करीवरच घालविलें गेलें; तेथें विरोधच उपरोध एक जसा केला गेला–केला जात होता कीं जी. (५४४)

**श्लोक ४२ वा**

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥**

यच्च अवहास अर्थम्=जे हंसण्या मस्करीवरच घालविलें. (अव=अवहेलना, हीनत्व, हानी, कमीपणा, विस्तार, अनादर, शुद्धि इत्यादि अर्थीं, अप्रतिष्ठा, हास्य, हांस=हांसणें, मस्करी, थट्टा, आनंदार्थ थट्टा.) असत्कृतः असि=अविद्यमान, असत्य, केला जात होतास. (असत्×सत्) विहार शय्यासन भोजनेषु= क्रीडा, बिछाना आसन, भोजनकाळीं–बिछाना=बसण्याची जागा. भोजन=जेवण, भोज्य. (विहार=विक्षेप, भ्रमण, क्रीडा, सहल करणें.) एको अथवा अपि अच्युत तत्समक्षं=लोकांच्या समोर अथवा एकलेपणीं अथवा त्या तुम्हां अच्युताच्याहि समक्ष. त्वाम् अहम् अप्रमेयम्=तुम्हीं जे सिद्धांतांनीं सिद्ध केले जाणारे नव्हत अशा तुम्हाला मी जें कांहीं बोललों असेंन ते क्षमा करा. तत् क्षामये=सोसणें सोशिकपणानें असा, सहिष्णुता राखा, (क्षमाशीलानें समर्थ व योग्य असे तुम्ही) मला त्याबद्दल क्षमा करा.

अन्वय :—

हे अच्युत! हे विष्णो! त्वाम् अप्रमेयम्। विहारशय्या आसन भोजनेषु। यत् च अवहासार्थम्। अहम् असत्कृत असि। एकः अथवा अपि 'अच्युत' तत् समक्षं। तत् क्षामये ॥ ४२ ॥

अर्थ :—

(१) हे अच्युता। क्रीडा, विहार, बिछाना, शय्या, आसन, भोजनाच्या वेळेस किंवा मध्यें जे कांहीं –(हंसू यावें का हासूंच लोटावें किंवा आनंदार्थ बोलणें, मस्करी, हांसणें का) अविद्यमान केलें जात होता, (कां तुम्हीं असत्य केले जात होतां–एकलेपणीं, अथवा लोकांच्या डोळ्यांसमोर त्या अच्युताच्या समक्ष ते तुम्हीं कोणत्याहीं सिद्धांतांनीं सिद्ध केलें जाणारे नव्हतच,) त्या तुम्हीं माझे अपराध क्षमावेत, क्षमा करावेत.

(२) विश्वरूपासारखा तुमचा थोर महिमा नच जाणणारा मी अज्ञ त्या माझ्याकडून चुकीनें, लडिवाळपणानें समवयस्क मित्र समजून, गड्या, कृष्णा, यादवा असे एकेरी शब्दानें, उद्धटपणानें बोललों असेन का हांक मारिली, हांक दिली असेल, तसेंच हे अच्युता, हे श्रीकृष्णा, क्रीडा विहार शय्येवर निजण्याच्या वेळीं, आसनावर एकत्र बसतांना, भोजन प्रसंग इत्यादि समयीं थट्टा, उपहास, लोकांच्या समोर का तुम्हीं एकटे असतांना, तुम्हांसंबंधीं जे अनादरयुक्त, अमर्याद, मर्यादा टाकून वर्तन मजकडून घडलें असेल तें सर्व, प्रमाणांनीं ज्याचें वर्णन होत नाहीं, अशा तुम्हां परमेश्वराला, अप्रमेयाला मला क्षमा करण्याविषयीं मी प्रार्थना करतों. ॥ ४२ ॥

(श्लोक ४२ वा ओव्या ५४५ ते ५६१)

(तत्समक्षम्) तूं या विश्वाची अनादि आदी। बैससी जिये सभासदी।
(यच्चावहासार्थ) तेथ सोयरिकेचिया शब्दि (संबंधी)। रळी बोलो ॥ ५४५ ॥
(असत्कृतोऽसि) विपाये राउळा येवो। तरी देवा तुम्हावरी मान पाहो।
(न) माना तरी जावो। रूसोनिया ॥ ५४६ ॥
आणि चरणा लागोनि बुझावणी। तुम्हां ठायीं जी सारंगपाणी (शार्ङ्गपाणी)।
पाहिजे ऐशी करणी। बहु केली आम्ही ॥ ५४७ ॥
सज्जनपणाचिया वाटा। तुजपुढें बैसे उफराटा।
तरी हा पाडु काई श्रीवैकुंठा। परी चुकलो जी ॥ ५४८ ॥
(विहारशय्यासनभोजनेषु) देवेसी कोल काठी धरूं। आखाडा झोंबी लोंबी करूं।
सारी खेळता तस्करू। की निकुरेही भांडो ॥ ५४९ ॥
चांग तें उराउरी मागो। सर्वज्ञांसी बुद्धि सांगो।
तेवीच्चि म्हणो काय लागो। तुझे आम्ही ॥ ५५० ॥
ऐसा अपराध येतुला आहे। जो त्रिभुवनी परी न समाये।
जी नेणताचि कां पाये। शिवंतिले तुझे ॥ ५५१ ॥
देवा बोणेयाच्या अवसरी। स्नेहे कीरे आठव करी।
परी माझा निसुग गर्व अवधारी। जे फुगोचि बैसे ॥ ५५२ ॥
देवाच्या भोगायतनी। खेळतां साशंके ना मनी।
की रिघोनिया शयनी। सरिसा पहुडे ॥ ५५३ ॥
(हे कृष्ण, हे यादव, हे सखेति) कृष्णा म्हणोनि हांकारिजे।
यादवपणें तुम्हां लेखिजे। आणि आपुली आण घालिजे। जाता तुज ॥ ५५४ ॥
(एकोथवाऽप्यच्युत) मग एकासनि बैसणें। का तुमचा बोल न लेखणे।
हे वोलखीचेनि दाटपणें। बहुत घडले ॥ ५५५ ॥
(तत्क्षामयेत्वामहम्) म्हणोनि काय काय आतां।
निवेदिजैल श्री अनंता। मी रासी आहे समस्तां। अपराधांची ॥ ५५६ ॥
यालागी पुढां अथवा पाठी। जिये राहाटलो बहुवे वोखटी।
तिये जननीचे परी पोटी। सामावी प्रभु ॥ ५५७ ॥
जी कोण्ही एके वेळे। सरिता घेऊनि येती खडुळे।
तिये सामाविजति सिंधु जळे। आन उपाय नाही ॥ ५५८ ॥

**(मया प्रमादात् प्रणयेन वापि)**
**तैसी [प्रति का (प्रतिका मूर्ति] प्रीति का प्रमादे। देवे मजसी विरुध्दे।**
**बोलिली तिये श्रीमुकुंदे। उपसह्वावी जी ॥ ५५९ ॥**
**आणि देवाचेनि क्षमत्वे क्षमा। आधारू जाला असे भूतग्रामा।**
**म्हणोनि ते जी श्रीपुरुषोत्तमा। विनवूं (ते) थोडे ॥ ५६० ॥**
**(अप्रमेय) परी तऱ्ही आतां अप्रमेया। मज शरणागता आपलेया।**
**क्षमा कीजो जी यया। अपराधासि ॥ ५६१ ॥**

तेथ–तेथें. सोयरिकेचिया–सोयरिकीचिया. शब्दि–संबंधी. रळी बोलों = विनोदाचीं भाषणें, भांडणें. (५४५) तुम्हावरी–तुझेनि आंगें मान पाहो = तुमच्या बरोबरीचा सन्मान. पाहो–पावो. न माना–न मानिसी; रुसोनियां–रुसोनि सलगी. (५४६) चरणा = पाया. तुम्हां–तुझिया. सारंगपाणी–शार्ङ्गपाणी. पाहिजे–, रूप देखिजे = पाहात होतों, करीत होतों. (५४७) सज्जन–स्वजन. उफराटा (उपराटा)–पाठीमोरा. पाडु = योग्यता. जी–जी आम्हीं. (५४८) कोलकाठी = दांडपट्टा, झोंबी लोंबी = कुस्ती, कवाइत. सारि–सारिपाट, सोगट्या. तस्करूं = घर चोरून, निकरानें भांडू. निकुरेही = निकरोहि = निकरानें. (५४९) तै–ते. उराउरी = ताबडतोब. बुद्धि–की बुद्धि. म्हणे–म्हणो. (५५०) आहे–हा आहे. का–की. नेणताचि के पाये शिंवतिले तुझे = पण देवा, तुम्हांला न ओळखतां तुम्हांशीं असें वागलों हें तुमच्या पायाची शपथ घेऊन सांगतों. (५५१) बोणेयाच्या–बोनयाच्या = जेवणाच्या. अवसरीं = वेळेस. स्नेहे–लोभे (पा. भे.) निसूग = रिकामा. फुगोचि–फुगुनचि. (५५२) देवाच्या–देवांचिया. भोगायतनी = विलास मंदिरांत. खेळतां साशंकेना–खेळतां आशंकेना–खेळतसा शंकेना. की–जी. रिघोनियां–रिगोनिया. सरिसा पहुडे = शेजारी निजे. (५५३) तुम्हां–तूंते. आपुली–आपली. तुज–तुम्हां. (५५४) तुमचा–तुझा. लेखणें = मानणें. वोळखीचेनि–वोतटीचेनि–वोवटीचेनि–ओळखीचेनि–प्रीतीचेनि = परिचयाच्या, वहिवाटीच्या, दाटपणें = घसटीनें. बहुत–मज बहुत. (५५५) निवेदिजैल–निवेदिजेल. (५५६) जिये–जिथें. जननीचिये परी–मायेचिये परी–मायेचिया वरी. प्रभु–प्रभो. (५५७) जी–जिये. कोण्हि–कोण्हे. खडुळे = खडूळपाणी. सामाविजती–सामाविजेति. (५५८) प्रति–(प्रतीका मूर्ती), प्रीतिः [प्रतिक = उलटा, प्रतिकूल : प्रतिक = पैशांचे किंमतीचा] प्रतिमासादृश्य : प्रमादे = चुकीनें. देवे मजसी–देवेसी मज (मी–मिया)–मज देवेसी. बोलिली–बोलाविली. उपसह्वावी–उपसाह्वावी. (५५९) देवाचेनि क्षमत्वें क्षमा = तुमच्या क्षमाशीलतेमुळें ही क्षमारूपी पृथ्वी प्राण्यांना धारण करिते. जाला असे–जाली आहे या. थोडे–ते थोडे. (५६०) तऱ्ही–परी. अप्रमेया = अपरिमिता, अखंडास, अमर्यादेस. आपलेया–आपुलेया. (५६१)

ह्या विश्वाची, अनादीचीही आदि शक्ति तुम्हीं ! शिष्टत्व उपस्थित झालेले ! तेथें आम्हीं शरीरसंबंध धर्मी शब्दांनीं भांडणच का भाषणच एक जसें असें बोलत होतों.

तेथें सोयरीक जुळवावयाची आहे, अशा प्रश्नामध्यें शब्दसंबंध पुढें घेऊन भांडतच होतों जसे. तेथें तीं भांडणें म्हणजे विनोदाचीं सर्वथैव अशीं भाषणेंच होतीं कीं. (५४५)

कदाचित् देवरायाचें जें राऊळ तेथें आलों तर, तुमच्या बरोबरीचा सन्मान पाहात होतों. तुमच्यापेक्षांही जास्त मान इच्छित होतों. व जर नच मानसन्मान झाला (का जर नच आम्हां माना) तर आम्ही सलगीमुळें रुसून जात होतों. (परिचय सलगीमुळें तेथें रुसणें तें तर अहो ! ह्या शिष्टपणाचें तें तेथें ती अवज्ञा आहे असेंच गणिलें जात होतें.) परंतु आम्हीं तर शरीरसंबंध–सोयरिक–नातें गोतें असें समजून चालत असलेले ते त्या शिष्टाचारास मुळींच मानलें नाहीं. त्यानें तर ते तसे आमचे तुम्हांवरही

सन्मान पावण्याचे (तुम्हांपेक्षां जास्त मान पाहाणें जें कांहीं सलगीचें किंवा नात्याचें महिमान तेंच मुळीं अवज्ञा, अनादर अप्रतिम असेंच भलेपणानें, शिष्टाचारानें—) केलें गेलें. (५४६)

तुम्हांठायीं रूप देखिजे, देवदर्शन पाहिजे, देखिजे, अहो! हे शार्ङ्गपाणी अशी बहु करणी आम्हीं केली तेथें समजूत जी ती तर पायासच लागणें होत होतें, पायाची शपथच घेणें होत होतें जसें, पायांच जसें पडणें होत होतें. कसेंही करून समजुतीस यावेंच अशी तेथें करणी होत होती. पायां लागून बुझावणी पाहिजे, देवच दर्शनास आणिला पाहिजे–आला पाहिजे, अशी करणी आम्हीं बहु केली. तुमची शपथच घेऊन, अहो शार्ङ्गपाणी! तुमची समजूत करीत होतों. (समजूत घालीत होतों). (५४७)

सज्जनपणाचा का स्वजनपणाचा हिस्सा का वांटाच एक (अनुस्थितित्व) वांटणीस आलेला, तो वांटणीचा व्हावाच व्हावा, म्हणून तुम्हांपुढें तर उफराटेच (म्हणजे पाठीमोरेच) बसत होतों; पण योग्यता, (सरिसेपण का बरोबरी) ही कशी बरें येणारी होईल–रूप तें कसें बरें दर्शनाचें होईल! आणि म्हणूनच अहो, हे श्रीवैकुंठाधिपति! आम्हीं चुकलों की अहो जी! (५४८)

देवाबरोबर कोलकाठी किंवा दांडपट्टा खेळूं आखाड्यामध्यें झोंबी लोंबी,–कुस्ती करूं, सारिपाट खेळतां खेळतांच घरचा तस्कर होऊन अगदीं निकरानेंच की, भांडणही करीत होतों. (५४९)

उत्तम असें कांहीं दिसलें कीं, ते उराउरीं म्हणजे ताबडतोब पाहिजे असें मागत होतों. तुम्हीं सर्वज्ञ जे त्यांनां कांहीं एखादी बुद्धिच सांगत होतो, त्यानां शिकवितच होतों जसें तेथें असेंहीपण म्हणत होतो कीं तुमचें आम्हीं कांहीं लागत नाहीं! कीं! जी! (५५०)

असा हा एतुला एवढा अपराध आहे जो त्रिभुवनींही नच मावणारा, पण (असें हें अपराधाचें होणें एक, हें कांहींच समजत नव्हतें. तेथें तुम्हीं उमगत नव्हतां; मजला ओळखले जात नव्हता; तुम्हीं कसे ते मजला मुळीं समजत नव्हते.) देवा! तुम्हांला न ओळखतां तुमच्याशीं असें वागलों हें तुमच्या पायांची शपथ घेऊन सांगतों. (५५१)

जेवणाच्या वेळेस लोभानें तुमची आठवण करीत होतों; पण असें समजा कीं, माझा रिकामा गर्व तर नुसताच रुसणें फुगणें घेऊन बसत होता—जसें का जें कांहीं एक पाहिजे तें दिल्याशिवाय तें तसलें संलग्नतेचें अंगचमुळीं वर नच येणारें.) (५५२)

देवाच्या विलास मंदिरांत खेळतांना मनीं संकोचेना! आशंकेना [संकोच (शंका भीड मुरवत. पाहिल्या बरोबर=देखल्या सरिसा)] शय्यागारामध्यें–शयनागारामध्यें जाऊन तेथेंहीपण तुम्हां शेजारींच पहुडत होतों. (५५३)

कृष्णा! म्हणून तुम्हांस हांकारावें, हांक मारावी, बोलवावें. तुम्ही एक सामान्य यादव आहांत असें तुम्हांस लेखावें; आणि जेव्हां तुम्हीं दिसत नसतां का तुम्हीं दर्शनाचे होत नाहींत, तेव्हां तुम्हांस आपलीच शपथ घालावी जशी का! (५५४)

एकाच आसनानें श्रृंगारिलेलें तुमचें व माझें बसणें, बैठक तेथें जसें कांहीं तुमचा बोलच महत्व दिलेला झाला नाहीं, होईना, होणेंच नाहीं; त्यास मानलेपण आमच्याकडून होईचना त्यास आम्हीं मानूं ना–असें हे दाट ओळखीमुळें, (परिचयामुळें, घसटीमुळें, वहिवाटीच्या दाटपणामुळें) मजला पुष्कळ घडलें आहे–(मजकडून पुष्कळदां) असें झालें आहे. तसें नच मानणें तें दाट प्रीतीच्या वहिवाटीमुळें मला पुष्कळदां घडलें. (५५५)

असें आहे म्हणून आतां हे श्रीअनंता काय मी तुम्हांस तें निवेदन करावेंच करावें, म्हणून एकदांच सांगितलेलें बरें कीं, अहो मी तर समस्त अपराधांची राशीच आहें! (५५६)

या कारणास्तव, पुन्हः पुन्हः पुढें अथवा पाठीमागें जी वोखटी मी राहाटलों असेन, ती सर्व मायेचिया-परी–जननीप्रमाणें अहो, हे प्रभु, तुम्हीं आपल्या पोटींच समावून घेऊन असा–ती माऊलीप्रमाणें पोटांत घाला. (५५७)

अहो ! खड्ळ पाणी एखादे वेळेस घेऊन सरिता म्हणजे नदी ही आपले बरोबर घेऊन येते; तेव्हां ते सर्व सिंधु जळानें आपल्यांत समावून केव्हांही घेतलें जातेंच. तेथें तें आपणामध्येंच कीं मिळवून घेतल्यावांचून दुसरें गत्यंतरच नाही–दुसरा उपायच नाहीं. (५५८)

तशी (प्रति, प्रमाद का) प्रीति तेथें प्रेम वृद्धिंगत व्हावें असें जें देवाचें व माझें विरुद्ध बोलणें झालेलें तें हे श्रीमुकुंदा उपसाहावें, [सहन करून असावें–आपल्यांत सामावून, मिळवून घ्यावें, पोटांत घालावें] (देवांनीं मजशीं बोलिलेली–मजकडून बोलाविलेली, जीं कांहीं बरोबर (का विरुद्ध) बोलणी तेथें देव प्रीति का प्रमाद हाच जसा प्रति प्रतिमामूर्ति–सादृश्यतेचा (विरुद्धच) तो प्रेमाचा धागा वागविला गेल्यानें तेथें अशीं ती बोलणीं होणारीच कीं. (५५९)

श्री देवाच्या क्षमाशीलावरचमुळीं ही क्षमारूपी पृथ्वी, ह्या सर्व प्राण्यांना आपल्या पाठीवर धारण करते. तेथें आधारचमुळीं ती ह्या सर्व प्राण्यानां ह्या भूतग्रामांना, अशी आहे म्हणून जेवढें कांहीं किंवा जेतुलें म्हणून आपणांस हे पुरुषोत्तमाना जे आधार ह्या भूतग्रामांनां त्यानां विनवावें, तितके थोडेंच कीं होय. (५६०)

करितां हे अपरिमिता, अखंड अमर्याद अशा हे अप्रमेया, समजण्यास कठिण अशा दुर्ज्ञेया ! अगाधा ! ह्या मला आपल्या शरणागताला सर्व अपराधासहित क्षमेनें विभूषित करावें कीं जी अहो ! (५६१)

**‘श्रीरामस्तुति’—** (श्लोक ४३, ४४, ४५)

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**नत्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥**

त्वं अस्य लोकस्य च पिता = तुम्हीं ह्या सर्व लोकांचे पूज्य असे पिता आहांत. त्वं अस्य चराचरस्य गरीयान् गुरुः = पूज्य असे, श्रेष्ठ असे, गुरूंचेही गुरु आहांत. नत्वत्समः = तुमच्या सारखा दुसरा कोणीहि नाहीं. अधिकः कुतः अन्यः = तर मग अधिक तो कुठचा असणार ? लोकत्रये अपि अप्रतीम प्रभावः = आपला सामर्थ्यप्रभाव, महिमा ह्या तिन्हीं लोकांमध्यें अप्रतीम लोकोत्तर असा आहे.

अन्वय :—लोकत्रये अप्रतीम प्रभावः । त्वं अस्य चराचरस्य लोकस्य पिता असि । पूज्यः असिः गुरुः असिः गरियान् गुरुः असिः । त्वत्समः न । अधिकः अन्यः कुतः ॥ ४३ ॥

अर्थ :—(१) तिन्हीं लोकांमध्यें अप्रतीम अशा प्रभावानें, सामर्थ्याचे तुम्हीं, ह्या लोकांचे तसेच चराचराचे पिता आहांत, पूज्य असे श्रेष्ठ गुरु आहांत.

(२) सर्व लोकांचे व चराचराचे आपण पिता आहांत, आपण सर्व चराचरांनां पूज्य आहांत, सर्व लोकांना व चराचरांना आपणच गुरु आहांत, सर्व लोकांना व चराचरांना आपणच श्रेष्ठ आहांत. आपणा-सारखा दुसरा कोणी नाहीं. मग तुमच्याहून अधिक असा तो कुठून असणार ? तुम्हीं ह्या तिन्हीं लोकां-मध्यें अप्रतिम अशा लोकोत्तर प्रभावाचे–सामर्थ्याचे (तुम्हींच सर्वोत्कृष्ठ अशा योगशक्तीचे) आहांत.

(३) हे अतुल सामर्थ्यवंता ! तुम्हीं ह्या जगतात्मक विश्वाचे पालनकर्ते पिता आहांत. सर्वांना वंद्य आहांत. आपण फार मोठे म्हणजे श्रेष्ठ असे गुरु आहांत. साऱ्या त्रिभुवनांत देखिल तुमच्या बरोबरीचा दुसरा कोणीच संभवत नाहीं. मग तुमच्याहून अधिक सामर्थ्यवान् कसा संभवेल ? कोठून असणार ? ॥ ४३ ॥ (श्लोक ४३वा, ओवी ५६२ ते ५६२)

**(पितासि लोकस्य चराचरस्य)**
**ऐसे जी जाणितले मिया सांचे। महिमान आतां देवाचे।**
**देव चराचराचे। जन्मस्छान ॥ ५६२ ॥**
**(त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्)**
**हरिहरादि समस्तां। देवा (तू) तुम्ही परदेवता।**
**वेदातेंहि पढवितां। आदि गुरू तूं ॥ ५६३ ॥**
**गंभीर तूं श्रीरामा। नाना भूतैकसमा।**
**सकळ गुणी अप्रतीमा (अ-प्रतीमा)। अद्वितीया ॥ ५६४ ॥**
**(न त्वत्समोस्ति। तुजसी नाहीं सरिसे। हे प्रतिपादनचि काईसे।**
**तुवा जालेनि आकाशे। सामाविले जग ॥ ५६५ ॥**
**(अभि अधिकः कुतः अन्यः) त्या तुझेनि पाडे बुझे। ऐसे बोलताचि लाजिजे।**
**तेथ अधिकाचि कीजे। गोष्टी कायसी ॥ ५६६ ॥**
**(लोकत्रयेऽप्यतिमप्रभावः) म्हणोनि त्रिभुवनी तू येक। तुज सरि नाहीं अधिक।**
**तुझा महिमा अलौकिक। नेणिजे वर्णू ॥ ५६७ ॥**

जी–ऐसे जी. जाणितलेया–जाणितले मिया. देव-देवो. स्छान–स्थान. (५६२) तूं–तुम्हीं. परदेवता–परमदेवता. आदि–आद्य. (५६३) भूतैकसमा=अनेक भूत, एक सम; अनेकत्व–एक भूत समाः (वर्षे)=एक भूतच ते अनेक भूतांचें, एक सम झालेले, विश्वरूप जसें. अ प्रतीमा–अप्रतिमा. (५६४) सरिसे='दोन्ही सरिसे सारिखे विश्वरूप विठ्ठल सखे'. कायीसे–कायसे. आकाशे–अवकाश=तूं उत्पन्न केलेल्या आकाशांत सारें विश्व सांठविलें आहे (सामावलें जग) (५६५) त्या–तया. अधिकाचि–अधिकचि. कायसी–कोणी. (५६६) येक–एक. सरी–सारिखा. अधिक–आणीक. अलौलिक–अलौकिक. वर्णू–वानूं. (५६७)

**'श्रीराम स्तुति'— नाना भूतैक समा। गंभीरा श्रीरामा।**

असे ते श्रीदेवांचें महिमान मी खरेपणानें, सांचेपणानें जाणितलें–जाणलें. देव हे चराचराचें जन्मस्थान होत. (५६२)

अहो देवा! हरिहरादिकां समस्तांनां सुद्धां तुम्हीं परमोदार देवता आहांत–, परम व पर अशी देवता आहांत. अहो! प्रत्यक्ष वेदांनाही तुम्हींच पढविते आहांत! असे तुम्हीं आदि तसेच आद्य गुरु आहांत! (५६३)

अहो! हे श्रीरामा! तुम्ही महागंभीर असे अनेक भूतांनां एकसम आहांत; सर्व गुणांची अप्रतिम प्रतिमा तुम्हांमध्यें आहे; तुम्हीं अद्वितीय असें आहांत. भूतांचें अनेकत्व समसमानें एकत्वास आलेलें असें; तेथें त्रिगुण हेच उभे झाले; तेथें गुणत्व जाऊन आदिशक्ति गुणमयी तीच सगुण होऊन आली; अप्रतिमा, अप्रतीम अशी तुमची प्रतिमा तुमची तुम्हां सारखीच, तेथें अप्रतीमतेमुळें द्वितीयत्व नाहीं–, अद्वितीयत्वच एक तेथें तुम्हांमध्यें अहो! श्रीरामा! असें अप्रति म्हणजे देवत्वच एक सर्वथैव–देवच एक सर्व तेथें !!! (५६४)

विश्वनाथ व विठ्ठल हे जसे सखे तसें तुम्हीं सरिसे; ते तुम्हांसारखेंच होत–, तुम्हांजवळ अद्वितीयतेमुळें तुम्हांहून अधिक असें कांहींच नाहीं–तुम्हीं तुम्हांसारखेच होत. सागर सागरासारखाच. तेथें दुसरी उपमा मुळींच ठरत नाहीं. तसें तुम्हीं तुम्हांसारखेच कीं अहो! तुम्हांजवळ हून किंवा अधिकतर, अधिकतम, असें 'तर तम भावच' नाहींत. तेथें तुम्हीं एकले सर्वश्रेष्ठ असे अप्रतीम असे, असें हे प्रतिपादन

करणें ते तर काय कसचें! पण तुम्हींच मुळीं सर्व आकाश होऊन त्यांत जगरूपानें सामाविलेले होऊन आहांत. तुम्हींच उत्पन्न केलेल्या आकाशामध्यें सारे जग सांठविलें आहे. तेथें आकाश, अवकाश, जग सामावणें हे सर्व तुम्हींच होऊन आहांत. (५६५)

अहो! त्या तुमच्या पवाड्यावर–, विस्तारावरहि दुजें असें एकादें नाहींच. अहो! तुम्हांहून दुजें असें बोलतांना लाजच कीं अहो! येत आहे!!! तुम्हीं अद्वितीय! परब्रह्म! तुम्हा सारखेच तुम्हीं! येथें अधिकाची का अधिकतेची गोष्ट ती कसची? अशी गोष्टच मुळीं उरत नाहीं. पुरत नाहीं.

तुमच्यापेक्षां दुसरें एकादें जास्त आहे, असें म्हणतांच लाज येत आहे. अहो! वेदांनाही पढविणारे आदि असे आद्य गुरु आपणच आहांत. भूत एक समा–एकच भूत आकाशासारखें तेथें अनेकीं अनेक अशीं भूतें एकत्वास आलेलीं एकाच वस्तूंत सामावलेलीं असें परम, परब्रह्म–सकळगुणी अप्रतीम असे आपण अद्वितीय असें हें सर्व आकाश व्यापकत्वानें अवकाशानें आहे तेथें सर्व जग हेंच मुळीं सामाविलें जात आहे. असें आपण खरोखरीच अद्वितीय असे आहांत! सर्व जगतानें आज्ञा वंदावी असें जें कांहीं महिमान, तें तुमचें जवळ आहे! ह्या विद्वत्तेवरही उभे होणारे जें का एक 'आज्ञाच' पाळावी असें शोभविणारे का शोभणारें माऊलीपण असें जें कांहीं महत्व, तेंच तुम्हीं आहांत! चित्त हें अचित होण्याकडे सोकलेले व्याकुळ केव्हांही असणारच, पण त्या चित्तासच मुळीं ती मनुष्यपणाची मानव देहाची योग्यता आकलन व्हावी तीच मुळीं अति लोभनीय अशी असल्यानें तेथें त्या योग्यतेची जी देणगी तिजपुढें दुसऱ्या सर्व देणग्या तुच्छतेच्या कोटींत जाऊन बसतात. ह्या बुध्दीनें नेहमी ह्या जीवदशेच्या अभिमानास तर भलतीकडेच नेले जाणारे, तेथें विश्व हेंच जर नटविलें गेलें, शोभविलें गेलें तरच बरें! त्या आज्ञेप्रमाणें देहास वागविल्यास, व्यवहारास घेतल्यास, तेथें मग सहज चालतां चालतां संसार काज काम सर्व कांहीं करीत असतां, असतांच मुळीं सहजतेचें तें आज्ञा वागविणें हें स्वभावाच्या उत्तमत्वाच्या कोटींत जाऊन बसतें. तेथें सर्व साधन संपत्तीनें हा देहच मुळीं त्या त्या साधन शोभिवंतामध्येंच जाऊन बसतो. विचार करीत बसणें बरें नाहीं? असें बरें का तसें बरें? हें बरें का तें बरें–असें ह्या मनास व्यर्थपणें शिणविणें जें, तेंच धर्मधारणेस क्षीण करूं लागतें. म्हणून ह्या बुध्दीचें जें कांहीं दाक्षिण्य का महत्व, उत्तमत्व तेंच मुळीं, ह्या नामसंदेशावर उभें झाल्यानें, तेथें आज्ञेचें गहनत्व, तेंचमुळीं देवच एक देवपणावर उभा झाला असें होतें तेथें सर्व विश्व हें उत्फुल्लतेप्रत आल्यानें एक सहजपणेंच देवाचें येणें होय.

तप करीत बसणें का अनुष्ठानावर टेंकणें हें सर्व कांहीं जे परिणाम पहाणारें होतें तेंच मुळीं हें सहज रम्यतेचें तें नामधारकाचें जसें एक देवाशीं बोलणेंच होय. ज्ञान ज्ञान म्हणून जें आहे तें जर ह्या निवृत्तिलक्षणावर खडें झालें तर तें एका देवदिव्यतेवर कर्मव्यासीनें अगाधपणाचें झालेलें असें होय; पण अगाधपण जर वाढवीत राहिलों, तर मग तेथें प्रबुद्धतेचें लक्षण पुढें झाल्यानें व्यर्थ शीणच एकें, म्हणून तेथें ती निवृत्तिलक्षणा, ह्या आज्ञा प्रामाण्यानें साधली तर ती आज्ञाच मुळीं तो तेथीलचा सर्व संसार संभार उचलून धरते व शेवट हा म्हणजे विश्रांतीच एकही पाहविते. असे ते आपलें अति महत्व हें घेऊन चालत असल्यानें तेथें कसलेंही दुसरें बोलणें व्याख्यानाचें केलें, का दुसरी तिसरीकडेच कांहीं एक समाधान समाधानास यावें म्हणून हातभार लावणें केलें तर तें मुळींच उपयोगाचें होत नाहीं म्हणून तेथें (एकच गोष्ट ती ही कीं,) अधिक हा बोल म्हणजे सर्व शास्त्रें शिकलों, आजवर जगलों, कांहीं शिकलों, संवरलों तरीपण तेथें हें व्यवहार्यतेचें जें बेमालून असें उदाहरण आपलें सर्व सौंदर्य घेऊन चालत असल्यानें, नटत प्रगटत असल्यानें, त्याचे गोडीच्या सारखेपणाची ती गोष्टचमुळीं नाहीं; तेथें तें सौंदर्य त्याजसारखेंच होय. तें अद्वितीय असें, का अद्वय असें, असल्यानें तेथें दुजेपण हें मुळींच नाहीं; अहो, एकले एकपणच कीं सर्व जगाचें होऊन तें एकसम (आकाश आकाराचें जीवित) झालेलें तेथें अद्वितीयता हीच आपल्या बरोबर

परम दिव्य घेऊन चालत असल्यानें तेथें (तेंचमुळीं एक) आद्य असेंच गुरुपण शोभविलें गेलें, महत्वास आलें, स्वतःस शोभवूं लागलें, असें होय. (५६६)

म्हणून त्रिभुवनीं तुम्हींच एक होत–तुम्हीं नेहमींच अतिशयतेचे अधिक असे, अप्रतीम असे, अद्वितीय; म्हणून तुम्हां बरोबरीचा कोणी नाहींच. तुम्हांसारखा असा दुसरा कोणीही नाहींच. तुम्हीं म्हणजे तुम्हींच; आणीक एकादें का आणीक दुसरें असें नाहींच. अहो! जी श्रीरामा! जेथें तुमचा महिमा अलौकिक, लोकोत्तर असा असल्यानें तो वर्णनासच मुळीं येईना. तो वानणें होईचना!!! (५६७)

**श्लोक ४४ वा**

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्॥ ४४॥**

त्वां ईशं ईड्यम्=स्तुत्य अशा परमेश्वराला. तस्मात् प्रणिधाय काय प्रणम्य=(म्हणून आपणांस–ईशास–जेथून यज्ञाचें महत्व उगवलें आहे त्या यज्ञाच्या आदीस) मी आपला सर्व देह (काय) सर्वांग भूमीवर टेकून, साष्टांग असा करून तुम्हांस प्रणाम करीत आहें. प्रसादये=आपण मजवर प्रसाद करा. पितेव पुत्रस्य इत्यादि=पितापुत्रांचे, मित्रमित्रांचे, प्रियकर प्रियाचे का प्रियेचे सर्व कांहीं सहन करतो तसे तुम्हीं माझे अपराध सहन करावेत–तुम्हींच एकटे ते अपराध सहन करण्यास समर्थ आहांत.

अन्वय :—देव। कायं प्रणिधाय प्रणम्य। त्वां ईड्यं ईशं प्रसादये। अहं। देव! हितार्थम् पुत्रस्य पिता इव सख्युः सखा प्रियायाः प्रियः प्रियकरः इव सोढुम अर्हसि॥ ४४॥

अर्थ :—(म्हणून) माझें सर्वांग भूमीवर (ठेवून) टेंकवून तुम्हांस साष्टांग दण्डवत (नमस्कार) करून, स्तुत्य अशा तुम्हां परमेश्वराला, प्रसन्न व्हा! अशी मी प्रार्थना करतों. हे परमेश्वर! हे देव! पुत्राचा अपराध ज्याप्रमाणें पिता पुत्राच्या कल्याणार्थ सहन करतो, मित्राचा अपराध मित्र जसा मित्राच्या हितार्थ सहन करतो, प्रिय पत्नीचा अपराध जसा पति पोटांत घालतो, त्याप्रमाणें तुम्हीं माझे सर्व अपराध क्षमा करावेत. अपराध सहन करण्यास तुम्हीं समर्थ आहांत म्हणून (प्रणिपातपूर्वक मी तुमची प्रार्थना करीतों कीं, माझे सर्व अपराध आपण (माफीचे) क्षमा करावेत. ॥ ४४॥

(श्लोक ४४वा, ओव्या ५६८–५७९)

**(तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायम्)**
**ऐसे अर्जुने म्हणितले। मग पुढती दंडवत घातले।**
**तेथ सात्विकाचे आले। भरते तया॥ ५६८॥**
**(प्रसादयेत्वामहमीशमीड्यम्)**
**मग म्हणतसे प्रसीद प्रसीद। वाचा होतसे सगद्गद।**
**म्हणे काढि अपराध। समुद्रौनिया॥ ५६९॥**
**तुज विश्व सुहृदाते कांहीं। सोयरेपणे न मनूचि पाही।**
**तुज विश्वराच्या (विश्वेश्वराच्या=ईश्वराच्या) ठायी।**
**(अनीश्वर) ऐश्वर्य केले॥ ५७०॥**
**तू वर्णनीय परि लोभे। मज वर्णिसी पां सभे।**
**तरी म्यां वलंगिजे क्षोभे। अधिका अधिक॥ ५७१॥**
**आतां ऐसिया अपराधा। (पाहाता) मर्यादा नाही श्री मुकुंदा।**
**म्हणोनि रक्ष रक्ष जी प्रमादा–। पासोनिया॥ ५७२॥**

(पितेव पुत्रस्य) जी हेचि विनवावयालागी। कैंचि योग्यता माझिया अंगी।
परि अपत्य जैसे सलगी। बापेसी बोले ॥ ५७३ ॥
पुत्राचे अपराध जरी जाले अगाध। तरी पिता साहे निर्द्वंद।
तैसे साहिजो जी ॥ ५७४ ॥
प्रियाचे ठायीं सन्मान। प्रियु न पाहे सर्वथा जाण।
तेवि उच्छिष्ट काढिले आपण। ते क्षमा कीजो जी ॥ ५७५ ॥
(सखेव सख्युः) सख्याचे उद्धत। सखा साहे निवांत।
तैसे तुवां समस्त। साहिजो जी ॥ ५७६ ॥
नातरी प्राणाचे सोईरे भेटे। मग जीवे भूतली जिये संकटे।
तिये निवेदिता न वाटे। (शंकाचि) संकोच कांहीं ॥ ५७७ ॥
कां उखिते आंगे जीवे। आपणपे दीजे (दिधले प्रिया) मनोभावे।
तिये कांत मिनलिया न राहवे। हृदय जेवी ॥ ५७८ ॥
तयापरी जी मिया। हे विनविले तुमते गोसाविया।
आणि (आणीक) कांहीं एक म्हणावया। कारण आहे ॥ ५७९ ॥

भरते–भरिते. (५६८) प्रसीद–कृपा करा. सगद्‌गद्–सद्गद. (सद्=पाणी, गृह, घर. गद्=वाक्य.) समुद्रौनिया–समुद्रौनि माते. (५६९) कही–कांहीं. विश्वर–विस्वर=बेसुर, शिक्षा, शिकवण, छंद, अध्ययन. विश्वराच्या–ईश्वराच्या–विश्वेश्वराच्या (देवीश्वर, देवेश्वर, विश्वेदेव, विश्व आत्मा, विश्व ईश्वर, विश्वसुहृद (ईश्वर उपचाराचा व्हावाच) ईशापेक्षांही श्रेष्ठ ईश्वर आहे–ईशते, ईश्वरायते. विश्वेश्वर=विश्व, ईश्वर ऐश्वर्य. अनीश्वर=नश्वर, मायिक, स्वार्थिक, स्वार्थी. ऐश्वर्य–आश्चर्य (पा. भे.) (५७०) लोभे–माते. म्यां–मियां. वलंगिजे–वल्गिजे–वगिलजे. प्रमादा (गबाळपण, अपराध)–प्रमदा. मर्यादा (=बेसावधपण)–पहाता मर्यादा. (५७२) निर्द्वंद्व=दुजाभाव सोडून. (५७४) प्रियाचे–प्रियाच्यिा. प्रियु=प्रिय. प्रियतम=पति; कांत. प्रियतमा=पत्नि, प्रिया. प्रियसख=खैर. प्रियप्राय=अति दयाळु वक्तृत्व. प्रियदर्श–प्रियदर्शी–प्रियदर्शन–नी=सुंदर; पोपट, मैना. (५७५) सख्याचे–सख्युचे. (५७६) (जीवे) भूतली=वर्तली, भोगिलेली, अनुभवलेली. तिये–तिथें. (शंकाचि)–संकोच. (५७७) उखिते=सर्वस्व एकदम. दीजे–दिधले जिया=ज्या सतीने. तिये कांत–तिया कांत. (५७८) आणि–आणीक. आहे–असे. (५७९)

याप्रमाणें अर्जुनानें म्हटलें व पुन्हां पुढें दंडवत घातलें तेव्हां त्यास सात्विकाचे भरतें आलें. (५६८) मग प्रसीद! प्रसीद! कृपा करा! कृपा करा! असें म्हणत असतां त्याची वाचा सगद्‌गदित झाली व नंतर तो म्हणूं लागला कीं, अहो! मजला ह्या अपराध समुद्रापासून बाहेर काढा! वांचवा!!

(१) तुम्हां विश्वसुहृदांनां–जगन्मित्राला आमचा सोयराधायरा असा आम्हांस धार्जिन आहे असें आम्हीं मानीत नाहीं; पण तुम्हीं जे विश्वईश्वर त्यांचे ठायींचेच असें अनीश्वर–अशक्त–स्वामीरहित असे नश्वर ते का ऐश्वर्यच एक केले कीं.

(२) 'आत्मा शाश्वत, देह नश्वर'—

तुम्ही जे प्रत्येक देहामधील अभिमानी जो जीव तेथें नश्वरतेचें विश्वच एक व अशा त्या विश्वाचे जे सुहृद म्हणजे मित्र त्यास आम्हीं आपला सोयरा असे केव्हांही मानीतच नाहीं–त्याचें सोयरेपण हे मनावर घेत नाहीं; अशा कारणामुळें तुम्हीं जे ईश्वर (सर्वज्ञरूप) त्या तुमच्या ठिकाणीं जसा एक (ईश=शक्ति असणें) अनीश्वर वादच–नश्वर–मायिक–असमर्थ–स्वार्थी–सोबती–वाद–करीत आहोंत–केला–परंतु काय अहो, चमत्कार कीं त्या अनीश्वर–असमर्थाच्या ठायीं कीं हो आम्हीं ऐश्वर्य ओतलें, तेथेंच ऐश्वर्य आहे असें समजतो.

विश्वेश्वर जे तुम्हीं ते ह्या विश्वाचे सुहृद–मित्र रक्षक; शरण; आश्रय; सखा; व त्यास सोयरेपणानें आपला आमचा सर्व संसारभार तो सर्वथैव उचलणारा होईल असें मानणें (मन्=विचार करणें, आदर करणें) जे ते आम्ही मानीत नाहीं, ते तसें मानावे कीं नाहीं हे समजून अथवा न समजून ते मनावर मुळींच घेत नाहीं–त्यास मुळी मानीतच नाहीं व असें झाल्यानें तेथें जशी एक उपास्तीची पदवीच मुळीं स्थिर केली व त्यास आश्चर्य–ऐश्वर्ययुक्त असें केलें

ईश्वरं मायिनं विद्यात्। मायातीत निरंजनम्'—

'सर्वज्ञ ईश्वरू। किंचिज्ञ जीव अनीश्वरू। एक न होती निर्धारू। विरोधास्तव'॥

विश्वराच्या ठायीं अनीश्वर केलें मायादेवी+ईश्वर=मायादेवीश्वर. विश्वेदेव=सभ्य सभ्यपणातच सर्व ऐश्वर्य आहे असें समजून.

विश्वसुहृदास आम्ही सोयरेपणानें न मानूं आणि म्हणून तुज मायादेवीश्वराचे ठायीं कीं नश्वर वादच एक केला (व अनीश्वर म्हटलें) व विश्वेश्वराच्या (विश्व ईश्वराच्या) ठायींच सर्व ऐश्वर्य ओतलें व त्यासच सर्व ऐश्वर्याचें केलें.

तुज देहधारीस मनुष्यरूपास नश्वर समजून स्वार्थी असें म्हटलें व त्यामुळें अनीश्वरत्वच एक तेथें जसें का प्रस्थापित व्हावें असें झालें. नश्वरासच–अनीश्वर–ऐश्वर्य आहे असें झालें. (५७०)

तुम्हीच वर्णनीय पण लोभामुळें मजलाच कीं, सभेमध्यें वर्णित आहेत : तेथें मी तर अधिकाहूनहि अधिक क्षोभाप्रत येऊन बगिलजे का वल्गना करावी, बडबड करावी!

**आत्मा शाश्वत देह नश्वर**–प्रत्येक देहामधील अभिमानी जो जीव तो विश्वच एक–तेथें ह्या षड्विकारांच्या उर्मीच वर उसळणाऱ्या; त्याचमुळीं सभेमध्यें वर्णन केल्या गेल्या, (दिग्दर्शनास आल्या गेल्या,) प्रदर्शनाच्या झाल्यानें–वर्णनास घेतल्या जाण्यानें मी तर विश्वाभिमानी जो जीवात्मा तेथें देहबुद्धीच एक व त्या देहाभिमानामुळें अधिकाधिकच क्षोभास येऊन वल्गनाच करीत होतों जशी : तेथें तुम्हांशीं लोभ जोडल्यानें देहधारी जसे एक तुम्हीं असे घेऊन स्वरूपाच्या विसरामुळें तुमचें वर्णन न करितां (जरी तुम्हीं वर्णनीय असे तरीसुद्धां व्रत, रूप, सौंदर्य, भेद कसास कसे लाविले किंवा ईश्वर तेथें) तें वर्णन जसें ह्या देहाभिमानाचें होऊं लागलें, तुमचें स्वरूप जें विश्व–सुहृद तेथें ते जे ह्या देहवंताच्या भरणपोषणास देणें जें ह्या पंचभूताचें संरक्षण का महत्व तेंच मुळीं आभरणासच पोहोचतें झाल्यानें तेथें देहाभिमान हाच दृढ होत गेला. त्यामुळें ह्या आभासांनां महत्व दिलें गेलें. तेथें लाजच सर्व येऊं लागली. मग काय एक क्षोभणेंच पुढें होऊन येत होतें.

विश्व जें सगुण तेंचमुळीं ह्या देहाचा संसार करणारें ह्या देहरचनेचें जें कांहीं ऐश्वर्य तेंच ह्या नामधारणेनें तें विश्वच नटविलें गेलें. तेथें तें नामधारण इतकें लोभनीय झालें कीं तेथीलचें अंतर मुळींच न सांपडल्यानें एक क्षोभच पुढें होऊं लागला. अहो, शुचिष्मंततेचें जें कांहीं एक (अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे) – सुसंस्कृततेचे करणें अन्न संस्कृत व्हावयासाठीं–अहो! जे संस्कार ह्या ब्राह्मण्यास उचलून धरणारे तेथें गरजा पुरविणारें जें कांहीं एक आमंत्रिततेचें ह्या शब्दोच्चारांनीं–उच्चारानें (शब्द, आकृति, वस्त्र, आच्छादन) ही नरदेहधारणाचमुळीं त्या संस्कारांनीं ब्राह्मण्यास पाहाणारी तेथें तें विश्वबीजच मुळीं हरविलें जात राहिल्यानें देवत्वाच्या जागीं एक अधिकाधिक क्षुब्धताच जशी का सभेमध्यें वर्णिली गेली, प्रदर्शनास आली. तेथें आतां संबंध किंवा आकारच एक उभा झाल्यानें तर लाज पुढें झाली व तिनें तर आधकाधिकच आपलें ठाणें दिलें, केलें, दृढ करूं लागल्यानें काय सांगावें की संबंधासच बुजगावण्यास बुजूं लागलों, संबंधाचा आकाराचा का बागुलाचा माराच मुळीं खराच होऊन आला व त्यानें

तर एक वाग्जल्पन का बडबडणें का व्यर्थ वल्गना होऊं लागली. तेथें तें विश्वबीज हरवलेंच! नव्हे का? असें हें काय बोलण्यासारखें मुळींच नाहीं. तेथें अपराधाच्या राशीच जोडल्या गेल्या. तुम्हींच मुळीं एक सर्व मनुष्यच देव मापाचे–वर्णनीय असे तेथें अवर्णनीयत्व पण स्तुतीची, कीर्तीची, वर्णनाची एक लोभावर उभी झालेली आकांक्षा तिनेंच मुळीं तें अवर्णनीयत्व वर्णनीय केलें–असेंही का म्हणाना! पण असें तें परमात्म्याचें जर वर्णन करूं लागलों तर ब्रह्म अनाम असल्यानें तें वर्णन केव्हांही होणारें नव्हेच, तेथें तर ही माया देहबुद्धीची मुळीं आड येणारी म्हणून जें मुळींच ह्या वर्णनास सांपडत नाहीं तें वर्णनीय तरी कसें बरें होणारें?

(बावन वर्णापरता एकहि मंत्र नाहीं व बावन उच्चारिले नाहींत तर काय जीवपण तेथें असतें? म्हणून मंत्राची परीक्षा जोंपर्यंत जाणली जात नाहीं, तोपर्यंत उच्चाराचें फल–वाणी ही पाहात नाहीं तसें कारण किंवा हेतूमुळें पिसाट कर्म निपजतें तें शास्त्राचे कसास किंवा कासेस जोंपर्यंत लागत नाहीं तोपर्यंत जरी कर्म हें होतच असतें तरी तेथें कर्माचें तें होणेंच नव्हे, कर्म होत आहे, असें नाहींच; तेथें अन्यायच एक अन्यायावर हेतूचा झाला असें होऊन असतें. अध्याय १८ वा, ओवी ३७५/३७६) (५७१)

हे मुकुंदा, आतां अशा अपराधाची तर मर्यादाच नाहीं; म्हणून प्रमादा बेसावधपणा, हर्षानंदानें प्रीतीनें उन्मत्त होणें, उपमर्द, चूक, (गाफिलपणा) इत्यादि अपराधांपासून रक्ष, रक्ष, आमचें रक्षण कर. (५७२)

परंतु हें एवढें विनवणें जें तेंही होण्यास, करण्यास माझ्या अंगीं योग्यता नसल्यामुळें, ती योग्यता मी कोठून आणावी, अहो! पण एकाद्या बालकानें जसें बापाशीं सलगीनें लडिवाळपणानें बोलणें करावें त्याप्रमाणें मी बोलत आहें. (५७३)

मुलाचे अपराध अगाध–का पुष्कळ असले जरी, तरी बाप–पिता 'दुजाभाव सोडून' ते मुलाच्या कल्याणास्तव सहन करितोच करितो; तसें माझे समस्त अपराध ते आपण सहन करावेत. (५७४)

प्रियकराकडून प्रिया ही सन्मान मागते का इच्छिते, असें केव्हांही नाहींच; त्याप्रमाणें आपण उच्छिष्ट काढलें तें अहो! जी देवा, क्षमा करावें. प्रियानें सन्मान द्यावा, अहो महाराज यावें! अहो महाराज! असे जे स्तुतीचें जें कांहीं एक महत्वानें रंगविणें–तेथें बुद्धीनें तें प्रियपण का त्या प्रियपणाचें वर्णन रंगवावें असें नाहींच! अहो! तेथें प्रियपण तें कसें तें वर्णनानें रंगविलें स्तुतीनें पाठकपणच जसें एक पत्करलें असें केव्हांही असतें काय?

ते प्रियपण अति सन्मानाचें केलें, व्याख्यानाचें झालें. तेथें प्रियानें तें प्रिय जें तेंच मुळीं अनेक अशा सुंदर वचनांनीं वर्णनास घेतलें–तेथेंच सर्व अवर्णनीयता ओतली असें करणें, त्या प्रियवस्तूंस मुळींच नको असते. सन्मानाचें तें प्रियपण नसून तेथें ती जी सीमा सर्वथा प्रेमाची होऊन प्रेमांतच बसणें हेंच मुळीं तें प्रियपण होय. तेथें खरोखर प्रिय आहे किंवा नाहीं का दुसरीकडे कोठें तें प्रियपण आहे, हें कांहीं ती प्रियवस्तु पाहाण्याचें करीत नाहीं. कारण प्रीतीचे प्रिय सर्वथा झालें तर तेथें सर्व प्रीति सर्व प्रियता, सर्व प्रेमच मुळीं स्थिर झालें असें होयः म्हणून येथें प्रेमाचे न होतां, त्या प्रेमांत न बसतां, त्याबाबत बोलण्याचें म्हणजे ते देहबुद्धिवरच टेकणारे आतां जसें झालें असे तें मग केव्हांहि प्रियपण जसे एक सन्मान पाहूं दिलें, सन्मानार्थ केलें, असें होय. तेथें सर्व सन्मान एक ओतला गेला–प्रियपण तेंच मुळीं सन्मानास आलें–म्हणून तो प्रेमाचा विकास न पाहतां प्रिय तें जसें आतां सन्मानाचें झालें; एक स्तुतीच तेथें गाईली जाणारी–कीर्तीच वर्णिली, नुसत्या स्तुतीचें मापच एक सन्मान प्रिय, असे होऊन बसलें म्हणून तेथें आतां जसें एक उच्छिष्टच पदरांत पडणारें हें आपण जाणिलें व तें नुसत्या वीरू सन्मानाचें होणें तेथील उच्छिट आपण काढिलें हें केवढें बरें आपलें क्षमा करण्याचें उदारपण !!! (५७५)

सख्याचें दांडगेपण–दांडगटपण तरी तें सखा जो तो तर निवांतपणेंच सहन करतो. तसें तुम्हीं माझे समस्त अपराध ते सहन करावेत.

अहो, सखा म्हणजे मित्र जो आहे तो तर सख्यु आहे म्हणजे प्रीति रसायन जे भाजन तेथेंच सख्यत्वांतच त्या प्रीतींतच राहातो.

तेथें भांडणें तंटणें, का अपराध, का चूक, कीं गाफीलपणा, हर्षानंदानें उपमर्दतेचें होणें, प्रीतीचें उन्मत्त तेथें सखा जो तो तर निवांतपणेंच सहन करितो. त्याप्रमाणें अहो ! आपण सर्व जें कांहीं मजकडून झालेलें अमर्यादतेचें तें समस्त अपराध सहन करावेत–पोटांत घालावेत. सख्यु म्हणजे प्रीतीचें स्थान जें तेथें सखा म्हणजे प्रिया त्या सख्यूचे अपराध कधींच पाहात नाहीं. प्रेम हें केव्हांही प्रेमच होय : तेथें नजर चुकीनें सहजच जसें कांहीं अपराधाचें असें होतें, तें सखा निवांतपणें सहन करणारा, क्षमा करणारा असतोच.

"गायन भजन—

" शिव भवानीये उपदेशीची प्राणप्रिये । निजमानासी ध्याये परमानंदु पाहे ॥ १ ॥ रामु सखा रामु सखा । रामु सखा हरि रामु सखा ॥ धृ ॥ सहस्रनामावरी कळसु साजे । तोचि तो अंतरि बाहिजु भीतरीं ॥ २ ॥ हेचि निजकर्म हाचि निजधर्म । हेचि परब्रह्म वर्म हेंचि एकु ॥ ३ ॥ जिवाचें जिवन मनाचें मोहन सुखाचें साधन भक्तिज्ञानाचें अंजन ॥ ४ ॥ बाप रखुमादेवीवरू सुलभु साकारू । अर्ध मातृका अक्षरू चिदानंदु सुख थोरू ॥ ५ ॥ "

मानीनीचे मानीपण (प्रीति जी दुज्यावर मोठी । ती सर्वेहि आपुल्यासाठीं । मानिनी !) सौंदर्याचें मोठेपण, महत्व, मानीपण—मान्यतेचें,–

जिवाचा सखा, जिव सखी, जीव सख, त्यानें (उद्धत) वर उडविलेले जीवित, का अतिशय कठोर असें जोराचें बोलणें, त्याचें क्षुब्ध होणें का उत्तेजित होणें का उत्सुकतेचें तें प्रदर्शन का भव्यतेचें तें का झगझगित असें ही हें बोलणें कां जीवित करणें तें पूर्ण प्रेमाचें असेंच होऊन असतें तें मुकाट्यानें सहन केलें जातें, त्याप्रमाणें माझे अपराध आपण सहन करावेत. (५७६)

अथवा प्राणाचे सखे सोयरे भेटले असतांनां अहो ! तेथें सर्व प्राणच आनंदास आला, जीवित आनंदाचें झालें, तेथें त्या जीवदशेनें भोगिलेलीं, अनुभवलेलीं, वागविलेलीं, (ज्यांचें निवारण झालें आहे अशीं) संकटें-सांकडें सांगतांनां, निवेदन करितांनां, मुळींच संकोच वाटत नाहीं, शंका येत नाहीं. (५७७)

जिनें मनोभावानें आपलें तनमन आपल्या पतीच्या-कांताच्या ठायीं आत्म अर्पण केलें आहे. सर्व अंगानें दिलें आहे, अशी सती, तिला जेव्हां तो प्रिया का कांत का सखा, पति, मिनला, भेटला तर तिचें हृदय हें सर्व गोष्टी सांगितल्याशिवाय केव्हांहि स्वस्थ रहाणार नाहीं. तिच्या हृदयींचें तें ती मनोभावानें सांगतेः तेथें हृदय हें उचंबळून येऊन प्रेमास पाहाणारें हें केव्हांही ! (५७८)

त्याप्रमाणें, अहो जी देवा ! गोस्वामी, स्वामी, गोसाविया आपल्या चरणीं सर्व कांही निवेदन केलें आहे. आपल्या चरणीं ही विनवणी केली आहे. आतां याहीवर आणिक एक सांगणें, करणें का विनवणें आहे, तेंही पण सांगतों. (५७९)

## श्लोक ४५ वा

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

मे मनः भयेन च व्यथितं च =माझें मन भयानें व्याकुळ होत आहे. देव! तत् एव ते रूपं मे दर्शय=अहो देवा! तुमचें तें देव चतुर्भुज रूपच मला दाखवा. देवेश जगन्निवास जगदाधारा जगाचें रहाण्याचें ठिकाण जे आपण ते प्रसन्न व्हा.

अन्वय :—देव! अदृष्टपूर्वं दृष्ट्वा हृषितः अस्मि। भयेन व्यथितम् च। मे मनः। देव! तत् एव (चतुर्भुज) रूपं दर्शय। देवेश जगन्निवास प्रसीद ॥ ४५ ॥

अर्थ :—पूर्वी केव्हांही न पाहिलेलें तें चमत्काराचें जसें आपलें रूप पाहून मी अति हर्षयुक्त झालों आहे. हे देवाधिदेवा ह्या सर्व जगास आपण आश्रयभुत-आधार असलेले देवा। आपण आपल्या मूळच्या चतुर्भुज देवरूपानें मला दर्शन द्या, अशी विनंति आहे; आपण मजवर प्रसन्न व्हा. ॥ ४५ ॥

(श्लोक ४५वा, ओ. ५८०-६००)

(अदृष्टपूर्वम्) तरी देवेसी सलगी केली। जे विश्वरूपाची आळी घेतली।
ते माय बापे पुरविली। स्नेहांनी ॥ ५८० ॥
सुरतरूची झाडे। आंगणी लाविली कोडे।
द्यावे कामधेनूचे पाडे। खेळावया ॥ ५८१ ॥
म्यां(मिया) नक्षत्री डाव पाडावा। जे चंद्र चेंडुवा लागी द्यावा।
हा छंद सिद्धि नेला आघवा। माऊली तुवा ॥ ५८२ ॥
जया अमृत लेशा लागी सायास। त्याचा पर्जन्य केला चारी मास ॥
पृथ्वी वाहोनि चासेचास। चिंतामणी पेरीले ॥ ५८३ ॥
ऐसा कृतकृत्य केला स्वामी। बहु लळा पाळिला तुम्हीं।
दाविले जे हरब्रह्मी। नाईकीजे कानीं ॥ ५८४ ॥
मा देखावयाची केउती गोष्टी। जयाची उपनिषदा नाहीं भेटी।
ते जिव्हारी गांठी। मजलागी सोडिली ॥ ५८५ ॥
जी कल्पादी लागोनि। आजिची घडी धरूनि।
हे माझी जेतुली होऊनि। गेली जन्मे ॥ ५८६ ॥
तया आघवेयाची आंतु। घर धांडोळी घेऊनि असे पाहातु।
परि हे देखिली ऐकिली मातु। आंतुडेची ना ॥ ५८७ ॥
जी बुद्धिचे जाणणे। कंहि न वचेचि याचेनि आंगणे।
हे (साद) साध्यही केउती अंतःकरणें। करवेची ना ॥ ५८८ ॥
तेथ डोळिया देखिली होआवी। हे गोष्टीचि काईसया करावी।
किंबहुना ऐसे पूर्वीं। दृष्ट ना श्रुत ॥ ५८९ ॥
(हृषितोऽस्मि दृष्ट्वा) ते हे विश्वरूप जी आपुले। तुम्ही मज डोळा दाविलें।
तरी माझे मन जाले। हृष्ट देवा ॥ ५९० ॥
परी आतां ऐसी चाड जीवी। जे तुजसी गोष्टी करावी।
जवळिक हे भोगावी। आलिंगावासी ॥ ५९१ ॥
ते येचि विश्वरूपी करूं म्हणिजे। तरी कोणे येक वदनेसी चावळिजे।
आणि कवणा क्षेम दीजे। तुज लेखचि नाहीं ॥ ५९२ ॥
(भयेन च प्रव्यथितं मनो मे) म्हणोनि वारयासवे धांवणें। न टके गगना खेवो देणें।
जळ केली खेळणे। समुद्रीं केउती ॥ ५९३ ॥

या लागी जी देवा । येथिचे भय उपजतसे जीवा ।
म्हणूनी येतुला लळा पाळावा । जे पुरे हे आतां ॥ ५९४ ॥
(तदेव मे दर्शय देवरूपं) पै चराचर विनोदे पाहिजे । मग तेणे सुखे घरी राहिजे ।
तैसे चतुर्भुज रूप तुझे । तो विसावा आम्हां ॥ ५९५ ॥
आम्ही योगजात अभ्यासावे । त्याने (तेणे) याचि अनुभवा यावे ।
शास्त्राते आलोडावे । परि सिद्धांतु तो हाचि ॥ ५९६ ॥
आम्ही यजने किजेति सकळे । परि तिये फळावी येणेचि फळे ।
तीर्थे होतु सकळे । याचि लागी ॥ ५९७ ॥
आणीकही कांहीं जे जे । दान पुण्य जी आम्ही कीजे ।
तया फळी फळ तुझें । चतुर्भुज रूप ॥ ५९८ ॥
ऐसी तेथिची जीवा आवडी । म्हणउनि ते देखावया लवड सवडी ।
वर्ततसे जी सांकडी । ते फेडि जी वेगा (वेगी) ॥ ५९९ ॥
(जगन्निवास)
अगा जीविचिया जाणतया । सकळ विश्व वसवितिया (वसवतिया, वसवितया) ।
(प्रसीद देवेश) प्रसन्न होई पूजितिया । देवाचेया देवा ॥ ६०० ॥

आळी=हट्ट. स्नेहाळांनीं–स्नेहाळाचेनि. (५८०) लाविली–लावावी. यावे–देयावे. (५८१) म्यां–मियां. नक्षत्री डाव पाडावा=नक्षत्रें तीं फांसे म्हणून खेळायला मागावींत. चेंडुवा लागी=चेंडू म्हणून. यावा–आणावा. (५८२) जया–जिया. चासेचास–चासेमास=नांगराच्या प्रत्येक रेषेंत. वाफ्या–वाफ्यांत. (५८३) कृत्यकृत्य–कृतकृत्य. केला सा मी=केलो स्वामी. हरब्रह्मी–हरीहर ब्रह्मी–हर ब्रह्मी –केव्हांही, नाईकीजे कानी=हर अथवा ब्रह्मा यांच्या कानांनां ऐकण्यास मिळणारें नव्हे. (५८४) गोष्टी –गोठी (५८५) लागोनि–लागौनि (५८७) आघवेयाचि–आघवियाची. घरधांडोळी–घर डोळी=प्रत्येक घराचा झाडा. हे–ही. (५८७) न वचेचि याचेनि. आंगणे, बुद्धीचें जाणणें=या विश्वरूपाच्या आंगचा (आंगणांतील) तो बुध्दीचा जाणणेरूपी गुण असल्यानें तेथें बुध्दीचें कांहींच चालत नाहीं. तसेंच (साद) ध्वनीचेंही पण तें सादणें अंतःकरणानें केलें जात नाहीं हें साध्यही अंतःकरणें–हे साद केउती अंतःकरणे. (५८८) देखिली–देखी. (५८९) मजला दाविले–मज डोळां दाविलें. (५९०) गोष्टी–गोठी. आलिंगावासी–आलिंगावयासी. (५९१) येचि विश्वरूपी–इयेचिरूपी. वदनेसी चाळविजे–मुखेसी चावळिजे. क्षेम देईजे–खेंव दीजे. लेखचि–लेख. (५९२) खेंवो–खेंव. जळ केळी–जळ केली. केउती–केउते. (५९३) ते–तो. (५९५) त्याने–तेणे. (५९६) कीजेति–कीजती. (५९७) म्हणउनि–म्हणोनि. ते तेचि. लवड-सवडी=त्वरेनें, उत्कंठेनें. वर्ततसे–वर्तत असे. ते फेडी जी वेगा–फेडी जी वेगी. (५९९) जाणतया–पूजितया. देवाचेया–देवाचिया. (६००)

थोड्याबहुत परिचयामुळें आपणांशीं मी सलगी केली व ह्या विश्वरूपाच्या दर्शनाकरितां हट्टच घेऊन बसलोंः दर्शनाची ती इच्छा, हे मायबापा ! आपणां प्रेमळांनीं पुरविली ! अहो ! प्रेमळ जे त्यांस प्रेमळ भेटला असतां तेथें आळीच एक जशी का दर्शनाच्या हट्टासंबंधोंची ती पुरविली म्हणजे खरेंखोटेंचा प्रत्यक्षा-वर निवाडा दिला असें तें आपणां स्नेहाळाचें–प्रेमळाचें मुळीं प्रेमच जें त्यानें तुम्हीं आपल्या सर्व प्रेमभारास आणिले जाता असें होत; प्रेमळ जे त्यांचेच सर्वभावें तुम्हीं आहांत हे केव्हांही ! (५८०)

ज्याप्रमाणें विश्वरूपाचा हट्ट घेतला व तो देवा ! आपण पुरविला, त्याचप्रमाणें जशी का देववृक्षाचीं झाडेंच आंगणामध्यें मोठ्या (प्रेमानें) कौतुकानेंच लावावींत, तसेंच कामधेनूचें वत्सच खेळण्याकरितां द्यावें,

तेथें हें जें देणें घेणें पाहिजे तें सहजच पुरविलें जाणें, हा त्या एकंदर इच्छेचा पुरता करणारा असा लळाच का हट्टच एक जसा तेथें हेहीपण आपण पुरविते कां पुरते होऊन स्नेहाळाचें स्नेहाळपण का प्रेमानें प्रेमळपणच जसें जोगविलें जावें तसें होय. (५८१)

मी फांसे न घेतां नक्षत्रें घेऊन त्यांनींच कीं डाव खेळण्याची इच्छा करावी, चेंडूसाठीं चंद्रच देयावा आणावा, असा सर्व छंद तो माउलिनीं–तुम्हीं सिद्धीस नेला.

अहो ! एकंदर नक्षत्रतेच्या पुंजीवर जसा एक ह्या देवमहात्म्याचें ब्रीदच उभें केलें; तेथें त्या नक्षत्राच्या योगें खेळलेला तो डाव केव्हांही जिंकणेंच नाहीं तरी पण तो आपणच जसा प्रेमळाच्या प्रियोत्तमांनीं ह्या एकंदरतेचा जसा एक देखीस दिलेला सोहळाच होय. तेथें नवलपणाचें व अद्‌भुततेचें तें देवलीलेचें आकर्षण तें कसें व केवढें तरी आपलेपण घेऊन नटलेलें तें कांहींच बोलतां येत नाहीं. तसेंच अहो ! चंद्र जो आकाशमंडळांतील तोहीपण चेंडु म्हणून आणावा, चेंडु म्हणून खेळण्याकरितां द्यावा व तसा तो छंदही पण आपण सिद्धीस न्यावाः सर्व तऱ्हेनें तेथें माउलीपण शोभविलेलें तें कांहीं कसल्याहि उपमेस पुरतेंच होत नाही. तो कसल्याहि उपमेनें बरोबरीचा होणारा नव्हेच नव्हे. (५८२)

अहो ! ज्या अमृताच्या एका लेशमात्रासाठीं, अंशमात्रासाठीं, सायास हे केवढें बरें होणारे तेथें तर तुम्हीं त्या अमृताचा चारीमास–चार महिने–पाऊसच कीं पाडिला, वृष्टीच केली व पृथ्वी ती वाफ्यावाफ्यानें वाहून तीमध्यें चिंतामणी सारखीं रत्नेंच कीं पेरिलीं.

अहो हे माउलीये ! एक लेशभर अमृत मिळविण्यासाठीं केवढे तरी सायास मनुष्य करितो व येथें तर तुम्हीं माउलींनीं त्याचा तर पाऊसच केला : काय अहो ! असें हें आपल्या कृपेचें वर्षणें कीं, चार महिने, चातुर्मास त्या अमृताचा वर्षावच होत राहिला अहो ! नांगरानें फाळलेली जी जमीन त्या प्रत्येक रेषेमध्यें सर्व पृथ्वीच जशी वाहिली, उचलून धरिली व तीमध्यें सर्व चिंता पुरविणारीं रत्नेंच पेरलीं. सर्व दर्दी बुजविणारीं रत्नें, सर्व दुःखें नाहींशी करणारीं – सर्व ज्या कांहीं ह्या हृदयांमधील वर्मस्पर्शाची का परस्पर जें कांहीं एक भांडणतंडण का मलातुला, का माझेंतुझेंची जी बुद्धि तीचमुळीं सर्व जखमा बऱ्या करणारी जशी रत्नेंच ह्या पृथ्वीमधीलच्या नांगरानें फाळलेल्या रेषेमध्यें पेरलीच जशी का. (५८३)

असा मी कृतकृत्य केलों गेलों; अहो ! गोसाविया स्वामीनी तर तुम्हीं बहुत लळा पाळिला, लाड पुरविला तेथें तर जे का ब्रह्मदेव व शंकर यांचे कानीं केव्हांही नच पडणारे तेही मजला ऐकविलेंत.

याप्रमाणें अहो जी स्वामी ! मी जन्मास येऊन कृतकृत्य केला गेलों : अहो ! जी स्वामी तें तुमच्या प्रेमळपणानें एक लळा पुरविला गेल्यानेंच होय. हट्टच जसा पुरविला–असा बहुततेनें, बहु प्रकारानें, बहु प्रकारचा लळा पुरविला गेला. अहो ! जे कांहीं ब्रह्मदेवानें का महेशानेंही कधीं काळीं कानानीं ऐकलें नसेल, जें हरब्रह्मांनांही ठाऊक नसेल, त्यांनांही जें ऐकण्यास मिळत नाहीं, त्यांच्या कानींच मुळीं जी गोष्ट येत नाहीं, तें तर मी प्रत्यक्ष पाहिलें. तें तुम्ही मला प्रत्यक्ष दाखविलें ! (५८४)

तेथें अहो ! देखण्यापाहाण्याची गोष्ट ती कोठून आणावी, ती कोणीकडे कां कसची ती होणारी ! ज्याची कीं उपनिषदांसही भेट नाहीं, अशा त्या देखण्याची कां ऐकण्याची ती अंतरंगांतील गांठ मजसाठीं आपण सोडलीत किं अहो !

असें ते आश्चर्याचें एक जसें, तेथें पाहावयाची गोष्ट ती केवढी आहे बरें ! अहो, ज्याची उपनिषदानांहीं मुळीं भेटच होत नाहीं अशी ही आपण आपल्या जीवींची गोष्ट मजला सांगितली–जिव्हार हृदय–जिव्हाळाच तेथें सर्व गांठीं बांधलेला जसा, तेथें ती गांठच मुळीं आपण मजकरितां सोडिलीत. (५८५)

कल्पाच्या आरंभापासून तों तहत आजच्या चालल्या घडीस धरून जितके कांहीं माझे जन्म झाले असतील त्यांमध्यें–त्या अवघ्या जन्मामध्यें–घर धुंडाळून प्रत्येक घराचा झाडा घेऊन पहात आहें, पण तेथेंही देखणेपणाची का ऐकण्याची ती गोष्ट देखिली का ऐकली असें आढळून येत नाहीं. (५८६–५८७)

बुध्दीचें जाणणें जें, तेंही आंगचें आंगणेंच एक, तेंहीपण सांपडत नाहीं. बुद्धीनें जाणणें जागलें जात नाहीं. तसेंच हें शब्दाचें का हांकेचें तें तेथें अनुसरणें करून तें अंतःकरणानें साध्यही करवतच नाहीं. (५८८)

अहो! तेथें डोळ्यांना देखील पाहाणें गोचर व्हावें हें रूप, अशी गोष्टचमुळीं कसची ती! बहुत काय, पण असें पूर्वीं कोणी हें रूप पाहिलेंही नाहीं व ऐकीलेंही पण–नाहीं. (५८९)

असें तें आपलें विश्वरूप तुम्हीं मजला माझ्या डोळ्यांनां प्रत्यक्ष दाखविलें व आतां माझें मन अहो, देवा! आनंदित होऊन आहे, हृष्ट झालें आहे. (५९०)

पण आतां ह्या जीवामध्यें माझ्या मनामध्यें अशी चाड–इच्छा आहे कीं, मी तुम्हांशीं कांहीं बोलावें–तुमच्याशीं गोष्ट करावी व तुम्हांस आलिंगास–आलिंगण्यासाठीं तुमची जवळीक भोगावी तुम्हांस आलिंगावें. (५९१)

तसें तें बोलणें, का आलिंगन देणें तें ह्याच विश्वरूपाशीं करूं म्हणावें तर कोणत्या बरें त्या मुखा-बरोबर मी बोलणें करावें–चावळावें–बोलावें? व कोणत्या बरें त्या देहरूपास आलिंगन द्यावें–क्षेम द्यावें? तुमच्या रूपांस तर पार नाहीं. – तुम्हीं अगणित अशा रूपांचे असे आहांत, म्हणून मी कोणत्या रूपास आलिंगन देऊं? (५९२)

याकरितां असें पहा कीं वाऱ्याबरोबर धांवणें तें कसचें? गगनास खेंव–क्षेम–आलिंगन देणें, घडणें टिकणें शक्य नाहीं. अहो, अगाध असा जो समुद्र, त्या समुद्रामध्यें कसची ती जलक्रीडा करणें का केऊते, ते क्रीडा कां, खेळणे होणार बरें! (५९३)

यासाठीं अहो जी देवा! एथीच्या ह्या रूपासंबंधींचें कीं भयच एक ह्या माझ्या जीवीं उपज घेऊन आहे, भयच वाटत आहे: म्हणून एवढा छंद सिद्धीस नेलेला तो ळळा पाळावाच कीं व आतां आपण ह्या विश्वरूपाचें तें होणें पुरे करा. (५९४)

अहो! चराचर विश्व सहज विनोदानें, कौतुकानें देखावें, पहाण्याचें करावें, व मग त्या पाहाण्याच्या सुखावरच कीं घरीं स्वस्थ रहावें जसें, त्याप्रमाणें तुमचें हें जें चतुर्भुज रूप तेंच कीं आम्हांस विसावा होय. (५९५)

आम्ही यमनियमादि अष्टांगयोग कां सर्वयोग अभ्यासावा तो कशासाठीं, तर ह्याच कीं अहो चतुर्भुज रूपाच्या दर्शनासाठीं ना? शास्त्रेंहीपण शिकावीं, आलोंडावीं, शास्त्रांचें अध्ययन करावें, त्यांत पारंगत व्हावें, तरीपण तेथें हाच एक सिद्धांत कीं तें रूप चतुर्भुज विसांव्याचें तेंच कीं, आम्ही अनुभवास घ्यावें.. (५९६)

सकळही यजनें पूजनें जेवढीं तेवढीं करावींत; पण त्याचें फळ जें कांहीं तेंच कीं हें चतुर्भुज रूपडें कीं, 'रूप कां फळच की एक आम्हांस मिळालें जसें.' सकळ तीर्थें का तीर्थाटन जें, तेंही कीं ह्याचसाठीं अहो! (५९८)

अशी तेथची ह्या जीवास केवढी बरें आवड ती म्हणून तेच की लगबगीनें देखण्या पाहाण्यासाठीं मी जो कांहीं अडचणीनें वर्तत आहे तें देखणें तें तर सांकडें का संकटच एक वाटत आहे, तें आपण आता वेगनें, त्वरित कीं फेडावें, (नाहींसें करावें, निस्तारावें जी). (५९९)

अहो, अशा ह्या माझ्या जीवींची आवडती गोष्ट जाणणारे असे तुम्हीं अहो, सकल विश्वच कीं हे आपणच वसविलें आहे वसवित आहांत असे जे तुम्हीं देवांचेही देव त्या तुम्हांस की पूजित असलेल्या मजवर प्रसन्न व्हा. (६००)

**श्लोक ४६ वा**

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

किरीटिनं = डोक्यावर मुगुट धारण केलेले. गदिनं = हातांत गदायुध घेतलेले: चक्रहस्तम् = हातांत चक्र असलेले. अहं त्वां द्रष्टुं इच्छामि = असें तुम्हांस मी पाहूं इच्छितों. तथा एव = तसेंच अगदीं (मस्तकावर मुगुट धारण केलेले हातांत गदा चक्र असलेले) हे विश्वमूर्ते, हे सहस्रबाहो अहो तेनैव चतुर्भुजरूपेण भव = त्याच चतुर्भुजरूपेण भव = त्याच चतुर्भुज मूर्त रूपाचे आपण व्हावें.

अन्वय :—हे विश्वमूर्ते ! हे सहस्रबाहो ! किरीटिनं । गदिनं । चक्रहस्तम् । तथा एव त्वां अहम् द्रष्टुम् इच्छामि । तेन एव । चतुर्भुज रूपेण भव ॥ ४६ ॥

अर्थ :—अहो हे विश्वमूर्ते ! अहो हे सहस्रबाहो ! तुम्हांस मी तसल्या त्या रूपानें पाहूं इच्छितो कीं ज्या रूपाच्या मस्तकीं मुगुट धारण केलेला आहे, हातांत गदा आयुध व चक्र आहे, करितां त्याच चतुर्भुज रूपाचे होऊन तुम्हीं, मला तशा त्या चतुर्भुज रूपानें दर्शन देणारे तुम्ही नेहमीं व्हावेत. तुम्हांस मी नेहमीं त्याच चतुर्भुजरूपानें पहावें अशी माझी इच्छा आहे. ॥ ४६ ॥ (श्लोक ४६ वा, ओ. ६०१–६१०)

**(तथैव) कैसे नीलोत्पलाते रांवित । आकाशाही रंग लावित ।**
**तेजाची वोज दावित । इंद्रनीळ ॥ ६०१ ॥**
**जैसा परिमळ जाला मर्गजा । की आनंदासीचि जालिया भुजा ।**
**जेणे जानुवरी मकरध्वजा । जोडिली बरव (बरवी) ॥ ६०२ ॥**
**(किरीटिनं) मस्तकी मुगुटाते ठेविले । ते मस्तकचि मुगट झाले ।**
**श्रृंगार श्रृंगारा लेणें लाधले । आंगाचेनि ज्याचिया ॥ ६०३ ॥**
**इंद्र धनुष्याचिया आडणी । माजी मेघ गगन रंगणी ।**
**तैसे आवरले सारंगपाणी । वैजयंतिया ॥ ६०४ ॥**
**(गदिनं चक्रहस्तम्) आतां कवणी ते उदार गदा । असुराते दे कैवल्यपदा ।**
**कैसे चक्रहन गोविंदा । सौम्यतेजे मिरवे ॥ ६०५ ॥**
**(इच्छामित्वां द्रष्टुमहं)**
**किंबहुना श्रीस्वामी । जी ते देखावया उत्कंठित (पां) मी ।**
**(तेनेव रूपेण चतुर्भुजेन) म्हणौनि आतां तुम्ही । तैसया होआवे ॥ ६०६ ॥**
**हे विश्वरूपाचे सोहळे । जी भोगुनी निवाले डोळे ।**
**ते आतां होताति आंधळे । श्रीकृष्ण मूर्ती लागी ॥ ६०७ ॥**
**ते साकार श्रीकृष्णरूपडे । वांचोनिया पाहो नावडे ।**
**ते न देखतां थोडे । मानिताति हे ॥ ६०८ ॥**
**आम्हां भोग मोक्षाच्या ठाई । ते श्रीमूर्तिवांचूनि नाहीं ।**
**म्हणौनि तैसाचि साकार होई । हे सांवरी आतां ॥ ६०९ ॥**
**(स्पष्ट भावार्थ गद्य) या अर्जुनाचिया बोला । विश्वरूप तो विस्मय पावला ।**
**म्हणें ऐसा नाहीं देखिला । धसाळ कोणी ॥ ६१० ॥**

नीलोत्पलाते = निळे कमळ जें त्यांत. (उत्पल = कुश, असडिक धान्याची भाकरी, पांढरें किंवा निळें कमळ, फूल, कोष्ट. उत्पलिनी = कमल समूह (कमळाचें झाड) कमलाचा वेल उत्पल पत्र = नखचिन्ह, टिळा, रुंद सुरी.) रांवित (रावित) = आपला रंग देत आहे. आकाशासही रंग लावीत आहे. वोज = झांक, प्रभा, काळजीपूर्वक, तेजाचे ते असें दाखविणें असे प्रगटवित, प्रगटत. इंद्रनीळ = एक मणी. (इंद्र = आत्मा, आदित्य, परमेश्वर, देवांचा राजा. नील = नीळा, रंग, इंद्रनीलमणी, मोठा काळा भ्रमर. मणी = = रत्न, मनगट, लोहचुंबक, मणिबंध = मनगट, एक छंद) (६०१) मर्गजा–मरगजा = मरकत मण्यास पाचूस [मस्तकपत्री = पाच (व.)] जालिया–निगालिया. जेणे–ज्याचें. मकरध्वजा = मदनाला जोडली. बरव = शोभा आली. बरवी (शोभा) बरव (तेज) जानु = ढोपर, गुडघा. (जानुफलकं–जानुमंडलं = गुडघ्याची वाटी. जनु = उत्पत्ति, आयुष्य, जन्म, जन्मभूमि, प्राणी, फल जन = प्राणी, जीव, मनुष्य, व्यक्ति, लोकसमूह, जात. उत्पत्रि प्रयोग = अभिप्राय (जनान्तिक = शेजाऱ्याशी, इतरानां ऐकू न येईल असें बोलणें. जानपद = देश, देशांत रहाणारा, खेड्यापाड्यांतील मनुष्य.. जानकी = सीता. जानि = जायाबद्दल, जानकी जानी.) (६०२) मुगुटाते–मुकुटाते. ठेविलें–ठेवविलें. (तें कीं मस्तकचि मुगुट जाले–की मुकुटा-मुकुट मस्तक झालें) श्रृंगार–शृंगारा आंगाचे–आंगाचेनि. जया–ज्याचिया, जयाचिया. (६०३) धनुष्याचिया आडणी–धनुष्याचिये आडणी = बैसका, बैठक (जिच्यावर शंख ठेवितात ती आडणी) रंगणी (रंगिन = प्रीतियुक्त रंगविणारा, मंडलामध्यें, गगन हीच रंगभूमि, गण रंग क्रीडा, नृत्य रणभूमि. (गणिन् = शिक्षक.) आवरलें–आवरिले. सारंग–शार्ङ्ग = (सारंग = चातक, हरिण, हत्ती. शारंग = हरिण, चातक. शारि = मैना ) (हत्ती भ्रमर, मोर, धनुष्य, मदन, राग, मेघ, कापूर ) शिंगाचें धनुष्य. (शार्ङ्गिन् = धनुर्धारी विष्णु, तिरंदाज.) वैजयंती = हार, विष्णूचें भूषण, पताका. शाङ्र्गइष्टा = करंजभेद (व०) शाङ्र्गकः शाङ्र्ग, पक्षी (वि.) (६०४) गदा = भावी भाषण, सोटा, आयुध, गदा, सागर गोटी. असुराते दे–असुरा देत. चक्र सौम्य तेजे मिरव = (क्षितिज ) चक्र जें महान तेजाचें तें तर येथें आतां सौम्य होऊन मिरवत आहे. (चक्र = चाक, समुदाय भोंवरा वर्तुळ, सैन्य, राष्ट्र , चक्रवाकपक्षी, क्षितिज.) मी–पां मी (६०६) जी भोगुनि निवाले डोळे–भोगुनि निवाले डोळे. आंधळे–आधले = अधीर, हांवरे, हपापले. कृष्णमूर्ति–श्रीकृष्णमूर्ति (६०७) वांचोनिया–वांचूनि, थोडे = जीवित थोडे जगणें हें हलकें, थोडे, त्याहून लहान, क्षुल्लक विरळ. (अल्पायु = बोकड) (६०८) श्रीमूर्तिवांचूनि = सगुणरूपाशिवाय. वाचूनि–वाचौनि. साकार = त्याच आकृतीचा. सांवरी–उपसंहारी = आटोपून घेणें, गोळा करणें. परत घेणें, मागें घेणें, परत मागें घेणें, आंखडून घेणें, संक्षेप करणें, थोडक्यांत आणणें. संक्षिप्तपणा आणणें, सारांश, अपहार, संहार. विश्वरूप-विश्वरूपा. विस्मय पावला-विस्मय जाहला. धसाळ = दांडगट, अविचारी. (६१०)

भगवान श्रीकृष्ण कसे तर जसे का परब्रह्मवस्तु स्वरूप सौंदर्य, तेज इंद्रनीळ मण्यानें आपल्या तेजाची उत्तमता, बरव शोभा दाखवावी, तेज प्रगटवून, प्रगटावें निळ्या कमळामध्यें वास करावा, सर्वेच्या सर्व आकाशासहीपण आपल्या रंगाचीं पुटें द्यावीत असे ते भगवान ! ( बळराम, कुबेरनिधी, नीळ !!!) (६०१)

जसें का मरगजा म्हणजे मरकत मण्यास का पांचूसच ( पांच नांवाच्या रत्नास) परिमळ सुगंध येऊन आहे का हर्षासच अथवा आत्म्याचें स्थान जो आनंदमय कोश त्यासच हात येऊन आहेत. लंपट का धूर्त असें जें सर्पाचें शरीर जें तेंच हात म्हटलें होत कीं ज्यायोगें जन्म का फल जानुवरी म्हणजे तेथें गुडघ्याच्या आश्रयानें उत्पत्तीवरच की मदनाला शोभा जोडून आली; सौंदर्य प्राप्त झालें : येथे मकरध्वज तो मकर केतन, मकरकेतु तो मदन म्हटला तसेंच समुद्रहीपण निधी असा म्हटला. (बरवा, चांगला, गुणश्रेष्ठ, पंखपक्षी, गरूड.) (६०२)

मस्तकावर किरीट, मुकुट, शिरोभूषण ठेवलें का मस्तकासच तें किरीट भूषण लेवविलें तेथें तें मस्तकच कीं मुगुट झालें होतें कीं, का मुगुट तोच मस्तक झाला. अथवा मुगुटासच मुगुट ते मस्तकरूपी झालें म्हणावें जसें. ज्याच्या आंगामुळेंच आंगच्या शोभेस, प्रगटतेस, तेजास, सौंदर्यास, कांतीस, शृंगारासच मुळीं, लेणें, अलंकार, श्रृंगार, भूषण, लाधलें, सांपडलें, मिळालें. (मस्त, मस्तक = डोकें, शिखर) (६०३)

धनुष्य जें इंद्राचें–देवांच्या राजाचें–परमेश्वराचें, आदित्याचें, आत्म्याचें, त्याच्या बैसणीमध्यें (जिच्यावर शंख वाद्य ठेवितात त्या) आडणीमध्यें, गगन रंगणामध्यें वर्तुलामध्यें गगन आंगणीं मेघांनीं रंगण घेणें जसें शोभलें होतें तसें वैजयंतीनें –(जिच्यामध्यें पांच तत्वांचीं दर्शक पांच रत्नें असतात ती हिरा–आकाश, माणिक–अग्नि, पुष्कराज–वायु, मोती–जल, नीळ–पृथ्वी ह्यांनीं) श्रीकृष्णाला आपल्या मध्यभागीं घेऊन शोभा आणली आहे. झांकलें आहे, व्यापलें आहे, भरलें आहे, निरोधिलें आहे. आकाशा-मध्यें जसे मेघ गगन रंगी रंगणी. इंद्रधनुष्याच्या मधील भागीं शोभून दिसतात तसा श्रीकृष्ण वैजयंतीनें शोभत आहे, आवरिला होत आहे. [निरोध = झांकणें, नियमन, अडथळा, इजा, संहार, लय, अंतःपुर, भुलविणें, डोळे भारणी, जादू करणें.] (६०४)

आतां येथें कोणती बरें ती गदा म्हणावी कीं, जी का ह्या असुरानांहीं पण आपल्या उदारपणावरच औदार्यानें उदार अशी दानशूर श्रेष्ठ अशी ती शारदा म्हणा का सरस्वति ती सिद्ध कोटींतीलच कीं एक परमात्माच तो की–वर्ष पाऊसच की ती, द्वीपाचा पोट भाग, शिंपडणें, वसतिस्थान का दिवस गदाधर विष्णूच कीं तो, आपल्या उदारपणानें, देदिप्यमान असा शोभणारा तो तर आपल्या उदारपणावरच कीं असुरानांहीं कैवल्य मोक्ष निःसंगपणा–अद्वितीयत्व, पृथक्पणा, वैशिष्टय, असें पद देणारा, तेथें चक्र हें तर आपल्या सौम्य अशा तेजानें मिरवत, प्रकाशत आहे. पहा कीं! गोविंदच कीं तो गोविंदापतिः [सौम्य = सुंदर, प्रिय, शुभ, साधु भला, सोमप, ब्राह्मण, भक्त, सज्जन, ब्राह्मण संबोधण्याचा शब्द, पितर, पितृभेद, उंबर, (ज्यो.) मृगशीर्ष (मृग) नक्षत्राच्या मस्तकावरील पांच तारका. मृगलोचन = चंद्र, मृगपिप्लु, मृगलांछन, मृगांक = चंद्र, वायु.] (६०५)

बहुत काय, पण अहो हे श्रीस्वामिन्! ते दान पुण्यफळी फळ ते चतुर्भुजरूप देखण्यासाठीं मी अति उत्कंठित झालों आहें, म्हणून आतां तुम्हीं तसें त्या चतुर्भुजरूपाचे व्हावेत, अहो हे श्री! स्वामी! (६०६)

अहो हे स्वामी! विश्वरूपाच्या ह्या सोहळयांना पाहून माझे डोळे निवाले आहेत, शांत झाले आहेत; व आतां ते तर श्रीकृष्णमूर्ति, (देहधारी शरीरधारी) जी (मूर्ति देह व्यक्ति) तिजसाठीं तर आदळे म्हणजे हपापले होऊन आहेत, उताविळ असे झाले आहेत. (६०७)

त्या साकार अशा श्रीकृष्णाच्या रूपड्याशिवाय दुसरें कांहींही ते पाहूं इच्छित नाहींत–कांहींही दुसरें देखणें तें त्यांना आवडेचना! (आवडेनासें होऊन आहे) म्हणून तें रूपडें पाहिल्याशिवाय हें जीवित कांहींच नव्हे असें ते मानीत आहेत, त्यांना थोडें थोडें असें हें जीवित होऊन आहे. (६०८)

आम्हांस देखणें पाहाणें श्रीमूर्तीच एक ती तेंच भोग होय, तोच कीं मोक्ष होय, म्हणून तसें तुम्हीं साकार व्हावेंत: हे विश्वरूप आतां सांवरावें, आवरावें, आटोपून घ्यावें. (६०९)

अशा अर्जुनाच्या ह्या बोलण्यावर तर विश्वरूपास मोठेंच आश्चर्य वाटलें (त्यांनां मोठा) विस्मय वाटला; व ते म्हणाले कीं हे अर्जुना! तुझ्यासारखा धसाळ, वेडा, धांगड, धोंगड, दुसरा कोणी सांपडणार नाहीं—कीं. (६१०)

श्रीभगवानुवाच :—

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्॥ ४७॥**

तवप्रसन्नेन मया=तुझेच तुजवर मी संतुष्ट होऊन, उघड्या पुरुषार्थावरच कीं. मे परं रूपं दर्शितम्=माझें परम श्रेष्ठ रूप दाखविलें. आत्मयोगात्=परमात्म स्पर्श, ईश्वरी सामर्थ्य, आत्मसामर्थ्य, संभोग संबंध सान्निध्यानें : आद्यं विश्वं अनन्तं तेजोमयं=प्रथमचे तेजोमय अपारपणाचें शांतब्रह्म. यत् मे=जे माझे. त्वत् अन्येन तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणीही. पूर्वम् न दृष्टम्=आजपर्यंत [पूर्व=पुढचा भाग, वरचा भाग, कारण, उदय. पूर्वदेव=असूर, वृषपर्वा दैत्य, नर ऋषि (अर्जुन). पूर्ववत्=परिणामाचें अनुमान (उदा. ढगावरून पावसाचें.) ] न पाहिलेले. (आद्यपूर्वम्=आजपर्यंत)

अन्वय :—

श्रीभगवानुवाचः—

अर्जुन। मया इदं। तव प्रसन्नेन। परंरूपं तेजोमयं विश्वम् अनन्तम् आद्यम्। आत्मयोगात् दर्शितम्। यत् मे रूपम्। त्वत् अन्येन। न पूर्वम् दृष्टम्॥ ४७॥

अर्थ :—

श्रीभगवान म्हणाले, हे अर्जुना! आम्ही तुझ्या आवडीवर कौतुकानेंच तुजवर प्रसन्न होऊन, मी हे पर श्रेष्ठरूप, तेजोमय असें, विश्वच सर्व असें, ज्यास अन्तच नाहीं असें, हेंच प्रथमचें आद्य असें, तें तुजला आत्मयोगानें म्हणजे परम ईश्वरी सामर्थ्य सान्निध्यानें दाखविलें असें तें रूप आजपर्यंत तुजवांचून दुसऱ्या कोणीही पाहिलेलें नाहीं.॥ ४७॥ (श्लोक ४७ वा, ओव्या ४११–४१७)

शांत रस :—

**(श्रीभगवानुवाच)**
**कोण्हि हे वस्तु पावला आहासी। तया लाभाचा तोषु नेघसी।**
**मा भेणे नेणो कायि (बोल) बोलसी। हेकाड ऐसा॥ ६११॥**
**(मया प्रसन्नेन)**
**आम्ही सावियाची जै प्रसन्न होणे। तै आंगचिवरी म्हणें देणे।**
**वांचुनि जीऊ असे वेंचणें। कवणासि गा॥ ६१२॥**
**(तवार्जुनेदं)**
**ते हे तुझिये चाडे। आ–जिवाचेचि (आत्मयोगात्) दळवाडे।**
**कामाउनिया येवढे। रचिले ध्यान॥ ६१३॥**
**(दर्शितं) ऐसे काइ नेणो तुझिया आवडी। जाली आमची प्रसन्नता वेडी।**
**म्हणौनि गौप्याची हे गुढी। उभविली जगी॥ ६१४॥**
**(रूपं परं) ते हे अपारां अपार। विश्वरूप माझे परात्पर।**
**येथुनि ते अवतार। कृष्णादिक॥ ६१५॥**
**(तेजोमयं विश्वमनंतमाद्यम्)**
**हे ज्ञान तेजचि निखळ। विश्वात्मक केवळ।**
**अनंत हे अढळ। आद्य सकळ॥ ६१६॥**
**(यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्)**

**हे तुज वांचुनि अर्जुना । पूर्वी श्रुत दृष्ट नाहीं कवणा (आना) ।**
**जे योग्य नव्हे साधना । म्हणोनिया ॥ ६१७ ॥**

कोण्हि–कोण. अनर्घ्य=बहुमोलाची, ईश्वरत्वच जसें. तोषु नेघसी=तोष न घेसी. कायि–कायि नेणो बोलसी–बोल बोलसी. हेकाड=हट्टी, कच्चे, हेकड, मेकड. ऐसा–ऐसे. (६११) सावियाचि=सहजिकच. आंगचि वरि=जड शरीरापर्यंतच, बाह्यात्कारीं देहापर्यंतच, वांचुनि–वांचोनि. जीऊ=सर्व जीव कीं प्राण असें, वेंचणें=खर्च करणें, जीव लावणें. (६१२) एवढें=केवढें तरी. आ जीवाचेनि–आत्मयोगात्= जीवाचेनि दळवाडे–सारसर्वस्व, मगज, गुह्य स्वरूप. जीव समाजत्वे, कामऊनिया–कमाऊन, श्रमपूर्वक तयार करून. ध्यान रचिले=चिंतन, आराधन ते व्यवस्थिलें, कृतीचे केलें, रचिलें, उद्योगास आणिलें. [ आ जीवाचेनि, आजि–जिवाचेनि, आजिवाचेचेनि (वाचेनि–वाचेनेंच) ] (६१३) ऐसे–ऐसी, तुझिया–तुझिये. आमची प्रसन्नता–प्रसन्नता आमची. गौप्याची=गुज संरक्षणाची. हे–ही. गुढी=ध्वजा, पताका. उभविली–उभारिली. (६१४) हे–हे जाण. अपारां (अपरां=पश्चिम दिशा.) अपार=अमर्याद, पैलतीर. विश्वरूप–स्वरूप. (६१५) ते–हे. तेजचि–तेजाचे. आढळ–अढळ=अक्षय्य=शाश्वत. अद्य–आद्य= पहिले. सकळ–सकळा=संपूर्णासही पहिले असे. (६१६) हे–आणि हे. कवणा–आना. योग्य=जोगे. (६१७)

ईश्वरत्वच, तें कीं इतकी बहुमोलाची, अनर्घ्य किंमतच ज्याची होणें शक्य नाहीं अशी वस्तु तुला मिळाली आहे; तेथें त्या वस्तूच्या लाभाचा तोष, संतोष, तृप्ति, आनंद, समाधान पाहात नाहींस, लाभ घेत नाहींस पण मिऊन जाऊन असे हें कायसे ते बोल बोलत आहेस कीं ज्यायोगें तुझें, हेकाड कच्चेपण हट्टीपण ते मेकडपणाचें असें भ्याडपणच एक दिसून येत आहे. (६११)

आम्ही सहाजिकतेनेंच जें कांहीं तुजवर प्रसन्न व्हावें, अनुग्रह करावा, तेथें तर जड शरीरापर्यंतच मात्र का बाह्यात्कारी देहापर्यंतच मात्र म्हणतो समजतो कीं, जें द्यावेंच असें–: तेथें जीव प्राण असा जीव तो वेंचणें लावणें, खर्च करणें तें कुणास का कुणाकरितां पण तुझिया आवडीच्या प्रसन्नतेवरच कीं ना कृपाळुपणच ते ! निर्मलत्वच ते ! (६१२)

ते हे तुझिया (आजीवाचेनि) आवडीनें जीव समाजत्वें का समुदायेंकरून तें दळवाडे समाज, गुह्य स्वरूप, सार सर्वस्व, परिश्रमपूर्वक तयार करून एवढें हें ध्यान रचिलें, चिंतन आराधन तें व्यवस्थिलें, कृतीचें केलें, रचलें, उद्योगास आणिलें. (६१३)

अशी तुझ्या आवडीमुळें आमची प्रसन्नता वेडी झाली, कृपाळुपण निर्मलत्वास आलें : तें आम्हीही पण जाणत नाहीं, पण हें सर्व तुझ्या आवडीसाठींच कीं ! ते कृपासिंधुपण ते उचंबळून जाऊन वेडेपणास आलें–दर्शन प्रदर्शनास आलें आणि याजवरच कीं अथवा आणि म्हणूनच मी गुजगौप्याची, गुजसंरक्षणाची, गुह्यगौप्याची, ही ध्वजा कां पताकाच एक ह्या जगीं उभारिली गेली, उभविली गेली. दोघेही श्रीकृष्णार्जुन का प्रकृतिपुरुषच ते कीं उभय असे उभारिले गेले. (६१४)

अपरंपार जें त्याचेही पेक्षां अपार किंवा अपरंपार असें तें स्वरूप जाण व तेंच माझें परात्पर स्वरूप होय. तेंच विश्वरूप होय व तेथूनचमुळीं ते कृष्णादिक का कृष्णादि अवतार झालेले. (६१५)

तें तेजाचें तेज असें शुद्ध ज्ञान होय. तें केवळ विश्वात्मक होय. ते अढळ, अति स्थिर, असे अनंत होय. तें सकळांसही आद्य असें होय. (६१६)

असें ते हे अर्जुना, तुजवांचून कोणासही पूर्वी दिसलेलें का दर्शनाचें झालेलें नाहीं. का तें तुजशिवाय इतर कोणी ऐकिलेलें आहे असेंही नाहीं. दुसऱ्या कोणास–(आना कवणास) हे श्रुतही नाहीं व दृष्टही

नाहीं. कारण तें साधनाजोगें नाहीं, तें साधन असें होत नाहीं–योग्य असें तें साधन करण्यास नव्हेच नव्हे आणि म्हणूनच तर तें तुजशिवाय दुसऱ्या कोणी ऐकिलेलें का पाहिलेलें नाहीं. (६१७)

**श्लोक ४८ वा :—**

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

वेदयज्ञ अध्ययनैः=वेदांच्या अभ्यासानें, यज्ञाच्या करण्यानें का इतर अध्ययनांनीं. उग्रैः तपोभिः= तसेंच उग्र तपाचरणानें, कडक अशा तपांनींसुद्धां. उग्रक्रियाभिः=उग्र तपक्रियानीं सुद्धां. अहं एवं रूपः द्रष्टुं नृलोके शक्य न=मी अशा रूपाचा दिसणें का पहाणें ह्या मनुष्यलोकीं शक्य नाहीं. त्वत् अन्येन= तुजशिवाय दुसऱ्या कोणी. कुरु प्रवीर=हे वीररसप्रधान कुरुश्रेष्ठा. (प्र=उत्कर्ष, आरंभ, आधिक्य. वीर= पराक्रमी शूर योद्धा, वीररसप्रधान.)

अन्वय :—

कुरुप्रवीर ! वेदैः न। यज्ञैः न अध्ययनैः न। दानैः न। नच उग्रैः क्रियाभिः। नच उग्रैः तपोभिः। अहं नृलोके न त्वत् अन्येन। एवं रूपः द्रष्टुं शक्य ॥ ४८ ॥

अर्थ :—

हे वीर रसप्रधान कुरुश्रेष्ठा ! वेदांच्या का यज्ञांच्या आचरणानें का अध्ययन करण्यानें का उग्र क्रियांनीं का (क्रियायोगांनीं) तसेंच उग्र तपांनीं मी ह्या लोकीं, मनुष्यलोकीं, तुजशिवाय दुसऱ्या कोणी 'अशा (विश्व—)' रूपाचा मला पाहणें शक्य नाहीं. ॥ ४८ ॥ (श्लोक ४८ वा, ओव्या ६१८–६२३)

**(नवेदयज्ञाध्ययनैः) याची सोये पातले। आणि वेदीं मौन्यचि घेतले ।**
**यज्ञ कीर माघौते आले। स्वर्गौनिया ॥ ६१८ ॥**
**साधकीं देखिला आयासु। म्हणोनि वाळिला योगाभ्यासु ।**
**का जे अध्यायनी सौरसु। नाही येथ ॥ ६१९ ॥**
**(नचक्रियाभिः) सीगेची सत्कर्मे। धाविन्नली स्वधर्म संभ्रमे ।**
**तिये बहुते की श्रमे। सत्यलोकु ठाकिला ॥ ६२० ॥**
**(न तपोभिःउग्रैः) तपी ऐश्वर्य देखिले। आणि उग्रपण उभ उभयाची सांडिले ।**
**(एवम्) तप साधन जे ठेले। अपारांतरी ॥ ६२१ ॥**
**(न दानैःएवंरूप इति) हें तुवां अनायासें। विश्वरूप देखिले जैसे ।**
**ये मनुष्यलोकीं तैसे। न फावेची कवणा ॥ ६२२ ॥**
**आजि ध्यान संपत्तिलागीं। तूंचि येक आथिला जगीं ।**
**हे परम भाग्य अंगीं। विरंचीसि नाहीं ॥ ६२३ ॥**

सोये-सोय=मार्ग. मौन्यचि–मौनचि. यज्ञ=सृष्टीची रचना, (यय) स्वर्गोनिया–स्वर्गौनिया. (६१८) आयासु=परिश्रम थकवा. वाळिला=त्यागिला, सोडून दिला. कां जे–आणि. आध्यायनें– अध्ययनी (स्वाध्याय अध्ययन). सौरसु=सुलभता, गोडी, किंमत, योग्यता. (६१९) सीगेची=पूर्णत्वास आलेली, उत्तम, पूर्ण, अत्युत्तम. सत्कर्मे–नित्यकर्मे. स्वधर्मे–स्वधर्म. स्वसंभ्रमे=आपल्या मोठेपणानें, भ्रांतीनें, धांदल, त्वरा, भीती, गौरवानें. तिये–तिहीं. ठाकिला=प्राप्त करून घेतला. (६२०) (जपजाप=वेदा- भ्यास. जप्=पुटपुटणें, हळु म्हणणें, जप करणें (उपजत, अभिजपः कान फुंकणें, चिथवणें) तपी= सामर्थ्य असणारे, तपणारे, तपश्चर्या करणारे, तपस्वीः उग्रपण=रागीटपणा, भयंकरपण, तीक्ष्णपण

(महादेवपण). उभ उभयाचि–उभयाचि सांडिले=उभ्याउभ्याच, लवंडिले. (जंपतीपण ते–जोडपेपण ते) तपसाधन साधना ठेले अपारांतरी=तप साधन (देह) साधनाला. अत्यंत दूर राहिले. अपारांतरी–अपारांतरे–अपारांतरे= (अपार=अमर्याद, नदीचे पैलतीर. अंतर=सीमा, मन, अवकाश, छिद्र, आच्छादन.) अमर्यादतेच्या मन अवकाशानें. (६२१) अनायासें सहजच. फावेचि=सांपडणें, फेडणें, अनुकूल होणें. (६२२) ध्यान संपत्ति=चिंतनरूपी धन का आराधनरूपी वैपुल्य, दौलत. जगीं=लोकीं (पृथ्वीमध्यें) विरंची=जग रचणारा का निर्माण करणारा ब्रह्मदेव. विरंच (चि):=ब्रह्मदेव. (६२३)

ह्या विश्वरूपाची सोय (आत्म आनंदाची ती दिशा लाभलेली) का मार्ग, शोध, रस्ता, पद्धती, रीति, ज्यांना म्हणून (लाभलेली) पावली आहे, लाधली आहे, लाभाची झालेली आहे, अशा वेदांनी–श्रुतीं–ज्ञानानें –तर मौनच पत्करलें, ते चूप बसले व यज्ञ, याग [=अग्नींत आहुती देणें=होम, पूजा, धर्मकृत्य, आत्मा, ब्रह्मा, विष्णु, यांसहित यज्ञ, (विकार कीर] तर स्वर्गाहून, कां स्वर्गाला जाऊनही येथेंच परत माघारी आले. (यज्ञांशभुज=देव. यज्ञात्मा=विष्णु. यज्ञभाग देव. यज्ञईश्वर=इंद्र. यज्ञभुज=देव, विष्णु. यज्ञवाहन=विष्णु, शिव, यज्ञसूत्र=जानवे. यज्ञसेन=द्रुपद.) (६१८)

साधकांनीं–उपासकांनीं साधन साधणारांनीं (हुशार किंवा जागें व्हावें म्हणून साधन करणारे जे त्यांनीं उपकारक व्हावें ह्या जगास, म्हणून जे उपकार–रत असें साधन करणारे जे) साधनामध्यें तर आयासच परिश्रम पाहिले तपश्रम थकणें, दमणें तेथें थकवाच एक देखिला असें जे त्यांनीं योग अभ्यास सोडून दिला, अभ्यासणें योग तो वाळिला–केला, कारण काय तर त्यांना येथें ह्या लोकीं अध्ययन अभ्यासामध्यें का अध्याय–(स्वाध्याय–वेदाभ्यास–) प्रकरणामध्यें गोडीच वाटेना, सुलभता सांपडेना, किंमतीचा असा योग तो त्यांना करीना–करितां येईना म्हणा का होईना म्हणा, योग्यता ती पुरती पडेना.

अत्युत्तम म्हणजे पूर्ण अशीं नित्यकर्में, जीं येथें सत्कर्में म्हटलेली, ती तर स्वधर्माच्या आपल्या, मोठेपणानेंच पळणारी (का मोठेपणावरच) धांवणारी, चालणारी, त्यांनीं (स्वच्छ करावी लागणारी, उजाळा द्यावा लागणारी वाहिली जाणारी, व्यापाची वाटणारी (हल्ला करणारी) त्या नित्य का नित्यतेच्या अशा बहुतेक कर्मांनीं) तर (अतिश्रमानेंच कीं मोठ्या क्लेशानें) मेहनतीनेंच कीं, ब्रह्मदेवाचा तो सत्यलोक मिळविला, प्राप्त करून घेतला तेथें शपथच एक खरेपणावरच चालण्याची ती. (६२०)

तपश्चर्या करणें, जप जाप हळु म्हणणें, जप करणें—तप सामर्थ्यानें असणें का तप करणें तें त्यांनीं ऐश्वर्य पाहिलें; ऐश्वर्य योग तो देखणा केला, प्रभुत्व वैभव ईश्वर शक्ति योगाची जी ती त्यांनां पाहविणारी देखणी झाली, आणि त्यांनीं तर तें उग्रपण सहज उभ्याउभ्याच सांडलें, वगळिलें, लवंडिलें व एवम् याप्रमाणें तपसाधन देह जें तें तर (तपसाधनाला) अत्यंत दूर राहिलें, अमर्याद अशा मन अवकाशाचे–तीव्र अशा मनाचे झाले. (६२१)

असें तें पारंपार का अपरंपार असलेलें विश्वरूप योगाभ्यासाशिवाय तुवां अनायासेंच देखिलेंस. ह्या मनुष्य लोकांमध्यें तसें तें रूप देखणें कोणासहीपण फावतच नाहीं. अंगीं उभारून येत नाहीं. (६२२)

सद्यःकालीं ही जी ध्यानसंपत्ति आहे, तिजला तूंच एक ह्या जगामध्यें आथिला म्हणजे सर्व विद्यमानत्व, महत्व घेऊन आहेस व असें हें परम भाग्य ब्रह्मदेवासहीपण प्राप्त होणारें नव्हेच असें आहे. (६२३)

**श्लोक ४९ वा**

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

ते व्यथा मा=तुवां ही संसार व्यथा न घेतां, संसाराची पीडा न पाह्यातां. ते विमूढ भावो मा=भावाचें मूढपण घेऊं नको, का भ्रांत लक्षणाचा तूं होऊं नको. मम इदं घोरं ईदृक्(ङ्) रूपं दृष्ट्वा=माझें हें घोर असें रूप पाहून. (घोर=सर्व श्वास जेथें ध्वनीचा जसा.) पुनः व्यपेतभीः प्रीतमनाः=पुन्हः माझ्या नामाचा आश्रय करून सर्व भीति सोडून दे व मन हे प्रीतीचें करून ऐस. तत् एव मे इदं रूपं प्रपश्य=तेंच जें पूर्वींचें माझें रूप तेंच आतां पाहा, शोध घे, तपास, जाण, मान, आलिंग.

अन्वय :—

मम इदं घोरं ईदृक् रूपं दृष्ट्वा। ते व्यथा मा। ते विमूढ भावः मा। (पुनः) व्यपेत भीः प्रीतमनाः। तत् एव मे इदं रूपं पुनः प्रपश्य ॥ ४९ ॥

अर्थ :—

माझें घोर असें रूप पाहून भिऊन जाऊं नकोस, भाव विमूढतेचा करूं नकोस-संसारव्यथेचा होऊं नको—तसेंच गोंधळून जाऊं नको. विमूढ—भावाची दुःख व्यथाहीपण घेऊं नको, अगदीं निर्भय हो व प्रीतीच्या भावाचें सर्व असें तें मन करून ऐस व तें माझें पूर्वींचें रूप आतां पुनः पुनः पाहा, मान, अलिंग, जाण. ॥ ४९ ॥　　　　(श्लोक ४९ वा. ओ. ६२४–६४०)

(मां ते व्यथा) म्हणोनि विश्वरूप लाभे श्लाघ। आणि तूं येथिचे भय नेघ।
हे वांचुनि अन्य चांग। न मनी कांहीं ॥ ६२४ ॥
हा गा समुद्र अमृताचा भरला। आणि अवचिता वरपडा जाला।
मग कोण्हिहि आथि वोसंडिला। बुडिजैल म्हणौनि? ॥ ६२५ ॥
नातरी सुवर्णाचा डोंगरू। येवढा न उचले हा थोरू।
ऐसे म्हणौनि अव्हेरू। करणे घडे? ॥ ६२६ ॥
दैवे चिंतामणि लेईजे। की हे ओझे म्हणोनि सांडिजे।
कामधेनु दवडिजे। न पोसवे म्हणोनि ॥ ६२७ ॥
चंद्रमा आलीया घरा। म्हणिजे निघ करितोसि उबारा।
पडिसाई पाडितोसि दिनकरा। परता सर ॥ ६२८ ॥
तैसे ऐश्वर्य हे महातेज। आजि हाता आले आहे सहज।
कीं येथ तुज गजबज। होआवी कां ॥ ६२९ ॥
(मा च विमूढ भावः) नेणसीचि गांवढिया। काय कोपो आतां धनंजया।
आंग सांडूनि छाया। आलिंगतोसि मा ॥ ६३० ॥
हे नव्हे जो मी सांचे। येथें मन करूनिया काचे।
प्रेम धरीसी अवगणियेचे। चतुर्भुज जे ॥ ६३१ ॥
तरी अझुनि वरी पार्था। सांडि सांडि हे आस्छा (आस्था, व्यवस्था)।
इयें विषयीं अनास्था। धरिसी झणी ॥ ६३२ ॥
(दृष्ट्वा रूपं घोरमिदृङ्ममेदम् )
हे रूप जरी घोर। विकृति (विकृत) आणि थोर।
तरी कृतनिश्चयाचे घर। हेचि करी ॥ ६३३ ॥
कृपण चित्तवृत्ति जैसी। रोउनि घाली ठेव्या पासी।
मग नुसधेनि देहेसी। आपण असें ॥ ६३४ ॥

का अजात पक्षिया जवळा । जीऊ बैसउनि आविसाळा ।
पक्षिणी अंतराळा— । माजी माये ॥ ६३५ ॥
नाना धेनु चरे डोंगरी । परी चित्त बांधिले वछे (वत्से) घरी ।
तैसे प्रेम येथिचे करी । स्छानपति (स्थानपति) ॥ ६३६ ॥
येरे वोसरलेनि चित्ते । बाह्य सौख्य या सुखापुरते ।
भोगिजो का तिये श्रीमूर्तीते । चतुर्भुजे ॥ ६३७ ॥
परी पुढतो पुढती पांडवा । हा बोल येक न विसरावा ।
जे इये स्वरूपीहुनि सद्भावा । नेदा निघोवे ॥ ६३८ ॥
(व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वम्)
हे कांहीं नव्हते देखिले । म्हणोनि भय तुज उपजले ।
ते सांडी येथ संचले । असो दे प्रेम ॥ ६३९ ॥
(तदेव मे रूपमिदं प्रपश्य)
आतां करुं तुझिया (तुजया) सारिखे । ऐसे म्हणितले विश्वतोमुखे ।
तरी पूर्वील रूप सुखे । न्याहाळी पां तूं ॥ ६४० ॥

संजय सांगत आहे कीं, अर्जुनानें असें म्हणतां क्षणींच तो भगवान देव श्रीकृष्ण तो मनुष्यरूपानें पुन्हां दिसूं लागला.

ऐसे वाक्य जी बोलत खेंवो । मागुती मनुष्य जाला देवो ।
हे असो परी नवलावो । आवडीचा तिये ॥ ६४१ ॥
तो श्रीकृष्णचि जीच कैवल्य उघडे । तरी सर्वस्व विश्वरूपा येवढे ।
हातीं दिधले कीं नावडे । अर्जुनासी ॥ ६४२ ॥
वस्तूं घेऊनि वाळिजे । जैसे रत्नासी दूषण ठेविजे ।
नातरी (कन्या) निरीक्षूनि म्हणिजे । मना न ये हे ॥ ६४३ ॥
तया विश्वरूपा येवढी दशा । करिता हे प्रीतीचा वादु कैसा ।
सेल दिधली असें उपदेशा । किरीटीसी देवे ॥ ६४४ ॥
तोडुनि भांगाराचा रवा । लेणे घडिले आपुलिये सवा ।
मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥ ६४५ ॥
तैसे शिष्याचिया प्रीति जाले । कृष्णत्व होते ते विश्वरूप केले (जाहाले) ।
ते मना न येचि मग आणिले । कृष्णपण माघौते ॥ ६४६ ॥
हा ठाय ठाव वरी । शिष्याची निकसी (शिष्याच्याविषीं शिष्याचीनि कसी ।
साहाती गुरु आहाती कवणिये देशी । परी नेणिजे आवडी कैसी संजय म्हणे ॥ ६४७ ॥

श्लाघ=धन्यता मान. भय–तप (पा.मे.) नेघ=घेऊं नकोस (६२४) अवचितां–अवसांत= अकस्मात् वरपडा झाला=अंगावर लोटला, प्राप्त झाला. जाला–जाहला. वोसंडिला=टाकून दिला. (६२५) सुवर्णाचा–सोनयाचा. डोंगरू=पर्वत, गिरीः येवढा–एवढा मोठा न उचले–येसणा (एवढा) न चले–नुचले. थोर=मोठा. (६२६) निघ–निगे=दूर हो. उबारा=उष्मा. पडिसाई=पडछाया, सावली. (६२८) ऐसे तैसे. महातेज=श्रेष्ठ, मोठे, कांति, बळ, वीर्य प्रताप, अग्नि. गजबज=भ्याडपणा, धडपड, हपापलेपण, अधीरपण. (६२९) गांवढिया=गांवढळा. (६३०) काचे=भ्याड, अधीर. अवगणियेचे=सोंगाचे, मिथ्या वस्तूंचे; [आंगवणियेचे (पा. मे.)] चतुर्भूज=साकार चतुर्भुज रूपाचे. (६३१)

आस्छा–आस्था=व्यवस्था, कळवळा, आधार, स्थिति, काळजी, विचार, आदर, संमति, स्थळ, आशा. इयेविषयीं ह्या विश्वरूपाची, ह्या विश्वरूपासंबंधीं. अनास्था=औदासीन्य, अपमान, अनादर, अविश्वास. धरिसी झणि–करिसी झणें (६३२) विकृति–विकृत–विकाळ=रूपांत फेरफाराचे. (विकृत=विकार पावलेला, रोगी, विमनस्क.) (६३३) रोउनि–रोवोनि. ठेव्यापासी=द्रव्याच्या ठेव्यापासी, ठेवयापासी. नुरूधेनि–केवळ–नुसधेन (६३४) अजातपक्षियाजवळा=पंख न फुटलेल्या पिलाजवळ. बैसउनि–ठेउनि तिये. अविसाळा=घरट्यांत. अंतराळा=आकाशांत. जाये–जाय. (६३५) नाना=अथवा. धेनु=गाय. वछे-वत्स्ये. स्छानपति–स्थानपति=वसतिस्थान स्वामी प्रभु. (६३६) वोसरलेनि–लय पावलेल्या–वरिचिलेनि. चित्ते–प्रेमे (पा. भे.) सौख्य (पा. भे.) सखया–सख्य या–बाह्य सौख्य, सुखापुरते–बाह्य सुखापुरते. चतुर्भुजे–चतुर्भुज. (६३७) पुढतो पुढती–पुढपुढती=वारंवार. बोल येक–येक बोल स्वरूपीहूनि–रूपीहूनि; रूप व सद्भाव यांना विभक्त करूं नये–रूप निराळें व सद्भाव निराळा असें करूं नये–सद्भाव तो रूपासहित असावा, रूप तोच सद्भाव. नेदावे निघो=निघूं देऊं नये (६३८) कांहीं–कंही. भय–भय जे. हें कांहीं नव्हतें देखिलें–कधीं नव्हतें तें देखिलें. (पा. भे.) संचले=सांठ्याचे. (६३९) तुजया–तुज या–तुझिया. विश्वतोमुखे=श्रीकृष्णांनीं. पूर्वील–मागील. (६४०) ऐसे वाक्य जी बोलत खेवो=देव, जैसे वाक्य म्हणतां क्षणींच. मागुता–मागुती. जाला–जाहला. हे असो ना=हे विशेष असें नाहीं, हे ना परि. नवलावो=आश्चर्य. आवडीचा तिये=त्या श्रीकृष्णार्जुनाच्या प्रेमाचे विशेष कौतुकच एक. (६४१) श्रीकृष्णचिजी–जीच. कैवल्य=परब्रह्म. जरी–तरी–बरी. (६४२) वस्तु=सत्य पदार्थ, जिंदगी, स्वभावधर्म, द्रव्य, दौलत, सत्वांश, सार, सत्य गोष्ट इत्यादि 'वस्तुनि अवस्तु आरोपः' (गोष्टीचा) विषय, संविधानक; [वस्तु उत्थापनं=(सा.) जादूनें पदार्थांचा फेरफार करणें. (वस्तुतः=स्वभावतः, खरोखर, अर्थात्. वस्तुपुरुष=नायक. वस्तुकं=चंदन बटवा (व.) वस्त्यं=वासस्थान, गृह.)] वाळिजे=टाकावी. (कन्या) निरीक्षूनि–पाहूनियां. [रत्ननिधी रत्नाकर=समुद्र. रत्नकंदल=पोंवळे. रत्नगर्भ=समुद्र, कुबेर, पृथ्वी. रत्ननायक, रत्नराज =माणिक. रत्नमुख्य=हिरा. रत्नवती=पृथ्वी. रत्नषष्टि=व्रतविशेष. रत्नसानु=मेरु. रत्नसू =पृथ्वी. रत्नि=कोपर, मुंढा हात लांबी.] (६४३) प्रीतीचा वाढु=पोक्त, वृद्ध, थोर, वृद्धि, वाढ. सेल (दिधली असे–दीधलीसे)=उत्तम वांटा, शेलका वाटा. उपदेशा=पढविणे जे, मसलत, सबब, शिकविणे, निर्देश, सल्ला, मंत्र शिकविणें, (व्या.) आद्योच्चारण (उपदेष्टृ=उपाध्याय. उप=न्यूनता इत्यादि अर्थी समासात.) (६४४) तोडुनि–मोडुनि. भांगाराचा रवा=सोन्याची लगड. आपुलिये–आपुलिया. सवा =इच्छेप्रमाणें, हौसेप्रमाणें. (६४५) केले–जाहाले. माघौते–मागौते–मागुते. आणिले=उत्पन्न केले आणले: (६४६) ठाय–ठाव. शिष्याची निकसी–शिष्याचीनि कसी–शिष्याच्या विषीं=शिष्याची पिर पिर, किरकिर जिकीर. साहाती–साहाते=सहन करणारे. गुरू=बृहस्पति, बाप, मोठा, जड, श्रेष्ठ, दीर्घ, विशाल, तीव्र, अत्यंत शक्तिमान, महत्वाचे, पूज्य, भयंकर, पचविण्यास कठिण, अर्थपूर्ण, अभिमानी, द्विभावक स्वर, स्वामी, संस्कार करणारा बाप इत्यादि पूर्वज वडील, नातलग, सासरा, अध्यापक, उपाध्याय, मंत्रोपदेशक, कफ. [गुरुत्व=दीर्घता, जबाबदारी, मोठेपणा, जडपणा, गुरुत्वाकर्षण, महत्व, पूज्यता. गुरुअर्थ=दक्षिणा. गुरुकार=पूजा. गुरुकुल=गुरुगृह; गुरुगृहीची शाळा. गुरुक्रम=परंपरागत शिक्षण, गुरुपरंपरेचा आदेश. गुरुघ्न=पांढरी मोहरी.' गुरुचर्या=गुरुसेवा; गुरुदैवत, गुरुभ=पुष्य (ज्यो.) गुरुपत्रा=चिंच. गुरुपत्रम्=कथिल. गुरुवर्तिन्=गुरुच्या आज्ञेंत रहाणारा. गुरुवासर=गुरुवार. गुरुवृत्ति=गुरुसेवा. गुरुश्रुति=गायत्री मंत्र. गुरुशिंशपा, गुरुसार=मोठा शिसवा. गुरुबीज=मसुरा. गुरुमती=गर्भिणी. गुरुमर्दल=वाद्यविशेष. गुरुरत्न=पुष्कराग मणी. गुरुलाघव=तारतम्य. गुरुवर्चोघ्न=कागदी लिंबू. गुरुक=उदात्त, श्रेष्ठ. गुर्वाकः=पोफळ. गुर्विणी, गुर्वी=गरभार स्त्री. गुर्वी=गुरुपत्नि, सुपारी] कवणिये–कवणे. (६४७)

म्हणून विश्वरूप लाभानें संतुष्ट हो, धन्यता मान, 'स्तुत्य' होय असा जनाकडून मानवून घे-प्रशंसाच कीं एक ती तेथें आनंद मानून घे, इथल्या तपासंबंधींचें भय घेऊं नको, विश्वरूप हेंच एक पहाः यावांचून अन्य दुसरें कांहीं चांगलें का ह्यापेक्षां जास्त का विशेष असें मनांत आणूं नकोस. (६२४)

अगा हे अर्जुना ! अमृताच्या अपरंपार असा समुद्र, परिपूर्ण असा सबराभरित तो अकस्मात वरपडा झाला–स्वाधीन झाला, प्राप्त झाला का अंगावर आला तर कुणी कांहीं तो वसंडिला–टाकून दिला का सोडून देऊन असणें तें करील काय, जे का त्यांत बुडून मरून जाणें होईल म्हणून अहो ! जें अमृत अमर करतें तें मारील तरी कसें ? तें तर केव्हांहीं अमर करण्याचीच गोष्ट बोलेल ना ? (६२५)

अथवा सोन्याचा डोंगर येसणा म्हणजे येवढा चालणें शक्य नाहीं, का उचलणें शक्य नाहीं म्हणून त्याचा 'अव्हेर करणें अशा गोष्टीच्या घडण्याचे' ते व्हावे ? (६२६)

दैवयोगेंकरून चिंतामणी अंगावर घातला पेहनला, लेईला व हें तर ओझेंच एक म्हणून सांडला, टाकला, त्यागिला पर्वाच केली नाहीं असें व्हावें काय ? अहो ! कामधेनु पोसवत नाहीं म्हणून हांकून लावावी काय ? दूर करावी काय ? दवडावी, नासावी काय ? (६२७)

'मन' चंद्रमा घरीं आला तर त्याला उष्मा करीत आहेस, माझ्या मनाची तलाखी होत आहे आणि म्हणून दूर हो ! मसणवाट्याचा हो ! निघून जा ! हे दिनकरा ! पडिसायी, पडिसाई, पडछाया सांवली (कर्मरूपी अभ्रच्छाया आड आली ती केव्हांही निवारणेची करणे ना ! ) करीत पाडीत आहेस आणि म्हणून सर सर रे परता, माघारी जा, (हे मदना ! पाठमोरा हो !!!) (६२८)

त्याप्रमाणें ईश्वरी विश्वरूपाचें ऐश्वर्य महातेज, दैदीप्यमान असें दिव्य आज सहजच तुझिया हातास आलें आहे, तुजला प्राप्त होऊन आहे; आणि इथें तें कां बरें तुजसी तें तगमगीचें व्हावें तें, गजबजीचें व्हावें तें ? [तेथ मनी गजबज जहाली । आणि आपैसी कृपा आली । तेणें अपमाने निघाली । वीरवृत्ति ॥ १८५ अ. १ला.] येथें संसारव्यथा व्याधीची करूं नको, ती पीडा समजूं नको, दुःखच ती की ही संसारपीडा गांजणारी सर्वथैव असें घेऊं समजूं नकोस. ( मा=मापणें; निषेध, निंदा, विकल्प इत्यादि अर्थीं, लक्ष्मी, माता, नको, नाहींतर, च्या भीतीस्तव, शाप. माचिरं, माविलंबम्=लवकर. मा शाब्दिक= प्रतिबंध करणारा. मास्म=नको, न होवो. मा=आई, लक्ष्मी. माईश, मापति, मा वर=विष्णु. ) (६२९)

गांवढळासारखा होऊं नको, फसविला जाऊं नकोस, शहाणा हो ! हे अर्जुना ! तूं तर खरोखर (जरुरीचा भाग, दुय्यम साधन—) आंग तें (पुरुषाचें सोडून का टाकून देऊन) छायाच कीं, एक ती आलंगीत आहेस नी ? व आतां तेथें हे धनंजया ! तुजवर रागावणें करावें का कोपावें ? (तें समजत नाहीं) कोपविणें होत आहे तें कां तें उमजावें ? क्रोधानें दूषित होणें होत आहे तें कां ! मा म्हणजे अहो ! अहो ! हें एक नवलच नव्हे का ? (६३०)

हे छाया देह कांहीं खरोखरीच की मी नव्हें खरोखरीचा जो मी तो कांहीं छाया नव्हे येथें तर तू आपलें मन तें भ्याडपणाचें करून अंगव्यापाराचें अवगणियेचें कां आंगवणियेचें जें साकार चतुर्भुज त्याचेंच कीं प्रेम, (मानीत आहेस) धारण करीत आहेस, त्यानेंच जगत आहेस त्यानेंच आहेस, तेंच बाळगीत आहेस, तेंच मनांत आणीत आहेस, त्यासच आश्रय देत आहेस. (६३१)

करितां अजून तरी, हे पार्था ! तेथें ती जी कांहीं आस्था (काळजी, आदर, आशा, प्रयत्न, विचार) तसली ती सांड, सोड, त्याग : कारण सत्वरतेच्या अशा त्याच कीं काळजीमुळें ह्या येथच्या विश्वरूप ईश्वरा-संबंधीं कीं अनास्था, औदासिन्य, अपमान, अविश्वास, अनादर, पाळीत (धरीत करीत) आहेस तर तसे करूं नकोस. (६३२)

घनघोरतेचे (शंकर, राम) असें भयाचें तें हें ईश्वर विश्वरूप जरी विकृत, विमनस्क, विकार पावलेलें असें व थोर असें तें [ मरणं प्रकृतिः शरीरिणाम् विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः । ] विकृतीचें विक्राळपणाचें असें तरी सुद्धां किंवा आणि म्हणूनच किं हेंच तूं आपल्या कृतनिश्चयाचें, केलेल्या संकल्पाचें, पुरेशा खात्रीचें, योग्य निर्णयाचें घर कर. (६३३)

कृपण तो लोभी, हलका, दरिद्री जसा आपली चित्तवृत्ति, मनाचा कल, द्रव्याच्या ठेव्याजवळ की रोंवून घालतो, रोंवून असतो व मग नुसत्याच की, केवळ देहानेंच फक्त आपण असतो जसा. (६३४)

अथवा असें पाहा कीं जशी पक्षिणी ती घरट्यामधील अद्याप वयास न आलेल्या म्हणजे पंख न फुटलेल्या पिलाजवळ आपला जीव ठेवून अंतराळामध्यें आकाशांत आकाशांतल्या मधल्या पोकळ जागेंत फिरते, उडते, जाते. (६३५)

अथवा असें पाहा कीं, गाय ती पर्वतावर, गिरीवर, डोंगरीं चरते, पण तिचें लक्ष, चित्त, मन तें तर वत्सानेंच का वत्सामुळेंच ना घरीं बांधलेलें असें असतें; त्याप्रमाणें प्रेम तें येथचें कर म्हणजे विश्वरूप ईश्वराच्या ठायीचें कर, छानदार अशा मालकीचें कर, अधिकाराच्या मालकीचें कर, वर्णोच्चार स्थानाचें अधिष्ठातें कर, स्थिति धारण नेटानें वंद्यतेचें कर. (६३६)

दुसरें जें चतुर्भुज म्हटलेलें तेथें आपणच की तें चतुर्भुजतेचें होऊन ती श्रीपदाच्या पदवीची ती श्रीमूर्ति भोगावी कीं, नुसत्या वरीलच्या चित्तानें मनानें बाहेरील अंगाच्या सखया, राया, अशा सख्य सुखाला पुरते करून का होऊन की अहो ! (बाह्य=बहिर्मुखतेची–' बाहिर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंतु आंतु सुख वाढे । तेथे सहजचि योगु घडे । नाभ्यासिता ॥ ३५३' अ. ६ वा.) (६३७)

तरीपण वारंवार सांगणें कीं, हे अर्जुना ! हाच एक बोल तो नच विसरावा जे का ह्या विश्वरूप ईश्वराच्या रूपामधून आपल्या जीवींचा सद्भाव अनुभव तो निघूं देऊं नये ; नाहींसा होऊं देऊं नये, दूर करूं नये, दूरचा करूं नये, निघून जाऊं देऊं नये कीं. (६३८)

भय गेलेला असा, नीतिभ्रष्टता नाहींशी झाली आहे असा, नीतिमान्, प्रतिकूलतेचें वारें नाहींसें झाल्यानें आतां सर्वथैव अनुकुल असा प्रीति प्रसन्नतेच्या मनाचा होऊन ऐस व असें हें कधींहीं देखिलें, पाहिलें नव्हतें, म्हणून जें कांहीं भय तुजमध्यें उपजलें होतें तें सांड. त्यज, निर्भय हो ! धीराचा हो ! (आपले बळ अजमावणारा हो ) फलाचा हो व येथें ह्या विश्वरूप ईश्वराचे ठायींच कीं संचलेलें असें सांचे समूहाचें, सांठ्याचें, संग्रहाचें, याज्ञिकीचें जसें, सांध्याचें तें तुझें प्रीति आनंदाचें असें प्रेम असूं दे ( संचः=लेखनार्थ पत्रसमूह.) (६३९)

तेंच माझें रूप तुझ्या पाहाण्याच्या आरंभानें उत्कर्षानें आधिक्यानें पाहून घे, व आतां तुझ्या (इच्छेप्रमाणें) म्हणण्याप्रमाणें तें चतुर्भुजतेचें रूप धारण करूं, असें विश्वतो मुखानें श्रीकृष्णांनीं–धाता जे प्रजापति ब्रह्मा, पिता, त्यांनीं म्हटलें; पण मागितलेलें जें कां मागील पाहिलेलें जें तेंच रूप कीं आतां तूं सहज सुखानेंच कीं पुन्हां बरें नीट न्याहाळून पाहा. (६४०)

**असें वाक्य बोलतांक्षणींच देव पुन्हः मनुष्य झाले.** तेथें नवलावच एक तो अथवा असें म्हणूं कीं आश्चर्यच कीं तें ह्या श्रीकृष्णार्जुनाच्या परस्पर प्रेम, प्रीति आवडीसंबंधीचें तें प्रियपण कीं. (६४१)

श्रीकृष्णचि जी की अहो ! उघडें स्पष्ट असें अद्वितीयत्व परब्रह्म कैवल्य, मोक्ष (निराळेपणा) याहीवर तेथीलचें सर्वस्व तें पहावें तो तें तर विश्वरूपा ईश्वराएवढें तेंच कीं अर्जुनाच्या हातीं दिलें, त्याच्या स्वाधीन केलें; पण तें कांहीं त्यास आवडेचना, पसंत पडेना. (६४२)

अद्वितीयत्वें जी उत्तम, श्रेष्ठ अशी जिंदगी, सत्वांश, सत्य पदार्थ का वस्तु ती घेऊन टाकून द्यावी, वाळावी, बगळावी, सोडावी, टाकावी, वर्ज्य करावी का पर्वा न करावी जसें हें असें, कसें म्हणावें तर जसें का रत्न तें आपल्या हातीं घेऊन त्या रत्नास दूषण द्यावें, त्या रत्नावर ठपका ठेवावा, त्या रत्नास दोष द्यावा, किंवा अहो कुमारिका, कन्यका, कुंवारीण, पुत्री, दहा वर्षांची मुलगी कन्या ती पसंत करण्यास पाठविली आहे ती (रत्नच म्हणावी का) भेटून, मानून, तपासून, पाहून, सवरून म्हणावे होत आहे कीं, अहो, ही अशी तर बुवा कांहीं मनांत भरत नाहीं, मनास पसंत पडत नाहीं, मनाच्या पसंतीस उतरत नाही. [कानीन=(कन्या) डोळ्यांतल्या बाहुलीसंबंधीं. कनीनी=डोळ्यांतली बाहुली.] (६४३)

त्याविश्वरूपा–'ईश्वरा'–येवढी दशा, स्थिति, अवस्था रूपाची होतां होतां, अहो! तेथें प्रियकरपण का प्राति ही वाढ (पोक्त, वृद्ध, थोर, उदय, वृद्धि) होऊन असलेली होते. असेंच तें पढविणेच्या उपदेशाचें महत्व देवांनीं अर्जुनास दिलें, एवढेंच नव्हे तर अहो, तेथें श्रीदेवांनीं ह्या अर्जुनाला अतिशय मोठा असा, अगदीं शेलका असा उपदेशाचा पढ भाग (वांटा, हिस्साच) दिलेला होय. देवांनी आपल्या मधील जें उपदेशाचें [म्हणउनी विसुरा काइ येणे। ईश्वर आकळावा कवणे। जो आपले मान नेणे। आपणचि॥ १७४ (५)] उत्तमत्व तेंच तें विश्वरूप होय व तेंच त्यांनीं अर्जुनाच्या पैं किरीटी तूं मातें। नेणसी ना निरुतें। जरी तो गा जी मी येथें। तें विश्वची होय॥ ६३–(१०).] हातीं दिलें. तेथें विश्वाबद्दलची प्रीति केवढी तरी वाढ घेऊन असलेली होते तें कांहीं सांगतां येत नाहीं व हाच 'उपदेश'. (६४४)

अहो! सोन्याची एक मोठी लगड आहे, ती तोडून अथवा मोडून तिचे आपल्या इच्छेप्रमाणें अलंकार केले, घडले व ते अलंकार ह्या जीवास आवडेनासे झाले तर पुन्हां सोनें आटवावें लागतें–तेथें सोनेंच मग नुसतें एक तेथें ना आवड हौस, ना लेणें ना जीवदशेस काय आवडतें तें विचारणें जसें. (६४५)

त्याप्रमाणें प्रीतीनेंच का प्रेमानेंच शिष्यत्व पत्करलें तेथें आकर्षत्व कृष्णत्व– कर्ता करविता असा परमात्मा (कर्ता–येथ ईश्वर एक कर्ता। ऐसें मानले जरी चिंता आणि तोचि मी हे स्वभावता। आधीची असे॥ ८४॥ अध्याय ३ रा.)—होता ते विश्वरूप (जीवित सुवर्ण अलंकाराचे केलें तें) केलें व मग तें जर मनास येईना तर पुन्हां तें कृष्णासच (शरीरधारीपणासच–तामसास–संसारिकतेसच) आणिले जसें.

सत्व तें सत्वच, कृष्णत्व तें कृष्णत्वच निखळ तेथें आकर्षयति असौ त्यानें सर्व जीवित वालभ प्रीतीच आकर्षिली व ती विश्वरूपास–वल्लभत्वास–आणिली–येथें ती प्रीति ह्या मनास जर आवडेना तर पुन्हां परत तेथें एक कृष्णपणच (दासीपण, मनपण, देहधारीपण) ते जसें नुसतें, सत्व, प्रियत्व, मसिपत्रत्व, प्रियपण तें पणास लावणें, तेथें सत्व तें सत्वच पण सत्वपण तें जेव्हां सत्वानें होईल तेव्हांच तेथें सत्वच एक; तसें कृष्णत्व हें निखळ चिदानंदाचें, तेथें तें कृष्णपण, (माया, अज्ञान) हें नुसतें विशेषणाचें झालेलें तें जेव्हां कृष्णत्वास (सुचित्व) येईल तेव्हांच तेथें तीं चिदानंदाची अवस्था का दशा उगवणारी. (६४६)

हा म्हणजे एक ठाय का ठावच जेव्हां तेव्हां त्या शिष्याचा कस पाहाण्याकरतां–सत्व घेण्याकरितां शिष्याच्या विषयीं का शिष्याची विष विषयीं–निकस–का कस–तेथें जशी का एक मागें लागलेली पिरपिर–किर किर का जिकीर ह्या (शिष्याच्याविषीं–शिष्याच्या विषयीं) अशी ही किर किर सहन करणारे (साहाती) गुरु कुठें आहेत; कवणिये–कवणे, कोणत्या देशी आहेत! अशा त्या ज्या बोलीमध्यें असलेले असे ते गुरु कसे असणार! ते पुरतें होणारें असें, तेथें आवडच एक आवडून घेतली ती कशी तें कांहीं सांगतां येत नाहीं असें संजय म्हणाला–म्हणता झाला. (६४७)

**श्लोक ५० वा**

**संजय उवाच :—**

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥**

इति=याप्रमाणें. तथा उक्त्वा=तसें (बोलून) म्हणून त्याप्रमाणें तात्काळ. **भूयः स्वकं रूपं** दर्शयामास=स्वत:चें आपलें रूप पुन्हः दाखविता झाला. एवं भीतम् आश्वासयामास=भ्यायलेल्यास आश्वासन दिलें–स्थिर केलें. पुन्हः सौम्य वपुः महात्मा भूत्वा=पुन्हां सौम्य वपु असा महात्मा (आत्मा महा) होऊन.

अन्वय :—

वासुदेवः। अर्जुनम् इति उक्त्वा। भूयः स्वकं रूपं दर्शयामास। तथा। पुनः सौम्य वपुः भूत्वाः च। महात्मा। भीतं एनं आश्वासयामास ॥ ५० ॥

अर्थ :—

**संजय म्हणाला** :— भगवान श्रीकृष्णांनीं याप्रमाणें बोलून त्यांनीं तात्काळ पुन्हः तें आपलें पूर्वीचें विश्वरूप–स्वरूप दाखविलें. उदार आत्मा आहे ज्याचा असा तो श्रीकृष्ण त्यांनीं पुन्हः सौम्य रूप घेऊन –धारण करून त्या भ्यायलेल्या अर्जुनास आश्वासन देऊन शांत–स्थिर केलें ॥ ५० ॥

(श्लोक ५०वा, ओवी ६४८ ते ६८८)

**संजय उवाच—इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः)**
**मग विश्व व्यापुनि भोंवते (भगवंते)।' जे दिव्य योग तेज (योग ते) प्रगटले होते।**
**तेचि सामावले मागुतें। श्रीकृष्णरूपी तिये ॥ ६४८ ॥**
**जैसे 'त्वं' पद आघवे। तत्पदी सामावे।**
**अथवा द्रुमाकारू जेवि सांठवे। बीज कणिके माजी ॥ ६४९ ॥**
**नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा। गिळी चेइली जीवदशा।**
**श्रीकृष्णें योग हा तैसा उपसंहारिला ॥ ६५० ॥**
**जैसी प्रभा हारपली बिंबीं। का जळद संपदा नभी।**
**(नाना) भरिते सिंधु गर्भी। रिगाले राया ॥ ६५१ ॥**
**हो कां जे श्रीकृष्णाकृतीचिया मोडी। होती विश्वरूप पटाची घडी।**
**ते अर्जुनाचिया आवडी। उकलुनि दाविली ॥ ६५२ ॥**
**ते तु प्रमाण रंग। तेणे देखिला साविया चांग।**
**तेथे ग्राहक (ग्राहकिये) नव्हे (चि) लाग। म्हणोनि घडी केली पुढती ॥ ६५३ ॥**
**(भूत्वा पुनः सौम्य वपुः महात्मा)**
**तैसे वाढीचेनि बहुवसपणें। रूपे विश्व जिंतिले जेणे।**
**ते सौम्य कोडीसवाणें। साकार जाले ॥ ६५४ ॥**
**किंबहुना श्री अनंते। धरिले धाकुटपण मागुते।**
**(आश्वासयामास च भीतमेनम्) परी आश्वासिले पार्थाते। बिहालयासी ॥ ६५५ ॥**
**जो स्वप्नि स्वर्गासि गेला। तो अवसांत जैसा चेइला।**
**तैसा विस्मय जाला। किरीटीसी ॥ ६५६ ॥**

नातरी गुरुकृपेसवे । वोसरलेया प्रपंचज्ञान आघवे ।
स्फुरे तत्व तेवि पांडवे । श्रीमूर्ति देखिली ॥ ६५७ ॥
तया पार्था ऐसें चित्ती । आड विश्वरूपाची जवनिक होती ।
ते फिटोनी गेली परौती । हे भले जाले ॥ ६५८ ॥
काइ काळाते जिणोती आला । कीं महावात मागे सांडिला ।
आपुला बाही तरला । साते सिंधू ॥ ६५९ ॥
ऐसा संतोष बहुचित्ते । घेईजेत असे पांडुसुते ।
विश्वरूपा पाठी श्रीकृष्णाते । देखोनियां ॥ ६६० ॥
(स्पष्ट गद्य) मग सूर्याच्या अस्तमानी । मागुती तारा उघडती (उगवती) गगनी ।
तैसा देखो लागला लोचनी । (अवनी) लोके (लोका) सहित ॥ ६६१ ॥
पाहे तंव तेचि कुरुक्षेत्र । तैसेचि देखे दोहीं भार्गी गोत्र ।
वीर वर्षताति शस्त्रास्त्र । संघाटावरी ॥ ६६२ ॥
तया बाणयाच्या मांडवा आंतु । तैसाचि रथ आहे निवांतु ।
धुरे बैसला श्रीलक्ष्मीकांतु । आपण तळीं ॥ ६६३ ॥
एवं मागील (मागितले) जैसे तैसे । तेणे देखिले वीर विलासे ।
मग म्हणें जियालो ऐसे । जाले आतां ॥ ६६४ ॥
बुद्धिते सांडुनि ज्ञान । भेणे वळघले रान ।
अहंकारेसी मन । देशधडी जाले ॥ ६६५ ॥
इंद्रिय प्रवृत्ति भुलली । वाचा (वाचकपण) प्राणा चुकली ।
ऐसी आपांपरी होती जाली । शरीर ग्रामी ॥ ६६६ ॥
तिये आघवीचि माघौती । जिवंते भेटली प्रकृति ।
आतां जिताणे इया श्रीमूर्ती । जाले मिया ॥ ६६७ ॥

भोंवते = सभोंवार, पूर्णत्वेंकरून, समंततः, चोहींकडे. भगवत् = परमेश्वर, ऐश्वर्यवान्, श्रीमंत. दिव्य = स्वर्गीय, सुंदर, तेजस्वी, देवाचें. योग ते = अनेक योगसंबंध, संयोग, भेटणें, जीवात्मा परमात्मा संयोग, चित्तानुरोध, परिणाम. योग तेज = जीवशिव ऐक्य–जीवात्मा परमात्मा संयोग, कांति, अग्नि. सामावले = मुरले. (६४८) त्वंपद = जीवदशा. जगद्रूप तत्पदी = ब्रह्मरूपी. सामावे = एकरूपाचे, एकजीव होते. द्रुमाकारू–द्रुकारू (द्रु = (१) धांवणे, सत्कार करणें, पाझरणें, पीडा करणें, (२) वृक्ष. (३) गमंन.) बीज = चतुरतेचें बी. कणिके माजी जेवि = बारीक कण, वैरणे जे. (कणिका = कण, सूक्ष्मांश. कणिश = धान्याचे कणिस. कणित = कण्हणें) बीं सूक्ष्मांशामध्यें असें. (६४९) संभ्रम = घोटाळा. चेइली = जागृत झालेली. हा योग–योग हा. उपसंहारिला [(= समाप्तीचा केला, सारांशाच्या संग्रहाचा केला. संहरिला = एकत्र केला, जबरदस्तीनें घेतला, सारांशाचा, एकीचा केला.] –संहारिला. (६५०) जळद संपत्ति = मेघमाळा. भरिते–नाना भरते. सिंधु गर्भी = सिंधूच्या आंतील भागीं. (६५१) मोडी = आकाराच्या डौलांत, आकृतींत. (६५२) तंतुप्रमाण रंग–तव (पोत) परिमाणु का (वा) रंग = लांबी रुंदी व पोत रंग पाहिल्यावरही. देखिला–देखिले (पा. भे.) साविया = सहज. ग्राहक नव्हे लाग–ग्राहकिये नव्हेचि लाग = गिऱ्हाईकास माल न पटल्यामुळें, मार्ग आक्रमणें लागाबांध्याचें तें न सांपडल्यामुळें. (६५३) रूपें = वाढीनें रूप ते बहु–एकोऽहं-बहुस्याम्–होण्यानें सौम्य = सुंदर, शांत, साधु. साकार=आकार असलेला. (६५४) श्रीअनंते=ब्रह्म, आकाश, विष्णु, बळराम–शेष–निस्सीम अपार, चौदा गांठींचा हातांत बांधण्याचा रेशमी दोराः बिहालयासी–बिहा-

लियासी = भ्यायलेल्यास. (६५५) अवसांत = अकस्मात (६५६) वोसरलेया = लय पावल्यावर. श्रीमूर्ति=शरीर, प्रतिमा मूर्तिमंत, शरीरधारी, भौतिक (श्री = ऐश्वर्यशाली, कीर्तीमान) (६५७) पार्था–पाण्डवा. जवनिक –जवनिका = पडदा (६५८) आपला–आपुलिया. तरला–उतरला. सातै–सातही. (६५९) सूर्याच्या –सूर्याचिया. उघडती–उगवती. लोचनी–अवनी. लोके–लोका. (६६१) संघाटवरी–संघटवरी. (पा.मे.) शस्त्रास्त्र = शस्त्रांचा उपयोग, क्षात्रकर्म. (६६२) बाणांचया–बाणांचिया. आहे–देखे. आपणा–आपण. (६६३) मागील–मागितलें. म्हणे–म्हणें जी. जाले–जाहाले. (६६४) सांडूनि–संडोनि होते. वळघले = वेंधले, घेतले, आश्रय केले होते. होते देशधडी = दूर देशाचे झाले होते. (६६५) इंद्रिय प्रवृत्ति भुलली = (इंद्रिय वर्ग तो) ज्ञानाचे किंवा कर्माचे साधन ते, प्रपंच मार्ग, मनाचा कल, प्रयत्न, प्रघातास भुलले होते. वाचा–(वाचकपणा बोलणें) प्राणा–प्राणासि (पा. मे.) चुकली = मुकली. अपांपरी = दुर्दशा, अव्यवस्था, शरीर ग्रामी = देहगांवीं. (६६६) माघौती–मागुती. जीवते–जी–वंते, जिवंते, जिवंत. मेटली प्रकृति–मेटली तिये प्रकृति. (पा. मे.) जिताणे–जीवन. जाहालो मिया इया = आतां सांप्रत ह्या श्रीमूर्तीस मीच की जीवन होऊन आहे, जिताणे, जीवन झालों आहे कीं. (६६७)

नंतर सर्व विश्व व्यापून सभोंवार असलेले जे अनेक दिव्य योग–तेज प्रगट झालें होतें, तेंच पुन्हां त्या श्रीकृष्णरूपांमध्यें सामावते झाले, मुरून–सांठविले गेले. (६४८)

ज्याप्रमाणें त्वंपद म्हणजे जीवदशा किंवा जगत् रूप हें आघवें त्या 'तत्पदी' म्हणजे ब्रह्मरूपामध्यें सामावलें जातें, किंवा द्रुम आकार हा जसा बीज–कणिकेमध्यें सांठविला होतो–सांठवून असतो, 'द्रुङ्' मात्र जे का 'द्र' कार हा सांठवे जेवीं बीजी बी मध्यें एकजीवतेनें का समरसतेनें असतो; तेथें नैसर्गिक चातुर्यच तें कसें !!! (६४९)

किंवा स्वप्नाचा विस्तार हा जसा जागें झाल्यानंतर जीवदशा ही तो गिळून असते, त्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं तो विश्वरूपाचा योग आपल्यांतच आटोपून घेतला, आवरिला, सामाविला, उपसंहारिला, संहरिला. (६५०)

हे राया ! जसा सभोंवार पसरलेला प्रकाश हा बिंबाबरोबरच जातो का बिंबांतच हारपतो; का मेघ हे गगनांतच लय पावतात; अथवा सरिता–भरणी–नद्यांचें भरते ओघ हे सिंधुगर्भांत व्यासांत मिळून जातात, रिघतात. (६५१)

अथवा असेंही म्हणूं कीं जी कांहीं ह्या श्रीकृष्ण आकृतींत–कृतींत–आकारांत–डौलांत म्हणजे मोडीमध्यें त्या विश्वरूपवस्त्राची –(पटाची) घडी होती ती अर्जुनाच्या प्रेमामुळें (–अर्जुन हा श्रीकृष्णाचा अतिशय आवडता असल्यामुळें प्रेमानें) श्रीकृष्णांनीं उघडून दाखविली. (६५२)

एकतंतुप्रमाण असाच तेथचा रंग, तो त्यानें सहजच बोलानें पाहिला. पण ग्राहक व ग्राहकि यांना माल न पटल्यामुळें पुन्हां त्या वस्त्राची घडीच केली. अहो एक परिमाणुचि तेथें, तेथिलची लांबी, रुंदी व पोत, रंग हा सहज चांगुलपणानें पाहिला पण खरीददारास किंवा गिऱ्हाईकास माल न पटल्यामुळें, मन मिळणी न झाल्यामुळें किंवा तेथें ग्राहक सांठवण का कारण व गिऱ्हाईक यांचें न जमल्यामुळें पावलाच्या चिन्हावरून जाण्याचा मार्ग न सांपडल्यामुळें, लागाबांधा सोयरेसंबंधधर्मी, समर्थपण मज ईश्वराला हात घालणें, तेथें समर्थपण का उदार भाव तो कसा ते योग्यतेचें होईल किंवा काय ही शंकाच (जी ती त्यांना समजेचना) म्हणून पुन्हः त्याची घडीच केली पुन्हः जसे होते तसेंच त्यांनीं करून ठेविली–त्याची घडी केली. (६५३)

त्याप्रमाणें 'वाढीचेनि बहुवसपणें रूपें' एकाचे अनेक झाले, तेथें पोक्तपण, थोरपण अथवा अनेकत्वामुळें वृद्धि पावलेलें तें रूप–त्या रूपानें सर्व विश्व आपलेंसें केलें; – सर्व विश्वावर जय मिळविला; असें ते गोजिरवाणें, लहान व सुंदर असे साकारतेचे जाहाले. (६५४)

अहो! येथें आपण असेंही म्हणूं कीं, श्रीअनंतांनीं आपले थोरपणाचें तें रूप पुन्हः लहान केलें व त्यांनीं धाकुटपणच धरिलें; पण येथें त्यांनीं त्या भ्यालेल्या अर्जुनास आश्वासन दिलें, त्यास धीर देऊन स्वस्थ केलें. (६५५)

जसा एकादा स्वप्नामध्येंच स्वर्गास जावा, तेथील अद्‌भुतपण का आश्चर्य त्यानें पाहावें, पण अकस्मात पुन्हः तो जागा झाल्यानें जसें पाहिलेलें सर्व आश्चर्यच एक, तसें आतां ह्या अर्जुनास झालें, त्यास अतिविस्मय वाटला. (६५६)

किंवा गुरुकृपेनें अवघें जें प्रपंचज्ञान तेंच मुळीं वोसरावें व फक्त तत्त्व जें तेवढेंच स्फुरत असलेलें, त्याप्रमाणें श्रीमूर्ति म्हणजेच जेथें सर्व प्रपंचज्ञान हें लयाचें–झालेलें होतें व एक जें तत्व तेंच किंवा जिच्यामुळें स्फुरत असलेलें स्फुरून असणारें होतें ते ती श्रीमूर्ति होय. (६५७)

पार्थास आतां असें वाटूं लागलें कीं, त्याच्या चित्ताच्या व विश्वरूपाच्या आड किंवा मध्यें–जो कांहीं एक पडदा होता, तोच आतां बाजूस झाला, हें बरें झालें!

विश्वरूपाच्या वेगरूपानें जी कांहीं एक कनात किंवा पडदा त्याच्या चित्ताच्या आड होता, तो आतां फिटून गेला, नाहींसा झाला, बाजूस झाला. (निऱ्या केलेलें धोतर जसें विस्कटलें जावें का फेडिलें जावें) तसें त्याच्या चित्तास आतां झालें. (६५८)

अहो! काय सांगावें कीं जो महा काळासही जिंकून आला आहे, किंवा महावातही मागें टाकून जो त्यावर स्वार झाला आहे, का जो आपल्या बांहूनींच मुळीं सातही समुद्र तरून गेला–उतरून गेला आहे! (६५९)

तसें अशा तऱ्हेचा संतोष जेथें चित्त हें अतिशयतेचें महत्व घेऊन आहे, बहुपण घेऊन आहे, बौहे, बह्वी अशी बहु उच्चितता तेथें बौहर चित्ताचा संतोषच एक; विश्वरूपदर्शनानंतर श्रीकृष्णास पाहून अर्जुनाच्या ठायींच अर्जुनाचें चित्त हें मोठें झालें, सर्व संतोषाचें झालें, तेथें सर्व संततेचा ओघच–बहुचित्त तें सत्‌वचन–सत्य वचन, हें बहुवचनास आलें, जसें–सत्‌ हेंच मोठें झालें, तेथें सर्व संतोषाचा अंजन अलंकार शोभूं लागला जसा. (६६०)

तेथें मग त्यास हा लोक कसा दिसूं लागला म्हणावा तर जसा का सूर्याच्या अस्तमानानंतर गगनामधील तारका ह्या उघडल्या जातात का उगवल्या होतात, त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यांमध्येंच त्यास ही पृथ्वी–अवनी का तिन्हीं लोकांसहित दिसूं लागली. (६६१)

तो जों जों पाहूं लागला, तों तों त्यास तेंच कुरुक्षेत्र दिसूं लागलें, तसेंच दोन्हीं बाजूंस उभे असलेले ते त्याचे गोत्रज दिसूं लागले व युद्ध ते अनेक वीरांच्या शस्त्रास्त्रांच्या (समुदायावर) समुदायानें वर्षाव्याचें होत आहे कीं! (६६२)

त्या बाणांच्या मांडवामध्यें का खालीं तसाच देवांचा रथ त्यानें स्थिर असा पाहिला. तेथें श्रीलक्ष्मीकांत ज्यांनीं सर्व जबाबदारीचा भार अंगावर घेतला आहे असे ते–हे धुरेवर बसलेले (पुढें बसलेले) त्यानें पाहिले, व आपण जमीनीवर उभा असलेला— (६६३)

**अर्जुन म्हणाला आतां शरीरग्रामींच्या दुर्दशेंतून जगलों वांचलों कीं! असें मजला झालें आहे.**

याप्रमाणें पूर्वींचा जो कांहीं युद्धप्रसंगाचा देखावा तो जसाच्या तसाच त्या वीरानें (वीरत्व हेंच ज्याचे विलास) पाहिला व आतां तो म्हणूं लागला कीं, जी अहो! जियालों! जियालों! असेंच मजला होऊन आहे! आतां मात्र मी जगलों! वांचलों असें मजला होऊन आहे! (६६४)

अहो ज्ञान-सत्पात्रता हिनेंच मुळीं बुद्धीस सांडिलें होतें – (उलंघिलें–कलंडिलें होतें) व त्यामुळें तिनें रानच एक आपलेंसें केलें होतें – ती रानींच की वेंधली गेली होती – (तिनें रानच घेतलें जसें असें झालें होतें) रानाचा असाच सर्वथैव आश्रय तिनें केला होता व त्यामुळें ह्या मनानें अहंकाराचें होऊन ते देशधडीच जसे झालेले होऊन होते (ते देशाच्या अंतिम टोंकाच्या प्रदेशास गेले होते) ते दिगंतरींचे झाले होते–दूरच्या देशांस गेले होते. (६६५)

इंद्रियें भुलल्यामुळें त्यांनां प्रवृत्ति नीटशी समजेना, समजत नव्हती; वाचा ही प्राणास धरून बोलणें करीत नव्हती; प्राणास धरून वाचकपण ते न केल्यामुळें बोलणें हें नेहमीं चुकतच होतें; अशी दुर्दशा का अव्यवस्था (का लाथाळी) ह्या शरीरग्रामामध्यें होऊन चुकली होती. (६६६)

अशी ती आघवीं इंद्रियें तीं आतां ह्या विश्वरूपाच्या दर्शनानें जशीं का मागुती पुन्हां जिवंत झाली, सजीव, सचेत अशीच ती ह्या आपआपल्या प्रकृतीस भेटली, म्हणून काय सांगावें अहो कीं, अशा ह्या श्रीमूर्तीस तर मी एक जीवनच होऊन आहे. ही प्रकृति आतां जशी का जीवनच एक त्या श्रीमूर्तीस झालें.

**'आतां उभेपां उभेपण नाहीं साचे'**

जिवंत अशा जिवंतपणास जिवंतपणच नाहीं, शरीर उभें असतांना भान नाहीं तेथें आतां पडल्याचें भय काय–असी ती जीवनकळाच एक.

('श्रीमूर्ति=श्रीगुरुकृपेमुळें सर्व प्रपंचज्ञान वोसरून जाऊन फक्त तत्वच जें एक स्फुरणें तेथें आतां श्रीमूर्तीच ती एक अशी तेथें मी तर त्या मूर्तीस जीवनाधाराचा झालों आहें.') (६६७)

**श्लोक ५१वा :—**

**अर्जुन उवाचः—**

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

जनार्दन इदं तव सौम्यं मानुषं रूपं दृष्ट्वा=हे जनार्दना, तुमचें हें सौम्य मनुष्य रूप पाहून. इदानीम् अहं संवृत्तः सचेताः प्रकृतिंगतः अस्मि=मी आतां वृत्तीवर आलों आहें–माझें चित्त ठिकाणावर आलें आहे व मी आपल्या मूळच्या प्रकृतीसच स्वभावास आलों आहें.

अन्वय—जनार्दन! तव इदं सौम्यं मानुषं रूपं दृष्ट्वा इदानीम्। प्रकृतिं गतः। संवृत्तः। सचेताः। अस्मि ॥ ५१ ॥

अर्थ :—हे जनार्दना! तुमचें हें सौम्य मनुष्यरूप पाहिल्यामुळें आतां मी वृत्तीवर आलों आहें–चित्त ठिकाणीं येऊन आहे व मी मूळच्या शरीरावस्थेस आलों आहें. प्रकृतीचा का तबियतीचा मी आतां होऊन आहें. ॥ ५१ ॥ (श्लोक ५१ वा, ओव्या ६६८–६७६)

**ऐसे सुख जीवी घेतले। (दृष्ट्वेदं मानुषं रूपं) मग श्रीकृष्णाते जी म्हणितले।**
**म्या तुमचे रूप देखिले। मानुष्य हे ॥ ६६८ ॥**
**(तव सौम्यं जनार्दन) हें रूप दाखवणें देवराया। की मज अपत्या चुकलिया।**
**बुझावोनि तुवां माया। स्तनपान दीधलें ॥ ६६९ ॥**

**(इदानीमस्मि संवृतः)**
**जी विश्वरूपाचिया सागरीं। होता तरंगु मवित वावेवरी।**
**तो इये निजमूर्तीच्या तिरीं। रिघालों आतां ॥ ६७० ॥**
**ऐक द्वारकापुर सुहाडा। मज सुकतेया जी झाडा।**
**हे भेटी नव्हे बहुडा। मेघाचा केला ॥ ६७१ ॥**
**जी सावियाचि तृषा फुटला। तया मज अमृत सिंधु भेटला।**
**आतां जिणेया फिटला। अभरंवसा ॥ ६७२ ॥**
**माझिया हृदय-भुवनीं (रंगणी)। होत आहे हर्षलतांची लावणी।**
**सुखेसी बुझावणी। जाली मज ॥ ६७३ ॥**
**(श्रीभगवानुवाच) यया पार्थाचिया बोला सवें। हे काई गा म्हणितले देवें।**
**तुवां प्रेम ठेवुनि यावें। विश्वरूपी कीं ॥ ६७४ ॥**
**मग इये श्रीमूर्ती। भेटावें सडीया आईती।**
**ते सिकवण सुभद्रापति। विसरलासि मा ॥ ६७५ ॥**
**आगा आदळया अर्जुना। हाता आलिया मेरूहि होय साना।**
**ऐसा आथी जी मना। चुकीचा भावो ॥ ६७६ ॥**
**[अवचटे हाता आलिया। मेरूही होय साना।**
**ऐसा आथि या मना। कुस्वभाव ॥ ६७६ ॥ पा. मे.]**

म्यां–मिया. मानुष्य–मानुषु (६६८) अपत्या चुकलिया=मायेमध्यें चुकलिया, वाट हरवलेल्या मुलाला. बुझाउनि–बुझावोनि=समजावून. स्तनपान दिधलें मायिक ते तो वाळवून आपण स्तनपान प्रेमाचे तें दिधलें असें हें माझें वचन बोलणें कांहीं शृंगारिक आहे, असें नाहीं. (६६९) विश्वरूपा–विश्वरूपास–विश्वरूपाचिया. होता (असता) – होतो. मवित=मोजित. वावेवरी=हातांनीं लाटा फोडीत होतों; जसें वीतींनीं गगन मोजावें तसें. यिये–इये. निजमूर्ति=सप्तज्ञान भूमिकामधील जी सहावी भूमिका तेथीलची ती निदिध्यासनाची पायरीच्या तीरींच पोहोंचलों, रिगालों, शिरलों. (६७०) ऐके–आईके. द्वारकापुर=द्वारका. सुहाडा=मित्रा, मज सुकतेया झाडा मेघाचा बहुडा केला=हे द्वारकेंत राहाणाऱ्या जिवलग मित्रा, वीरश्रेष्ठा ! हें विश्वरूपदर्शन नव्हे तर मज सुकून जाणाऱ्या झाडावर मेघाचा वर्षाव जसा झाला. (६७१)

असें तें 'जेथें तत्वच एक स्फूरणारें व जेथें सर्व प्रपंचज्ञान वोसरून आहे,' सुख हें जीवींचें केलें व मग अर्जुनानें श्रीकृष्णास म्हटलें, अहो, जी आतां मी तुमचें मनुष्यरूप देखिलें, पाहिलें. (६६८)

अहो जी देवराया ! असें हें आपलें रूप मजला आपण दाखविणें तें कसें झालें आहे म्हणाल तर सांगतो की तें जसें का मज चुकलेल्या अपत्यास, लहान बालकास–त्याला–आपल्या आईची गांठ घालून दिलीत व स्तनपानच तेथें झालें जसें.

किंवा मज चुकलेल्या मुलास ही मायाच समजावून दिलीत व आतां तेथें स्तनपानाकरितां भुकेलेला हा जीव त्यास स्तनपान मिळाल्यामुळें तो आतां आईबाप भेटल्यामुळें समाधान पावून आहे. [करावेंसें वाटे जीवा स्तनपान। नोहे हें वचन शृंगारिक. (तुका) ]

अहो, जी देवराया ! त्या आपल्या विश्वरूपाच्या सागरामध्यें ह्या जीविताच्या लाटाच मुळीं आपल्या हातांनीं फोडित होतों, वावरीत वहिवाटीत होतों–मोजीत होतों तो आतां त्या सागरांतून ह्या श्रीमूर्तीच्या का निजमूर्तीच्या तीरास लागलों आहें, व आतां येथें ही निजमूर्तीच मुळीं सर्व आधार होऊन आहे. (६७०)

